| | | | |
|---|---|---|---|
| नदुपरिआलो | श्री | म,द्रा[1]माप्रतिविप्रवेषधरकाल ॥ सत्कारुनियांत्यानें, कायत्मणेंवांछितोसिनरपाल[2]॥ ७ | ७८ |
| विप्रत्मणेरघु | रा | या. मं[3]त्रेंकसवाअसाअसेकामे॥ ऐकेलनोवधावा, अरिहोईलबंधुमित्रसुतभाम[4]॥ ७ | ७९ |
| रघुवीरत्यास | म | यी, द्वारींसौमित्रिठेविलात्राणी ॥ वाणीश्रवणागस्कन्[5], वध्यनकोणीअसोत्मणेप्राणी॥ ७ | १८० |
| मगएकांतीहि | ज | तो, रामासित्मणेत्रिलोकजनकामी ॥ ब्रह्म[7]निदेशेंआलौ, कालतत्पा[8]दपद्मनतिकामी॥ ७ | ८१ |
| त्रिभुवननिर्म | य | केलें, स्वलवपिलेधर्मेरक्षिलेंसर्वे॥ शर्वमनोधामातूं, कसनरूचैहिनाशिलेंगर्वे॥ ७ | ८२ |
| [10]संसृतिसिंधुत | रा | या, भक्ता[11]सिदिलीस्वकीर्तिसन्तरणी॥ तरणिविभे[12]दुनिगेले, जेंजालेलच्छ[13]रेनिकृतेरणी॥ ७ | ८३ |
| आनोनूसकला[14] | म | र, मुकुरमणेयैस्वकीयधामातें॥ ऐसेंतुजविनवाया, पाठविलेंकंज[15]जेंबुधामातें॥ ७ | ८४ |
| दृष्ट्यादिकालक | ज | ज, व[16]चनेंजौंलोकबंधुलाभार्थी॥ तोंदुर्वासाआलो, द्वारींरघुनाथदर्शना[17]कार्थी॥ ७ | ८५ |
| [18]ज्वलितधनंज | य | वर्चो, दुर्वासावंदिलासुमित्राजें[19]॥ अवलोकिलेंमुनीचें, तेजनसाहे[12]क्षणार्धमित्रोजें॥ ७ | ८६ |
| वदरैतवोंथ[20] | ज | न्मा, कोठेंमीपानलोपहायाला ॥ ऐसेंपुसोनिघडवी, रघुनाथा[21]ज्ञाविलोपहायाला॥ ७ | ८७ |
| सौमित्रित्मणेका | य | स्वामीआज्ञाअसेमलाकळवा ॥ एकांतींनृपआहे, अवकाशद्विजेंदयानिधेंपळवा॥ ७ | ८८ |
| ऐसेंपरिसुनि | रा | गें, विप्रत्मणेरेंमलाभलाअनयो[22]॥ दुर्वासाआलाहे, जाणुनिमानेंत्मणोलकायनयो॥ ७ | ८९ |
| कोटेंहीवारण | म | ज, नाहींघडलेंपरंतुनूंकेलें॥ भाग्यमदानेंतुमचें, ज्ञानमलावारतेंलयांगेलें[23]॥ ७ ७ | १९० |

१मूर्ख २राम ३मसलत ४मेहूणा ५आपणश्रवणापराधकर्ता ६वधासयोग्य ७ब्रह्मदेवाज्ञा ८तत्पदकमलनमनेच्छु ९शिक्षमनयहजार्चे(हेरामा) १०संसारसमुद्रअ सुनौका १२सूर्य १३तुटलेले १४हेदेवमेघा १५ब्रह्मदेव १६ब्रह्मवचन १७रामदर्शनान्नेच्छु १८मदीप्तापिकांति १९लक्ष्मणें २०तुझाज्येष्ठबंधु(राम) २१रामाज्ञेचेउल्लंघन २२नीतिहीना २३नाश ॥ इतिश्रीमंत्ररामायणेउत्तरकांडेत्रिंशोमंत्रः ३०

| | | | |
|---|---|---|---|
| हरिहरइंद्र[1] | श्री | द, ब्रह्मार्कयमेंदुवन्हिमुखमानें ॥ प्रत्युद्गमनें[2]पूजिजेति, हेंश्रुतनाहींचेकायरामानें ॥ ७ | ९१ |
| तरणिकुळींचे | रा | जे, दशरथपर्यंतदेखिलेसारे ॥ परिहादुर्नयकोठें, नव्हतातोंओडिलातेंकेसारे ॥ ७ | ९२ |
| मार्गींगमनेंच | म | लों, आलोंभेटावयास्वयेंपरतों ॥ राघवदर्शननेघें, लक्ष्मणनौकोपानलाटथापरतों ॥ ७ | ९३ |
| आलादुर्वासादि | ज | हेंसलरसांगजाउभाआहे ॥ किंवातापसकोप, [4]ज्वलनाचेंवीर्येंलक्ष्मणापाहें ॥ ७ | ९४ |
| ऐसेंऐकुनिन[5] | य | पडु, सौमित्रिह्मणेमनींस्वनाशघडो ॥ परिमुनिकोपा[4]ग्निमुखीं, शल[6]भासमसर्वलोकहानपडो ॥ ७ | ९५ |
| वंदुनिकोपंप | रा | ला, गेलारामासमीपसहजें ॥ द्वारीचेंनृपतीतें, सांगेंअत्यतशीघ्रतोंहजें ॥ ७ | ९६ |
| रूनकार्यंकाल | म | गतो, गेलारामाचियापदींनमुनी ॥ मप्रुनें[10]समर्चिलाबहु, दुर्वासासत[11]पोनदीनमुनी ॥ ७ | ९७ |
| विप्रह्मणेमीतु | ज | ला, आलोंसेहेंकरोनिदिस्वाया ॥ द[12]शशतवर्षेंतप[13]लों, क्षुधितअसेंदिव्यअन्नदेखाया ॥ ७ | ९८ |
| भोजनकरुनि | य | [14]थागत, मुनिगेला[15]षड्रसाशनें[16]धाला ॥ मगलक्ष्मणाशिपाहुनि, आलेंबहुदुःखसत्य[17]संधाला ॥ ७ | ९९ |
| वंदुनियांआ[18]ग्र | ज | पदे, सौमित्रिह्मणेरघूत्तमाराया ॥ सत्यप्रतिज्ञहोतूं, चिंतानकरीमनानेमाराया ॥ ७ | ४०० |
| होतोविधि[19]नेंप्रि[20] | य | जो, व[21]ध्यपरित्यागनोंविवधगाचा ॥ त्यागउनिरामेंकेला, त्याकाळींत्यागबंधुरायाचा ॥ ७ | १ |
| मगशरयूती | रा | तें, गेलाबंदूनिरामरायासी ॥ धरिलासंकल्पमनीं, सौमित्रीनेंस्वरामरायासी ॥ ७ | २ |
| करुनिप्राणाया | म | त्यजिलेंशरयू[22]तरांगरींकाय ॥ स्वर्ग[23]प्रयाणकेलें, श्री[24]शाशालाअशाक्यहेंकाय ॥ ७ | ३ |

१ विष्णु शिवेंद्र कुबेर ब्रह्मदेव सूर्य यम चंद्राग्न्यादि २ सामोरें येणें ३ सूर्यवंश ४ तपस्वी क्रोधाग्नि ५ नीतितत्व ६ पतंगतुल्य ७ रागिट दुर्वास ८ सुंदर वागणें जाचें ९ वर्तमान १० पूजिला ११ मुनतपः समुद्र १२ हजार वर्षें १३ तपकेलें १४ आल्यामार्गें १५ सुभोजनें १६ तृप्त झाला १७ सत्यप्रतिज्ञ १८ रामपद १९ दैवें २० इष्ट आप्त २१ वधयोग्य २२ शरयू नदीं २३ स्वर्गगमन २४ विष्णुचा अंश इ० मं० ठ० का० एकत्रिंशो मन्त्रः ३१

| | | | |
|---|---|---|---|
| लक्ष्मणविरहें | श्री | मान्, स्वर्गमनाचा धरूनियां काम ॥ राज्य करावें त्यणनों, भरतें वंदूनि वारिला राम ॥ ७ | ४ |
| कुशनामकुमा | रा | तें, कोसलदेशांत अर्पिलें राज्य ॥ उत्तरकोसलविषयीं स्वामित्व लवासही दिल्हें प्राज्य ॥ ७ | ५ |
| होतां स्वर्गमन | म | ना, करिती येऊनियां प्रजा नमना ॥ त्यणतीं नाकीं गमना, करितां आह्मासि नें विपच्छमना ॥ ७ | ६ |
| नेइन सकळ | ज | नाला, ऐसें सांगोनि तोषविप्रकृती ॥ ते व्हां जयजयशब्दें, करिती अत्यंत घोषविप्रकृती ॥ ७ | ७ |
| करूनि विनिश्च | य | ऐसा, शत्रुघ्नाळाहि आणवायाला ॥ पाठविलें चारमलें, जालें हें त्यनें आणवायाला ॥ ७ | ८ |
| हें सकळ हि चा | रा | स्यें, एकुनि शत्रुघ्न घाबरा जाला ॥ रामवियोगें काहीं, वाटे नां देह हा बरा जाला ॥ ७ | ९ |
| मग झडकर | म | थुरेचें, सुबाहुला राज्य अर्पिलें तातें ॥ वैदिश नगरीं स्थापी, श्रुतसेनातें कनिष्ठ पोतातें ॥ ७ | ४१० |
| स्थापुनि तनुजे | ज | वानें, आला रामासमीप वाळकसा ॥ सोडावा सुज्ञाहीं, संसार धरूनि विश्वपाळक सा ॥ ७ | ११ |
| सुग्रीवें सविन | य | तो, अंगद अभिषेचिला गुणग्राम ॥ रामप्लवंगजनासह, साकेतीं वंदिला स्वविश्राम ॥ ७ | १२ |
| राक्षसजनरा | ज | हि तो, आला तेथें बिभीषण त्वरितें ॥ रघुपति नामोच्चारण, शब्दाहीं मूढ लोक उद्धरितें ॥ ७ | १३ |
| राम त्यणे निर्भ | य | तूं, यावें चंद्रार्क भूमदीय कथा ॥ तोंवरि बिभीषणा हें, राज्य करावें धरूनि साधुपथा ॥ ७ | १४ |
| मंत्र तमला स्म | रा | वें, विषयाचा सेवनासि विसरावें ॥ सज्जनपदां भजावें, बिभीषणा आपुल्या पुरा जावें ॥ ७ | १५ |
| हें सांगुनि सप्रे | म | प्रभुनें आलिंगुनी त्यणे प्राज्ञा ॥ गा मज उगा उगा गा, गावां जा जाहली तुला आज्ञा ॥ ७ | १६ |

+ स्वर्गगमन १ इच्छा २ उत्तरकोसलदेश ३ बहु ४ स्वर्गगमनी चित्त जावें ५ स्वर्ग ६ संकट निवारका ७ प्रजा ८ गर्जना ९ कुशाळ १० दूत ११ दूतमूर्ते १२ नाम कपुत्र १३ शत्रुघ्न १४ नाम १५ कनिष्ठ पुत्र १६ पुत्र १७ वेग १८ राम १९ गुणी २० वानरासह २१ उद्धार करितें २२ जोंपर्यंत २३ चंद्रसूर्य पृथ्वी माझी कथा २४ तोंपर्यंत २५ सुमार्ग २६ नगरास

इ० मं० उ० कां० द्वात्रिंशोमंत्रः ३२

| | | | | |
|---|---|---|---|---|
| समजाउनियां | श्री | शें, पाठविला राक्षसेंद्र लंकेला ॥ मग आलिंगुनि मारुति, धन्य प्रभुनें जगत्रयीं केला ॥ ७ | ७ | १७ |
| वातकुमारा वी | रां, | जों वर राहेल है कथा माझी ॥ तुं चिरंजीव असें तावत्सद्भक्तिचा पथा माजी ॥ ७ | ७ | १८ |
| संततमी तुज | म | ध्यें, तूंही बा वर्ततो समज माजी ॥ नाहीं वियोग काहीं, सत्योक्ति बरी मनीं समजे माजी ॥ ७ | ७ | १९ |
| ऐसें वदतां अं | ज | लि, जोडुनि विसरोंन कौस्तुभ्णें मातें ॥ जातां श्रीरामातें, मारुति बहुधा करी प्रणामातें ॥ ७ | ७ | ४२० |
| तेजांचवर्षाव | यं | हीं, ऋक्षाधिप सांत्विला परिष्वंगें ॥ संगें त्या चा जाली, अमृतानें क्षाळिलीं तशीं अंगें ॥ ७ | ७ | २१ |
| वीरां तूं या लोकीं, | रा | हें चिंतांतरीं मला स्मरत ॥ कलिचा प्रवेश समयीं, स्वपदीं होसील सर्वथा निरत ॥ ७ | ७ | २२ |
| अश्रुपुता क्षतो | म | गे, विभुला वंदूनि ऋक्षपति गेला ॥ तेव्हां देवाचें पद गमलें ज्यालें चिकायं गंगेला ॥ ७ | ७ | २३ |
| कुशनामें तनु | ज | रामें, कुशावती ळा ससैन्य पाठविला ॥ पावितनगरी लालव, धाडुनि निजलोक शोक अ टविला ॥ ७ | | २४ |
| सज्जनसमुदा | य | युत, श्रीशरयुचा तटासि विभु गेला ॥ नौत्रिदशांहीं नाना, वाद्यध्वनि पुष्पवृष्टि सहें केला ॥ ७ | | २५ |
| राघव करुणा | ज | ळधर, अवलोकुनियां प्रसन्न कवणाहीं ॥ नाकमयु रम्य बहु, नाचति जां ला त्रितापभय नाहीं ॥ ७ | | २६ |
| हरविधिशक्र | य | मोर्यम, विधुवसुवरुणाग्निसर्पगंधर्वें ॥ चारणकिन्नरसिद्ध. त्रिदशर्षिसमाज पातले सर्वें ॥ ७ | | २७ |
| नाचति वराप्स | रा | बहु. गाती गंधर्व वाजती वाद्यें ॥ आरंभिलें प्रयाणें. स्वर्गासि जसें समस्त देवाद्यें ॥ ७ | ७ | २८ |
| श्रीगोप्रतारना | म | क. शरयूतीर्थीं प्रजेसवें राम ॥ स्नान करुनियां गेलो, स्वस्थाना पूर्णकाम सुखधामें ॥ ७ | ७ | ४२९ |

१ राम २ बिभीषण ३ मारुति ४ मार्गी ५ रोनहात ६ अनेकवेळ ७ नमन ८ जांबवन्नामा ९ आस्वलपति १० आलिंगन ११ भिजविली १२ चिनात १३ अश्रुपूर्णनेत्र १४ जांबवान् १५ पुत्र १६ नामेंनगरी १७ साधुसह १८ देव १९ अनेकवाद्यप्रकार २० दयामेघ २१ मत्कचमार २२ अध्यात्मादितापभय २३ शिवब्रह्मेंद्रयमसूर्यचंद्रादी २४ देवयोनिविशेष २५ देवर्षिसमूह २६ गमन २७ पूर्णमनोरथ २८ सुखस्थान इतीश्रीमन्त्रार्यारामायणेमयूरेश्वरविरचितेउत्तरकांडेत्रयस्त्रिंशमत्र २३ सपूर्णोयंग्रंथः

श्रीमंत्ररामायणरत्नमाला॥समर्पिलीश्रीरघुसत्तमाळा॥प्रसादकंठींप्रभुसेवकाहीं॥ध्यावानसेंभूषणअन्यकाही॥१॥वाल्मीकिवि
प्रोत्तमकाव्यपद्मे॥श्रीरामलीलामकरंदसद्मे॥नेथेंमयूरेश्वरभृंगजाला॥सेवावयानित्य सुखेंरसाला॥२॥रामाचेंरचिलेंचरित्रमुनि
नेंवाल्मीकिनेंसंस्कृतीं॥नाहींहानिकदापिअन्यकविहींनेंवर्णितांप्राकृतीं॥मुक्तांचारचिलाचिहारवहिलाऔरींरिमाचागुणें॥तोंका
र्पासगुणेंकरूनिकरिनांकायप्रभेलाउणें॥३॥केलेंपात्रसुवर्णाचें॥ कींविरूपशिरवापरी॥ लाविनांतेथसंह्मारीं॥तमदीपशीखापरी॥
४॥खळनिंदितित्म्हणुनिबुधेंद्रा कावीकायहरिगुणासक्ती ॥ दीरनणराजाचें साध्वीनत्यागितीसुपतिभक्ती॥५॥श्रीवाल्मीकिप्र
भृतिमुनिहीं वर्णिलीरामलीला॥ मादृक्षाहींमुदितहृदयेंकायगावेंनतीला॥६॥श्रीकंठेंद्राद्यमरपरिषत्सेव्यगंगाप्रवाहीं॥संध्यास्ना
नादिकनकरणेंकायग्रामानवाहीं॥७॥अलंकारेंयुक्तारघुपतीकथाशोभतअसे॥अलंकारेंहीनाजरीत्म्हणनिकोणीनवीलसे॥कु-
नाभ्यंगस्नानांकनकमणिभूषाविरहिता॥विराजेसिंदुरेंधवलवसनेंभूपवनिता॥८॥सचेतकैरवांतेंविकचकरिजगत्तापसंपूर्णटाळी॥
अज्ञानध्वांतसारेंहरिरसिकचकोरासिंअत्यंतपाळी॥नानावस्तुप्रकाशीकविहृदयपयोराशिसंतोषहेतु॥काव्येंदुस्वप्रभेनेंखळ-
विरहिजनांहोतसेंधूमकेतु॥९॥विशुद्धस्वांतालारुचतिगुणपीयूषसमजे॥परीत्यानेंदुष्टस्वमनिंविषऐसेंचिसमजे॥घृतेंसीरेंहोतीं
प्रमुदितमखोनिर्जररवरें॥परीतेंहीतापप्रदरसजयालाज्वरभरे॥१०॥जालेजैनृतभास्वत्कुलतिलकरघूत्तंसलिलारसानें॥सारा
सारज्ञसाधुस्वमनिंअमृतहीमानितीफारसानें॥पीयुषेंसोदरेंदुस्सयहिनहरिलात्मागिलेंहीपित्याला॥राहूचाघातकेलाविषसह
जनिलाकाणसेवीलत्याला॥११॥गीर्वाणेंराघवाचेंयशरसिकजनालागतेंफारमिष्ट॥तेंसेंनप्राकृतानेंअचतुरम्हणतीमानितीनें

१कापसाच्यासुतानें २मादृशासारख्यानीं ३शिवइंद्रादिदेवसभासेव्यगंगोरकांत ४साधुचित्तरूपचंद्रविकासिकमळ + विकसित ५अज्ञानांधकार ६कविहृदयसमुद्रानंदकारक ७काव्यरूपचंद्र ८शुद्धचित्त ९यज्ञ १०देव ११सूर्यकुलतिलकरामकथारस १२अमृत १३विषासहउत्पन्नझालेलें १४ संस्कृत

नशिंद्दे ॥ पीतांगोसीरंकांतस्वेरमणिन्चषकें देतसेंजेविंगोडी ॥ सारज्ञालोंपलाशद्रुमदलपुटकें सेवितोतेंनसोडी ॥ १२ ॥ असेंहोती देवप्रमुदितशची नायकवनींतसेंसारज्ञातें बुधजनमयूरेशाकवनी ॥ महाराष्ट्रग्रंथींरशिक कविजें तेंचरमती ॥ परंतुह्यात्याचीपळ हिंनअसावीचरेमती ॥ १३ ॥ माजीसत्कृनिंदूषिलीजरिखळें उच्छृंखलें आग्रहें सेवावीचपरंतुनित्यरसिकें हेंसद्गुणाचागृहें ॥ चंडा ळें त्रिदशापगेतवमलाकींधेनुलास्पर्शला ॥ त्यांचेंश्रोत्रियदेवसेव्यपयहीत्याहींसदानिर्मला ॥ १५ ॥ इतिविद्वत्प्रार्थना ॥ ७

१ गाईचेंदूध २ सुवर्णाचारत्नखचितपेला ३ पळसाचापानाचाद्रोण ४ गोडी ५ इंद्राचाबागेत ६ चंचल ७ गंगा ८ ओकळा ९ अग्निहोत्रीवदेवयांसमान्य १० दूध-पाणी

हाग्रंथ·

कृष्णा शास्त्रीगुर्जरयाणीस्वपरहितार्थरा॰ गणपतकृष्णाजीयांचेछापखान्यांत छापून

प्रसिद्धकेलाअसे·

सुज्ञाहींदोषअसतीलतेक्षमाकरावे

शके १७८९ रौद्रनामसंवत्सरे

वैशाखशुध्द ११ मंगळवार

संन १८६७

नाशिकमे

# मोरोपंतकृत मात्रारामायण[*].

अजित प्रभु[1] विधिवचनें त्रिजगत्पीडक[2] दशास्य[3] माराया
होय चतुर्मूर्तिधर[4] श्रीदशरथपुत्र भक्त ताराया 1
आदिपुरुष देव धरी जीं तातें सविधि ठेविलीं नामें
तीं राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न असीं सुखवर्धिंचीं[5] धामें 2
इष्टार्थ[6] गाधिसुत[7] ने अस्त्रें ज्ञात दे मखघ्न[8]-अरि खपवी
पावे स्व पराभवकर- राक्षस-नाशें उदंड हरिख पर्वी[10] 3
ईश्वर[11] मुनिभार्येतें[12] चरण-रजें उद्धरी करी धन्या
हरधनु[13] चुरि जनकाच्या कौशिक चवघांसि देववी कन्या 4
उग्रा भार्गवरामा प्रभु दावुनि बाहु-बळ करी शांत
पितृसत्यरक्षणें शुचि यश जोडाया निघे रमाकांत 5
ऊर्ध्वगति[14] तया राजा[15] सुत-शोकें देह सांडितां घडली
राज्यश्री भरताच्या मनुवर्षें[16] प्रभुमतें गळां पडली 6
ऋषि सर्व भरद्वाज- प्रमुख प्रभु हर्षवी पदं नमुनी
सानुज[17] सदार[18] हर्षें बहु वर्षे तापसाश्रमीं क्रमुनी 7
एक दिवससा सरला बहु काळ तपोधनाश्रमीं हर्षें
पितृसख जटायु भिजवी पृथु-शीर्ष[19] प्रेमजाश्रुच्या[20] वर्षे 8
ऐश्वर्यातें कौतुकें[21] झाकुनि गोदावरी-तटीं राहे
दशमुख भगिनी[22]-घ्राण- छेदन खर-सैन्य-नाशही साहे 9
ओस पडाया स्वकुळ स्वर्ण-हरिण दाखवी मन भ्रमवी
श्री[23] हरि[24] जटायु-पक्ष छेदी दशकंठ तापसां श्रमवी 10

---

[*] अपासून ज्ञपर्यंत जे वर्ण आहेत त्यांस छंदशास्त्रामध्यें मात्रा असें म्हणतात. त्या मात्रा अनुक्रमानें आर्यांचे आरंभीं योजिल्या आहेत म्हणून "मात्रारामायण" असें नांव दिलें आहे.

1 विष्णु. 2 स्वर्ग, मृत्यु, पाताळ यांस पीडा करणारा. 3 रावण. 4 चार देह धरणारा. 5 सुखवृद्धींचीं. 6 यज्ञरक्षणार्थ. 7 विश्वामित्र. 8 यज्ञविध्वंस करणारे शत्रु. 9 आनंद. 10 यज्ञ. 11 राम. 12 अहल्येतें. 13 महादेवाचें धनुष्य. 14 स्वर्गवास. 15 दशरथाला. 16 चवदा वर्षें. 17 लक्ष्मणासह. 18 सीतेसह. 19 पुत्रवत् जो राम त्याचें मस्तक. 20 आनंदाश्रूंच्या. 21 कौतुकें. 22 शूर्पनखेच्या नासिकेचें छेदन. 23 लक्ष्मी (सीता) 24 हरण करी. + ऋ, ऌ, ॡ, त्या वर्णाचे शब्द नसल्यामुळें ह्या वर्णांच्या आर्या नाहींत. तसेंच पुढें ञ, ङ, आणि ळ यांच्याही नाहींत.

औषध भवरोगाचें ज्याचें यश तो पुसे खग-मृगातें
कोठें प्राणसखी हे लीला तारावया करि जगातें ११
अंकीं जटायुचें घे शिर रावण-कर्म कथुनि तो मेला
दे त्या पिंडोदक परि तच्छोकें दीनबंधु कोमेला १२
अस्त्रें शस्त्रें प्रार्थिति परि धैर्य धरी चरित्र वाढाया
प्रभु जाय पुढें सुरमुनि- हृद्गत दशवक्त्र-शल्य काढाया १३
कवळी कबंध राक्षस भक्षाया जो तयाहि दे सुगती
ऐसें नसोनि गर्वें आपणचि प्रभु म्हणोनि कां फुगती १४
खगपास विराधाला तेविं कबंधाहि उद्धरी मग ती
भक्ता शबरी प्रेमें प्रभुला पूजुनि वरील कां न गती १५
गहिंवरला पंपेच्या तीरीं श्रीनें स्मरोनियां राम
पवन-सुताचा आधीं मग पुरवी भानु-सूनुचा काम १६
घनदुरभिमान जो त्या शक्रसुता वाळिला वधी राज्य
सुग्रीवास कपांचें देउनि जगदीश दे सुख प्राज्य १७
चर सर्वत्र प्रेषी श्री शोधाया सुकंठ परि शोध
अग्रेज जटायुचा कथि लंघी जलधीस वात-सुत योध १८
छळुनि सुरसेसि मारी छायाग्रह सिंहिका पुरी पाहे
त्या श्रीस अशोकवनीं देखूनि उगाचि पादपीं राहे १९
जड दशमुख ये रात्रीं मन्महिषी हो म्हणे गत-व्रीड
धिक्कारी प्रभुभार्या त्यासि तयाची न ती धरी भीड २०.
झडपी मारुनि न तया आज्ञा प्रभुची नसे म्हणोनीच
स्वमनांत म्हणे म्हणतो हें आयुः शेष तो म्हणो नीच २१

---

१ म्लान झाला. २ रावणरूप कांटा. ३ नामविशेष. ४ मारुतीचा. ५ सुग्रीवाचा. ६ पुष्कळ. ७ सीता. ८ सुग्रीव. ९ ज्येष्ठ बंधु (संपाति) १० मारुती. ११ योद्धा. १२ नामविशेष (राक्षसी) ही नागमाता (जीस देवांनीं मारुतीची परीक्षा पहाण्याकरितां पाठविली होतीनी) १३ नामविशेष राक्षसी. १४ लंका. १५ हत्ती. ** जटायूस. * दृढ असा दुष्ट अभिमान. + आकाशमार्गानें जाणाऱ्यांची छाया ग्रहण करणारी (सिंहिकेचें विशेषण) ^ दूर. ० गेली आहे लज्जा ज्याची. (निर्लज्ज)

टपकरि[1] मागें घेउनि गेली स्त्री त्या दशानना क्षुद्रा[2]
मग एकांतीं प्रभुची स्तुति करुनि श्रीस नमुनि दे मुद्रा २२
ठकवी सबळा अक्षा[3] वधुनि रणीं घननिरवा[4] महामाया
ब्रम्हास्त्रा सांपडला काळमुखीं ही न योग्य हा माया[5] २३
डसुनि भुजंग कधीं तरि गरुडाला म्हणवितील हो काय
पेटवितां पुच्छ[6] उडे जाळी लंकापुरी महाकाय २४
ढळवुनि पर-धृति-नग[7] ये प्रभुला वंदुनि विलोकिली देवी
ऐसें सांगुनि चूडा‡-मणिसह मस्तक पदीं पुन्हा ठेवी २५
ण पुढें मागें रा ज्या तो ×गंध कपीस भेटला वानी
मानी बहु सिंधु-नदा गेला घेऊनि कीश[8] सेनानी[9] २६
नस बिभीषण झाला स्वाग्रज-दोषाऽग्निनें[10] शरण आला
त्याला लंका प्रभु दे कोण कवि न सद्यशोमृतें+ धाला २७
थरथर सागर कांपे मागे पारासि[11] जावया सेतु
नळ कपि करू धरिन मी होइल अघ-मग्न-मुक्तिला[12] हेतु २८
द#नुजारि सेतु करवी श्रीला दावी दशास्य चाप-शिरें
सरमा[13] कथी कपट हें मोहांत न तूं धरूनि ताप शिरें× २९
धनदोऽनुजासि ✶स्कंगल प्रथमचि भुजगासि गरुडसा झडपी
अंगद साम कर म्हणे परि हिन बोधामृता न तो जडे[15] पी ३०
नर वानर तुच्छ म्हणे दारुण रण करुनि भंग तो पावे
देवांश कपि प्रभुच्या तेजें कां काळमे न कोपावे ३१
पवनाशन-पाशांनीं[16] घनरव करि बद्ध सानुजा देवां[17]
दे वायुजादिकां भय ये स्वर्गपति[18] सोडवी करी सेवा ३२
फळ पावे पापाचें पर कीं घटकर्ण काळमाहि मरे

---

१ त्वरित. २ नीचा. ३ नामविशेष (रावणपुत्र) ४ इंद्रजितास. ५ सामाथयास. ६ खेदार्थी. ७ शत्रूचा धैर्यरूप पर्वत. ८ वानर. ९ सेनापति. १० रावणाच्या दोषरूप अग्नीनें. ११ तीरास. १२ पातकांत जे बुडाले त्यांच्या मुक्तीला कारण. १३ नामविशेष (बिभीषणस्त्री) १४ रावणास. १५ मूर्ख. १६ नागपाशांनीं. १७ रामास. १८ गरुड. + सत्-यश-अमृत-उत्तमयशरूप अमृतानें ‡ शिरोरत्नासह. × मेघाकर्णी. ✶ रावण. # राम. ❋ सुग्रीव.

कोण म्हणेल अशांता विग्रह[1] दावाग्नि[2] साम वा हिम[3] रे ३३
बहु विकळ करी घन[4]रव सबळा सकळा सलक्ष्मणा रामा
आणी औषधि शिखर[5]चि उठवि सकळ वात-पुत्र ये कामा ३४
भय दे माना सीता वधूनि बिभीषण तया भ्रमा वारी
मग लक्ष्मण घननादा+ मायावि[6]वरा महाखळा मारी ३५
मरतां सर्व दशानन सीता मारावया धरि असीतें[7]
त्यां[8] सचिव सुपार्श्व म्हणे जरि हातीं मारिसी तरि असीतें ३६
यत्न करी परनाशा बहु बळें[9] खपतां स्वयें अति क्रुद्ध
सौमित्रिस शक्तीनें भूतळिं पाडी करी असें युद्ध ३७
रक्षी प्रभु अनुजातें उठवी मारुति पुन्हा तया शिखरें
अमृतस्वादि छत्रचि तो निववि हरुनि उन्हा तयासि खरें ३८
लक्ष्मी-पति शक्र-रथीं बसुनि अहोरात्र सम करी युद्ध
शत-मस्तक खंडुनि वधि सूर्य-वरें होय यश जगीं शुद्ध ३९
वर्षुनि पुष्पें प्रभुतें वर्णिति जय नारद प्रमुख गाती
अति धवला कीर्ति शिवा लोपवि कवळून हंस-खगा ती ४०
शतमख[10] उठवी वानर दिव्य करी श्री[11] पिताहि[12] दे भेट
प्रभु-यश भवार्णवीं हें सेतु न नौका तसें नव्हे बेट. ४१.
षण्मुख[13]-जनक-सखाचें पुष्पकनामक विमान या वाहे
प्रभु त्यातें बैसोनि । श्रीसे त्यां[14] घरिवल कौतुकें पाहे ४२
स सकळ-बिभीषण प्रभु निज-जय मारुति-मुखें प्रथम कळवी
मग सानुज भरतातें भेटुनि तत्ताप सकळही पळवी ४३
हर्षवि राजा होउनि भरता सकळा बिभीषणा राम
मारुतिस भव्य वर दे पूर्ण करी सर्व-भक्त-जन-काम ४४

---

१ वैर. २ वणवा. ३ थंडी. ४ इंद्रजित. ५ द्रोणागिरि. ६ मायावी जे त्यांमध्यें श्रेष्ठ अशा (इंद्रजिताचें विशेषण.) ७ खड्गातें. ८ रावणाला. ९ सैन्य. १० इंद्र. ११ सीता. १२ दशरथही. १३ षट्-मुख-जनक-सख- कार्तिकस्वामीचा जो बाप महादेव त्याच्या मित्राचें (कुबेराचें) १४ शोभायमान सेतु आदिक सर्व. + इंद्रजितास.

क्षयकर विप्रांचा जो त्या रुयेणानें अरिघ्न ही मारी
भरत वधी कोटित्रय गंधर्व प्रभु असा जगा तारी ४५
ज्ञेंहि अज्ञेंहि जन तारी नामें कामादि शत्रुही मारी
स्वयशें भव-भय वारी करि भक्त-मयूर-घन-दया भारी ४६

**समाप्त.**

## मंत्रमयरामायण.

श्रीमान् राजशिरोमणि दशरथ जो निजयशें बरा महित
द्विजसेवक यज्ञनिरत जन-भय-हर्ता धरानिका महित १
श्रीशांहरा बहुमत तो त्याच्या ग्रांजलयशस्करा महिला
जननी चक्रज पायस- पानें करि दे स्वरवा बरा महिला २
श्रीराम ज्येष्ठ तनुज भरत यशोनिधि खरा कुमारमणी
लक्ष्मण शत्रुघ्न जया नय-जयरुचि जसि हरा उमा रमणी ३
श्रीराम प्रभु गाधिज- यज्ञाऽवन राक्षसांसि मथुनि करी
मुनि जय जय म्हणती जें गौतमदारा महाघराशि हरी ४
श्रीगलशरासन मथुनि जय करुनि धरा-मनोव्यथा हरिली
जनकयजनाऽयतनजा राजसभासद हरूनियां वरिली ५
श्रीकंठशिष्य राम द्विजसत्तम अति यशा खळविराम
त्याच्या जगनी पाळ- क्षत्रियजनलयमदा पळवि राम ६

१ नामविशेष (राक्षस) २ शत्रुघ्न. ३ ज्ञानीही. ४ अज्ञानीही. ५ पूज्य. ६ यज्ञाविषयीं तत्पर ७ पृथ्वीला अत्यंत कल्याण रूप असा. ८ राम ९ स्त्रिया. १० कुमारांमध्यें श्रेष्ठ ११ गाधिज-यज्ञ-अवन-विश्वामित्रानें यज्ञनिरक्षण. १२ गौतम-दारा-महा-अघ-राशि- गौतमऋषीचीस्त्री (अहल्या) तीच्या महत्पापाचा राशि. १३ जनकाच्या यज्ञस्थानापासून झालेली (सीता) १४ भार्गवराम. १५ दुष्टांचा नाशकर्ता. १६ पृथ्वीपालक जे क्षत्रिय त्यांचा नाशकरणाऱ्या गर्वाला. + विष्णुशिवांला. × शब्द यशकारक. ✕ पुत्रप्रसवत्या. ++ शिवधनुष्य.

✱ प्रत्येक आर्येंत त्रयोदशाक्षरी मंत्र साधिला आहे म्हणून "मंत्रमय" असें नांव दिलें आहे.

श्रीकारापासूनियां मकारपर्यंत वर्ण जे तेरा
प्रतिआर्येंत असति ते कविजन हो सूक्ष्म-दृष्टिनें हेरा. १.

श्री[1]रामा मग देतां अज[2]तनय नराधिनाथ वामे[3]गती
घे निजवरद्वय वळें कैकेयी स्वजन[4]नय परार्तमती ७.
श्रीराघवा वनमही निज[+]कार्यभवासि दे दरा न मनीं
धरि जन-हृदय जलरुह- प्रिय धी राज्य त्यजूनियां गमनीं ८
श्रीराज्य त्यजुनि मही सानु[×]ज भूतनय राघव मनांत
सुजनांच्या भय नुरवी स्वभुजद्वय कृतपराक्रम वनांत. ९
श्री[5]श वियोग खरा[6]मय अज[7]-तनय-प्राण हरि नरा[8]मर तो
द्वि[9]जशापान्तलय जसा पिउनि बि[10]लेशयभवा गरा[11] मरतो १०
श्री त्यजि रो[12]ष धरि मनिं जननींना यत्न करि पुरा गमना
परि जनक-यशस्कर जन- हित नयरत न मनिं सानुरागमना ११
श्री[13]सुंदराभ मनोहर ज[14]टिल सुभगकाय गाधिचर मर्मे
भेदी जय पावे द्विज यांनि निरवधि परा[*]ऽभया हरुनि शर्मे[15] १२
श्रीगोदातीराश्रम विप्र जप तप यज्ञ करि परा मथिता
शूर्पनखा-नेजःक्षय जयशाली राक्षसां मरण कथिता १३
श्री[16]स हरि रावण मदें जपुनि यतिमिषें वराचया मरण
जरि अनय कळे करि जन धरि नच भय वधि खरा मदाचि न रण
श्रीवर राक्षस मथितां जटायुला नेय दे खरा म[17]हित .
जनकप्रियसख्य गृध्राहि जग गाय तरीच सदभिराम हित १५.
श्रीश सुराऽत्मतम जरि यज्ञभुगीश्वर हरादिमत न बरी .
तरि भजनप्रिय जन हा स्वाशय कथि राम उद्धरुनि शबरी
श्री[18]दाराहर मर्दुनि मंगळ जगीं करि यशोवराऽमत्र

---

१ राज्यश्री. २ दशरथ. ३ कुटिल बुद्धि. ४ स्वजनाच्या नीतीनं परमदुःखितननीजीची ५ श्री-ईश-वियोग-सीतेचा पति जो राम त्याचा वियोग. ६ खर-आमय-दारुण रोग. ७ दशरथाचे प्राण. ८ नर-अमर-नरेंद्र. ९ द्विज-शाप-आन्त-लय-द्विजशापानें प्राप्त मरण ज्याला. १० सर्पापासून झालेल्या. ११ विषास. १२ क्रोध. १३ शोभायमान् जो मेघ त्यासारखा. १४ जटाधारी. १५ सुखें. १६ जानकीस. १७ पूज्य. १८ लक्ष्मीरूपिणी जी स्त्री (सीता) तीतें हरण करणारा (रावण) + आपल्या पुत्रास. × लक्ष्मणसीतेसह * महारोगाला.

जनि[1]लयजभयमहोर्म्मीं होय धरोजाऽऽरमण[2] रूच्छत्र १७
श्रीखचराऽधिप मरुदा-[3] त्मज शोधुनि होय मी-वरा मते हा
जपुनि यथाबळ भजतां यश येचि म्हणे न राजमणि नत हा
श्रीदैसख[6] पुरार्ति मना नेविं करी जय करावया स्वमन
जनि तरय जलधिकृतभय सेतु+च्ची दुस्तराघसंशमन १९
श्री राज्य नमनमात्रें अनुज मम यथार्थ मानराशि महा
रजनिचर-नायकाऽनुज[7] अर्व्यय[8] पावे वरा वरासि मेहा २०
श्री[10] दाचा खचराऽधम[11] अनुज तनय सोदरादिसहित मरे
नैकेचि जरि नयज्ञ स्वजनप्रिय म्हणति नृपवरा शम रे २१
श्री स्वीकारा मग करि जवन[12] विर्य[13] यान वरुनि नभिं राम
अनुजैं-समय न विलंघी जगदाश्रय सुगुणसंपदभिराम २२
श्री ये पुरा महो[14] जग- दुदयचि राज्याभिषेक[15] मह काळीं
स्वजनीं प्रभुनयन जसें सरतां वय मानुराग मन वाळीं
श्रीदचि पुरामधिल जन सज्ञान सदय खरा पर महर्षी
जलदोदय वनजनयन[16] सर्व मयूरापरी परम हर्षी २४
चोविस-आर्यांनें हें रामायण नाम यासि मंत्रमय
अंतर्गतारि-मारक सार कवि रचिल असें न यंत्र मय १




१ जन्ममरणभयरूप महाउर्म्मींत. २ सीताप्राणवल्लभ (राम) ३ मरुत्-आत्म-ज- वायुपुत्र (मारुती) ४ लक्ष्मीपतीला. ५ मान्य. ६ श्रीद्-सख- कुबेराचा मित्र (शिव)
७ रजनिचर-नायक-अनुज- राक्षसांचा धनी जो रावण त्याचा कनिष्ठ बंधु (बिभीषण)
८ नाशरहितअशा. ९ मोठ्या. १० कुबेराचा. ११ राक्षसांमध्यें अधम (रावण) १२ वेगवा-न्. १३ पुष्पकविमान. १४ महा - जग- उदय १५ राज्याभिषेकरूप उत्साहकाळीं.
१६ वनज-नयन-कमलाक्ष. (राम) ※ चवदा वर्षें संपताच घरीं येईन असी जी भरताशीं प्रति-ज्ञा केली होती ती. + दुस्तर-अघ-संशमन - तरण्यास कठीण जें पाप त्यातें शमविणारा.

राजीवोद्भव[1] विनवी विश्वाऽहित-दशमुखासि माराया
मधुकैटभारि दशरथ- सुत होय त्रिभुवनासि ताराया १
राम प्रभु कौसल्या- सुत कैकेयी-कुमार तो भरत
महित[2] गुण सुमित्राऽऽत्मज लक्ष्मण-शत्रुघ्न-कीर्ति-लाभ-रत २
राजासि राम लक्ष्मण गाधिज[3] मागे स्वयाग रक्षाया
मनुजेंद्र[4] गुरुनिदेशें[5] दे प्रियही प्रणत[6]-भद्र-दक्षा या ३
राहुनि आश्रांत सदा सादर मारुनियां पर[7] महर्षी
मख संरक्षुनि केला श्रीरामें सानुजें परम हर्षा ४
रामा[8] गौतममुनिची हर्षविली पद-रजें हरुनि शापा
मग जनक-पुरीं सीता लीलेनें राघवें चुरुनि चापा ५
राकेशमुखी[9] सीता रामाला तदनुजा तिघी कन्या
महितगुणा दे ऐसें सांगुनि मुनि जाय मैथिला धन्या ६
राजा जनक दशरथा आणुनि सानुज तदीय तनयांतें
मणि कनक भूषिता दे कन्या बहु धन्य म्हणति जन यातें[10] ७
रागें जो हर-कार्मुक- भंगें भार्गव[11] तया करी शांत
मन्यु[12] त्यजुनि म्हणे बा तूं तो जो चुकविता करीशांत[13] ८
राहुविमुक्त* शशीसा दशरथ राजा विशंक[14] धरि तेजा
मन कश्मलांत× बुडतां क्षण म्हणवी व्यसुवि+ बोध करितें ज्या ९
राब[15] गमें इतरांची रामाची पुरजनास कीर्ति सुधा[16]
मधुरत्वादि यश परा न भजे जें काय कामधेनु दुधा १०

---

* पूर्वार्धाच्या आरंभीं रा आणि उत्तरार्धाच्या आरंभीं म याप्रमाणें प्रत्येक आर्येंत रामनाम आहे म्हणून "नामांक" हें नांव दिलें आहे.

१ राजीव-उद्भव-कमलापासून झालेला (ब्रह्मदेव) २ स्तुत्य गुण. ३ विश्वामित्र. ४ मनुज-इंद्र (दशरथ) ५ वसिष्ठाहीनें. ६ नम्रजनांच्या कल्याणाविषयीं दक्ष अशा ७ शत्रू. ८ स्त्री. ९ राका-ईश-मुखी-पौर्णिमेच्या चंद्रासारिखें आहे मुख जीचें. १० जनकानें. ११ परशुराम. १२ क्रोध. १३ करी-ईश-अंत-गजेंद्रनाश. १४ शंकारहित. १५ काकवी. १६ अमृत. * राहूपासून मुक्त झालेला. × मोहांत. + प्राणरहित.

राजासि पुसोनि युधा- जिन्मातुळ ने सहा:नुजा भरता
मतिमाजि विचार असा होय नृपाच्या जगद्धिता[1] भरता[2] ११
राज्यभरोद्वहनोचित[3] सद्गुणसंपन्न राम लोकांस
मत युवराज[4] करावा करिल मुदें[5] पूर्ण हा सदोकांस[6] १२
राजप्रियेसि[7] सांगे सुरदूषितबुद्धि[8] मंथरा दासी
मन हृष्ट[9] कां सपत्नी- सुतराज्यें दीननेसि कीं जासी १३
राघव सपत्नीतें स्वसुता मागोनि राज्य घेच बरें
मन्वब्द[10] राम वरु वन उडवुन भरतीं सपत्न[11] हे चवरें १४
राज्ञी[12] तसेंचि करि ती मागे वर सत्यमादरा अडवी
मधुरतमाहि[13] तिची मति ती झाली लोभदूषिता कडवी १५
राहे यत्न नृपाचा सीता-लक्ष्मण-समेत राम निघे
मतिमान् गुरुवचना:वन[14] सर्वसुरवाधिक असें बरा मनिं घे १६
राहवि अभिषेका ती घे वस्त्रं प्रभुसि वल्कलें[15] ओपी
मग सेवा भरताहुनि मातें प्रभुवर म्हणे दिली सोपी १७
राजासि राम वंदुनि सर्व-गुरुजनांसि जाय उत्साहें
महिषी-गृहासि[16] राजा धरि भय करितील लोक कुत्सा[17] हें १८
राजा सुमंत्र धाडी तो स्वामि-रथीं तिघां जगा वाहे
मरता सर्वहि शोकें प्रभु करुण[18] म्हणोनि सम[19] जन राहे १९
रानट निषाद[20] गुह परि परम प्रेमळ सखा तया भेटे
महदागमें[21] दहनसा वनवासें शोक तन्मनीं पेटे २०
राजीवनयन सा:नुज मागुनि वटवृक्ष-पय जटा बांधी
मस्तक सकपर्द[22] नमें नें न विमोहाल्प साधूची कांधी २१

---

१ जगत्-हित-जगाच्या कल्याणार्थ. २ शिरता ३ राज्य-भार-उद्वहन-उचित-राज्यभार वहाण्याविषयीं योग्य. ४ राजाच्या हाताखालीं कामकरणारा (दिवाण) ५, आनंदानें. ६. सत्-ओक-उत्तमस्थानीं रहाणाऱ्यांस. ७ कैकेयीस. ८ देवांनी बिघडविली बुद्धि जीची असी. ९ हर्षयुक्त. १० मनु-अब्द-चवदा वर्षे. ११ शत्रु. १२ कैकेयीः १३ अत्यंत मधुर. १४ गुरुवचनाचें पालन. १५ वृक्षाच्या साली. १६ स्त्रीगृहास. १७ निंदा. १८ दयाळु. १९ समाण. २० कोळी. २१ महत्-आगम-मोठ्याच्या येण्यानें २२ जटाजूटयुक्त.

राजभजन सचिवा हित न गमे प्रभु उचित जाणवी नरि तें
मन करि विकल गुहाचें जेव्हां जगदीश आणवी तरितें २२
राशि जगद्भव्याची जी गंगा प्रभु तिनें उतरला हो
मग त्या म्हणे गुहातें येतों बा न नव धी स्कतरला हों[४] २३
राज-मख-भरद्वाजा साऽनुज सस्त्रीक राम येऊन
मत्स्यवर जसा डोहा भेटे सानंद होय सेवून २४.
राकानाथ चकोरा राम तसा चित्रकूटवासि जना.
मधु जेविं मक्षिकांच्या मुनिराजीच्या तसाचि होय मना २५
राहे स्कमंत्र भेटे तो महिर्षीच्या भजोनि गेहातें
माहित्ला वियोग नृप दे त्यजुनि म्हणत राम राम देहातें २६.
राखायाचा जातां झालें गोकुळ जसें तसें पुर तें
मरुशोक श्रीगुरुनय- घन जीवन अन्यथा कसें उरतें २७
राघव[१०] सानुज गुरुनें[+] दूत प्रेषूनि शीघ्र आणविला
मन्युद[११] अनर्थहि तिणें हर्षद मानुनि स्कनासि जाणविला २८
राग करी मातेवरि करुनि पित्याची क्रिया निये पूर्ण[१२]
मघव्या[१३] भय दे प्रभुला भेटे व्हाया स्वकाम तो पूर्ण २९
राजासि तोय देउनि समजावी राम ओंक[१२] भरतानें
मधुर वदे मन्त्रिनां जें पूर्ण करी न बा शुभ-रता तें ३०
राहोंदे मज चवदा वर्षें पितृसत्यरक्षणा रानीं
महिमा तुम्हाहि गावा ताताचें वचन- रक्षणारानीं ३१
राष्ट्राऽवनासि मागुनि घे प्रभुच्या पादुका शिरीं वाहे
मरणद समयादर्शन कथुनि सं[**]मावृत्त पुरनिकट राहे ३२

१ नौकेतें. २ जगाच्या कल्याणाची. ३ अत्यंत चंचला. ४ होवो. ५ चंद्र. ६ ऋषिपंक्तीच्या. ७ पृथ्वीला. ८ रक्षणकर्ता. ९ श्रीगुरु जो तोच नीतिरूप-मेघ. १० भरत. ११ क्रोधदायक. १२ शीघ्र. १३ इंद्राला. १४ राष्ट्र-अवन- राज्य रक्षणार्थ. + कैकेयीनें. ** माघारां फिरलेला.

राक्षस[1]-कदनार्थ निघे श्रीरामहि चित्रकूट सोडून
मँह[⁂] बहु देता झाला अत्र्यनुसूयांसि हस्त जोडून ३३
रानीं विराधराक्षस सीतेसि धरी हरी दरी[2]वदन
मत्ता नया मथुनि दे पदरनमितयाहि कुमतिचें सदन ३४
रात्रिंचर-भीति-रहित दंडकवन करुनि हरुनि ताप सजे
मदनांत कसा घाया गति त्यांस कुपथ धरूनि तापस जे ३५
राजा गृध्रांचा जो तातप्रियसख जटायु तो तात.
मग्नचि सुखांत केला हें यश गाते तसेच होतात ३६
राहे गोदातीरीं प्रभु पंचवटींत रचुनि दल[+]शाला
मत्ता रैन्[3]चरी लोभे त्यासि शठनी[4] जेविं अमृतफलशाला ३७
रागें कर्ण घ्राण छेदी लक्ष्मण कृती तिला दंडी
म[5]दिरासृप खर बंधु प्रेरी प्रभुच्या वधास ती चंडी ३८
राक्षस शूर्पणखेचे कैवारी मारितां रणीं दुष्टा
म[6]हदप्रिय दशवदना कळवी ती परम दारुणा रुष्टा[7] ३९
राख स्वकुळ कराया कपट-कनक-मृग निशाचर प्रेषी
मर्त्याशन वरमत्त क्षणदाचर-राज[8] दशमुख द्वेषी ४०
रावण संहाराया श्रीहि कपट-कनक-हरिण-लोभ धरी
मनु[9]-कुल-तिलका प्रार्थी त्यामागें प्रभुहि जाय जेविं हरी ४१
रानांत दूर पळतां प्रभु कपट मृगासि खर[10]-शरें हाणी
मर्म-हत हि हा सीते हा सौमित्रे असी वदे वाणी ४२
राणी प्रभुची वाणी[11] मानुनि भी[12] लक्ष्मणा म्हणे स्वामी
मरणव्यसनीं रक्षीं तुज पत्यंक[13]दान मागतें वामी ४३.

---

१ राक्षसनाशार्थ. २ गुंहसारिखें मुख ज्याचें असा. ३ राक्षसी (शूर्पणखा) ४ कुश्री. ५ मद्य व रक्त पिणारा. ६ महत्-अप्रिय. ७ क्रोधयुक्ता. ८ राक्षसराज. ९ रामाला. १० तीक्ष्णशरानें. ११ वारवाणी. १२ भय. १३ पति-अंक-दान- पतीचें प्राणदान. + पर्णशाला. ⁂ आनंद.

राघव म्हणे सखि रहा स्वस्था भी न रघुसत्तमा पावी.
मथिला बहुधा प्रभुनें तो कनक-कुरंग मत्त मायावी. ४४
राग करी कटु बोले उटजांतुनि घालवी तया आर्या
मधुभित्प्रभुची भार्या सिद्ध कराया सुरांचिया कार्या ४५
रावण तोंचि सदुटजीं शिरुनि हरी श्रीस जड म्हणे आजी
मत्सम मीच जयश्री मेळविली सहज न करितां आजी ४६
राहु सुर-यशो-विधुचा तो खळ केला जटायुनें भग्न
मग तेणेंही प्रनयें पक्ष च्छेदूनि कश्मलीं मग्न ४७
राज-सुता गगन-पथें नेतां लंघूनि ऋष्यमूक नग
मर्कट-पंचक पाहे सोडी ती त्यांत सोत्तरीय नगे ४८
राक्षस लंकेमध्यें रोधी सीता सती अशोक-वनीं
मोणिकीं रस गंगेचा नेघे कथ्येचाचि या असा कवनीं ४९
राम मनुष्य-तनु प्रभु परते मृग वधुनि तों अनुज कथितें
महिजोक्त श्रवण करुनि धांवत उटजासि ये मनें व्यथितें ५०
रामा उटजीं न दिसे हाय म्हणे स्त्रैणसा विलाप करी
मादराक्षि हाय कोठें आहेसि म्हणे बरीच शोक धरी ५१
रानीं हुडकी स्त्रीतें मारुतसा तों जटायुला पाहे
मरणोन्मुखाहि वदवी न दशानन-पाप-कृत्य तें साहे. ५२
राजसखाचें उत्तर- कार्य करुनि पुनरपि प्रिया शोधी
मन वरिचेवरि शोकीं बुडतां लक्ष्मण परोपरी बोधी ५३
राक्षस-कबंध खाया धरि त्या प्रभु दे विमान बैसाया
महिमा श्रीरामाचा अत्यद्भुत विश्वगान ऐसा या ५४

---

१ लक्ष्मण. २ पर्णशालेंतून. ३ मधुदैत्यमारणाऱ्याची (रामाची) ४ सत्-उटज - उत्तम पर्णशालेंत. ५ मुक्त. ६ देवांच्या यशोरूप चंद्राचा. ७ मूर्छेंत. ८ उत्तरीयवस्त्रासह. ९ दागिने. १० मडक्यांत. ११ महिजा-उक्त-सीतेचें भाषण. १२ स्त्रीलंपटसा. १३ जटायूचें. १४ रामाचा. × सीता.

राजीवनयन बसवी    प्रेमें शबरीस भावुक[1] विमानीं
मकरा[2]लय करुणेचा    हा प्रभु या सत्य भावु कवि मानी ५५
राघविलो प्रणत-गृहीं    जो सकळा सिद्धि तो सहाय करी
मर्कट-भल्लूकांनें    चरितें तारावया जगासि हरी    ५६
राजस कपिपति वाळी    स्त्री हरुनि जपे वधावया भ्राता
मत्ता प्रभु-बान उडवि    मित्रीकरुन सुगळ कपि भयाभ्रा त्या ५७
राउ नसी सुगळाची    कुदशा गांग प्रवाहसा राम
मरुदात्मज[3] रविकांत[4]    प्रभु-रवि-संनिधिन्व यासि दे धाम[5] ५८
राज्य कपीन्वें देउनि    सुगळा अग्रज-वधू दिली तारा
मरु[6]दधिप म्हणे प्रभुजी    तुमच्यानि करीं असे किती तारा[7] ५९
राजी सुगळ कपींच्या    धाडी त्यांला न लागला शोध
मरुदात्मजचि यशस्वी    होय न दुसरा जगीं तसा योध    ६०
राय कपींचा सुरसा    छाया-ग्रह ठकवि न धरि शंकेला
मकरालय शतयोजन    उडुनि गरुडसाचि जाय लंकेला    ६१
राम-प्रियेसि मुद्रा    दे वन चारि आहत-कटक ये जथुनी[8]
मथुनि तया पुर जाळी    खळदशवदनासि भाविंं[9] कथुनी ६२
[10]रासभसे पर केले    होउनि उच्चैःश्रवा तसा आला
मणि देवीचा देउनि    बहु मान्य प्रभुसि बान-सुन झाला ६३
[11]राळासा प्रभुपासीं    अग्निपासीं पवन नंदन सुमेरु
मदनारि विभु वंद या    वन्सा दहना पुढें पर उमे रु[12]    ६४
रावणवधार्थ राम    प्रभु अमित[13]-सुरांशा-कपि-बळेंद्र-युत
मकरालयासि पावे    शिव-विधि-शतमख-महर्षि-कोटि-नुत ६५

---

१ भावीक. २ सागर. ३ मरुत्-आत्मज-वायुपुत्र (मारुती) ४ सूर्यकांत. ५ तेज. ६ मरुत्-अधिप-देवांचा-स्वामी (इंद्र). ७ पंक्ति. ८ जमाव करून. ९ भविष्यें. १० गर्दभसे. ११ कणधान्यविशेष (हें धान्य बारिक आहे.) १२ कापूस. १३ असंख्य देवांशा जे वानर त्यांचा नायक जो सुग्रीव तेणें करून युक्त. + रक्षण करा.

राक्ष[1]सराजाऽनुजनि  प्रणत विभीषण पला[2]शे-कुल-राज्य
म[3]धुप म[4]धु जसें कमळीं  राम-पदीं पावला यश प्राज्य ६६
रा[5]शि जळाचा प्रभुच्या  तेजा भी[6] विनवि वा यश तगावें
मज दा[7]म अयुत-योजन-  ही सेतु गमेल काय शत गावें ६७
राक्षस-राज धराया  सत्वर कुळसहित मृत्युची पदवी
मस्तक मनुर्ष्य[8]-पतिचें  दाउनि सीतेसि हो[9] असें वदवी ६८
रा[10]मा विभीषणाची  स[11]रमा माया असें तिला कळवी
मळवी अश्रुभरें जी  मुख देवी तन्मनो[+]व्यथा पळवी ६९
राहुनि अष्ट दिन तटीं  नळकपिला कथुनि सेतुतें करवी
मग सबळ प्रभु उतरे  प्रा[12]ज्य य[13]शोमृत जगत्त्रया भरवी ७०
राजा कपि-कटकांचा  प्रभुतें घेउनि चढे सु[14]वेळनगीं
मत्तीं त्या दुर्गस्थीं  उडुनि पडे श्येन जेविं तुच्छ-खगीं ७१
रागें ताडुनि पाडुनि  शत्रु-मुकुट ये करूनि भुजयुद्ध
महि[15]जा-कांत म्हणे वा  साहस हें या न म्हणति बुध शुद्ध ७२
राक्षस-पुर विभु रोधी  अंगद-वदनें दशानना बोधी
मत्सरि[16]वर अरि परि हरि  करि साम न आचरीच जड तो धी ७३
राभिचर-चार धाडी  भुज झाडुनि चाळिस्कत करी चूर
मथुनि प्रा[17]सादातें  सू[18]र-कुळवराग्नि तो कथी शूर ७४
रागिट वानर ऋक्ष  प्रभुची होतां रणार्थ आज्ञा ते
मलिन निशाचर मथितां  प्रेक्षुनि म्हणती न भान आ ज्ञाते ७५
राहे महामुनींचा  नित्यविधि समाधि समर-यज्ञांत

---

१ राक्षस-राज-अनुजनि-रावणानुज. २ राक्षसांच्या कुलाचें राज्य. ३ भ्रमर. ४ मध ५ समूह (समुद्र) ६ भयपावे. ७ माळा. ८ राजागमाचें. ९ हाय. १० स्त्री. ११ नामविशेष. १२ पुष्कळ. १३ यश-अमृत-कीर्तिरूप अमृत. १४ सुवेळ नामक पर्वतीं. १५ सीतापति (राम) १६ मत्सर करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ. १७ राजवाडयातें. १८ रामचंद्रास. + तन्-मनोव्यथा-सीतेची अंतःकरणसंबंधी व्यथा.

मन लुब्ध जय पराजय    दिसती घटिकेंत सम रथ[1]ज्ञांत ७६
राड रुधिर मांसांची    झाली समरंगणीं मग नदी न
मत्तेभां[2]हि नरेंद्रे    पळति खचर कादिती तग न दीन ७७
राजी[3] सलक्ष्मण प्रभु-    वरविशिखांच्या कबंध-लक्षांचें
मन मोहाया दाविति    नृत्य शनमखादि-युद्ध-दक्षांचें ७८
रावण-भंगें पावे    जो सेनेश प्रहस्त तो मेला
मरतां राक्षस-कटकें    मायावी मेघरव[4] न कोमेला ७९
रावणि अहिपाशांहीं    सौमित्रिस रघुवरासही बांधी
मर्कट-कटकें भंगी    श्रीची होईल न विकळा कांधी ८०
राजा सर्व-खगांचा    धांवुनि ये सख्य संकटीं कळवी
मरुदशनांतें[5] प्रभुच्या    गुण दोषातें जसा तसा पळवी ८१
रावण घटकर्णांतें[6]    कष्टें उठवुनि रिपु-क्षया धाडी
मदिरा-मदांध तो बहु    कपि-वीरांतें रणांगणीं पाडी ८२
रात्रिंचरेश्वराऽनुज[7]    सुग्रीवातें रणीं धरी परते
मर्कट-कटकें भ्यालीं    विजयें घनसेचि गर्जले परं[8] ते ८३
राजा[9] मग सुटुनि हरी    घटकर्ण-घ्राण-कर्ण वेगानें
महती[10] ख्याति करी सुर-    गंधर्वांसहि न वर्णवे गानें ८४
रागें भरे फिरे तो    काळ गमे कपि वधी गिळी सगळे
मर्कट भयें गळाले    पर्वत-शत-वृष्टिनेंहि तो न गळे ८५
राम प्रभु भुज चरण    च्छेदी तरि तो न आवरे अर्हित[11]
मस्तक खंडुनि पाडी    त्यातें करि वीर-मंडळीं महित ८६
राक्षसे[12]-राजाचे जे    बंधु सुत सचिव सहाय ते सर्व
मठ[13] कपटाचे खचले    दाखविते वज्रपाणिला[14] गर्व ८७

---

१ वेगवानांत. २ गजांही. ३ पंक्ति. ४ इंद्रजित्. ५ मरुत्-अशन-सर्पांतें. ६ कुंभकर्णातें. ७ रात्रिंचर-ईश्वर-अनुज (कुंभकर्ण) ८ शत्रु. ९ सुग्रीव. १० मोठी. ११ पूज्य. १२ रावणाचे. १३ गृह. १४ इंद्राला.

रावण त्यांच्या शोकीं जें जें श्रुत सदनुजोक्त आठवितें
मसणाप्रति सल्लंघन स्वकुळाहि महाबळाहि पाठवितें ८८
रावणि धैर्य नया दे गगनांत शिरोनि शस्त्रवृष्टि करी
मनि मोही सर्वांची बुडवी प्रभुही दशा तशीच वरी ८९
राजीवभव-कृताची हृदयांत धरूनि यशःप्रदा वाणी
मरुदात्मज औषधिनग- शृंग पुरहेराद्रि निकटगत आणी ९०
राहे न शल्य-मोह क्षत तद्गंधाऽनिळें कपिबळांत
मनुज-ननु साऽनुज-प्रभु- सह उठले सर्वही भट पळांत ९१
रावण-कृत मायावी सीता मायामयी रची मारी
मग्न करि महाशोकीं साधु बिभीषण तया भ्रमा वारी ९२
रावणि बिभीषणानें युक्ति कथुनि लक्ष्मणासि मारविला
मघव्याला थोडा दे दे विजय कृरांत फार हा रविला ९३
रावण शोकें रववळे धर्वळेतरभा धरूनि करवाळा
महिजा-मथना धांवे वारी त्या बुध कृपार्श्व अरेवाळा ९४
राक्षसबळ चतुरंग प्रभुवरि मथनार्थ पाठवी रागें
मधुभित्पवना त्यांतुनि एकेंहि दिली न पाठ वीरांगें ९५
राख प्रभुशरदहनें केलें बळ-तृण असेंहि परिसून
मदिरांध दुरभिमानी सोडी अज-सूनुर्चा न परि सून ९६
राट क्रोध धरि निघे न गणुनि उत्पात अपशकुन भारी
मरुसख छाया घाली गांठि प्रभुशीं स्कंठ-बळ मारी ९७
राळ करी सर्वांची सौमित्रिस शक्तिनें विकळ पाडी
मर्मी खर-विशिखांहीं त्यातें प्रभु तो भ्रमे असें ताडी ९८
राग अनुपूर्व भगव- द्दास्यीं बहु ज्यासि तो महास्कृती
मरुदाऽत्मज उठवि पुन्हा त्याचि उपायें तया महोस्क कृती ९९

१ सन्-अनुज-उक्त-साधुबिभीषणानें भाषण. २ सन्-लंघन-सांधूंचें लंघन. ३ राजीव-भव-कृत-ब्रह्मदेवाचा पुत्र (नारद) याची. ४ मारुती. ५ द्रोणाचलाचें शिखर. ६ कैलासपर्वताजवळचें. ७ इंद्राला. ८ धवळ-इतर-भा (कृष्णवर्ण) ९ तरवारीला. १० उत्कृष्ट खड्गास. ११ रामरूप वायूस. १२ वीर-अग-वीररूप पर्वतानें १३ दशरथाची. १४ निर्जीव. १५ अनुराग (प्रीति) १६ महाबळ. + सीतेला मारण्यास. ※ राजा. ✻ फजीती

रा[1]ईचा गिरि गिरिची राई करि त्या दशास्य तो काय
महिमा अरिसहि देतो ज्याचा हृदयांत आपले पाय १००
रा[2]जा गीर्[3]वाणांचा रथ दे त्यावरि बसे करी समर
म[+]कर निवटिला जेणें [+]जो कासारीं म्हणे करीस मर १०१
रात्रिदिवस सप्तक रण अत्यद्भुत ज्यांत शत शिरें तुटलीं
मरण तरि न अरि पावे पहिलीं जैशीं तशीं नवीं फुटलीं १०२
रा[5]द्धांत दशमुखाच्या अंताचा तें न होय कोणाही
मरण-भयप्रद झाला जेविं [6]दुखविला स्वगेहकोणाही १०३
राहे साध्वि प्रभु तों रवि[7]त्हृदय अगस्त्य दे जपायास
मथिशिल अरिसि रवि असें वदला बहु न करितां जपायास १०४
राक्षसवरा वधी तो [8]वरविध्यस्त्राभिमंत्रितें बाणें
महिला लोकेशांच्या [9]वांदिति तेव्हां महोत्सवें वाणें १०५
राशि स्व[10]ःपुष्पांचे प्रभुवर करं वर्षले सरी घनसे
म[11]हभर तो करुन विपुळ[12] त्यांत पररसासि लेश रीघ नसे १०६
राक्षस-वध-विजयातें गाती गंधर्व नाचती देवी
मध्य ब्रम्हांडाचा वा[*]द्यस्तव-रव न रिक्त तिळ ठेवी. १०७
रावण-दाहादि सविधि करवूनि पदीं बिभीषण स्थापी
मग दे[13]वी दि[14]व्य करी सयश सत्यादिलोक हें व्यापी १०८
राजा दशरथ भेटे उठवी मृत-रक्ष-कपि-बळें शक्र
मन स्वकवीचें मानी हें सयश अमृत अमृत तें नक्र १०९
राक्षस-राजा करवीं सबळ सकळ पूजवून तत्सहित
महित विमान वरि निघे राम करायासि भरत-वत्स-हित ११०

---

१ मोहरीचा. २ इंद्र. ३ देवाचा. ४ सरोवरांत. ५ सिद्धांत. ६ स्व-गृह-कोण-अहि आपल्या घराच्या कोणास राहणारा सर्प. ७ आदित्यहृदय. ८ वर-विधि-अस्त्र अभिमंत्रित- श्रेष्ठ ब्रम्हास्त्रानें अभिमंत्रित. ९ स्त्रिया. १० स्वर्गपुष्पांचे. ११ उत्सवभर. १२ अगणय १३ सीता. १४ शपथ. + कसर. * वाद्यें आणि स्तुति यांचा ध्व

राजसुतेसि[1] रण-कथा कथुनि प्रभु सेतु दाखवी रमवी
मधुर-वचनें बिभीषण- सुगळ-समागम मना सुधा गमवी १११
राहु जसा चंद्रातें मोह तसा ज्या क्षणा:कुळा कवळी
मनु+नात-मित्र येथें सुगति वरुनि सयशें कुळा धवळी[2] ११२
राजितें× कुसुमविमानीं विरहींचें वृत्त सर्व आयकवी
मधुपिककूजित[3] जैसें प्रभु-भाषण हें म्हणेल काय कवी ११३
रा[4]मगता आधीं हें नाम जिचें तीस घे जग नयानें
मग न सुखी करिता प्रभु गोदेनें पावला गगन यानें ११४
राजीवाक्ष विभु म्हणे सादर गोदावरी-तटीं वसलों
मदिराक्षि नगिंच सप्रिय- जन सुविमानीं कुबेरसा बसलों ११५
राज्ञि अगस्त्याश्रम हा अत्र्याश्रम चित्रकूट नेंघ लोकीं
म[5]हद सदा या गंगा यमुना हा श्रीप्रयाग अवलोकीं ११६
राहे प्रभु प्रयागीं नमुनि भरद्वाजमुनिस तूर्ण[6] पण[7]
मग झाला सिद्ध म्हणे आशीर्वादें तुझ्याचि पूर्ण पण ११७
रात्रि क्रमूनि येथें येइन तूं कुशळ वद गुहा भरता
मरु[8]दात्मजा असें प्रभु सांगे परम स्वदास्यलाभरता ११८
रा[9]धींचा पिक[10]पक्षि- स्वन रसिक-जनासि बहु तया परिस
मधुर मरु[11]ज्ज-रव गुहा मानी जीवातु[12] मूर्त या हरिस ११९
रानट कपि परि गुरुहुनि चंद्राहुनि अधिक वाटला भरता
रान्या:निलाहुनि श्रम- हर रघुपति-भजन-वाट-लाभ-रता
रा[13]कारमण चकोरा तैसा प्रभुवर तया गुहा होय
मग[14] दर्शन दे भरता देतो घन चातका जसें तोय १२१
राजित होय न केवळ साकेत[15]चि बहु निवोनि विश्वाद नें

१ सीतेस. २ शुभ्र करी. ३ वसंत ऋतूंत कोकिळाचें भाषण जसें. ४ तारा. ५ तेजोदायक किंवा उत्साहदायक. ६ त्वरित. ७ प्रतिज्ञा. ८ मरुत्-आत्मज ९ वैशाखींचा. १० कोकिल. ११ मरुत्-ज-रव- वायुपुत्राचा शब्द १२ जीवनौषध. १३ चंद्र. १४ अलंकृत (शोभायुक्त) १५ अयोध्याच ∗ नूतन. + मनु-नात-मित्र-(जटायु) × शोभायमान पुष्पकविमानीं.

मघमथित धवळ कयशें केलें ब्रम्हांडें[1]भांड विश्वहितें १२२
राज्याभिषेक-विधि तो केला वरुनि प्रभूनमें धन्य
मणगट धरुनि दवडिलें भवभय राहेल कोण गे अन्य १२३
राजे कपिगण विभीषण जनकादिक सर्व पूजिले सबेळ[2]
मरुदात्मजा[3] निज यश- श्रवण-वर दिला जसा सुधा-कवळ १२४
राउत उच्चैःश्रवा[4]निचा जो त्याच्या कपिगनिनें जसा अन्य
मनुजेंद्र[5] श्रीराम प्रभुच्या पावे तसा न राजन्य[6] १२५
रागादि-कषाय शमवि यानादिस अमृतरस तुरवि शेष
मनुंजप तसा प्रजाःधिप राम असा स्तविति महिसुर[7] विशेष १२६
राज्य प्रभुचें प्रभुच्या राज्यापरि मत्त लवण गंधर्व
मथनीं त्याच्या गमला शत्रुघ्न तसाचि भरतही शर्व[8] १२७
राष्ट्रचि न राम निवर्षा देउनि धर्मार्थ-काम-मोक्ष मही
मत अनुसरे प्रजांचें अक्षमसा रामराज तो क्षमही १२८
राजाराम दयाघन भक्तमयूरासि हा अमृत-वर्षे
मन निवरुनि नाचवि जो भवभान उरों न दे किमपि हर्षें १२९

**समाप्त.**

## परंतुरामायण[*]

### बालकांड.

श्रीरामचरित करितें मुक्त सकृत् किमपि सेवितां भावें
पार न लागे दशशान- वदनाहि **परंतु** वाटतें गावें. १

1. ब्रम्हांडरूपभांडें. 2 सेनायुक्त. 3 मारुतिस्था. 4 उच्चैःश्रव्याचा. 5 मनुज-इंद्र-मनुष्यां मध्यें श्रेष्ठ. 6 राजा. 7 ब्राम्हण. + औषधिविशेष. संसारस्मृति. राजा. महादेव.
* प्रत्येक आर्येंत परंतु याशब्दाचा उपयोग केला आहे, म्हणून परंतुरामायणें हें नांव दिलें आहे. एकदां. शेषालाही

संकल्पेंचि स्मर-द्विज- पीडक रक्षःक्षयें स्व-भजन-रसा
देता परंतु झाला दशरथ-भक्त-प्रियाऽर्थ अज नरसा २
एकेंचि मूर्तिनें प्रभु करिता त्रैलोक्य-कामना-पूर्ती
क्रीडार्थ परंतु धरी चार त्रिजगन्मनोहरा मूर्ती ३
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार सारसाऽक्ष जना
दिसती बाळ परंतु स्वगुणांहीं हरिति गुरु-मुनींद्र-मना ४
श्रीराम लक्ष्मणांनें मागे पहिलेंचि सिद्धि-सदन मुनी
गुर्वाज्ञेनें नृप दे क्षणें-विरहाक्षम परंतु पद नमुनी ५
चालति मुनिच्या मागें सुकुमार परंतु ते कुमारमणी
पाहुनि बहुधा वदली हंत श्री शंभुची उमा रमणी ६
निष्ठुर गमे परंतु श्रीरामा क्षुत्तृषा न बाधाया
विद्या बला अतिबला घे शीघ्र म्हणे पथांत बा धाया ७
वेदनिधि परंतु प्रभु घे विधिनें गाधिजें दिलीं अस्त्रें
जैसीं राजा घेतो प्रेमें स्वाऽश्रितजनाऽर्पितें वस्त्रें ८
स्त्रीवध निंद्य परंतु ब्रम्होक्तें तूर्ण ताटका मारी
त्या प्रभु-यशासि मानी अमृताचें पूर्ण नाट कामारी ९
सिद्धाऽश्रमांत करितां यज्ञ-प्रारंभ पाळिते घाले
आले परंतु भस्म श्रीराम-प्रभु-शराऽनळें झाले १०
शत योजनें उडाला प्रभु-शर-पुरताऽनिळें परंतु पडे
मारीच अकूपारीं भाविबळें त्या खळा न मृत्यु घडे ११
मुनि मिथिलेसि निघे कीं जनक स्वाऽध्वर-विलोकना बाहे
नेणार परंतु म्हणे प्रभु शिवें-चापेक्षणस्पृहा आहे १२
जातां गौतममुनिच्या आश्रम लागे पुसे कथा राम

---

१ जन्मरहित. २ सारस-अक्ष-कमल,नेत्र. ३ क्षणमात्र वियोग सोसण्याविषयीं असमर्थ. ४ नामविशेष. ५ विश्वामित्रें. ६ ब्रम्ह-उक्त-मुनिवचनें. ७ शिव. ८ सागरीं ९ नामविशेष(नगरी) १० आपला यज्ञ पाहण्याविषयीं. ११ बोलावी. १२ शिव-चाप-ईक्षण-स्पृहा- शिवधनुष्य पहाण्याची इच्छा. ॥ तृप्त व्हाया.

तत्काळ अहल्येचें  चिर नष्ट परंतु वाढवी धाम[१]  १३
अति कठिन भर्ग-धनु अति-  सुकुमार प्रभु परंतु गुण जोडी
वोढी सलील लीला-  नर-तनु तें इक्षु जेविं गज मोडी  १४
जी ब्रम्हीं नृप[२] रामीं  भासे नरसा परंतु ती चव घे
दशरथ आणुनि तत्कृत  केले कन्यार्पणें सुखी चवघे  १५
निज-गुरु-चाप-ध्वंसें  क्षत्रांतक राम[३] पथ धरी कोपे
तो प्रभुपुढें परंतु  द्युमणि[४]पुढें चंद्रमा तसा लोपे  १६
लंक सुना करुनि पुढें  दशरथ राजा प्रवेशतां सारी
मुदिता[५] होय अयोध्या  नांत सदा श्री परंतु हे भारी  १७
ज्याचा वियोग घटिका-  भरहि सुदुःसह परंतु आजाला
भेटाया तो भरत  प्रेषावा लागलाचि राजाला  १८

## अयोध्याकांड.

साहित्य करी राजा  अर्पाया यौवराज्य रामातें
दयिता परंतु मोडी  कैकेयी-नाम कुमति वामा[६] तें  १
ती पूर्वदत्त मागे  वर दोन परंतु राज्य तनयातें
धावें म्हणे चतुर्दश  वर्षे जो ज्येष्ठ राम वन यातें  २
दुर्बुद्धि-मंथरा-मत-  दूषित-मति सर्पिणी तसी खवळे
राजा भार्या बहुधा  करही जोडी परंतु ती न वळे  ३
गुरुसत्यरक्षणार्थी[७]  दाराऽनुजसह निघे सुखें राम
वल्कल धरी परंतु न  सोडी त्या श्री जसी सती धाम[+]  ४
वाइट कैकेयीतें  स्त्रैण[×] म्हणे दशरथासही पुरतें
न विटे परंतु चित्त  प्रभुचें कीं शांति-सद्गुणें पुरतें  ५
पायींच जात होता  तात-प्रेषित-रथीं परंतु बसे
पौर[८] त्यजुनि निघे प्रभु  दिसला निष्ठुर मनीं परंतु नसे  ६

१ तेज. २ जनक. ३ परशराम. ४ सूर्यापुढें. ५ आनंदयुक्ता. ६ वक्रा. ७ गुरु-सत्य-रक्षण-अर्थी—गुरु दशरथ जो त्याचें सत्य रक्षण करूं इच्छिणारा. ८ पुरवासी लोक. + गृह. × स्त्रीलंपट.

भेटे निषादपति गुह- नाम सखा वल्कसुभगदेहातें[1]
दे प्रभु म्हणे परंतु द्रुत तो त्या न वट-दुग्ध दे हातें ७
परतोनये परंतु न हठ उचित असें सुमंत्र तो पाहे
प्रभु जाय चित्रकूटीं मुनिस नमुनि मुनिकृतोटजीं[2] राहे ८
आला सूत[3] परंतु न काढी वदनावरूनि शेल्याला
साकेतीं[4] जन शोकें नीट नसे जेविला नसे त्याला ९
नृप कौसल्येसि कथी मृत्युप्रद पुत्रशोक हा शाप
सोडी प्राण परंतु न राम स्तुगुण धन्य म्हणति आशाप[5] १०
होता दूर परंतु द्रुत गुरुनें साधु भरत आणविला
कैकेयीनें त्याला राज्यार्थ कृत प्रयत्न जाणविला ११
हांसे माय परंतु स्मृत-गुरु[6] तो साधुराय हाय वदे
कीं ती मूढा बुडवुनि शतखंडी एक राज्य हा खवदे १२
तीतें क्षमी परंतु क्रोधें धिक्कार करुनि साधु निघे
नमुनि गळां पडुनि रडुनि कौसल्येचा प्रसाद साधुनि घे १३
सार्थक करी पित्याचें बुध भक्त परंतु गुरुघरचाहि सोडी
होय गुह भरद्वाज- स्तुत सत्कृत धरुनि गुरुगुणीं गोडी १४
तो प्रभुसि चित्रकूटीं प्रार्थी आग्रह करी फिरायास
सत्कृप[7] परंतु न वळला कीं हरणें विप्रस्करचिरायास[9] १५
हठ कर परंतु समजे माथां वाहोनि पादुका परते
नंदिग्रामीं राहे श्रीसीं स्वर्गीहि साभ्रु[8] तो न रते १६
श्रीसीतेसि विदारुनि वक्षोज[10] जयंतकाक[11] दे त्रास
नस्कटे पळे परंतु प्रभु अस्त्रें हरि नदेकनेत्रास[12] १७
अति रुचि रम्य परंतु प्रभुवर तो चित्रकूट नग सोडी

1 वल्कलानें सुशोभित देह ज्याचा त्या रामानें. 2 मुनि-कृत-उटज-पर्णानें केलेल्या आश्रमीं. 3 सारथी (सुमंत्र) 4 अयोध्येंत. 5 दिक्पाल. 6 स्मरण. 7 सहनशील. 8 प्रसन्नता. 9 विप्र-स्कर-चिर-आयास- ब्राम्हण देव यांस बहुकाळ झालेले दुःख. 10 स्तन 11 जयंत संज्ञक कावळा. 12 न दे-एक-नेत्र- त्या कावळ्याच्या एका डोळ्यास.

अत्रिस अनुसूयेसह      छात्र क्रम-नतसा सदार करजोडी १८
वेणी घाली गुंफी      तिस पुष्पें अंगराग दे भव्य
अनुसूया तत्पुण्यें      सीतांगीं चिर परंतु तें नव्य. १९

---

## अरण्यकांड.

दंडकवनीं विराध      श्रीस हरी ताडिती तया दोघे
सोडुनि सीता स्कंधीं      ते काळ परंतु बाळसे तो घे १
तोडुनि भुज खड्गांहीं      केला व्याकुळ परंतु तो न मरे
त्यानें पुरूनि गर्तीं      वदला भूपिहित-वन्हिसा शाप रे २
मथिला परंतु कोंडी      कीर्त्यमृतनदास दैव तुंबु रुतो
न तुज कण असें वदला      उद्धरिला धनदशाप तुंबुरु तो ३
शरभंग मुनिस्करेश्वर      ये त्यायाला परंतु तो गेह
पाहे प्रभुनें पूजा      मग हो मुनि-देह स्वगतिनें लोहे ४
नाम स्मरतांक्षणा परंतु      प्रेमळ तो राम मस्तकीं हुंगी
आलिंगी चिर तत्तनु      वाटे त्या जडलि मधुरसा भुंगी ५
राम महाश्चर्य म्हणे      ऐकुनि खळ-वृत्त मुनि परंतु सरीं
शक्रप्रियाप्सरांच्या      बहु भरला क्रीडनां निकाम भरीं ६
दंडकवनीं मुनींच्या      रमतां भव्याश्रमांत बहु हर्षे
प्रभुत्हृदया अल्प दिनें      गमलीं गेलीं परंतु दश वर्षे ७
पी सिंधु परंतु घटज      अति सौम्य महानपानिधि प्रेमें
प्रभुतें भेटे हर्षे      परम अधन जेविं पुष्कळें हेमें ८
शक्रस्थापित शस्त्र      स्वीय परंतु प्रसाद मानुनि घे

---

१ शिष्य. २ स्त्रीसह. ३ उरी. ४ नूतन. ५ नामविशेष (राक्षस) ६ खळरूपांत ७ पृथ्वीमध्यें आच्छादित अग्निसा. ८ कीर्ति-अमृत-नद- कीर्तिरूप अमृताच्या नदा-स. ९ धनद-शाप-कुबेरानें शापलेला. १० पावे. ११ बहुकाळ. १२ सरोवरीं. १३ शक्र-प्रिय-अप्सरा- इंद्रप्रिय अप्सरांच्या. १४ अगस्ति.

पंचवटींत वस म्हणे मुनि मग तो सदरितिमिर भानु निघे ९
गृध्र जटायु परंतु स्वजनक-सख म्हणुनि मानिला फार
गार प्रभुनें केला सीता-संगोपनादि घे भार १०
तुच्छा परंतु गुर्वी प्रभुनें सौमित्रिरचित दलशाला
बहु मान मृण्मयाही कनक घटाहूनि अमृतकलशाला ११
पाहे पंचवटीतें जीच्या गोदावरी निकट वाहे
राहे वनीं अयोध्या- वासी नृप-सुत परंतु सुख लाहे १२
श्रीरत राम परंतु त्यागुनि लज्जा रनार्थ ये रंडा
रसिक-जन इक्षुदंडा सोडुनि चोखील कोण एरंडा १३
रामाज्ञेनें लक्ष्मण तत्कर न परंतु कर्ण नासा हे
तदवयव घे तयाच्या ती शूर्पणखा न वर्णना साहे १४
भगिनीदंडें खवळे प्रभु-नाशा ये परंतु खरचि पडे
दिनमणि कडे पहाया डोळे होतील काय वर चिपडे १५
ती दशवदना दावी मुख सांगे म्यां त्वदर्थ जोडावें
कां न स्त्रीरत्न नरें हें प्राण परंतु काय तोडावें १६
त्वद्भगिनीचें नासा छेदुनि दोन्हीहि कर्ण कापावे
आजुनि मदश्रु न पुससि सुरभि पशु परंतु नैगका पावे.
सीता-हरणार्थ निघे जो म्हणवी आपणासि कवि चार
सांग निगम पाठ जया विधिचा पणतू परंतु अविचार १८
मारीच म्हणे उडवी शत योजन यदिषुचा पिसारा ज्या
तो मी परंतु म्हणसी कां जावें काय तूं पिसा राजा १९
म्हणतोसि राम-दयिता हरिन पुढें करुनि हेमहरिणा मी

---

१ सत्–अरि–तिमिर–भानु– शत्रुरूप अंधकाराविषयीं उत्तम सूर्य. २ मोठी. ३ प्रभुच्या योगानें. ४ पर्णशाला. ५ मानीच्यालाही. ६ सेवील. ७ नासिका. ८ तत्–अवयव–तिचे अवयव. ९ नामविशेष (राक्षस) १० उघ्यानें वाहणारे. ११ मत्–अश्रु–माझें रोदनोदक. १२ पक्षा. १३ वेद. १४ वेडा. १५ रामाची स्त्री (सीता) १६ स्वर्णमृगा. + यत्–इषुचा–ज्याच्या बाणाचा. ॐ सीतासंरक्षणादि.

हें करिसिल राजा तूं  म्हणसील परंतु हाय परिणामीं  २०
वदला स्पष्ट असें तो  कामांध परंतु नायके कांहीं
भोंना रामकथांहीं  भी अहि नष्टाऽयु[1] काय केकांहीं[2]  २१
होय कनक-मृग राक्षस  सीताहि म्हणे धरा हठें मागे
त्यागे प्रभु मागें तो  विशिख-हत परंतु रामसा गागे[3]  २२
श्रीनें रक्षक देवर[4]  शब्दें[5]चि भक्त परंतु दवडिला रागें
आगें[6] व्हाया भस्म  क्रूरमति नितें हरी तयामागें  २३
अति वृद्ध परंतु खळा  विरथ करुनि तो जटायु खग तीतें
मोडवि अरि तत्पक्ष-  छेदुनि घेऊनि जाय अगतीतें[7]  २४
हा राम म्हणे करि बहु  आक्रोश परंतु ती महा बुद्धी
नग[8] वानरांत टाकी  लागाया प्रभुसि आपुली शुद्धी[9]  २५
पावे लंकेसि तिला  ठेवी दशकंठ तो अशोकवनीं
आहे सर्वत्र बहुत  तच्छोक परंतु या नसो कवनीं  २६
प्रभु धीर परंतु करी  बहु शोक विलाप सानुज वनांत
तो जनकें[10] स्वता देखे  जो क्षत झाला स्वयोषिदयनांत[11]  २७
अत्यार्त[12] परंतु कथुनि  वृत्त[13] प्राण प्रभूरुवरि[14] सोडी
करि राम तत्क्रिया कीं  प्रीति पितृप्रीतिहुनि न ती थोडी  २८
दे सुगति कबंधातें  शबरीतें प्रभु परंतु पंपेतें
पाहुनि हाय म्हणे क्षण  बंधुसदुक्तें[15] दुःख संपे तें  २९

## किष्किंधाकांड.

भी सुगल परंतु पुढें  ये भेट पवन-पुत्र विनयानें

---

१ नष्ट आयुष्य ज्याचें. २ मयूरवाणींनीं. ३ ओरडे. ४ दीर. ५ शब्द. ६ अपराधानें. ७ गतिहीनेला. ८ अलंकार. ९ शोध. १० जटायू. ११ स्व-योषित्-अयन—आपल्या स्त्रीच्या रक्षणांत. १२ अति पीडित. १३ घडलेली गोष्ट. १४ प्रभु-ऊरुवरी—रामाच्या मांडीवर. १५ लक्ष्मणाच्या उत्तम भाषणानें.

वाहे पृष्ठें[1] दे स्कंध    देवांच्या तेविं लेशहि न यानें[2] १
अन्योन्य ते परंतु न    कटक[3] मुकुट रत्नहार निष्क[4] पटें[5]
समदुःखत्वें देती    नर-वानर-सख्य होय निष्कपट २
प्रभु[6]मि सुगल देवींचे    नग[7] शोकप्रद परंतु ते दावी
त्यांची राम उरासीं    स्वाधिक दुःखी सखे तया भावी ३
तज्ज्ञ[8] परंतु पुसे प्रभु    सौमित्रि म्हणे मला कळे सेवा
नमितां देखत होतों    मी जीं तीं हींच नूपुरें[9] देवा ४
सुग्रीव म्हणे वानर    [10]हृतदार परंतु मी नसें कष्टी
तुज देवी भेटवितों    व्यसनीं धृति हित-करी तमीं यष्टी[11] ५
राम पुसे सकल कथी    वैराचें बीज वालिखळ भारी
वारी तच्छंका प्रभु    अति सकृप परंतु कपिवर मारी ६
निंदी परंतु वाली    समजे श्रीराम विष्णु कर जोडी
प्रभु कपि-राज्य-श्रीसीं    तारेसींही करवुनि दे गोडी ७
कपि कोटि कोटि सकल    प्रभुच्या कार्यार्थ सकल प्रेषी
बहु शोधिलें परंतु न    दिसली+ ती दिक्[12]त्रयीं न तो द्वेषी[13] ८
[14]दक्षिण-दिगंतहि बहु    भ्रमले श्रमले परंतु संपाती
अग्रज जटायुचा कथि    लंकास्थित राम-मेघ-संपाती[15] ९

## सुंदरकांड.

दुस्तर परम जल[16]सागर-    निधि ज्ञानयान परंतु विश्रांतें
न गणुनि मारुति लंघी    गोष्पदसें[17] राम-भक्ति-निघ्नातें[18] १.

---

१ पाठीनें. २ विमानें. ३ कडीं. ४ पदक. ५ वस्त्र. ६ रमासि. ७ दागिने. ८ तें जाणता. ९ पादभूषणें. १० हरिली स्त्री ज्याची असा. ११ काठी. १२ तीन दिशांच्या ठायीं. १३ रावण. १४ दक्षिण-दिक्-अंत- दक्षिणदिशेचा शेवट. १५ राम रूप मेघाची वीज (सीता) १६ सागर. १७ गाईचें पाउलसें. १८ राम-भक्ति-निघ्न- रामभक्तीच्या स्वाधीन जो मारुती त्यातें. + सीता.

गरुड पवन मन यांच्या दावी तो अंजनीसुत [१]रयातें
दुस्तर परंतु होय स्मरतां भव-भंजना [२]सतर यातें २
लंकाऽधिदेवत करी कटकट कपिसीं परंतु भंगे तें
अघ खळहि नदी वेगें मागें मारील काय गंगे तें ३
भीं यानही न वशीं स्मरमनहि न धरि परंतु शंके तें
सीतेसि अशोकवनीं पाहे शोधुनि समस्त लंके तें ४
दशमुख विनवि परंतु श्री धिक्कारी तयासि तें पाहे
वाहे रोमांच म्हणे श्रीरामायोग्य हे सती आहे ५
मुद्रा दे कुशल कथी आधीं वचके परंतु मग हर्षे
कुशल पुसोनि तयावरि आशीर्वादामृतें सती वर्षे ६
स्कंधीं वाहुनि नेतों तो वीर म्हणे परंतु ती हांसे
वदली जाइन पडतां काळाचे शत्रुच्या गळां फांसे ७
कृत कृत्य होय मारुति घे चूडामणिसमेत संदेश
वंदुनि निघे परंतु स्वमनिं म्हणे वदविला न [५]संदेश ८
बहु सद्रुम फळभारें लवले होते परंतु ते मोडी
खोडी चळेंचि करि तो झोडी वनपाळ मस्तकें फोडी ९
बहु राक्षस-कटक वधी मारी दशकंठनंदना [६]अक्षा
अक्षा गृध्रांसि म्हणे पोसाल परंतु आपणा रक्षा १०
घननाद-ब्रह्मास्त्रा वश नच व्हावा परंतु सा पडला
स्मर वदले अन्य-द्रुत हें हा पाशांत घातसा पडला ११
बांधुनि सभेंत नेला वंदूनि परंतु करुनि आसोसी
दशकंठ सुखें हा हें वदावयाचीच धरुनि आंसोसी १२
बोले प्रभु-रत्नीं तव मन लुब्ध परंतु यांनृपा परतो
दी+प्त-ज्वलनचि चालिला जें राक्षस-कटक या नृपा परें तो १३

---

१ वेगातें. २ सत्वानें तरण्यास योग्य ३ पतिव्रता (सीता) ४ निरोप. ५ सं-द-ईश-(रावण) ६ नामविशेष. ७ इच्छा. ८ हे राक्षसपते (रावणा) ९ शत्रु + प्रदीप्त अग्नि.

व्हावें नम्र परंतु क्रोधें दुष्ट प्रदीप्त करि पुंस[१]
पेटवुनि पलाशपुरी रडवी तो वीरनायक रिपूंस १४
पर भस्म करि परंतु ज्वलन बिभीषण-गृह स्वयें रक्षी
भक्षी बहु शत धीवर उगळी विप्रा जसा महोपक्षी १५
हर्षे परंतु सीता- दाह-भय धरी म्हणोनि पुनरपि तो
पाहे दर्शास जसा पिउनि गुरूनिकस पुन्हाहि स्तनर पितो १६
होते महेंद्रशिखरीं चिंताऽकुल कपि परंतु ते धीरें
लंघुनि समुद्र भेटुनि हर्षविले वृत्त कथुनि त्या वीरें १७
अनुचित परंतु शिरले प्लवंग बळें दधिमुखासि ताडून
पाडून फळें प्याले मधु मतिभत मधुवनांत मांडून १८
कप्यपराध दधिमुखें सकळ कळविला परंतु तो राजा
हंसोनि वदे सांग तयां द्रुत[१०] भेटा आणि साधु होरा जा १९
दधिमुख नसेंचि कथि ते कृत-मंतु परंतु न निळ ही भ्याले
धाले[११] फळें मध्वशनें[१२] हर्षे गर्जत नभःपथें[१३] आले २०
नमितां सांगद मारुति कपि म्हणाला लक्ष्मणा घनश्यामा
सीता कुशल पुसे त्यां प्रिय भेटे परंतु न धरवे रामा २१
मारुति चूडामणि दे सगुण काक-कथा-निरोप आयकवी
अराकून पुसे परंतु प्रभु तें प्रेमें कथाल काय कवी २२
प्रभु सर्व पुमर्थाधिक आलिंगन दे परंतु वदला हें
धनु देउनिहि ऋणी मी बापा तूं उत्तमर्ण-पद[१५] लाहें २३
बहु असति परंतु म्हणोनि वाल्मीकिप्रमुख विप्र या स्मर हा
प्रभुच्या प्रेमें पावे मारुति होऊनि विप्रयास महा २४

---

१ पुच्छ. २ राक्षसांची नगरी (लंका) ३ कोळी. ४ गरुड. ५ सीता जळेल असें भय. ६ वानर. ७ नामविशेष (राक्षस). ८ यथेच्छ. ९ कपि-अपराध. १० मुहूर्त. ११ तृप्त झाले. १२ फळ-मधु-अशन- फळसंबंधी मधूच्या भक्षणानें. १३ आकाशमार्गानें. १४ सकलपुरुषार्थापेक्षां अधिक. १५ सावकाराचें स्थान

## युद्धकांड.

विजयपद परंतु प्रभु विजयमुहूर्तीं बसे कपिस्कंधीं
यद्वाणी पर-मद-हर- गुण जैसा गंधहस्तिच्या गंधीं १
तारांजनीतनुजरथ दाशरथि-सहाय कपिचमू-भर्ता
उत्साह परंतु अतुळ कपिकटकीं जय-समृद्धिचा कर्ता २
प्रभुसह सुगल-सुरक्षित सागरतीरास पावलें कटक
अटक परंतु पडे हा नोहि म्हणे कपटनर जगद्रुटक ३
अरि-बंधु परंतु शरण आला त्याला शरण्य-वर पावे
दे लंकाराज्य करीं यश जेणें सर्व ताप हरपावे ४
प्रार्थी अजित परंतु न करितां अस्त्रप्रयोग कर जोडी
सागर सेतु रचिल नळ कपि हें मागे तयासि विभु सोडी ५
रचिला सेतु समुद्रीं शत योजन लांब रुंद दश गावें.
कटकासि परंतु थिटा होय प्रभुचें अचाट यश गावें ६
कपिपति सुवेळशिखरीं चढुन उडुन पडुन वरि मुकुट उडवी
तुडवी परंतु नुमजे अंगद-मुष्टींहि खळ सकळ बुडवी ७
प्रभुचें शिर धनु दावुनि खळ रडवी बहु परंतु सीतेतें
सरमा परमामा ये समजावी नाथ-घात-भीतीतें ८
युद्धीं अहिपाशांहीं घननादें बद्ध दाशरथि केले
रडविन्ति मनी परंतु त्रिजटा वदली उगी नव्हे मेले ९
हाय म्हणे प्रभु सुगळहि नोहि बिभीषण परंतु खगपतितें
संकट हरि मारविलें धूम्राक्षप्रमुख बहुत मग पतितें १०
मग सौमित्रिस पाडी दशमुख विधि-दत्त-शक्तिनें ताडी
प्रभु मद परंतु झाडी विरथ करुनि मार्ग दे गृहा धाडी ११
पावे पश्चात्ताप क्षणदाचर शक्रशत्रुचा बाप
ताप स्मरे परंतु न सोडी भीतें धरी मनीं पाप १२

१ तारासुत(अंगद) अंजनिसुत(मारुति) हे रथ त्यांचे. २ अपुरता. ३ सुवेळ संज्ञक पर्वताच्या शिखरीं. ४ नामविशेष (बिभीषणस्त्री) ५ नागपाशांनीं. ६ गरुड. ७ राक्षस. ८ इंद्रजिताचा ९ रावण

कष्टें घटकर्णानें[१]   उठवी ज्या भीति देव देखाया
राम परंतु वधी त्या   वांटुनि गृध्रांसि दे वदे खाया[२] १३
घटकर्ण-वधें रडला   मूर्छित पडला परंतु सत्यागी
ध्याया वरदा विधिची   दशकंधर आग्रहास न त्यागी १४
त्रिशिरा[३] कुमति नरांतक   देवांतक सुत चतुर्थ अतिकाय
मेले परंतु न वळे   मेल्यावांचुनि फिरेल मति काय १५
त्रास उदंड परंतु   प्रेरुनि शर-वृष्टि मेघरव[४] ताडी
कपि सर्स[+] षष्टि-कोटी   दाशरथींही रणांगणीं पाडी १६
सर्व व्याकुळ वदले   बहु हाय परंतु पवनसुत रक्षी
आणुनि औषधि-पर्वत-   शिखर उठवि चकित करि अजित पक्षी
औषधि-गंधें झाले   दाशरथि विशल्य तेहि कपि सर्व
तें शृंग पुन्हा ठावीं   मारुति अतिबळ परंतु गतगर्व १८
मेले परंतु उठले   म्हटले जाळीन कीश लंकेला
दाहत्रस्त निशाचर   पळतां वधिले त्यजूनि शंकेला १९
घटकर्णसुत महाबळ   मग कुंभ निकुंभ संगरा गेले
मेले परंतु आणीं   ते रावणसंग धरुनि रंगेले २०
त्यावरि वधिला खरसुत   मकराक्ष[७] प्रभुवरें परंतु रणीं
घनरव दाशरथि-वधा   ये त्या भिववूनि पळवि राजमणी २१
मेघरव करी माया   सीतांत[८] परंतु सत्यसा वाटे
दाटे प्रभु-कंठ महा-   शोकें कगळोर तेधवां फाटे २२
शोकचि राहु ग्रासी   जो त्या तेजस्वि सत्तमा रविला
प्रबळ परंतु उडविला   बिभीषणें तोहि सत्त्व मारविला २३
वज्रधरास[१०] कदुःसह   घननाद परंतु तो सरवा:वधिला
पावों न देउनि रणीं   कलिचा श्रीलक्ष्मणें सरवा वधिला २४

---

१ कुंभकर्णानें. २ याचा. ३ नामविशेष. ४ इंद्रजित. ५ शिखर. ६ वानर. ७ नामविशेष (राक्षस). ८ सीता-अंत-सीतेचा नाश. ९ कगळ-उर-कग्रीवाचें वक्षस्थळ. १० इंद्रास. + सतुसष्ट कोटि.

अघहत परंतु दुर्मति धांवे सीतावधा धरुनि असितें
ती हा म्हणे अरिमुखें पाहुनि जीं अपयशें करुनि अंसितें २५
कोणी न पुढें ठाके त्याला जन सर्वही परंतु कवी
वारी सुपार्श्व स्वसचिव तत्काळभ्रामहानितें चुकवी २६
रावण दाशरथि-वधा धाडी बहु कोटि सैन्य चतुरंग
उरला परंतु एकहि न द्विरद न रथ न पत्ति न तुरंग २७
अनहंकार परंतु स्वजनास तदा स्वयें खळविराम
हें माझें अस्त्रबळ त्र्यंक्षाचें सम असें कळवि राम २८
समरा निघतां झाले उत्पात परंतु तो महामानी
घाली गांठी प्रभुसीं न तयाच्या स्वांतका महा मानी २९
शतमख निजरथ धाडी तदधिक मारुति परंतु तो रामें
स्वीकारिला तयानें द्याया यश मानदें यशोधामें ३०
शिण सप्त अहोरात्रें झाला निरुपम परंतु तो कांहीं
नाहीं श्रमला रावण गणिला दुर्घट तदंत लोकांहीं ३१
शतधा खंडन केलें समरीं प्रभुनें परंतु न दहा तीं
सरलीं शिरें तरि धरी शर धनुही दिव्य-दीप्ति-तद हातीं ३२
सर्वज्ञ परंतु प्रभु ऐसें दावी जगीं मनुष्यपण
संकल्पेंचि खपविना अरितें कुतुकेंचि धरि धनुष्य पण ३३
मातलि म्हणे रघुपते शत्रुवरि पितामहास्त्र सोडावें
वज्राभेद्य परंतु द्विषदुर एणें पव्यांत फोडावें ३४
घटज रविहृदय सांगे भास्करवर घे म्हणे स्वयें मागे
किति विधिकृत-अस्त्र शर प्रभुचरित परंतु सोड हें सांगे ३५
विध्यस्त्रें अभिमंत्रुनि विधिरचितशरें उरःस्थळीं ताडी
नव्हता पडत परंतु प्रभु उर भेदूनि शतमुखा पाडी ३६

१ खड्गानें. २ कृष्णवर्णे. ३ हत्ती. ४ अहंकाररहित. ५ महादेवासारिखें. ६ स्व-अंतक- आपला नाश करणाऱ्या. ७ इंद्र. ८ शशाचें स्थान असा. (रामाचें विशेषण) ९ कौतुकेंचि. १० इंद्राचा सारथि ११ पितामह-अस्त्र- ब्रह्मास्त्र. १२ द्विषत्-उर-शत्रूचें वक्षस्थळ. १३ अगस्त्यऋषि. १४ आदित्यहृदय. + तेजा.

जो आनंद प्रसरं दशमुख-निधनोदयीं तया मोया
ब्रम्हांड गुरु परंतु क्षणही न पुरे अयातयामा या ३७
स्फुर पुष्पवृष्टि वाद्य- ध्वनि जयजयकार नृत्य नुति गानें
झालीं बहुत परंतु स्वल्पें कर्त्यांसि राम बहु मानें ३८
वधिला परंतु केला धन्य असें तदनुजासि वदला हां
दे जन्म वा माझाही हा बंधु तुझा तसाचि पद लाहो ३९
राजा केला होता पहिलाचि परंतु तो दयानिधिनें
लक्ष्मणकरें बसविला भक्त बिभीषण पदीं पुन्हा विधिनें ४०
जाणे परंतु कळवी जें न कृत लोकसार साक्षी तें
करवी दिव्य यथोर्थ क्षणभरि दे शोक सारसाक्षीनें ४१
श्रीरामें गौरवुनि त्रिजटा सरमा कला स्फपार्श्व यशें
भक्ति दिलि परंतु न बहु मानियलें बहुहि साधु-रीति-वशें
दशरथ भेटे समजे श्रीविष्णु असें परंतु लोभानें
शिर हुंगी वंदूं दे पहिलासा सोडिलाचि तो भोनें ४२
युद्धमृत स्फधावर्षे उठले सर्वहि परंतु ते योध
अंतरले समरमरवा बहु हळहळले सदैव सक्रोध ४४
जाते प्रभुसहि नेते साकेता सबळ ते सरवे तूर्ण
केला परंतु पुष्पक- यान-मनोरथ रघूत्तमें पूर्ण ४५
राज्ञी परंतु मानी निर्जित-नाका पुरास देव तारा
भेटे सखीका भव- तमाच्या कापुरा सदवतारा ४६
अरस परंतु रस भरुनि प्रभुनें पंपाविलाप चारवविला
सीतेला पंचवटी अत्र्याश्रम चित्रकूट दारवविला ४७
नेदे परंतु आज्ञा राम भरद्वाजमुनिस वंदुनि घे
निवसुनि गुहा तयाच्या चित्त करीचा मनोज्ञ अंदुं निघे ४८

---

१ मावावयास. २ मोठं. ३ गेला नाहीं प्रहर ज्यावरून असा. ( नवा असा भाव. ) ४ स्फूर्ति ५ सारस-अक्षि-कमलनेत्रा सी ( सीता ) तीनें. ६ देहस्मृतीनें. ७ अयोध्येस. ८ जिंकला आहे स्वर्ग ज्याणें. ( पुरानें विशेषण ) ९ वणवा. १० बंधनरज्जु.

ज्ञानहि परंतु जेणें मातेचा नित्य अनय आठविला
त्या स्वागम कळवाया श्रीरामें पवन-तनय पाठविला ४९
दूत परंतु प्रेमें रामचि भरतागमें पवन-तनया
वंदी बहुधा भेटे होऊंदे आपणा अवनत न या ५०
पुरधन परंतु विभु भर त्याला हा दास रामरायाचा
परमघनाचा चातक न धरुनि पर-आसरा मरायाचा ५१
मातेसीं वत्साची भेटी प्रभुसीं तसीच भरताची
म्हणति परंतु अधिक हें क्षण टळतां हा शिरवींत भरताची
हर्षे भुलला होता बहु भरत परंतु पादुका आधीं
नमुनि मिठी मग पायीं घाली त्या प्रभु म्हणे यशें साधीं ५३
ऋक्ष प्लवंग राक्षस भरत सुमित्रा-तनूज शोभविले
होते विकट परंतु त्रिदश तिहीं रूप धरुनि लोभविले ५४
सुश्री परंतु राम स्वीकारी राजवेष शोभविता
तो नरि तद्वहित रमा प्रभु खग मृग कानतांत लोभविता ५५
कौसल्या सीतेतें तारेनें यूथप-स्त्रिया अन्या
त्यांनें स्वयेंचि शोभवि असती इतरा परंतु ती धन्या ५६
करिती पुर-प्रवेश प्रभुसह रथ-हय-गजादि यानाहीं
सुर मुनि म्हणति निरखिलें महं बहुत तुळा परंतु या नाहीं ५७
पुर शोभविलें होतें पुर-संस्कारें परंतु शोभे तें
प्रभुच्या नव-प्रवेशें प्राणाच्या धरि शरीर शोभे तें ५८
त्या श्रीमत्साकेतीं होतचि आलें परंतु हा भारी
राज्याभिषेक राम- प्रभुच्या अद्यापि वर्णितां तारी ५९
अति मोहन परंतु जनें न तदा वैकुंठ लोक आठविला
स्वयशोरस साकेतें सर्वां लोकांस विपुल चाटविला ६०

---

१ अन्याय. २ भरतास. ३ स्व-आगम- आपलें येणें. ४ अग्नीत, ५ शिरताच.
६ आस्वल. ७ वानर. ८ उत्सव. ९ श्रीमत्-साकेत- शोभायमान अयोध्येंत.
१० अतिस्तन्य.

संसारीं बहु आधि व्याधि सदाही परंतु रामाच्या
राज्यांत मुक्त्यधिक सुख सर्वांसि अखिल-विपद्विरामाच्या ६१
अधिकृतहि चित्रगुप्त क्षणहि परंतु न करी वहि समोर
यम-दूतास जन प्रभु- राज्यस्थ तसा जसा अहिस मोर ६२

---

## उत्तरकांड.

सर्वज्ञ परंतु प्रभु कुंभज-मुनितें पुसे दशास्य-कथा
सांगे तोहि सविस्तर लीला-मनुजेश्वरा सुपर्ण-रथा १
विधि-सुत पुलस्त्य सुतपा तो न स्पर्शे परंतु दृष्ट्यातें
तृणबिंदु-सुता प्रसवे पुत्रातें म्हणति विश्रवा यातें २
त्यास भरद्वाज-सुता- कुक्षिज वैश्रवणपुत्र होय नृपा
राक्षस-सुता परंतु भार्या करवी श्रमें मुनींद्र-कृपा ३
मुनि शांत परंतु स्त्री खचरी जी कैकसी तिला पहिला
दशमुख घटकर्ण सुता शूर्पणखा हे भयप्रदा महिला ४
चवथा पुत्र बिभीषण राक्षस्यात्मज परंतु हा साधू
याळाहि म्हणे निजमना मळ चिंतुनि शिव-मुखा सुहासा धू ५
वैश्रवण-बंधु अग्रज लंकेश भला परंतु शततुंडा
त्याचें भाग्य न सोसे तपतां होय प्रसन्न विधि तुंडा ६
कपि नर न गणुनि इतरां सर्वांपासूनि अभय-वर याची
घटकर्ण वरी निद्रा श्रमवि मनीं गुरु परंतु पर याची ७
राक्षस परंतु मागे सुवर बिभीषण रुचो सदा धर्म
ब्रम्हास्त्र अशिक्षित दे ज्यांत नय दया असें घडो कर्म ८
चिरजीवित्व सुदुर्लभ तेंहि न मागे परंतु दे धाता

---

१ अखिल-विपद्-विराम-सकलविपत्तीचा नाश करणारा जो राम त्याच्या. २ अगस्त्य ऋषितें. ३ गरुड आहे रथ ज्याचा अशा (रामास) ४ दृष्टीच्या पडण्यानें. ५ नाम विशेष, रावणाचा पिता. ६ कन्या. ७ पृथ्वीला. ८ राक्षसी-आत्मज-राक्षसीचा पुत्र. ९ ब्रम्हदेव. १० मागे. + अधिकारी.

दशमुखही लंकेतें प्रथमचि [1]गुरुच्या करी मनोघाता ९
गुरुवर दिक्पति शिव-सरव झाला वैश्रवण सुहित-संदेश
प्रेषी परंतु खवळे दूतासि वधी दशास्य मंदेश १०
भंगी गुरुस परंतु न चित्तींहि दशास्य खळ परम लाजे
पुष्पक हरुनि म्हणे ते वधिनचि मुख दाविंतिल पर[+] मला जे
पुष्पक अडे शरवनीं तिळहि न चाले ढळे उपाय-शतें
बलवत् परंतु अमृता जें येइल काय हो तुपा यश तें १२
नंदीश म्हणे मानिशि साधारण वन परंतु हें शर्वें
शरवन अलंघ्य केलें केलिस्थळ दूर सोडिलें सर्वें १३
हित कथि परंतु हांसे कपिमुख नंदीश्वरासही पापी
शापी कपि वधितिल तुज ऐसें कीं तो तयासही दापी १४
स्थानभ्रष्ट कराया प्रभुतें उपडी समूळ कैलास
दडपी परंतु तद्भुज रडवी चिर देवदेव-वैलास १५
मरतां परंतु केला प्रभुनें तो मुक्त करिसम स्तवनें
जो वेदनार्त गर्जुनि सुरवरें चिरकाळ करि समस्त वनें १६
[9]गुरु-पौत्री वेदवती देवी दर्शन तिचें करी पापी
वधिन तुज म्हणोनि जळे अति-शांतमती परंतु ती शापी
यज्ञांत मुनि मिळाले होते जे त्यांसि दुष्ट जो मारी
वधितांचि मरुत्तनया [10]संवर्त परंतु आग्रहें वारी १८
होते गयादि राजे सुसमर्थ परंतु ते तया वळले
बळ-लेश न दाखविती कीं वर विधिदत्त सन्मुखें कळले १९
विधि जरि न वारिता तरि काळ कसा काळ-दंड आवरिता
मत्त परंतु दशानन पडतांचि झरोनि मर्व आव रिता २०
प्रबळ तरि [11]निवातकवच त्याशीं दशकंठ रण करी वर्ष

---

१ वैश्रवणाच्या. २ उत्तमकल्याणदायक निरोप. ३ मंद-ईश-सूर्यस्वामी (रावण) ४ महादेवें. ५ क्रीडास्थान. ६ बहुकाळ. ७ गजेंद्रासारखा. ८ शब्दितें ९ वैश्रवणाची नात. १० नामविशेष (ऋषि) ११ नामविशेष (दैत्य) + शत्रु.

चतुरानन सख्य करी    मग माया शिकुनि पावला हर्ष
ते असुर कालकेय    सख्यात कदापि सोडिते न रणा
शूर्पणखा-पति दशमुख-    खड्गेंचि परंतु पावला मरणा
वासुकि-पुर वरुण-पुरहि    जिंकी ज्या सुंदरी स्त्रिया अन्या
अबळा रडति परंतु    क्रोधें त्या शापिती सती धन्या २
घननाद-सिद्धि ऐकुनि    शक्रमुखें भूप पावला तोष
पाहे परंतु यजिले    स्वसुतानें स्वरिपु देव हा दोष २
सांगे बिभिषण हरिली    भगिनी कुंभीनसी बळें लवणें
येनांचि निंघ गिळिले    मानधन जनें परंतु हे कवणें २५
अक्षौहिणी नयाच्या    त्या चार-सहस्र धांवल्या मागें
ती नमुनि म्हणे द्यावें    त्या अभय परंतु मज महाभागें २
न वळावाचि परंतु    द्रवला दे अभय-दान लवणातें
भेटे प्रेमें ऐसें    जें कर्म न आवडेल कवणातें २७
मग सुर-वनास जाई    तो सुरविजयाचिया समारंभा
भोगी परंतु न गणुनि    धर्मन्याय स्नुषासमा रंभा २८
तें ती रंभा कळवी    नळ-कूबर धनद-पुत्र वरशील
क्रोधें परंतु शापी    करुनि बळात्कार कर्म मरशील २९
जिष्णु पुसे विष्णु वदे    अति दुर्जय रिपु परंतु भांडावें
सांडावें न स्व व्रत    धीरें जें उचित तेंचि मांडावें ३०
मथिले राक्षस वदले    दुःसह पविपाणि-धाम सीमा या
नाहीं परंतु घनरव    धरि हरि पसरूनि तामसी माया ३१
लंकेस धरुनि नेला    घननादें तो परंतु विधि-यत्नें
सोडविला अमरत्व-    प्रद होमज रथ तदिष्ट-वर रत्नें ३२
श्रीराम म्हणे स्वामी    निर्वीरा काय तेधवां क्षोणी
अनय करि परंतु नया    मद-परिहर हरि न भेटला कोणी ३

१ सुरा. २ लवणासुरानें. ३ इंद्राचें तेज. ४ वानर. ५ पृथ्वी. + इंद्र.

घटज[1]मुनि म्हणे बांधी अर्जुन[2]राजा दशानना रामा
सोडी परंतु पूर्वी भूप पुलस्त्या महर्षिच्या कामा ३४
वानर परंतु वाली दडपी कक्षेंत[3] तो दशास्याला
या होय फाल्गुन मही श्रीमंताच्या जसी दशा स्यांला[4] ३५
श्रीराम म्हणे स्वामी बळ वालीहूनि वातजीं[5] निपट
होता परंतु कां हा सुग्रीवाजवळ अबळसा निपट ३६
होतें परंतु याला निज बळ कळलें नसे असें स्वमतें
गमतें असेल कारण सांगा जें निबिड नाशया तम तें ३७
मुनिराज म्हणे रामा क्षुधित शिशु परंतु उडुनि हा रविला
फळ म्हणुनि जाय खाया याचे तेजेंचि राहु हारविला ३८
राहु पळे हरिसे[6] कळवि तों ये तो गजहि फळ गमे याला
पाडी वज्रें ताडुनि हनु[7] सज्ज परंतु या अभेयाला ३९
दुरुनि जगत्प्राण[8] म्हणे सृष्टि लया जेविं तनुज मम जावी
द्रुहिण[9] परंतु नया शिशु शस्त्रास्त्रावध्य करुनि समजावी ४०
करिशील उपद्रव पण ऋषि वदले प्राकृता मुलासम जो
वर्तसि तूं त्या निजबळ न प्राज्ञ परंतु बा तुला समजो ४१
कथुनि कथा प्रभुसत्कृत मुनि गेला स्वस्थळा तप कराया
जनकहि परंतु लागे रामेतर सर्वही स्वपक गराया ४२
स्वस्थहि हो किश[10] राक्षस गौरविले पुत्र-बंधुसे रामें
प्रिय सर्व परंतु अधिक मारुति सत्कारिला दया-धामें ४३
निंदेस्तव गर्भवती[11] दयिता[12] शुद्धा परंतु मोह दया
त्यजुनि त्यजिली त्यागा कारण केला तदीय-दोहद[13] या ४४
अपवादें[14] सदयेंही घालविता स्वप्रताहि बाहेर
रडली परंतु झाला वाल्मिक्याश्रमचि तीस माहेर ४५

---

१अगस्त्यऋषि. २सहस्रार्जुन. ३कुशींत. ४मेहुण्याला. ५मारुतीच्याठायीं. ६इंद्रास. ७हनुवटी. ८वायु. ९ब्रह्मदेव. १० वानर. ११ गर्भिणी. १२ भार्या. १३ नदीय-दोहद-त्यासी-तेचा डोहळा. १४लोकापवादें(लोकनिंदेनें) + अंगणाला. ∺ अरुचिक.

अति नीच परंतु सुखी प्रभुनें केला उलूक कुनरा हो
कृतरा हो संसृति कवि म्हणती आजी तनूज सुत राहो ४८

सीता-पुत्र विलोकुनि शत्रुघ्नें धावया हरिख पविला
प्रभु-वचनें लवणासुर अत्युग्र परंतु तो अरि खपविला
रचुनि पुरी मधुरा तो येतां प्राचेतसाःश्रमीं राहे
श्री-सुत-कुश-लव-गीत श्रवण करि परंतु तो न त्यां पाहे
भिन्न परंतु हि राज्यें आठां पुत्रांसि आठ दे राम
शूद्र वधुनि मृत-शिशुतें उठवुनि पुरवी द्विजातिचा काम ४९

प्रभु गौतमी-तटीं करि योग्या शरयू परंतु हरिमेधा
वाल्मीकिहि ये ज्याची विधिमेधेचेहि भय न धरि मेधा ५०

सुर मुनि वदले दिसले शक्रादि कृताःश्वमेध बहु लक्ष
हाचि परंतु गुरु जनीं कोण प्रभुसम सभाग्य कवि दक्ष ५१

गाती स्व-गुरु-निदेशें कुश-लव रावण-वध-प्रबंधातें
तृषित क्षुधित परंतु श्रवणीं न स्मरति जन अबंधातें ५२

स्वचरित परंतु रुचलें प्रभुस कुशलव स्वपुत्र हें कळलें
वळलें मन बाहेरचि जें जन-कृत-गर्हणेमुळें मळलें ५३

केलें दिव्य परंतु प्रभु लोक-प्रत्ययार्थ योजी तें
ऐकुनि मुनिसह ये ती दे दुःसह जनापवाद तो जीतें ५४

निंदी लोक परंतु स्वच्छा जरि मी असेन घे पोटीं
भूतें विनवि असें ती श्री जीची स्तुति हरी अघें मोटीं ५५

उलली भू भूदेवी आली तत्काळ भूसुता हर्षे
जाय जशी माहेस प्रभु धीर परंतु अश्रुतें वर्षे ५६

---

१ संसार. २ हर्ष. ३ वज्राला. ४ प्राचेतस-आश्रम-वाल्मीकीच्या आश्रमीं. ५ अश्वमेधास. ६ ब्रम्हदेवाच्या बुद्धीचें. ७ बुद्धि. ८ मोठा. ९ चतुर. १० आपला जो गुरु वाल्मीकी त्याच्या आज्ञेनें. ११ रावणवधरूपकथेतें. १२ अप्-अंध-जल-अन्नः यांनें. १३ लोकांनीं केलेल्या निंदेनें. १४ शपथ. १५ ज्यासीतेनें. १६ सीता. १७ रोदनोदकातें. + शत्रु. ✻ सीतेचे पुत्र कुश लव त्यांचें गाणें. ✶ ब्राम्हणाचा.

प्रभु भूवरि कोपे त्या चतुरास्य[1] म्हणे परतु समजावें
तूं विष्णु श्री सीता तुमच्या स्मरणेंहि सर्व तम[2] जावें ५७
वचकें परंतु जोडुनि शमवाया कोप हात आड वदे
विनयें प्रभुस प्रभु तूं ऐसें पद तो पहात आठव दे ५८
राम म्हणे हें दयिता- रहित सदन कोप रंतुकामातें[3]
विषय तृण धर्म-पत्नी कृतिस वद नको परंतु कां मातें ५९
विरह परंतु मुनीची श्रवण सफळ स्रुकविता करी शांत
विधिनें समाश्रितें ने हयमेधा चुकविता करीशांत[6] ६०
अयुताब्द[7] राज्य सीता कनकमयी[8] सकळ मख करी रमती
सुजन परंतु न विसरे प्रभु दयितेतें जसा शरीर-मती ६१
भेटविल्या निज ताना श्रीकौसल्यादि सर्वही माता
होता परंतु उडवी कैकेयी वरिल रोष तो धाता ६२
कोटित्रय गंधर्व प्रबळतर परंतु मारिले भरतें
तत्पुत्र-द्वय जें घे राज्याचा त्याचि-जनपदीं[9] भर तें ६३
लक्ष्मण-सुत कारुपथीं रामें केले पुरद्वयीं राजे
अवघड मुलांशि वाटे वात्सल्य परंतु फार त्या साजे ६४
यावें वैकुंठातें हें प्रार्थायाशि आपुल्या ताता[10]
प्रियकर परंतु अप्रिय करवाया काल पाठवी धाता ६५
वदतां रहस्य येइल पाहिल तो प्रिय परंतु माराया
काळ असा पण करवी मग कोण भयें न दूर साराया ६६
भ्राता परंतु ज्याचे भक्त असंख्यात नाव सद्वारीं[11]
त्या लक्ष्मणा प्रभु म्हणे बहु सावध तूंचि बा वस द्वारीं ६७
त्रासविला परंतु रोपें खिजुनि म्हणे लक्ष्मणासि दुर्वासा

---

१ चतुर-आस्य-ब्रम्हदेव. २ अज्ञान. ३ रुसांपद. ४ रघूद्वहिणारानें. ५ हे ब्रम्ह-देवा. ६ करी-ईश-अंत-गजेंद्राचा नाश. ७ दहाहजार वर्षें. ८ सुवर्णमयी. - ९ त्याचि देशीं. १० बापा ( रामास ) ११ सत्-पार-साधुसमूहीं.

श्री-संततिंत रता तुज या क्रोध-दवीं करीन दुर्वासा ६८
थोर परंतु कराया कुल-लय दोषाविना शपथ करितो
हें जाणुनि सौमित्री स्वेतर तोषा विनाश पथ करि तो ६९
मृदुल परंतु स्वहृदय कूर्म कठिण करुनि विश्व-पाळानें
विधि-वचन मान्य केलें जें कथिलें विप्र-वेष-काळानें ७०
तों लक्ष्मण जाय कथी मुनि आला हें परंतु अविकळ तो
मुनिसंकटिंही निश्चळ- धैर्य अशा लक्षणेंचि कवि कळतो ७१
प्रभु पूजुनि भोजन दे मुनि बव्हाशी परंतु पायसदा
तो अलमलं म्हणे जो हारविला तृप्तिचे उपाय सदा ७२
लक्ष्मणवध प्रतिज्ञा- रक्षण संकट वदे परंतु कवी
आचार्य प्रभुसि वध त्यागसम असें कथूनि तें चुकवी ७३
जा प्रभु म्हणे परंतु न चित्तीं सौमित्रि शुचिहि रागेला
वंदुनि कुळांतुनि जसा पदकांतुनि भव्य-रुचि हिरा गेला ७४
समजे तत्व परंतु स्वमनीं वाईट देव रवि मानी
देवांनीं सीतेचा नेला वाहूनि देवर विमानीं ७५
प्रभुचीहि परंतु भरत राजाज्ञा जी करीन साधु तितें
घे अग्निहोत्र ऐसें बोधी त्या मान्य यति जसा श्रुतितें ७६
अन्य पुरी-पति केले ते योग्य परंतु कुशलव तनय तीं
न दिल्ही निज साधुनि घे जेविं ज्ञानेंचि कुशल वतन यती ७७
मधुरा दूर परंतु प्रहर पथीं संपवूनि चोवीस
शत्रुघ्न दूत कथिति वार्ता स्फर म्हणति जीस हा वीस ७८
दों पुत्रां दोन पुरें दे त्यांनें प्रिय परंतु सोडोनी
एक रथें धावुनि ये भेटे रामाशि हात जोडोनी ७९
पद अंगदासि देउनि दूरस्थ परंतु पावला तूर्ण

१ दुर्-वास. २ स्व-इतर-तोष-- आपणाहून इतरांच्या संतोषार्थ. ३ ब्राह्मणवेषधर-णारा जो काळ त्यानें. ४ निर्भय. ५ बहु- आशी-पुष्कळ आशीर्वाद. ६ दीर (लक्ष्मण) ७ सत्वामी. ८ अयोध्या. ९ सत्वर.

सगल तसाचि विभीषण केला तत्काल राघवें पूर्ण ८०
भक्त परंतु बिभीषण पवन-तनय जांबवान्हि राहविला
प्रभुनें निज-बोधामृत पाजुनि निःशेष ताप साहविला ८१
प्रभुवर स-दार-बंधु- द्रय-सगल सहित निघे जना बाहे
रम्यें गृहें परंतु न कोणी तेव्हां तयांकडे पाहे ८२
बहु पुष्करादि तीर्थे भूमिवरि परंतु गोप्रतारा या
प्रभुनें महिमा दिधला तेणें पशुतें हि जो प्रतारा या ८३
पी सरस सरभियांचीं होतींच परंतु जीं लवत पातीं
गुण शोधूनि सराचा धरुं देति न अधिकता लव तपातीं ८४
बसले नवे परंतु न गमले वैमानिकांशि ते नवसे
जन तेज विमानावरि पडलें संकोच चिन्मनीं न वसे ८५
विधिनें स्वलोकसंनिध संतानक लोक निर्मिला बरवा
काल महोग्र परंतु न तेथें त्याची तयां असे परवा ८६
वसवी श्रीसीतेसह सुखकर वैकुंठनाम निजधाम
शोभवि परंतु तोही संतानक-लोक-भक्त-वश राम ८७
थोडें परंतु रामा- यण राम-पदीं उदंड हो भावें
लोभावें रसिकजनीं या सुयशें सज्जनांत शोभावें ८८
परंतुरामायण हें मयूरें रामनंदनें॥ श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें
कृतवंदनें आर्यासंख्या २४९ ८९

समाप्त.

१ बंनाया. २ विमानामध्यें बसणाऱ्यांस. ३ नूतनसे ४ नामविशेष. ५ म-हा-उग्र. + नामविशेषतीर्थ.

# मोरोपंत.

## तीर्थरामायण.*

श्रीपति पुष्कर लव शिव बिश्वा घाया दशानन-वधानें
नर होय तयशीं अव- धानें मिळतें न तें अनवधानें १
सत्यव्रत दशरथनृप जो अर्थि द्विज मयूर घन यास
स्वगुरुत्व दे जगद्गुरु क्रमतिस शत-मख-सखास सन्यास
गंभीर कृत-सुर-तरु- व्रीड मनुज-कौतुकी तनुज चार
ते राम-भरत-लक्ष्मण- शत्रुघ्न कुमार रुचिर रुचिर रुचिचार ३
कौशिकया गोपद्रव मथुनि पथीं ताटका हरी राम
+तीर्थांघ्रि गौतमाच्या स्त्रीला वारूनि शाप दे धाम ४
शक्र-यशोनिधि चढवुनि गुण लीलेनेंचि भव्य रुद्र-धनू
ओढुनि मोडी प्रेमें वरि विभुसि महा विभूति भूमिजनू ५
व्हाया कुळ सफळ जनक नृपति परम-वल्गु-भाषिणी धन्या
दशरथ-पुत्र तिघे जे भरतादिक दे तयां तिघी कन्या ६
पुण्ययशा प्रभु भार्गव- राममनःक्षोभ शमवि दे शांती
रिपुचेंही नम नाशी ताप हरी राम-शक्ति शशिकांती ७
×गंधर्वांला गाया लावी प्रभु साधु-चरित नगर भरी
आनंदे संत तदा गमले शिव सर्व गीत नृत्य करी ८
सत्यव्रत-राजाला वर अल्पदृगंगना हठें क्षोभें
मागायाला लागे स्तवुनि म्हणे स्वपतिला यशें शोभें ९
त्वत्तनय राम वल्की[11] जटिल क्रमु काननांत मनुवर्षे[12]

---

*: प्रत्येक आर्येंत तीर्थाचें नांव साधिलें आहे म्हणून या ग्रंथास तीर्थरामायण असें नांव ठेविलें आहे.

१सावधपणानें. २असावधपणानें. ३ पाळक ४नीतियुक्तास. ५केली आहे कल्पवृक्षांला लज्जा ज्यांणीं ६कौशिक-याग-उपद्रव विश्वामित्राच्या यज्ञाला उपद्रव. ७ तेज. ८ पृथ्वीपासून झालेली ( सीता ) ९परम सुंदर भाषणें ज्यांची अशा १० अल्पदृष्टिजीची असी स्त्री ( कैकेयी ) ११ वल्कलें धरणारा. १२ चवदा वर्षे + तीर्थ-अंघ्रि- तीर्थरूप पाय ज्याचे × या आर्येंत गंगा हें नांव राजापुरांतील गंगेचें आहे.

नरनाथा मत्पुत्रा भरता दे यौवराज्य-पद हर्षें १०
सत्यव्रत रक्षाया स्वपित्यानें तीर्थपाद जोडून
हस्त गुरुजनासि निघे सानुज सस्त्रीक राज्य सोडून ११
चतुर समर्थहि राजा धर्मज्ञोत्तमहि पावला ताप
अणवपराधें घडला तीक्ष्ण सुत-वियोग-शोक दे शाप १२
गंभीरहि हाय वदे पुत्र-वियोगार्त कथुनि सारथितें
बसवि रथीं सुत-मोहें जातां स द्वार सहितसार थितें १३
कौतुक-निधि जातां तें पुर शोक-विषांबु-राशिमाजि बुडे
शिशु कीरहि बहु रडले श्री सीता पक्षिणी नसोच उडे १४
कथवे न खेद रघु-वर- विरह परम तीक्ष्ण नागरांस मग
मातांचा काय तयां गमलें शोकांत सर्व शून्य जग १५
शोकांत विप्र वेद- स्मृति न करिति दुःख बहु असें झालें
गुह बहु रडे तयाच्या प्रेमाश्रुभरेंहि भूमितळ धालें १६
प्रभु अति-कोमल दारुण वनवास म्हणूनियां महा सूत
रडला मागें जा हे आज्ञा होतां सुमंत्र तो सूत १७
गुह अश्म कठिन मन करि, पावी रामास सुर-नदी-पारीं
होय भरद्वाज वरिष्ठ कष्टी हृदयीं म्हणे मुनी तारीं १८
बहु विप्र चित्रकूटीं प्रभुला पाहुनि निशाचर-भयानें
सोडिति म्हणती स्वाहित जे त्यांतें केसरी शरभ यानें १९
बालिशता मातेची भरता बहु दुःखदा मनीं होय
शरण प्रभुला गेला विधिनें देउनि नरेश्वरा तोय २०
शामवी तल्लोकातें संश्रित-कल्पद्रु-चरण जनकातें
जल पिंड पादुका दे भ्रात्यातें स्व-पद-भजन-कनकातें २१
परतविला प्रभुनें तो नंदिग्रामीं वसे प्रजा रक्षी
करि दास्य पादुकांचें वल्क-जटा-धर दळें फळें भक्षी २२

---

१ नगरवासीलोकांस २ सारथि. ३ पाषाणासारखें कठिण. ४ स्वशत्रु. ५ प्रभुतें ६ शूरवंता. ७ दशरथास. ८ पर्णें, + अणु-अपराध-थोड्या अपराधानें.

अत्रिस परम पुरुष दे आनंदा तातसा मुनि हितातें
करि हुंगी सानुज-जग- दीश-शिरातें पदीं सुनिहितातें २३
अनुसूया श्रीस उटी दे विपुलगुणा अयातयामाजी
स्वीकारी लेंकुरपण जें सीता बहु दया तयामाजी २४
दंडकवनीं प्रचंड क्षणदाचर रौद्र जानकीस हरी
भासे काळ जगा त्या वधुनि विराधासि राम मुक्त करी २५
तापस-वेष प्रभु दे रात्रिचर-त्रस्त-मुनिजना भेट
अभय-वरद-तीर्थपदा म्हणति भवाब्धींत भेटलें बेट २६
प्रभु-लक्षित मुन्याश्रम विप्राधिप कुंभजाश्रमपदातें
गेला तोंषाचें या दे शस्त्र दिसे जयोत्सुक तदा तें २७
गृध्रवर दाशरथिनीं नमिला पितृ-सख जटायु तत्कथित
गोदा-तट-पंचवटी- स्थान वसवि करि जगत्त्रयीं मैथित २८
दशमुख-भगिनी विधवा शूर्पणखा ये सजूनि कनकाची
पुतळी होय म्हणे मी योग्या बहु शर्मदा न जन काची २९
जीवित रक्षी नासा कर्ण तिचे लक्ष्मण क्षणें कापी
कुडवी चमू समस्ता तद्भ्राता खर रणीं मरे पापी ३०
हेम-हरिण खळ दावी प्रभु लक्ष्मण कपट करुनि दूर करी
खड्गें जटायुतें ही पाडी श्रीतें बुडावयासि हरी ३१
प्रभुवर बहु हाय म्हणे मानी सर्वस्व-नाश तात-सखा
विधिनें दे सलिल करुनि जनकाच्या जेविं तेविं अंत्यमखा
तप योग करुनि तरले सधर्वा उष्णीष हें न अन्यास
सुपुरुष दशरथ-सख्यें अतुळ मिळे भव्य याचि धन्यास ३३
योजन-बाहु कबंध ग्रासाया जो धरी तया तारी
शबरीतें सत्यपदीं स्थापी मह मारुतीस दे भारी ३४
चतुरें वात-कुमारें भेटविला रामभद्र सुगळाला

---

१ जीवरून महर गेला नाहीं असी (ताजी) २ विप्र-अधिप-कुंभज-आश्रम-पद-ब्राम्हणश्रेष्ठ जो अगस्त्य त्याच्या आश्रमस्थानातें. ३ प्रख्यात. ४ सुख देणारी. ५ हरणकरी. ६ जटायूस ७ अंत्य वीला. ८ कल्याण. ९ सुग्रीवास १० उत्तमयशारूपपागोटें ११ उत्सव.

क्षुद्रावाळीस वधुनि निवविं प्रभु मित्र-नेत्र-युगळाला ३५
लंघुनि समुद्र मुद्रा श्रीतें दे मारुति -छळी मंदा
जाळी पुरी चकित कर वदले या ग्रीष्म-नीरधिस वंदा ३६
गोष्पद करि लवणोदा देवीस पुसोनि पवन-पुत्र हरी
श्रीचा चूडामणि दे प्रभुला संदेश कथुनि खेद हरी ३७
शिर चरणावरि ठेवुनि कथितां संदेश परम मानद या
कृत-कर्मा आलिंगी वर्णी प्रभु करि पित्यासमान दया ३८
क्षिप्र निघे अनुज-कगळ- कपि-बळ-सह लवणसागरा पावे
तो धरि चरण बिभीषण जे शिव-विधि-ज्ञानमरवादिकीं गावे
भीताऽभयप्रद प्रभु दे लंकाराज्य नमनफळ दावी
सेतु रचावा ऐसें सिंधु कथी काम तें नळा लावी ४०
तो ब्रम्हराक्षस प्रभु- मस्तक-धनु दारवूनि देवीतें
गुरु-मंतु करी रडवी जें अघ विष विषय-लुब्ध सेवीतें
लोकेश्वर-चूडामणि- दीपक-नीराजितांघ्रि तो पारा
पावे सेतुपथें किति शतयोजन करि भवाब्धि सोपारा ४२
कृष्णाध्वा जेविं वनीं लंकाद्वीपीं महाप्रताप शिरे
मुनि वदले रे मत्ता प्रभुला नमन न करूनि तापशि रे ४३
जाणुनि वेदा शास्त्रा सर्व पुराणांहि खळ असामकर
श्रीपति म्हणे दृढ मिठी घालि नसे आमिषा जसा मकर ४४
त्या प्लवग-नायक कुटी छद्मनिधिस करुनि तीव्रतर वेगा
वदला श्री दे सावध हो अहिस गरुड-नखा न लखे गा ४५
मग अंगद पाठविला प्राणाचें व्यसन दारुणा रानें
सूक्तें खळा घळावें तरि मत्ता कां न वारणा राजे ४६
प्रभु निज-पंकहर-चरित सत्कवि-गंधर्व-कोटिनीं गावें

---

१ शक्तिसमुद्रास. २ लवण-उद- क्षारसमुद्रा. ३ वानर (मारुती) ४ निरोप. ५ हरणकरी. ६ मोठा अपराध. ७ अग्नि. ८ सज्ञानकरणारा. ९ कलर. १० चांगल्या बोलण्यानें. + सीतेचा. * हत्तीला

दशवदनासीं निरुपम युद्ध करी सुचिरकाळ या भावें ४७
पांडित्य घनरवाचें घटकर्णाचें निशाचरवराचें
पाहे मानद हा प्रभु दावी मग आपुल्या खर-शराचें ४८
जो मेघनाद खोटा मायावी नागपाश जे घाली
ते वारवि पक्षिवरा त्रिजगीं प्रभु हा करी यशःशाली ४९
सांगे जनासि रक्षी व्यसनीं सबळा मलापहा या गा
मारुनिळा अभय तुम्ही मागा श्रितवत्सला महाभागा ५०
बहु सुखवुनि तुंदिल करि गणपतिसे सर्व साधु हित कथुनी
भव्य जया रुद्रापरि पद मी द्विज रविवरें अरिस मथुनी ५१
उग्या हवीं विजयदा सामग्री स्व-रथ-सारथी प्रेषी
वासव यश घे मातलि- ही ब्रह्म कथी वधावया द्वेषी ५२
दिव्या माजि उतरली जनक नृप सुता महासती सीता
जय-हेतु इच्छेंचि व्रत ऐसी केली महर्षि-सुर-गीता ५३
जे स्नेहपात्र शिशुसे युद्ध-मृत प्लवग ते उठीव असा
वर मागे गंधर्वा गा या यश हरिस दे तयाहि रसा ५४
करवि ममोप्येष यथा तव हें बोलोनि हा क्रिया अरिची
न्हस्त गमवि मेरु पदीं बैसवुनि विभीषणा दया हरिची ५५
घनरव-काळ करी अभि- षेक विभीषण-शिरीं निवे लंका
रीति प्रभुची पंकां वारी प्रणतीं उरों न दे शंका ५६
माताला नम्र प्रभु सानुज सस्त्रीक होय परमहित
दर्शन मानी वर्णी करि विश्वीं दशरथासि परम हित ५७
बैसे प्रभु यातु-कपि क्षिति-पति वाहूनि पुष्पकीं क्षिप्र
ये स्वपुरा हित नीरद करि बर्ही-बंधु-पौर-गुरु-विप्र ५८
श्रीराम सकळ-हितकर निर्जर-तर्वधिक-चरण कंजरजा

---

१ इंद्रजिताचें. २ कुंभकर्णाचें. ३ रावणाचें ४ पाप घालवणाऱ्यास ५ इंद्रास. ६ मम-अपि-एषः-यथा-तव- हा रावण जसा तुझा तसा माझाही. ७ यामका. ८ मेघ. ९ मयूरासारखे जे बंधुपौर आदिक त्यांचें. १० निर्जर-तरु-अधिक- चरण कंज-रज- कल्पवृक्षापेक्षां अधिक ज्याचें चरण रज. + दोंदील. ## ब्रम्हास्त्र. ४ लक्ष्मण.

जगतीश पुमर्थप्रद यश करि कवि म्हणति वज्रपंजर ज्या
तीर्थरामायणप्रेमें मयूरें रामनंदनें श्रीरामचरणांभोजीं
अर्पिलें कृतवंदनें. ६०

---

**समास.**

## ऋषिरामायण.[*]

श्रीप्रिय केशवचक्री श्रित-सर्व-सुर-द्विजाऽवन-काम
होय चतुर्मूर्ति प्रभु दशरथ-सुत राम हें धरी नाम १
प्रचुरैधमानतेजा कौसल्या-पुत्र राम हा ज्येष्ठ
कैकेयीचा सभ्य- सुत भरत तदीय गुण बहु श्रेष्ठ २
कमनीयरूप लक्ष्मण शत्रुघ्न प्रसवली सुमित्रा हे
सद्गुण-रत्नक्षीरधि ज्यां अनिमिषतात भाग्यवान् पाहे ३
औदार्य बहु तपाचें ज्याच्या तो गाधिज स्वयें मागे
त्या ऋषिस राम लक्ष्मण दे अज-सुत निज-कुळ-व्रतीं जागे
भृत्य जयाचे सुरवर तो सानुज गुरु करी तया ऋषिनें
शिष्यत्व वरी सुयशो- मृतहें सेविति सुधी मनें तृषितें ५
करि अंत ताटकेचा प्रभु मग सिद्धाश्रमांत कामारी
जेविं त्रिपुरा ऋषि पर्ळ- गिळित्या राक्षस-बळास हा मारी ६

---

१ पुरुषार्थ देणारा. २ चक्र धरणारा. ३ आश्रित जे सर्व सुरादिक त्यां-च्या रक्षणार्थ. ४ प्रचुर-एधमान-तेजा- अत्यंत वाढणारें तेज ज्याचें. ५ त्याचे. ६ दशरथ. ७ सु-यश-अमृत. ८ मांसभक्षण कर्त्या. + सुंदर स्वरूप. * जगति-ईश. × देवांचा बाप.

*: प्रत्येक आर्येंत ऋषीचें नाम साधिलें आहे म्हणून याला ऋषिरामायण हें नांव दिलें आहे.

पद कमळरजाणुवनिळें मुनिपत्नीचा निवारिला शाप
चाप शिवाचा भंगुनि जनक-सुतेचाहि शमविला ताप ७
परमेष्ट मुनींद्र बुधा जनका रामानुजां तिघी कन्या
दे ऐसें उपदेशुनि जाय रुचे फार मैथिला धन्या ८
सबळ दशरथ स्वपुरा आणवि करि तो विवाह कवि-चार
उत्सव घन जन बर्हीं कीं नृप दोघेहि वृन्द सविचार ९
उत्सव अत्यद्भुत हा जन्मुनि दोघां नृपांसि जे इतर
बंदी मागध सूत प्रचुर निवाले सविप्र-सुर-पितर १०
प्रमुदित पुरासि येतां ये भार्गवराम विघ्न परि चुकवी
प्रभुचा प्रताप संकट लीलेनें दशरथास्य जें सुकवी ११
मुक्त करुनि परधर्मा- पासुनि मुनि-मार्ग उचित तो धरवी
दे शांति राम-हृदया चुळ करुनि तमास राम-बोध-रवी १२
अगणित-गुणा प्रभूतें स्वस्त्यस्तु असें म्हणे पुसुनि जाय
स्व-पुरा सुत-स्नुषां-सह आला पावोनि विजय तो राय १३
दृष्टि-स्थ पुर-जनाचा काढाया ताप सानुजा भरता
साधु युधाजिन्मातुळ ने पुसुनि नृपा सदिष्टलाभरता १४
ऊनत्व-हेतु लोभ स्वीकारी स्वर्ध्वजा पति-यशातें
मळवाया स्त्री रामा युवराज्य करूं न दे निज-यशातें १५
उग्र वदे कैकेयी भरता दे यौवराज्य वन रामा
मनुवेर्षे राजा धरि षंढगुणाचि ऐकतां अशा कामा १६
परिसुनि तें प्रभु गुरुच्या भव्या धर्मा न शब्द लागाया
नमुनि निघे सीता-नुज- सह सुजनीं या पथींच वागाया १७
दीप्ति न लोपे त्यजितां सद्रत्न अनर्घ्य भूषणें तनयां

---

१ पद-कमल-रज-अणु-अनिल-चरणकमलरजाच्याकिंचित् वायूनें. २ अहल्येचा. ३ सैन्यासह. ४ जनरूपमयूर. ५ उत्पन्न होउनि. ६ स्वस्ति-अस्तु-कल्याण असो. ७ युधाजित्-मातुल. ८ सत्-इष्ट-लाभ-रत. ९ कमीपणाला कारण. १० स्वर्गीध्वजासारिखें. ११ कैकेयी. १२ चवदावर्षे. ※ धनुष्य. + विश्वामित्र. ⁂ दशरथ-आस्य- दशरथाचें मुख.

त्या दोघां ती नेसवि   वल्कें[1] करि माय मोहिली अनयां १८
गत-गौरव दशरथ नृप   हाय म्हणे तळमळे रथीं तनया
बसवी कथुनि सुमंत्रा   सखीका दोष लाविती जन या १९
कर्म-फळ अवश्य तशा   त्याहि उपस्थित पहा कसें झालें
प्रिय-पुत्रांच्या शोकें   शापास्तव मरण न चुकतां आलें २०
चवघांत जवळ एकहि   तनय नसे प्रभु गुहा भरद्वाजा
भेटोनि चित्रकूटीं   वसला हें तो सुमंत्र कथि राजा २१
यन्नामस्मरण[2] जना   मुक्तिप्रद तद्वियोग-तप्त मरे
दशरथ तद्वपु तैलीं   शोकीं साकेत सुचिर-काळ भरे २२
मंत्रि-प्रेषित दूत   द्रुत सानुज भरत आणिते झाले
तो मातेसि म्हणे गे   दुर्गुण उदयासि हे कसे आले २३
सारुनि उत्तर-कार्य   स्वजन-सहित शरण जाय रामातें
प्रभु पादुका अभय दे   फिरवी भरतासि करुनि सामातें २४
नंदिग्रामीं राहे   अति-दुःखित भरत तापसत्वानें[4]
मंत्रि-मतें पद रक्षी   साहे दुःसहहि ताप सत्त्वानें[5] २५
वनवास-रसिक अत्रि-   प्रमुख तयां श्रेष्ठ भाव अज दे हा
नमि पितृसख-गृध्रा सजि   मुनि-पत्नीच्या यदंघ्रिरज देहा २६
दशमुख-भगिनी दुष्टा   मायेनें सुतनु भक्ति जी दावी
कर्ण घ्राण हरुनि   प्रभु तीतें हा म्हणावया लावी २७
ती पाखरासि प्रेषी   मारा या प्रभुसि हा तया शमवी
कार्य सुरांचें सत्वर   करितां ऐसें सुराधिपा गमवी २८
विश्वाःहित खळ दशमुख   कनक-हरिण-रूप रात्रिचर धाडी
भूमिसुता धरवी त्या   त्रस्ता प्रभु मार्गणें[6] वनीं पाडी २९
तो भयद श्वास करी   आर्त-स्वर राम मारिच दूर वनीं
तद्वाक्यें जनक-सुता   धांव म्हणे देवरा[7] भिवूनि मनीं ३०

---

१ वल्कलें. २ यत्-नाम-स्मरण. ३ भरत. ४ तपस्वीपणानें. ५ धैर्यानें. ६ बाणानें.
७ दिरास (लक्ष्मणास)

रजनीचर कपट नव्हे राम-प्रभु-शब्द कथि असें सुमनी
द्रवडि विषाग्नि कटु वदुनि भक्ता पुरवी प्रकोपना दुर्मती[1] ३१
परमार्त शरुचिहि रागें गेला गमला उदश्रु[+] बाळकसा
शून्योटजीं[2] गिरे हरि भीरुस[*] भासेल तो न काळ कसा ३२
सोडवितां औद्धत्यें[3] पक्ष-च्छेदुनि जटायुतें पाडी
उद्दाम लय-भय किमपि न धरी हरि जरि परांगना नाडी ३३
आशवें[4] च स्वपुरींत श्री ने रोधी तिला अशोकवनीं
लक्ष्मण कथि दुःख प्रभु धाके जों यातु-वध[5] करूनि मनीं ३४
शून्य उटज पाहूनि प्रभु शोकोपहत[6] होय हाय वदे
लक्ष्मण धैर्य भ्रात्या दे जरि तो किमपि आपणासि न दे ३५
विपिनीं पुसे लतांतें वृक्षांतें जानकी प्रभु नगांतें[7]
हरिण करेणु फणीतें रडवि रडुनि हंस बर्हिण[8] खगांतें ३६
देखुनि जटायु मूर्छित हाय म्हणे यत्न करि तया वदवी
वृत्त कथुनि लय वरि तो तत्पुत्राचीच राम धरि पदवी ३७
मग दे सुगति कबंधा[9] वर्ण्यविमानांत बैसवी शबरी
करि वायुजीं[10] सुकंठीं[11] धर्मात्मा प्रीति जानकीश[12] बरी ३८
शक्र-सुत-मळा प्रभुचें त्या गंगास्रोतसें[13] शिवे शस्त्र
कपि-राज्य सुगळ सेवी धौत न परम रम्य काय तें वस्त्र ३९
गंधवहज[14] उदधि तरे स्वस्ति वदे श्रीस नमुनि दे मुद्रा
कार्य करुनि आवश्यक परते जाळी पुरी छळी क्षुद्रा ४०
लोभ बहु मरुसुतीं प्रभु करि यश वाढवी निघे सबळ
कपि शतकोटि उसळले दशकंठाचा करावया कवळ[15] ४१

---

१ दुष्टमति. २ शून्य-उटज-शून्यपर्णशालेंत. ३ उद्धतपणानें (दांडगेपणानें) ४ आशु-एव-लवकरच. ५ राक्षसवध. ६ शोक-उपहत. ७ पर्वतांनें. ८ मयूर. ९ नामविशेष (राक्षस) १० मारुतीच्या ठायीं. ११ सुग्रीवाच्या ठायीं. १२ जानकि-ईश. १३ गंगाप्रवाहसा. १४ मारुती. १५ ग्रास.
+ उत्-अश्रु. (रडत) * भित्रीला.

कृत-नमना द्विषदनुजा[1]  प्रभु लंका-राज्य दे सुचिर शुद्ध
सेतु-पथें उतरे करि  नाकेशा[2] प्रीत आदरुनि युद्ध ४२
शिर धनु दावुनि रडवी  प्रीतें जो परम-दुष्ट-बुद्धि अरी
पहिलेंचि लोमहर्षण[3]  युद्ध तयासीं बलीसुरेंद्र करी ४३
अंगद कथि उग्र प्रभु-  रण कोणीहि न करूनि युद्ध नरे
हों न म्हणु विश्रवा दे  सीता कर साम हो न उद्धत रे ४४
राज्य-पदापासूनि  च्यवणारा खळ न मान्य करि साम
आज्ञा दे सुग्रीवा  रजनी-चर-वर मथावया राम ४५
युद्धांत शक्रजित् करि  अहि-पाश-निबद्ध सानुजा रामा
यातुपति हर्ष पावे  गरुड महासंकटांत ये कामा ४६
विपुल-बल घटेश्रुति[6] ये  स्वस्त्युक्त[7] त्रिदशा[8] वदनि बळ मोडी
सुगळा धरि परते परि  तत्कर्ण-घ्राण तो सुटे तोडी ४७
मारी सगळेचि गिळी  कर्कंधु-फळांपरि[9] प्लवग शतशा
वेडे यूथप झाले  प्रभु-सायक मात्र वचकले न तशा ४८
घनरव रिपु लपुनि नभीं  शरवर्षे सानुज-प्रभुसि ताडी
मारुनि-बिभीषणेंतर  मूर्छित कपि-ऋक्ष-सुगळ-सह पाडी ४९
ऋक्षाधीश-प्रेरित[10]  मारुति औषध्यगाचिया[+] शिखरा
लवकरि आणुनि उठवी  म्हणति जगत्प्राण-पुत्र यासि खरा ५०
तो शत्रु रणीं मोही  मायासीता[11]-शिरोंबुरुह कापी
श्रम हरि बिभीषण सुधी  लक्ष्मण तेजेंचि भंगला पापी ५१
प्रभु-हृदय-तपस्वी-वृसि[12]  श्रीहत्यार्थी दशास्य खड्ग धरी
त्या शश्वदतिक्रमकृत् अकृतीस फिरवी सुपार्श्व साधुपरी ५२
उरुविक्रम[‡] विश्वंभर  मन्नंतु प्रभु अनेक शतकोटी

१ द्विषत्-अनुज-शत्रूचा कनिष्ठ बंधु. (बिभीषण.) २ नाक-ईश. (इंद्र) ३ रोमांच उत्पन्न करणारें. ४ हाय. ५ राक्षसपति (रावण). ६ कुंभकर्ण. ७ स्वस्ति-अस्तु-कल्याण असो. ८ देव. ९ बोरांसारिखे. १० ऋक्ष-अधीश-प्रेरित. ११ मायारूपी सीतेचें शिरकमळ. १२ राम-हृदयरूप तपस्वी बसण्याचें आसन अशा सीता तीतें मारण्याकरितां. + ओषधि-अग-औषधियुक्त पर्वताच्या. (द्रोणागिरिच्या) ‡ महापराक्रमी.

मर्दी चतुरंगबळ प्रकट करी त्र्यक्षरीति[1] जी मोटी ५३
मेले सर्व भ्राते स्मृत मंत्री यातुवीर तज्जाया[2]
रडतां दशकंठ निघे प्रभु-सायक-सागरांत मज्जाया[3] ५४
स्मर-वैरी शंकेना पाहे उत्पात तरिहि ये युद्धा
मूर्त प्रलयचि मानिति वानरयूथप[4] रणीं तया क्रुद्धा ५५
सबळा स्मगळा भंगी माराया रावानुजा महाबाहू
युद्धांत गांठि घाली ग्रासाया हिमकरा[5] जसा राहू ५६
शरणागतासि रक्षी सौमित्रि महापराक्रमी छेदी
तच्छक्तितें दुजीनें तदुरःस्थळ[6] परम कठिन तो भेदी ५७
मरुदात्मज जाय पुन्हा अति शीघ्र पतंग‡-राजसा गुप्त
दिव्यौषधी सशिखरा आणुनि उठवी तया जसे स्मृप्त[7] ५८
शक्रार्पित-जैत्ररथीं[8] भूमिसुता-जानि+ बैसला सप्त
पूर्ण अहोरात्र करी रण निववायासि विश्व जें तप्त ५९
प्रभु बान फळें तैसीं शत दशमुख मस्तकें जरी खंडी
नपडे तो दे भीती त्रिदशवरा कांपवी जसी थंडी ६०
प्रभुच्या मनास वाटे गेलें शस्त्रास्त्र तेज तों जवळ
प्रकटे कुंभज[9] जपवी तरणि-हृदय[10] यशचि दे गमे धवळ ६१
होय प्रसन्न जपतां स्वहृदय दे विजय-वर रवि प्रभुला
ब्रह्में* प्रभु अरिस वधी यासि म्हणति सर्व तज्ज्ञ विप्र भुला
प्रमुदित झाले वासव शंकर विधि नारदादि नाकर्षी
तो उत्सव सर्वांतें चुंबक लोहास तेविं आकर्षी ६२
प्रभुवरि स्मर मुनि हर्षे दिव्य-कुसुम-वृष्टि करिति यश गाती
म्हणती जी विजयश्री या स्वस्वामीस नित्य वश गा ती ६४

---

१ त्रि-अक्ष-रीति-महादेवाची रीति. २ तत्-जाया. ३ बुडाया. ४ वानरांच्या समुदायाचे स्वामी. ५ चंद्रास. ६ तत्-उरस्थळ. ७ निद्रिस्थ ८ इंद्रानें अर्पिलेला जो जयशील रथ त्यांत. ९ अगस्त्य ऋषि. १० आदित्यहृदय. + भूमि कन्या जीसी ना ती स्त्री ज्याची तो (राम) *: ब्रह्मास्त्रानें. ‡ पक्षिश्रेष्ठ गरुडासारखा.

शौर्य प्रभुचें वर्णिति दुंदुभि-मुरजानक-प्रमुख वाद्यें
वाजविति गाति नाचति हर्ष दिला अरि वधूनि जगदाद्यें ६५
सांगुनि विभीषणा प्रभु विधिनें करवी क्रिया दशास्याची
जरि भांडला कठिन अरि बहु मानी टेंक त्या अशास्याची
केला भूप बिभीषण अभिषेक अणीक मांडवुनि भव्य
दिव्योत्तीर्णा देवी प्रभुचा उत्संग शोभवी सव्य ६७
ऋषिवर शिष्य करीती स्तुति दशरथ ये तया नमी कृतना
करि कीर्ति या त्रिलोकीं शृंगारा बहु गमे हिता कृतना ६८
मृत सर्व पाकशासन कपि उठवी ऋकृस्से ऋथा वर्षे
त्या सेश्वरांसि पूजुनि भक्त बिभीषण महामना हर्षे ६९
पुष्पक लंकापति दे घे त्या सबळा सख्या तयामाजी
आनंदवूनि घे भर- तासि म्हणे जो नसे दया माजी ७०
सत्वर पुष्पक विनता पुत्रसम निघे त्रि-लोक-गीतेतें
नकुशाळगति प्रमुदित करि रामाहूनि फार सीतेतें ७१
दशमुख-शासन दावी युद्ध-मही सेतु चरित आयकवी
श्री बहु हर्षे तत्कख जाल्या मुख-शतहि कथिल काय कवी
प्रभु जलधि-तीर दावी सांगे सत्कारुनि स्वयें मार्ज्य
प्रेम करी या स्थानीं लक्ष्मण दे या बिभीषणा राज्य ७३
मग सांगे आर्य कृगळ परम-सखा प्राप्त या नगीं झाला
हा ह्रद मी हस्ती कीं या कमळीं देवि भृंग हा धाला ७४
शुद्धात्मा विक्रम-निधि पवन-सुत प्रथम भेटला मग या
मज भेटवि सुग्रीवा सत्संगति हिन करी नसी न गया ७५

---

१ शासन करण्यास अशक्य जो रावण त्याची. २ कल्याण. ३ दिव्य-उत्तीर्णा-शपथेंतून पार झाली. ४ मांडी. ५ अतिविस्तारपावलेली. ६ पुत्रत्व. ७ बिभीषण. ८ नत्-कुशाल-गति- त्या पुष्पकाचें कल्याणरूपगमन. ९ पुष्कळ १० पर्वतीं. ११ डोह. १२ तृप्त झाला. + सामर्थ्य. ## त्रैलोक्यांनगाइलेली असी (सीतेचें विशेषण)

किष्किंधा दारवविता कथितां तें वृत्त गुणवती तारा
श्रीनें आणविली त्या रुचिर-विमानीं[2] कथा कथी मोरा ७६

पंपेच्या तीरींची निज-विरह-दशा सुदुःसहा कळवी
निज-चरणीं शबरीचें प्रेम कथी स्व-हृदयासि जें वळवी ७७

शत्रुपण कबंधाचें मित्रपणहि जाहला स्वयें कथिता
प्रभुवर अनंत-हृद्य जो मथिता तारावया भवव्यथिता[3] ७८

वेगें मंदहि चाले पुष्पक समजोनि नाथ-भावातें[4]
पावे गोदेसि जिचें दे बहु जीवांसि पाथ[5] भावातें ७९

गोदावरीस वंदी जगतीजा[6] जी झषां[7] दिसे स्वर्ग
किंबहुना माळेपरि जीतें वाहे शिरीं सदा भर्ग[8] ८०

अति सुकुल-व्रत-रक्षण करुनि श्रीचें जटायु तो मेला
त्यातें स्मरतां प्रभुचा सीतेचाही मुखेंदु कोमेला ८१

घटजादि विशदधी[9] जे चिर अवलोकुनि तदाश्रमपदातें[10]
अत्र्याश्रम पाहे श्री- अनुसूया-प्रेम आठवि तदा तें ८२

श्रीचित्रकूटशोभा[11] पाहुनि चाले स्व-पर्णशालेच्या
प्रभु कर जोडुनि महिमा वर्णी श्रीकंठ-मौलि-मालेचा[12] ८३

प्रभुनें मुनि प्रयागीं शंकरसा सुखद सविनयें नमिला
भरताकडे पवन-सुत धाडुनि तो दिवस आश्रमीं क्रमिला ८४

प्रभु सलिलद-रव[13] कपि शिखि चातक गुह भरत कवि मना गमले
शमले ताप श्रीम- द्दर्शन होतांचि तद्यशीं रमले ८५

परमानंद पुरा दे दशरथ-भद्रासनीं बसे राम
प्रभु हा करि प्रजांचा प्रेमें संपूर्ण सर्वही काम ८६

---

२ श्रेष्ठ. ३ संसारानें जो तापला त्याला. ४ रामाच्या अभिप्रायानें. ५ उदक. ६ पृथ्वीपासून झालेली (सीता). ७ मत्स्यां. ८ महादेव. ९ स्वच्छबुद्धि १० तद्-आश्रम-पद. ११ शोभायमानचित्रकूटपर्वताला. १२ महादेवाच्या मस्तकसंबंधी मालेसारखी जी गोदावरी तिचा. १३ सलिलद-रव- मेघाचा शब्द.

वानर-यातु-पतीची प्रभु जसि तसि रचिल न स्वरग[1] पूजा
अखिला वात्सल्य भुलवि जें पनिसह पवनजीं करी भूजा[2] ८७
सोदरि[3] लवण शत्रुघ्नें वधिला भरतें त्रिकोटि गंधर्व
हर्षित केलें प्रभुनें जग हें यश गाय शक्र विधि शर्व ८८

ऋषिरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृत-वंदनें ८९

---

## समाप्त.

## स्तोत्ररामायण.*

विश्व-स्रष्टा विष्णु- प्रति विनवी दशमुख-क्षयार्थ तया
वर वेदशास्त्र-षट्का- रक्षाया दे जगीं करूनि दया १
भूप-स्तत-भव्य-यशा रवि-कुल भव सत्प्रभु प्रथित भारी
जो दशरथ-प्रभूत द्विज-हित असंकेतु स्मर-व्यसन वारी २
तो भूतरणी क्षितिभृत् पति केला तात-भाव पाहोनी
भूताप-हर चतुर्धा स्वात्माही गर्भ-वास माहोनी ३
तो देव भूतभावन कौसल्या-पुत्र राम-नाम धरी
पूतात्मा परमात्मा कैकेयी-पुत्र भरत होय हरी ४

---

१ स्वर्गसंबंधी वृक्ष-(कल्पतरु) २ पृथिवीपासून झालेली (सीता) ३ सत्-अरि-साधूचा शत्रु. ४ ब्रह्मदेव. ५ मरुत्यान. ६ वारंवार. ७ दे वांचें संकट.

* विष्णुसहस्रनामावर १० रामायणें करून प्रत्येक रामायणांत १०० नांवें संपविलीं आहेत.

[1]जनता करूनि मुक्ता नांदवि जो निज पदीं जया धन्य
स्तनगति भजन परमागति मागे होवोनि बाळ तो स्तन्य[2] ५
[3]अव्यय भव्य-यशो-निधि होय सुमित्रा-तनूज पुरुष-मणी
लक्ष्मण शत्रुघ्न अशीं नामें धरि दानवायु-वायु-फणी[4] ६
होय असा क्षीराब्धिचा जामाता मनुज गाधि-सुत-यज्ञ[5]
क्षेत्रज्ञ अक्षर प्रभु रक्षी हें चरित वर्णिती तज्ज्ञ ७
वारी वियोग योगद- पद कविजन देवतरु निवे दांत[6]
मुनि सस्त्रीक तयातें ताप शमे जो न वरुनि वेदांत[7] ८
विनवी प्रधानपुरुषें ईश्वर हा प्रभु जनक-भूप-चित्तातें
तो शिव-धनु चुरितां दे कन्या या मातुजा[8] स्व-चित्तानें ९
जो नारसिंहवपु घे श्रीमान् खळ-कनक-कशिपुनें[9] मारी
तो केशव पुरुषोत्तम हा या भृगुराम[10] काय हो भारी १०
या सर्व शर्व[11]-मुख्य स्मर गाती विजया शिवप्रदा स्थाणू[12]
तैसा भृगुपति निश्चळ होय म्हणे शांति धनु मनीं नाणू ११
भूला दिवस तसा दे तो सु-विजय मंथरा-मना मह[13] न
जो श्रीचा अव्यय निधि कैकेयीनें तया दिलें गहन[14] १२
मातृ-मनीं संभवला भावन हित देव-रचित कीं भर्ता
श्रीचा हो क्षिप्र भव- प्रभुसा स्वोग्रांऽहितायुचा हर्ता[15] १३
ईश्वर वल्क[16]- जटाधर लक्ष्मण-सीता-समेत जें जाय
हर्षे बहु स्वयंभू शंभुहि आदित्य तें म्हणे हाय १४
[17]हा पुष्कराक्ष म्हणती पुर-जन करिती महास्वन स्नेहें

---

१ जनांचासमूह. २ स्तनोत्पन्न (दुग्ध.) ३ नाशरहित. ४ दैत्यांचे आयुष्यरूप वाऱ्यास खाण्याविषयीं सर्पासारिखा. ५ विश्वामित्राचा यज्ञ. ६ जितेंद्रिय. ७ वेद-अंत-उपनिषदें. ८ सुभास. ९ दुष्टहिरण्यकशिपुनें. १० परशुराम. ११ महादेवादिक. १२ खांद्याशिवाय वृक्षाच्या काड्यासारिखा. १३ आनंद, उत्साह. १४ अरण्य. १५ स्व-उग्र-अहित-आयु-आपल्या उग्रशत्रूच्या आयुष्याचा हरण कर्ता. १६ वल्कलें जटा धरणास. १७ खेद करून.

शोकें अनादि निधन[1]हि बहुधा नापेंचि भक्त तद्देहें १५
विविधा ताप-विळापा करि सोडी देह इंद्र कीं तापें
धातु जळे उत्तमही धीर विवेकी गळेचि तो शापें १६
मातुळ-गृहागत भरत साहेना अप्रमेय-विरहानें
निंदी मातेसि म्हणवि सदन हृषीकेश-रहित चिर हो तें १७
तान-क्रिया करि निघे तो प्रेमळ पद्मनाभ-पाद-रत
भेटोनि चित्रकूटीं अमर-प्रभुतें म्हणे मभो परत १८
राम म्हणे ताताचें उक्त करावेंचि विश्वकर्मा तें
या गाइल मनुजेश्वर सत्याऽवन दारवील शर्मानें १९
भव-वृक्ष-त्वष्टा दे राज्य करायासि पादुका भ्रात्या
नंदिग्रामस्थ विषय स-कनिष्ठ त्यजि जपे दयाःभ्रात्या २०
स्थविर प्रधानहि ध्रुव निश्चय कीं ज्यांसि भोग अग्राह्य
चालविति शाश्वत व्यव- हार बहु विराग आंतर न बाह्य २१
अरि[11]-कक्ष कृष्ण-वर्त्मा तो मेघश्याम लोहिताक्ष हरी
अत्रिम स्मरवचि विराध[12]- प्रतर्दन भक्त-वृंद हृष्ट करी २२
देव प्रभूत-दय जो त्रिभुवन-कर कुशल-गुण-निधी राम
लब्धारि मथी करि तो पवित्रमंगलहि पर घटज[13]-धाम २३
ईशान-ध्येय प्रभु पितृ-सख[14]-गृध्रासि भेटला त्याला
प्राणद किंवा प्राणचि रामासहि तो स्व-तातसा झाला २४
राम म्हणे तूं ज्येष्ठ श्रेष्ठ-सुनेला वनांत संरक्षीं
आम्ही नव प्रजापति- भावें राज्या सदैवही लक्षीं २५.

---

१ मृत्यु. २ दशरथ. ३ गृह. ४ हाय. ५ पर्वतविशेष. ६ माघारें फिर. ७ कल्याणानें. ८ संसाररूपवृक्षछेदनकर्ता. ९ शत्रुग्नसहवर्तमान. १० वृद्ध. ११ शत्रुरूपतृण. १२ विराधराक्षसास मारणारा. १३ अगस्त्यऋषीचें गृह. १४ दशरथाचा सखा जो जटायु त्याला. * अग्नि.

गोदा-तटीं मग उटज[1] करुनि वसे तो हिरण्यगर्भ-गुरु
भूगर्भ-स्त्रीरत्ना हरि दशमुख ताप दे प्रभूसि उरु[2] २६
माधव-दयिता गृध्रें सोडविली परि तदीय[3] पक्ष खळ
छळपटु खड्गें खंडी ने नें स्त्री-रत्न भी न जेविं गळ २७
मधुसूदन कनक-हरिण राक्षस मारूनि परतला वाटे
लक्ष्मण साश्रु कथी तें ज्या आर्योक्तें[4] उरस्थळीं फाटे २८
ईश्वर ही स्त्रैण-तैसा शून्य विलोकूनि गृह म्हणे हाय
वन हुडकितां निरखिला क्षत-मूर्छित तात-सख[5] महा-काय २९
सावध करितां सांगे रावण कृत-विक्रमी[*] तनु त्यागी
त्याची क्रिया करी प्रभु धन्वी रकडी वदे वनीं हा[6] गीं[7] ३०
मेधावी लक्ष्मण या[8] समजावी करुनि विक्रम खळांतें
मारूं आर्या[9] आणूं न असाध्य तुझ्या पराक्रम-बळानें ३१
राक्षस कबंध[10] धरि जो त्यासि अनुत्तम[+]-दयालु दे सुगती
बसवी विमानि शबरी सज्जन या सद्यशो-मृतें[11] फुगती ३२
सर्व-दुराधर्ष तरि प्रभु पंपेच्या[12] तटीं स्मर-शरांनीं
कोंपे लीला-मानुष-तनु मानाया खरा नर परांनीं ३३
वात-सुतीं[13] सुग्रीवीं करि परम दया कृतज्ञ-पर राम
दे खळ वाळीस वधुनि मित्रा स्त्री श्रीसमेत तद्धाम[14] ३४
निज-कृति गावी कविनीं निश्चय तरावें सुखें अशा भावें
प्रभुनें चरित्र केलें नाम जडांच्याहि आननीं[15] यावें ३५
धाडी स्त्रीस आरसही हुडकाया आत्मवान्[16] पवन-तनय[17]

---

१ पर्णशाळा. २ बहुत. ३ त्याचें. ४ आर्य-उक्त-श्रेष्ठभाषणानें. ५ जटायू. ६ हाय. ७ वाणी. ८ रामास. ९ सीता. १० नामविशेष (राक्षस) ११ सत्-यश-अमृत-उत्तम कीर्तिरूप अमृतानें. १२ नामविशेष (सरोवर) १३ मारुतीच्या ठायीं. १४ त्याचें गृह. १५ मुखीं. १६ देहधारी. १७ मारुती
* महापराक्रमी. + ज्याहून दुसरा दया करणारा उत्तम नाहीं असा.

शतयोजन सिंधु उडुनि वंदी सीतेस तो सुधी सनय ३६
प्रभु-मुद्रा दे श्रीनें राक्षस मारी सुरेखा-चित्त हरी
गांजी अरीस लंका जाळी श्रीराम-भजन-चित्त हरी ३७
प्रणत-शरण-तरण प्रभु हर्षविला कथुनि कुशल-संदेशें
श्री-चुडामणिनेंही बहु तोहि करूनि विमद मंदेशा ३८
बहु शर्म प्रभु पावे भेटे त्या पवन-नंदना राम
या प्रभुवर-प्रसादा- हूनि उणा निपट नंदनाःराम ३९
सुरमुनि म्हणे दशमुखा केलें या प्रकट विश्वरेतानें
नाहीं तुझ्या कपाळीं हा नमितां भक्ति-भाग्य देता तें ४०
सर्व-प्रजा-भव यशें नाशाया सिंधुच्या तटा गेला
तों ये शरण बिभीषण तो लंकाधीश वत्सलें केला ४१
सेतु अहल्या-तारक पांचां दिवसांत करुनि श[10]तगावें
बळवधि जयापुढें शत- मख-मुख लोकेश-तेज न नगावें ४२
संवत्सर शत न पुरे कथितां रण खचर कपि असा करिती
न रिती हाय चमू जरि रक्त-नद्या सागरोदरा[11] भरिती ४३
घनरव[12] कपि-बळ भंगी प्रभुसि रणीं व्याल[+]-पाश-बद्ध करी
श्री हाय म्हणे त्रिजटा निस धृति[13] दे व्यसन नें खगेंद्र हरी ४४
प्रत्यय ये दशकंठा समरीं घटकर्ण[14] मारितां रामें
अनुज पवन वालि-तनय वदले बुडसिल परांगना-कामें ४५
बळसेश सर्व दर्शन न घडो देउनि नभीं शिरोनि खळ
घनरव मूर्छित पाडी परि उठवी पवन-सुत अनंतबळ ४६
अज-कुल-तिलक वदे हा[15] मायामीना-वधें भ्रमा वारी

---

१ सीतेनें. २ हरणकरी. ३ वानर. ४ निरोप. ५ शिरोरत्नानें. ६ मंद-ईश-मूर्खांचा स्वामी. ७ नंदननामक बाग. ८ नारद. ९ राम. १० शंभरयोजनें. ११ सागर-उदर-समुद्राच्या मध्यभागाला. १२ मेघासारखा आहे शब्द ज्याचा (इंद्रजित) १३ धैर्य. १४ कुंभकर्ण. १५ हाय. + नागपाशांनीं बद्ध.

भक्त बिभीषण लक्ष्मण मग घननादा महाबळा मारी ४७
**सर्वेश्वर** होय सुखी त्या विजयें लक्ष्मणासि कुरवाळी
जेणें एकचि शरें वधिला भेदूनि दृढहि उर थाळी ४८
झाला **सिद्ध** दशानन सीता-हनना तथा सचिव फिरवी
मिरवी मग तेज रणीं लक्ष्मण पाडुनि विभू-हृदय चिरवी ४९
प्रभु-कार्य-**सिद्धि**-सादर मारुति उठवी महौषधी आणी
प्रभु शक्र-रथीं बैसुनि दशकंठा स्वानुजा धिला रयाणी ५०
**सर्वादिव्यें** शरुचिता श्री कळवी कीर्ति करि जगीं सुतता
विनवी नमुनि दशरथा प्रभु सानुज यांसि बहु रुचे सुतता ५१
**अच्युत** उठवुनि मृत-बळ सर्वांसह पुष्पकें पुरा आला
धाला गुह भरतमुखें प्रभु राजा हर्ष बहु जगा झाला ५२

स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीराम-चरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें १

## इति प्रथमस्तोत्ररामायणं.

---

## द्वितीयस्तोत्ररामायणं

देव **वृषाकपि** दशरथ- सुत झाला दशमुखासि माराया
ताराया सुर भूसुर तत्संकट तें अशेष वाराया १
जगदीश **अमेयात्मा** रूपें ये चार विश्व-हित- कामें
श्रीराम-भरत-लक्ष्मण- शत्रुघ्न अशीं धरी रुचिर नामें २
तो **सर्वयोग**- पटु-कवि- नुत निःसंदेह संसृति तराया

---

१ वक्षस्थळ. २ प्रधान. ३ विस्तृता. ४ दशरथास. ५ पुत्रपणा
६ तृप्त. ७ ब्राम्हण. ८ संपूर्णयोगामध्यें कुशलकवींनीं स्तविला असा

नर होउनि करि लीला    सकळांचे ताप शापहि हराया २
वसु[1] दे अर्थिजना[*] बहु    दशरथ संस्कार करि वसिष्ठ कवी
श्रुति शास्त्रें पढवि स्वरें    प्रभु गुरुजन-मनहि शिशुपणें ठकवी
जो भूमि-देव सुमना    केला गाधिज[3] मखघ्न-खल-दमनें
आपण मयूर चातक    झाले प्रभुला करूनि जलद[4] मनें ५
सत्य-करुण तीर्थ-चरण    मुनि-पत्नी-पाप-नाम-शाप हरी
प्रकट करी अत्यद्भुत    निज-पद-पंकज-रजः प्रताप हरी ६
ईश्वर-कार्मुक भंगी    दुर्घट ही सिद्ध करुनि तूर्ण[6] पण
प्रकटुनि नवरस[+] मात्मा[‡] निववी प्रभु दाखवूनि पूर्णपण[7] ७
काळासी न असंमित    भृगुपति[8] ठाके धरूनि घाटेतें
शांत करी लीलेनें    त्या प्रभु सर्वांसि[9] नवल वाटे तें ८
सम सर्वांहीं वरिला    आनंद असीम[10] त्यां पुरजनांहीं
जेविं सुरांचे कोणा    पौरांचे वाजले मुरज नाहीं ९
तातांचें सत्य व्रत    मातेचें पुत्र राज्य हें इष्ट
सुरचिंतितहि अमोघ    प्रभु करि नव वरुनि हर्षवी शिष्ट १०
सौमित्रि जानकी सह    तापससा देव पुंडरीकाक्ष[11]
भय चित्रकूटवासी    द्विज-पीडक धरिति मानें जे राक्ष ११
करितो कृषीवलाच्या    कृष कर्मा परि घनाविना न फळे
धर्म तसा जन-पोषक    या वांचुनि अबळ यावरूनि कळे १२
राज्य वृथा भोग विषा-परि मानी दशरथ त्यजी देहा

---

१ द्रव्य. २ वेद. ३ विश्वामित्र. ४ मेघ. ५ रामचंद्र. ६ त्वरित.
७ पूर्णत्व. ८ परशुराम. ९ मर्यादारहित. १० मृदंग. ११ सभा आहे अंगीं ज्याच्या असा राक्षशब्द. ✻ याचक जनांला. + शृंगार. वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक. बीभत्स, रौद्र, शांत. ‡ सीतारूपी लक्ष्मीचा आत्मा.

कुशलवर[1] भरत गुरुसि जळ मानेना धिक् प्रभूसि यश दे हा।
घेउनि अभय वर् निघे आर्याज्ञा[2] पादुका शिरीं वाहे
रुद्र मम विरक्त जटी[3] नंदिग्रामीं महातपा राहे १४
धरि विनय बहुशिरानें चरणांवरि अत्रिच्या प्रभुहि अर्पी
कन्येसि माय नमी अनुसूया श्रीस[4] आदरें तर्पी[5] १५
बभ्रु[*] मयूर व्याळा तेंवि विराधासि बंधु[6] हे झाले
हे सुयशोमृत सेवुनि दंडकवनवासि विप्र-वर धाले १६
विश्वपति कुंभ-योनिस[7] भेटे शास्त्रें पुराननें पावे
ज्या सदहित-शमनाचे[8] सद्गुण देवर्षिनी सुखें गावे १७
भेटे जटायु दशरथ- सख गृध्र श्रुचिश्रवा तया सुखवी
तात म्हणे बहु मानी ज्या प्रभुचें वेद-राशितें मुख वी १८
अमृत-यशा शाश्वत जो स्थाणु ध्येयांघ्रि-पद्म[9] तो स्वामी
राहे गोदातीरीं पंचवटी माजि पर्ण-तृण-धामीं १९
दशमुख-भगिनी विधवा शूर्पणखा ये म्हणे वरा मातें
रोषें सौमित्रि हरी तत्कर्ण-घ्राण आपुल्या हातें २०
तत्त्राता खर ये त्या शत्रु गज्याचा महात पा प्याला
मारी प्रभु विशिख खळ जेंवि समुद्रा महातपा[10] प्याला २१
नकटी[11] ते दशमुखा कळवी तें सर्व गलद्-सृक्-स्नाता[12]
घाता खरादिकांच्या ऐकुनि तो कोपला निचा भ्राता २२
सर्व-विनाशार्थ कुधी[13] तद्भाषित मानुनि स्वहित सेवी
मारीचासि कनक-मृग करुनि प्रेषी हरावया देवी[14] २३
कनक-कपट हरिणानें विप्वक्सेन प्रभु-प्रिया मागे

1 कुशलश्रेष्ठ. 2 श्रेष्ठाची आज्ञा. 3 जटाधारण केलेला. 4 सीतेस. 5 तृप्त करी. 6 रामलक्ष्मण. 7 अगस्त्यऋषीस. 8 समवे 9 ध्यानकरण्यास योग्य त्याचें चरणकमल. 10 अगस्ति. 11 नासिकारहित असी. 12 रक्तस्नाता. 13 दुर्बुद्धी. 14 सीता. *. मुंगुस.

सुर-कार्यार्थ **जनार्दन** तो त्यामागें धावाया लागे २४
धांवे दूरें मृग कळे राक्षस हें **वेदवित्**-सभा-गीता
वेधी शरें प्रभु म्हणे आर्त-प्रभुसाचि हाय भी सीता २५
ज्याच्या नामोच्चारें व्यंगेंहि **अव्यंग** होतसे कर्म
तच्छर-हत कपटीही राक्षस पावेल तो न कां शेर्म २६
गावे दांतांनीं स्मर- **नग**-गुरु यत्पाद-पद्म ती आर्या
गांजुनि देवर दवडी मिळू कराया सुरांचिया कार्या २७
तो **वेदवित् कवि** स्मर- द्रष्टा यें जनक-नंदिनीस हरी
हा रघुवर हा लक्ष्मण ऐसे ती उच्च आर्त नाद करी २८
**लोकाध्यक्ष**-स्त्रीतें सोडुनि गृध्रेंद्र विरथ करि अरितें
तत्पक्ष छेदुनि नें लंकेंत मनीं स हर्ष दे हरितें २९
मृग वधुनि **स्मराध्यक्ष**- प्रिय-कर्ता प्रभु फिरे तयास वनीं
लक्ष्मण भेटे सांगे सीतेचें उक्त जें न मोय मनीं ३०
ज्या **धर्माध्यक्ष** पण क्षणहि न मोसे कदापि तो भर्ता
धांवुनि उटज विलोकुनि शून्य बहु विलाप जाहला कर्ता ३१
वाटे विलाप करितां स्त्रैण जना प्रा**कृता कृत**-विलाप
प्रभु शोधी श्रीस वनीं तों गृध्राचा दिसे क्षत-विलाप ३२
**चतुरात्मा** नंद-प्रद- चारित प्रभु हा म्हणे तया वदवी
रावण-कर्म कळवि धरि पर-लोकाची खगेंद्र तो पदवी ३३
**चरित अतुल** दावी प्रभु आरंभी तत्क्रिया धरी सुतता
उर्व्यूर्ध्वाधस्थ स्मजन हर्षवि मत्कीर्ति होय हे स्मनता ३४
भक्त-हितार्थ प्रभु जो होय **चतुर्दंष्ट्र** सिंह तो पातें

---

१ वेदज्ञांच्या सभेनें गाइला असा त्यास. २ पीडित. ३ न्यूनहि. ४ पूर्ण. ५ स्मरव. ६ जितेंद्रियांनीं. ७ श्रेष्ठ. ८ वीर (लक्ष्मण). ९ समाधे १० पर्णशाला. ११ मार्ग. १२ पुत्रपणा १३ अत्यंतविस्तृत. ⁂ भयें + स्त्रीलंट. × चार दाढांनीं युक्त.

वात्सल्यें पुष्कल स्वीकारुनि कां न देवु तोयातें ३५
देव चतुर्भुज झाला नर ताराया जगा यशें भव्यें
सव्यें अपसव्यें दे देवर्षीला सुखें सदा नेव्यें ३६
या करुणा-भ्राजिष्णु स्तवि बहु हरिनें कबंध शापानें
उद्धरिता शबरीनें फळ भोजन करुनि हरुनि तापातें ३७
विषयज-सुखदुःखाचा भोक्ता आपण मनुष्य हा भाव
दावी पंपा[5]तीरीं सीता-विरही श्रिताघ[6]-तृण-दाव ३८
स्मर-शर-विकळा प्रभुच्या दे लक्ष्मण धैर्य-कवच नव देहा
तेणें सहिष्णु होउनि हा[8] ऐसें राम न वचन वदे हा ३९
जगदादि जलेज-नाभ प्रभु मारुतिला मग स्व-वृत्त कथी
भेटवि सुगळा[10] त्या दे कपि-राज्य तदग्रजा खळास मथी[11] ४०
रुपदेंहि वधुनि दुष्टां अनघ प्रभु हा शरण्य विजय-शतें
गा त्यासि षडरि[12]-जेता छाया करि गौरवूनि निज यश तें ४१
तो विश्वयोनि[13] भगवान् विरहें खेदी नसो मरो द्वेषी
हें चिंतुनि सुग्रीव श्रीतें धुंडावया कपि प्रेषी ४२
प्रभु नमन स्मरण पुनर्वसु पुष्यचि सर्व कार्य-सिद्धि[14]-कर
सर्वत्र वीर गेले जाणों ते राम-भद्र-भानु-कर ४३
शोध उपेंद्र[15]-स्त्रीचा सांगे गृध्राधिराज संपाती
शत-योजन-सिंधु पुढें दिसती लंकेंत शांत[16]-शंपा[17] ती ४४
ऋक्षेंद्र[18]-सुत मारुति वामनसा वाढला उंच ताडी
मारुनि विघ्न वक्षें मैनाका[19] आश्रय-प्रदा पाडी ४५

---

१ उदकानें. २ नवीन. ३ दर्पणें अति शोभणारा. ४ हरण करणारा. ५ पंपा नामक सरोवराच्या काठीं. ६ आश्रय करणाऱ्यांच्या पापरूपी गवतास वणव्या सारखा. ७ सहनशील. ८ हाय. ९ कमलनाभ. १० सुग्रीवाला. ११ मारी. १२ कामक्रोधादि षड्रिपूंस जिंकणारा. १३ जगताला कारणीभूत. १४ संपूर्ण कार्यसिद्धि करणारें. १५ सीतेचा. १६ शमलेली असी विद्युल्लता. १७ सीता. १८ ऋक्ष-इंद्र-सुत- वानरश्रेष्ठांनीं मानलेला १९ पर्वतविशेष.

**प्रांशु** दहा गांवें तो ठकवी सुरसेसि सिंहिकेशि वधी
लंकाधिदेवतेतें जिंकी निवची पराक्रमें शिव-धी ४६
झाला **अमोघ**-विक्रम पाहुनि भगवत्प्रिया अशोक-वनीं
खळ धिक्कृतिनें हर्षे सुकवीच्या हें म्हणे असो कवनीं ४७
कपि हर्षे त्या श्रीचा **शुचि**-भाव बहु प्रभाव पाहून
एकांतीं मुद्रा दे तच्चरणाब्जीं शिरोब्ज वाहून ४८
तो **ऊर्जित** कुशल पुसे ये चूडामणि निरोप करि खोडी
ज्यांत मनोहर तरु तें दशकंठ-प्रिय अशोक-वन मोडी ४९
मारुति **अतींद्र**-खर-कर होय क्रव्याद-सैन्य लोळवुनी
बोळवुनि अक्ष-शोक- ज्वलनें दशकंधरासि पोळवुनी ५०
दावूनि दुरित-**संग्रह**- फळ हाय म्हणावयासि तो लावी
जाळी लंका खरपति- नगरीशीं जी विशंक तोलावी ५१
**उपसर्ग**-व्याकुळ करि अरितें परतोनि ये अजाजवळ
श्रीचूडामणि देवा झाला आर्ता असा सुधा-कवळ ५२
झाला सुखें **धृतात्मा** भेटे प्रभु सुप्रसन्न मारुतितें
जी अंजना त्रिलोकीं होय यश प्राप्त चंद्र-चारु तिनें ५३
प्रभुवात्सल्य तुरवि तो जो पहिला स्वामि-भृत्य हा **नियम**
जाय सबळ सिंधु-तटा हर्षे जाणोनि शत्रु-हानि **यम** ५४
वेदांत-**वेद्य** भगवान् चरण-प्रणता बिभीषणा राज्य
लंकेचें दे प्रेम प्रभुचें शरणागतीं सदा प्राज्य ५५
भव-गद-**वैद्य** प्रभुवर सिंधूक्तें करवि नळ-करें सेतू
प्रथमचि सुगळ मथी त्या ज्याच्या नामात यी पुढें ये तू ५६

---

१ उच्च. २ नामविशेष राक्षसी ३ सफलविक्रम. ४ तत्-चरण-अब्ज = तीच्या चरणकमळीं. ५ शिर-अब्ज-शिरकमल. ६ अक्षनामक रावणपुत्राच्या शोकरूप अग्नीनें. ७ पातकसंग्रहाचें फळ. ८ उपद्रवानें व्याप्त. ९ सैन्यासह १० पुष्कळ. ११ यापुढें तू ये म्ह० यातू (राक्षस) ** मांसभक्षण-करणारे राक्षसांचें सैन्य.

सामेंचि सदा योगी पावति ज्याचा प्रसाद तो दूत
अंगद धाडी सामा परि अरि खवळे तसा जसा भूत ५७

क्षय निरुपम होय म्हणे दृष्ट न यासम रवीरहा निकर
न कर म्हणति हिन-कर परि करि दशमुख समर वीर-हानिक

सानुज माधव केला घननादें नागपाश-बद्ध रणीं
सीता म्हणे मला पति- घातीं बहु दुःख हें न मद्धरणीं ५९

मधु-कैटभ-हंता त्या प्रभुला दुःसाध्य काय पामर हा
समर-क्रीडार्थ म्हणे घननादा दशमुखाहि राम रहा ६०

गरुडा यश दे प्रभु मग घटकर्णा परम-दारुणा पाडी
घनरव अतींद्रिय महा - माय सनाथहि समग्र बळ ताडी

दिव्यौषधि क्ष्मगाधर- शिखर महोत्साह पवन-सुत आणी
तद्गंधें वातें ते उठले अमृतें जसे मृत-प्राणी ६२

पाडुनि शृंग महा बळ पुनरपि तत्काळ ये महा तेजा
मग घनरव मायाश्री - वध करि वदले खरा पहाते ज्या ६३

शोक बिभीषण माया ऐसें सांगुनि हरी महाबुद्धी
लक्ष्मण वधी घनरवा तें यश दे गांगसें जगा शुद्धी ६४

दशवदन महावीर्य क्षोभें धावे सतीस माराया
वारी सचिवोक्ति रुचे श्रुति दे वाचा न तीसमा राया ६५

दशकंठ-प्रेषित-बळ अमित महाशक्ति रामभद्र वधी
युद्धा स्वयें निघे धरि सर्वस्व जन-क्षयें हि न द्वैव धी ६६

कपि-बळ भंगी युद्धीं क्रोधी तो धीट लक्ष्मणा हटकी
हाणी उरीं महाद्युति- शक्ति जिच्या भासती विजा बटकी ६७

---

१ शत्रु (रावण) २ इंद्रजितानें. ३ मद्-हरणीं-माझ्या हरणीं. ४ नीच. ५ कुंभकर्णास. ६ पृथिवीला धारण करणारा पर्वत त्याचें शिखर. ७ मारुति. ८ गंगासंबंधी उदकासें. ९ सीतेस. १० कान. ११ ओलावा.

होय **अनिर्देश्यवपु** श्रीमारुति शृंग तें पुन्हा आणी
उठवी सुषेणवीरां जय जय ऐसी उठे नभीं वाणी ६८
**श्रीमान्** रुक्म-शक्र-रथीं बैसे अरि-मस्तकें शत छेदी
तरि दश तसींच दिसती न मरे परि होय देव जो खेदी ६९
येतांचि **अमेयात्मा** कुंभज आदित्य-हृदय तो शिकवी
जपतां वरद रवि वदे बा रामा तूंचि आद्य होसि कवी . ७०
कच्छप **महाद्रिधृक्** रूर- कार्यार्थ प्रभु तसाचि नर आतां
ध्याया कृतार्थ कविशत अत्यद्भुत-पंक्तितुंड-वध गातां ७१
सम अहोरात्र समर करि विध्यस्त्राभिमंत्रितें रोपें
हृदय **महेष्वास**-धर श्रीशा विदारी वधी खळा कोपें ७२
रात्रिचर **महीभर्ता** मरतां प्रभुवरि पडे कुसुम-वृष्टी
सुरमुनि जय जय वदले कीं दे सर्वा महोत्सवें सृष्टी ७३
श्रीशा-निदेशें आधीं विधिनें दशकंधरासि दे तोय
साधु बिभीषण रूसतें मग लंका-**श्रीनिवास** तो होय ७४
दिव्य **सतांगति** करवी शिव-विधि-सुर-मुनि-समूह-गीतेतें
स्वीकारी प्रभु दशरथ- चरणांतें नमन करुनि सीतेतें ७५
शक्रें सैन्य उठविलें लंकेशें पूजिलें सुकंठयुत
**अनिरुद्ध**-गति विमान प्रभुसि दिलें पुष्पकाख्य विश्वनुत ७६
तो मूर्त **सुरानंद** प्रभु सबळ-सुगळ-बिभीषणा-सहित
श्रीसह सानुज पुष्पक- यानीं बैसे निघे जगन्महित ७७
**श्रीगोविंद** श्रीला अत्यद्भुत समर-सेतु-विरह-कथा

१ शिखर . २ खेदयुक्त. ३ अपरिमित ज्याचा आत्मा. ४ अगस्त्यऋषि . ५ विधि-अस्त्र-अभिमंत्रित—ब्रम्हास्त्रानें मंत्रित. ६ बाणें . ७ रामाच्या निरोपानें ८ उदक. ९ शपथ. १० बिभीषणानें. ११ सुग्रीवयुक्त. १२ विश्वानें स्तुत. १३ मूर्तिमान्. १४ पुष्पकविमानीं . १५ जगास पूज्य. ⁂ मोठें धनुष्य धरणारा. + मंदराचल धारण करणारा. ‡ कांसव. ‡ श्री- ईश-लक्ष्मीपति. * आश्चर्यकारकरावणवध.

सुगळ विभीषण-सगम    कथि लंघी पुष्पकें सुखें खपथा[1] ७८
गो-विप्र-सुखद भगवान्    क्रव्यादांतक[2] पति-व्रता भार्या
सुखवी भेटवि तारा    भक्ता शबरीहि जाणवी आर्या[3] ७९
वाटे मरीचि-माली[4]    साक्षात् पुष्पक-कथा कबंधाची
प्रभु कथि गोदा दावी    जी भी[+] राहोंचि दे न बंधाची ८०
दनुजदमन[5] दयितेला    कळवी दिधल्या जटायुच्या गतितें
घटजाश्रम[6]पद दावी    जें गायें शुद्धि-कामुकें पतितें ८१
मुनिमानस-हंस प्रभु    अत्र्याश्रम चित्रकूट मग दावी
मग उतरुनि प्रयागीं    स्व-शिर भरद्वाजमुनि-पदा लावी ८२
श्रीरामें पाठविला    पवन-सुत उडे सुपर्ण[7]सा तूर्ण[8]
गुह भरत निववि आला    प्रभु हें सांगोनि करि सखे पूर्ण ८३
प्रभु भरता भेटे त्या    भुजगोत्तम[9]हि न महोत्सवा कथिल[10]
हाचि महारजत इतर    जें ब्रम्हांडांत सर्व तें कथिल[11] ८४
प्रभुचें आगमन पुरा    शोभवि जैसें हिरण्यनाभ रणा
न करिति वैकुंठाच्या    साकेतीं[12] त्या महामही[13] स्मरणा ८५
सुतपा वसिष्ठ विधिनें    अभिषेकुनि ईश्वरा करी राजा
प्रभुदर्शनामृत म्हणे    त्यजुनि भवरोगदा[14] प्रजा-शरीरा जा ८६
नहु पद्मनाभ निजबल-    सहिता सुगळा बिभीषणा अर्ची
स्व-यशोमृतें[15] शिवोंदे    न पवन-तनया भवाग्निची अर्ची[16] ८७
म्हणति प्रजापति कसा    आम्हां हा प्रास बहु असाध्याया
अन्या धन्या वरितिल    मोक्षहि दुर्लभचि परि असाध्या या ८८

---

१ आकाशमार्गास. २ मांसभक्षकराक्षसांचानाशक. ३ श्रेष्ठा. ४ सूर्य. ५ दनुजांला दमविणारा. (राम) ६ अगस्त्यमुनींचें आश्रमस्थान. ७ गरुडसा. ८ त्वरित. ९ भुजग-उत्तम- सर्पश्रेष्ठशेषहि. १० कथन करील. ११ धातुविशेष. १२ अयोध्येंत. १३ उत्साहा. १४ संसाररूपरोगास. १५ स्व-यश-अमृत- आपल्या कीर्तिरूप अमृतानें. १६ ज्वाला. + भय.

प्रभुचें राज्य **अमृतक**- स्मरण स्वप्नीं नसे असुख लेश
प्रभुसि लवण गंधर्वचि नति न करुनि वेचिनी असे खलेश ८९

तो **सर्वदृक्** प्रभु करी सर्वहि सर्व सर्व देव-सम हर्षी
पुरवुनि वांछित नाचवि घन जेविं मयूर सकळ सम-हर्षी ९०

रघुराज राज-**सिंह** श्रीश-श्रीराम-भद्र-यश-गाते
जे जन तेज न त्याचें उरवि तमा करिति मुक्ति-वश गाते ९१

स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीराम-चरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें १.

## इति द्वितीयस्तोत्ररामायणं समाप्तं.



## अथ तृतीयस्तोत्ररामायणं

श्रीकांत करी सत्या **संधो** तापद दशास्य माराया
ताराया संकट नय- धर्म-त्राणें सुरर्षि ताराया १

अमृत-मथनार्थ बळिसीं केला देवेंद्र **संधिमान्** जेणें
स्वीकारिलें विधिवचें तेणें दशरथवधूदरीं येणें २

जे भरत राम लक्ष्मण शत्रुघ्न प्रकटले कुमारमणी
**स्थिर** कुळ करिति कवि-मतिच न निवे श्रीशंभुची उमा रमणी ३

**अज**-कुळ बहुतचि शोभे श्रीरामें सानुजें तयावरि ते
गाधिज-सिद्धाश्रमपद वधितां खळ यज्ञ-विघ्न जे करिते ४

दिति-दनु-सुत **दुर्मर्षण** **शास्ता** प्रभुवर सुबाहुला खपवी

१ नामविशेष (दैत्य) २ माण. ३ खल- ईश. ४ यज्ञ. ५ लक्ष्मीचा पति (राम). ६ प्रतिज्ञा. ७ रावण. ८ संधियुक्त. ९ ब्रह्मदेवाच्या वचनानें. १० दशरथ-वधू-उदर- दशरथ स्त्रीच्या पोटीं. ११ विश्वामित्ररूपसिद्धाचें आश्रमस्थान.

शत योजन मारीच्या उडवी करिते असे न लाख पवी[1] ५.
बहु होय विश्रुतात्मा या कामें हा स्मरारिहा यागो[2]
सिद्ध करि म्हणे कौशिक ऋषि हो सिध्यर्थ सर्वदा या गा ६
गुरु गाधिजसह जातां अवलोकाया महेशा[3]-चापातें
प्रभुवर वारी गौतम- दत्ता-हत्या-महा ग्र-शापातें ७
जनक-पुरीं गुरुत्तम हा त्र्यंबक-धनुतें स[4]लील गुणे[5] जोडी
मोडी पण पुरवि वरी सीता श्री स्व-भजनीं जिला गोडी ८
मुनि-[6]वचनें शम-धाम क्षिति-[7]पति रामाऽनुजांसि मग तनया
दे याज्ञवल्क्य-शिष्या त्या म्हणती साधु धन्य अगत नया ९
कोपे भृगु[8]राम प्रभु [9]दे शांति क्षत्र-कंदन-दक्षा या
मग कैकेयीलाही [10]क्षिति दशरथ-सत्य-धर्म रक्षाया १०
सत्यपराक्रम भगवान् सीता-सौमित्रियुक्त जाय वना
भवना देहा शोकें त्यजि नृ[11]प भरतहि धरेचिया अ[12]वना ११
रक्षाया मुनि-मि[13]षें करि राम वसे चित्रकूट-नाम-न[14]गीं
दे अभय पादुका प्रभु भक्ता भरतासि पुण्य कीर्ति जगीं १२
अनि[+]मिष-पतिच्या कार्या सिद्ध कराया निघे पुढें जाय
वंदी अत्रिमुनीचे अनुसूयेचेहि पुत्रसा पाय १३
ती अनुसूया श्री[15]लो मातेपरि दाखवी बहु स्नेह
करि अ[*]म्लान स्रग्वी नित्यहि आ[**]र्द्रांगरागधर देह १४
केला विराध राक्षस तुंबुरु[16] निर्भयहि तें समस्त वन
करि तो प्रभुचें प्रेमें वाच[17]स्पतिसा उदारधी स्तवन १५

---

१ वज्र. २ यज्ञास. ३ शिवाच्या धनुष्यानें. ४ लीलायुक्त. ५ दोरी. ६ विश्वामित्राच्या वचनानें. ७ जनकराजा. ८ परशुराम. ९ क्षत्रियांच्या नाशा विषयीं निपुण. १० पृथ्वी. ११ दशरथ. १२ रक्षणा. १३ निमित्त. १४ पर्वतीं. १५ सीनेला. १६ नामविशेष (गंधर्व) १७ बृहस्पतीसा. + देवांचा स्वामी जो इंद्र त्याच्या कार्यार्थ. * मलिन न होणाऱ्या मालेनें युक्त. ** आर्द्र-अंगराग-धर-ओली चंदनाची उटी धारण करणारा असा.

अति वत्सल नर-विग्रह[1] सर्व जगाचा धणी करी धन्य
वन्य-पशूंनी दंडक- वन रति कुंभज[2] तसेचि जे अन्य १६
भूतग्रामक्षोणी[3] पाहुनि लावूनि चरण निववि हरी
गोदावरी- तटीं मग लक्ष्मण-रचितो[4]टजीं निवास करी १७
पञ्चवटींत श्रीमान् सीता-पति सन्मुनि-व्रतीं[5] राहे
रावण- भगिनी विधवा शूर्पणखा आग्रहें वरूं पाहे १८
न्याय करी सौमित्रि छेदी तद्घ्राण[6] कर्ण करवाळें[7]
बुडवूनि घेतलें प्रभु- सह समर करूनि खरें हि अरेवाळें[+] १९
सर्व क्रव्यादांचा[8] नेता भगिनी-कुमंत्रितें[9] क्षोभे
तो भेक[10] प्रभु सर्प श्री- स्त्री-रत्नीं मग वया लोभे २०
जेविं समीरण पर्णा मारीच्या तेविं दशमुख प्रेरी
श्रीस[12] कनक[13]-मृग-रूपें लोभवि की काळबल तया घेरी २१
जातें सहस्रमूर्धा[14] विश्वात्मा[15] यापरी स्तवी भावें
तो प्रभु म्हणे स्व-चित्तीं सिद्ध सहस्राक्ष[16]-कार्य तें व्हावें २२
जैसा सहस्रपात्[*] प्रिय निश्वानें व्हावया नमासि हरी
तैसा प्रभु दशवदना मारायाचा मनांत काम धरी २३
घ्या धरुनि म्हणे सीता लागे पाठीस चाप[17]-शर-धारी
आवर्तन[18] जेविं करीं दे पतिना त्या वनांत विभु मारी २४
हा सीते हा लक्ष्मण हाक अशी आर्त[19] रामसा फोडी
मोह निवृत्तात्मा प्रभु देवी ही धैर्य ऐकतां मोडी २५
लक्ष्मण तत्व कथी परि दवडी कोपोनि रक्षका सीता

---

१मनुष्यशरीरी. २ अगस्त्य. ३ प्राणीसमुदाययुक्त पृथ्वी. ४ लक्ष्मणानें रचलेल्या पर्णशाळेंत. ५ उत्तमऋषिव्रतांत. ६ तिचें नाक. ७ तरवारीनें. ८ राक्षसांचा. ९ शूर्पणखेच्या दुष्टमसलतीनें. १० बेडूक. ११ रावण. १२ सीतेला १३ एक वर्णमृगाच्या रूपानें. १४ हजार आहेत मस्तकें ज्याला असा. १५ जगदात्मा. १६ इंद्राचें काम. १७ धनुर्बाणधरणारा. १८ जन्माचा फेरा. १९ पीडित. + हलक्यानें. *: सूर्य.

यति[1]-रूप संवृतात्मा दशमुख ये होय ती सती भीता २७
हरितां स्नुषेसि धांवे गृध्रेंद्र[2] जटायु शत्रु-रथ मोडी
अति कुपित संप्रमर्दन[3] करि तेव्हां त्या सतीस खळ सोडी
दशकंठ अधर्मानें करि वृद्ध-जटायु-पक्षति[4]-छेद
तो राहु-ग्रस्त अहः[5] संवर्तकसा सतीस दे खेद २८
विरथ क्षतहि श्रीतें वाहुनि ने जाय हतक लंकेला
स्पर्शे वह्नि[6]-शिखेला जेविं जड पतंग गत[7]-कलंकेला २९
अनिल[8]-जवें खेचर[9] ने तैं नग[10] पांचां कपींत ती टाकी
काकी न जयंताची बहु वदले हंत[11] हंत असें नाकीं[12] ३०
धरणी[*]धराहि कांपवि रावण तो त्या करूनि अन्याया
सर्वंसहा[13] न साहे खेदा साहेल कोण अन्या या ३१
वृत्त[14] सुमित्रा-पुत्र क्षिप्र[15] कथी साश्रु[16] खेद करि राम
धांवुनि ये हाय म्हणे शून्य[17] पहातांचि आपुलें धाम[18] ३२
प्रभु शोधी सर्व वनीं ऐसें[19] रुत प्राणाधिक-प्रिया-रत्ना
अन्नाक्षें[20]हि कलात्मा प्राणी तैसा करी महा-यत्ना ३३
जरि विश्वधृक्[21] स्वतनुतें[22]- ही तो न शके धरावया शोकीं
स्त्रैणत्व[23] विश्वभर्क्[24] प्रभु मिरवी कामुक विडंबना लोकीं ३४
करि पितृ-सख-गृध्राचें जें उत्तर कर्म तें विभु लवाया
धर्मज्ञ कवीस यशें गीतें हरिणासि नेविं भुलवाया ३५
गृध्राचा सत्कर्ता[25] त्या उद्धरि सर्व-साधु हरिखाया[+]

---

१ सन्यासिरूपी. २ गृध्र-इंद्र-गिधांचा राजा. ३ चांगलें मर्दन. ४ पक्षांचा छेद. ५ दिवसाचा प्रलयकर्ता. ६ अग्निज्वालेला. ७ गेला आहे मल ज्याचा असा. ८ वायुवेगें. ९ राक्षस. १० दागिने. ११ खेदोद्गार. १२ स्वर्गी. १३ पृथ्वी. १४ चरित. १५ त्वरित. १६ अश्रुयुक्त. १७ रितें. १८ गृह. १९ वारंवार. २० कपेनें विफल ज्याचा आत्मा. २१ विश्वधारण कर्ता. २२ स्वशरीरानें. २३ स्त्रीलंपटत्व. २४ विश्वहर्ता. २५ सत्कार करणारा.
* शेषालाही. + हर्षाया.

जो सानुजासि योजन- बाहु सुदारुण कबंध[1] धरि खाया ३६
सत्कृत[2] होउनि बसवी शबरीतें वरद-नायक विमानीं
जन्म सफळ या श्रवणें रोमांच-व्याप्त-काय कवि मानी
साधु-बहु-मता केली पंपासरसीहि जन्हु[3]-कन्यासी
प्रभु-कृत-विलाप नेथिल वर्णिति सप्रेम सर्व सन्यासी ३८
पवनें[4]-सुतें नारायण— नर नेला ऋष्यमूक-गोत्रास
सुग्रीव[5] सखा होउनि नग दे सोडी सूर्य-सूनु तो त्रास ३९
कळवि असंख्येयात्मा[6] प्रभु बळ वाळीस वधुनि रविजातें[7]
कपि-राज्य दे यश करी सत्य अमृत[8] म्हणति सर्व कवि ज्यातें
अर्क-सुत[9] प्रभु-दयिता— शोधा सर्वत्र पाठवी धीर
मेर्वादिनगां[10]गत विभु- विजया स्वात्माहि वेचिते धीर ४१
अमरांशा[11]-भव विशिष्ट— ज्ञान-बळ भ्रमुनि ते दिशा तीन
मासावधि न विलंघुनि आले उत्साह-शक्तिनें हीन ४२
ज्या पुण्यश्लोकाचें अत्यंत अशिष्ट-शिष्ट कृत स्मरण
तत्कार्य न घडतां कपि म्हणति घडो सिंधुच्या तटीं मरण ४३
प्रायोपविष्ट[12] अंगद- मुख कपि वदले जटायु जरि मेला
तरि गंगा-शुचि यशातें जोडुनि सुकृती सुरालया गेला ४४
आम्हीं अपुण्य मरतों व्यर्थचि सिद्धार्थ जाहलों नाहीं
संपाती[13] अनुजाला पुसुनि म्हणे भय धरूं नका कांहीं ४५
सीता लंकेंत असे व्हा लंघुनि सिंधु सिद्धसंकल्प[14]
मत्सुत[15] वधिता परि अरि पथ मागे म्हणुनि सोडिला अल्प[16]

१ नामविशेष राक्षस. २ सत्कारयुक्त. ३ भागीरथीसी. ४ मारुतीनें. ५ सुग्रीव. ६ अपरिमित ज्याचा आत्मा. ७ सूर्यसुतानें. ८ मोक्ष. ९ सुग्रीव. १० मेरु इत्यादि पर्वतांपासून आलेले. ११ देवांशांपासून उत्पन्न. १२ आसनावर नियम धरून बसलेले. १३ जटायूचा श्रेष्ठ बंधु. १४ सिद्ध ज्यांचा अभिप्राय. १५ मत्-सुत- माझा पुत्र वधन् जटायु. १६ नीच- हलका. + ऋष्यमूकसंज्ञक पर्वतास.

पुरुषार्थ-सिद्धि-प्रभु- दयितेचा शोध सांगतां आले
रवि-दग्ध-पक्ष[1] गेला गृध्रें[2] उडुनि सर्व कपि सुखी झाले ४७
प्रभु-कार्य-सिद्धिसाधन- पटु पवन-तनय उडे नभीं सुरसा[3]
मैनाकातें पाडी ठकवि मुखीं शिरुनि निघुनियां सुरसा[4] ४८
जी छाया धरि ओढी मारी त्या सिंहिकेसि[5] जलधीतें
लंघी शंभु-वृषाही निर्वावि जवें त्याहि निहित-बळधीतें ४९
प्रभु-संकल्प शिव वृषभ पवन-तनुज जाय सिंधुच्या पारा
लंका धुंडी प्रभुची निरखि अशोकीं वनीं प्रिया दारा[6] ५०
विष्णु-प्रियेसि येउनि तो महिषी हो असें म्हणे पापी
दर्पी त्या मत्त-गजा[7] सिंहिसी जोडय[8] तच्छिरीं स्थापी ५१
नेणे ईश-कलत्रा[9] पुण्या तो मूढ जेविं वृषपर्वा
आज्ञापी जाचाया अत्युग्रा राक्षसी कुमति सर्वा ५२
श्रीस नमुनि मुद्रा दे कुशल कथुनि हरि[10] म्हणे परभरा[11] या
प्रभु हरिल खल-बळ-शमन जठरें[12] जसें तृण वृषोदर[13] भराया ५३
पे श्री-चूडामणि सुर- जयवर्द्धन वन चुरी करी कलहा
बल-हानि-कर घनरवा[14] अक्ष[15] वधुनि सांपडे महाबल हा ५४
तो वर्द्धमान-तेजा हरि करि पाण्यापरीस पातळ त्या
दशकंधरा निवारी साधु बिभीषण असीस[16] आतळत्या[17] ५५
एक विविक्त[18] बिभीषण- मंदिर रक्षी स्व-पुच्छ-दहनातें
मेरुनि पाप-पुरातें जाळी जैसा दवाग्नि[19] गहनांतें[20] ५६
ये मणि दे कुशल कथी श्रुतिसागरहि प्रभु स्तवी कपिलें[21]

---

१ सूर्यतेजानें दग्ध आहेत पक्ष ज्याचे असा. २ संपातीपक्षी. ३ देवसा. ४ नामविशेषराक्षसी ५ सिंहिकानामराक्षसीस. ६ स्त्री. ७ मत्तेसि. ८ जडत्व. ९ ईश्वरस्त्रीला. १० वानर (मारुति) ११ पर-भर-शत्रुरूपभारास. १२ पोट. १३ वृष-उदर. १४ इंद्रजितास. १५ रावणाचा कनिष्ठपुत्र. १६ खड्गास. १७ स्पर्शकर्त्यास. १८ पवित्र. १९ वणवा. २० अरण्यांतें २१ मारुतिस्मा + दावी.

कपिलादि यद्विभूति   स्तविनी यत्कीर्तिला महाकपिला ५७
**सुभुज**[1] प्रभुचे हरितें   आलिंगुनि करिति विष्टपीं[2] धन्य
वन्यहि[3] हा जेविं असा   झाला नर सुर+ न एकही **अन्य** ५८
सर्व-सुराऽसुर-**दुर्धर**   कपि-बळ घेउनि पयोधिला[4] पावे
**वाग्मी**[5] बिभीषण प्रभु-   चरण नमी जे सुरद्रुमीं[6] गावे ५९
जेविं **महेंद्र** खगा[7] जळ   किंवा यजमान पावका[8] आज्य
वत्सल-वर लंकेनें[9]   तैसें शरणागतासि दे राज्य ६०
जलधिमतें सेतु करवि   विभु जों तों **वसुद**⁜-बंधु तो पाप
ताप श्रीतें बहु दे   प्रभुचेंसें दाखवूनि शिर-चाप ६१
**वसु** रुद्राऽदित्य प्रभु   विजय असो म्हणति जपति मुनिवेद
दे दसुनि खळा प्रथमचि   सुगळ सुख सुरांसि पर-मतिस खेद ६२
जरि **नैकरूप**[10] कपि-बळ   जलनिधि वेढी परी बहुत खवळे
श्रीराम-दूत अंगद   साम कर म्हणे तथापि खळ न वळे ६३
आपण भंगे झाले   व्यसु[11] बहु घननाद-कपटहि न चाले
बंधु **बृहद्रूप**[12] मरे   घटकर्णहि युद्धें धरा हाले ६४
**शिपिविष्ट** प्रभु सानुज   सबळ घनरवें शरव्रजें[13] खिळिला
उठला मारुति-यत्नें   सुटला रवि जेविं राहुनें गिळिला ६५
विश्व **प्रकाशन** प्रभु   अरिचेंहि यश प्रसिद्ध करि लोकीं
घनरव-कृत माया श्री-   हननें हा म्हणुनि बुडवि मन शोकीं ६६
**ओजस्तेजोद्युतिधर**   लक्ष्मण मारी तथाहि उग्रास
प्रभुनें त्या स्वकरें तो   दिधला काळाऽननांत सुग्रास ६७

---

१ उत्तमबाहु. २ स्वर्गीं. ३ वनांतराहणारा. ४ समुद्राला ५ युक्तभाषणकरणारा. ६ कल्पवृक्षांनीं. ७ पक्ष्याला. ८ अग्नीला. ९ नृप. १० अनेकरूपी. ११ गतप्राण. १२ मोठें आहे रूप ज्याचें असा (कुंभकर्णाचें विशेषण.) १३ बाणसमुदायानें + देव. ⁜ कुबेरबंधु (रावण)

**प्र**बळतर सचिव-सोदर सुत-शोकाकुळमना विलाप करी
प्रभु-दयितेच्या नाशा पापात्मा तो दशास्य खड्ग धरी ६८
सचिवें सुर-**प्रतापन** तो हित बोधूनि वारितां सेना
बहु धाडी तत्केदनीं प्रभु रुद्राहूनि ऊने भासेना ६९
**ऋ**षि सिद्ध सुर स्तविती प्रभुच्या त्या अतुल-चाप-तेजातें
मग दशमुख ये युद्धा भ्याले पावोनि ताप ते ज्यातें ७०
मद्य-मदें क्रोधें हा **स्पष्टाक्षर** वच न येच तुंडास
कुंडा समिद्ध-शिखिच्या शलभ तसे त्याहि कीश-झुंडास ७१
सौमित्रि मूर्छित करी मारुति उठवी महेंद्र रथ धाडी
**मंत्र** घटज दे कीं अरि न मरे प्रभु जरिहि शतशिरें पाडी ७२
द्विपदुर विभु तरणि-वरें बाणें ब्रम्हाभिमंत्रितें फोडी
निववि यशें विश्व म्हणति **चंद्रांशु** स्वीय शक्ति बहु थोडी ७३
धरि **भास्कर-द्युति** प्रभु करि सुर-मुनि-वृंद पुष्प-वृष्टि वरी
हरिहर विधि कारिति स्तुति भरि नभ बहु वाद्य गीत ताप हरी
**अमृतांशूद्भव** रस जे प्राशिति सादर चकोर खग तातें
ते प्रभुसी कवि लाविति सेविति सुखरुचि भरूनि गगनातें ७५
**भानु**-कुळाऽलंकार प्रभु-वर सांगुनि बिभीषणा बरवी
निजबंधु म्हणुनि अरि जरि परि तापद सांग तत्क्रिया करवी ७६.
केला राम प्रभुनें देवद्विज शत्रु सिंह **शशबिंदु**
तंद्दन दुःखसागर लाजविला निर्मळें यशें इंदु ७७
केला भूप बिभीषण दिव्य करी श्रीहि भेट दे तातें
मृत-बळ उठवि **सुरेश्वर** कवि या चरितासि हृदय देतात

---

१ ति च्या नाशार्थ २ उणा ३ टोळ. ४ वानरश्रेष्ठाला. ५ अगस्ति. ६ शत्रु ७ द्विरद-उर- शत्रूचें वक्षस्थल. ८ सूर्यतेज. ९ अमृत-अंश- उद्भव- चंद्रापासून उत्पन्न होणारे १० पक्षी. ११ वापथ. + ब्रम्हास्त्रानें मंत्रित असा + पर्दात अग्नीच्या +: तत- दत्त-त्यानें दिलेला. ‡ दशरथ.

भवरोगाचें औषध  चरित करुनि पुष्पकीं[१] चढे राम
ससुगळ बिभीषण[२] नियें  तो जगतःसेतु नव-घन-श्याम ७९
श्रीस कथि सत्यधर्मप[३]  राक्रम वदला वरूनि विरहा तें
जें पंचवटी-पंपा-  सागर-तीरस्थ-देव चिर हातें ८०
तारेसि भूतभव्य भ-[४]  वन्नाथ श्री प्रियार्थ घेऊन
शबरी कबंध-हन कथि  नें ती सीतार्त जेविं ये ऊन ८१
भेटोनि[५] भरद्वाजा  पवन-तनय पाठवी कुशळ कळवी
खळवीरघ्न प्रभु तो  भेटुनि गुह-भरत-हृद्व्यथा[६] पळवी ८२
पावन-यशा प्रवेशे  सांकेतीं[७] स्वप्रजा करी मुदित
राजा होउनि रंजवि  जेविं चकोरांसि चंद्रमा उचित ८३
अनल[८] ब्राम्हण तर्पी  देवांचा सर्व काम हा पुरवी
सर्वेष्ट कामकृत् प्रभु-  रीति यश तसी न केळ कापुरवी ८४
श्रीचा कांत श्रीमान्  झूजीं सुगळा बिभीषणा सबळा
मारुतिस दे वर त्वरा  तात[९] जसा बाळका निजा कवळा ८५
शत्रुघ्न काम पुरवी  भूदेवांचा[१०] वधूनि लवणातें[११]
कोटित्रय गंधर्वहि  भरत वधी निववि यश न कवणा नें ८६
श्रित-कामप्रद[१२] सद्गुण  चवघांचे आठ पुत्र बळशाली
जळ शालीस[१३] जगा कुळ  ने विभु स्तन-पंक्ति अमृतें-कलशाली[१४] ८७
विधि शिव नेती हृदयीं  यश कोण न ने कवि प्रभु लवाया
आळस न धरी श्वखगहि[+]  बहु स्मरवि अनेक विघ्न भुलवाया ८८
त्रेतायुगांत होय  श्रीराम प्रभु युगादिकृत् स्पष्ट

---

१ पुष्पकनामक विमानांत. २ नव्या मेघासारिखा सावळा. ३ सत्यधर्मा विषयीं ज्याचा पराक्रम. ४ भूत भविष्य वर्तमान यांचा नाथ. ५ दुष्टवीरांचा नाश करणारा. ६ गुहभरतांची हृदयव्यथा (हृदयदुःख) ७ अयोध्येंत. ८ अग्नि. ९ बाप १० ब्राम्हणांचा. ११ लवणनामक दैत्यातें. १२ आश्रितांची इच्छा पूर्ण करणारे १३ शालिनामक धान्यास १४ अमृतकळशांची पंक्ति. + श्वान आणि पक्षि.

कष्ट नसे कोणाही जीवांस भरी सुरवें दिशा अष्ट ८१

स्तोत्ररामायणत्रेमें मयूरें रामनंदनें

श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें

---

## चतुर्थस्तोत्ररामायण.

साधूंच्या सुमनस्का[1] नेत्र-युगा चैत्र मुदित जे म्हणती
त्या चरणांनें करिती दशमुख मारावया सुर प्रणती १
आराधिला हयमरवें[2] त्रिभुवन-गुरु विष्णु दशरथें भूपें
तो नैकमाय[3] तत्सुत होय धरी चार सुंदरें रूपें २
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार गाधिज-कतुला[4]
रक्षी महाशन-वधें[5] प्रभु सुयशें दे सुधेसि[6] तक तुला[7] ३
होते अदृश्य गौतम- मुनिचे जे दार वरुनि शापातें
केले प्रकट प्रभुनें चरण-रजें हरुनि पाप-तापातें ४
त्र्यंबक-कार्मुक मोडुनि जनकपुरीं व्यक्तरूप तेज करी
म्हणती सहस्रजित् कवि किति यासि अनंतजित् परेश हरी
ज्यासि परानंदात्मक म्हणुनि म्हणति इष्ट[9] वेद कवि गीता
त्याला माळा घालुनि वरि तद्दयिता धरोद्भवा[10] सीता ६.
सद्गुण विशिष्ट अनुज प्रभुचे भरतादि जे तयांलाही
देउनि सुता दशरथ- क्षितिपतिचा जनक जाहला व्याही ७
शिष्ट प्रभु भार्गव- रामा दावूनि तेज करि शांत
ज्यानें क्रुद्ध विलोकुनि दशरथ भय धरुनि होय बहु तांत[*] ८

---

१ उन्नममनास. २ अश्वमेधें. ३ अनेकमायारूपी. ४ विश्वामित्राच्याय-ज्ञाला. ५ दैत्यवधानें. ६ अमृतास ७ नाकाचीतुळना. ८ स्त्री. ९ सांबधनुष्य. १० धरा-उद्भवा-पृथ्वीपासून झालेली + रहा. * कोमेलेला.

घन-दर्शनें[1] शिखंडी विजयी प्रभु पाहतां तसे पौरे[2]
बहु नाचले महर्षें गाउनि यश इंदुहूनि[3] जें गोरें[4] ९
नरपति-सज्जन-बहुमत दोष-रहित[5] सद्गुण क्रिया रामा[6]
युवराज[+] करूं पाहे वारी सुरभिन्नधी प्रिया रामा १०
नृप[7] सत्यधर्म-वश पति- वश वृषसा फार विनविनां भागे
मनुवर्षें[8] राज्य करूं भरत धरू राम वन असें मागे ११
प्रभु सत्य-रक्षणोद्यत[9] कैकेयीला पुसे म्हणे या जा
वल्कल दे नेसाया धरि शोक क्रोध[10] हा, वसे राजा १२
तो क्रोधकृत्[11] स्वयें कां प्रभु होइल देव-विप्र-हित-कर्ता[12]
श्रीलक्ष्मणसहित[13] निघे शोकाकुळ होय पुर[14] मही-भर्ता[15] १३
व्यैरि[16] करुनि विश्वबाहु ख्यात कराया जगीं यशें धवळें
नृप शाप-मुक्त व्हाया प्रभु निज-शोकाःनळा[17] म्हणे खवळें १४
बसुनि पितृ-रथीं जाउनि विभु[18] निववि गुहा निषाद जो वन्य[19]
जो चित्रकूट मुनि शत- महित महीधर[20] नया करी धन्य १५
दशरथ नृप अच्युत-सुत- शोकें पावे म्हणोनि हो[21] निधना[22]
कष्टार्जिता[23] सुरूपण प्राणी होतांचि जेविं हानि धना १६
मातुल-कुलाऽगत[24] भरत जननीतें[25] श्रवण करुनि तत्कथित[26]
व्यथित-स्वांत[27] म्हणे धिक् परि झाला सर्व-सज्जन-प्रथित[28] १७
तात-क्रिया करि निघे शंका सोडुनि गुहें भरद्वाजें

---

१ मेघदर्शनें. २ नगरांतील लोक. ३ चंद्राहूनि. ४ शुभ्रवर्ण ५ देवांनीं भिन्नजीचीबुद्धि. ६ कैकेयी. ७ दशरथ. ८ चवदा वर्षें. ९ सत्याच्या रक्षणाविषयीं उद्युक्त. १० कोप. ११ क्रोधकरणारा. १२ देवब्राम्हणाचें हितकरणारा. १३ सीतालक्ष्मणयुक्त. १४ नगर. १५ पृथ्वीपति (दशरथ) १६ शत्रुरहित. १७ आपल्याशोकरूप अग्नीस. १८ कोळी. १९ वनचर २० पृथ्वीधारण करणारा २१ क्षय २२ मरण. २३ कष्टानें संपादिलेल्या. २४ मामाच्या गृहापासून आलेल्या. २५ कैकयीतें २६ तिणें कथन केलेलें. २७ खिन्न अंतःकरण ज्याचें. २८ सकलसाधूंमध्येंप्रख्यात. + राजाच्याहातासालचामुख्यकारभारी. ❋ मोर.

राम **प्राण** समजतां सत्कारें निवविला गत[1]-व्याजें १८
झाला **प्राणद** वत्सल राम प्रभु अभय-पादुका-दानें
परते बाहेर वसे यांचे प्रभुच्याचि साधु-वादानें १९
त्या चित्रकूट-गिरितें पुसुनि निघे **वासवानुज**[2] स्वामी
दर्शन दे अत्रिस तो साधु वदे आजि पावलों स्वामी[*] २०
अनुसूया दे शीला जी वाळेना अशी उटी माळा
दे शांतिचा **अपांनिधि** सुगति विराधा पलाशभूपाला २१
धन्य **अधिष्ठान**[3] करी ऋषिचें तो भाउ दंडकवनांत
वाल्मीकिच्या तयाची आहे शोभा उदंड कवनांत २२
प्रभु **अप्रमत्त** सत्य प्रमुदित करि गृध्र-नायका वडिला
या कीर्तिला कवि जयें गंगेच्या जेविं काय कावडिला २३
गोदावरी-तटीं तो झाला उटजीं **प्रतिष्ठित** स्वामी
वसता क्षीर-समुद्रीं वैकुंठीं कीं महन्मनो-धामीं २४
शूर्पणखा **स्कंद**-पितृ- ध्येया प्रार्थी कुबुद्धि भोगाया
लक्ष्मण तत्क्षण हरी[8] हें चरित म्हणे कवीस हो गाया २५
प्रभु मग मथी खरवर खर खेचर चतुर्दश-सहस्र हरसांच[10]
**स्कंद** म्हणे ना यांचा मीं हा रघुवरचि शक्ति-**धर** सांच[+] २६
सुर-कार्य **धुर्य** राम प्रभु-दयिता कपट-पटु दशास्य हरी
विरथ क्षत होय रणीं छेदी खड्गें जटायु-पक्ष अरी २७
श्री विरहीं हाय म्हणे तात सख्या दिव्य धाम दे **वरद**
या अति-धवल-यशा बहु मानिति गजवदन वामदेव रद २८
भीषण[11] कबंध राक्षस धरि खाया राघ**वा युवा** हनन

---

१ निष्कपटानें २ इंद्राचा बंधु उपेंद्र (राम) ३ राहण्याचें स्थान. ४ सावध. ५ पर्णशालेंत. ६ महत्-मन-धाम साधूंच्या मनोरूप गृहीं ७ कार्तिकेयाचा पिता महादेव त्याणें ध्यान करण्यास योग्य जो राम त्याग. ८ निचें नाक. ९ नामविशेष राक्षस. १० सांबसाच. ११ भयंकर. * स्वकीय द्व्यास. + खरा.

करि उद्धरी तया प्रभु  या चरित्राचेंचि करिति मुनि मनन २९
शबरीस वासुदेव  प्रभु गति दे प्रथम चाखिलीं हो तीं
भक्षी बदरें पदरें  घे जीं चिर जपुनि राखिलीं होतीं ३०
सुत-दैन्य-तिमिर कांहीं  वारूं न शकेचि भानु राम हरी
या वात्सल्यें पावे  सत्य बृहद्भानु हें सुनाम हरी ३१
सत्ता वाळीस वधी  लीलेनें आदिदेव विश्वास
करुनि सुरांश कपीश्वर  करि सुग्रीवाख्य-साधु-मित्रास ३२
हर्ष सूर्य पुरंदर  जगदीशाकडुन स्व-पुत्र-वध साहे
राहे उगाचि अनघा  अनुजा त्यां हरुनिही वधूं पाहे ३३
छाया अशोक राम  प्रभु शोधाया सिता प्रिया राजा
कपि धाडी त्यांसि म्हणे  जा कार्य करूनि सद्यशें साजा ३४
संसार-सिंधु-तारण  राम विरहसागरांत ताराया
गेले प्रभु-कार्यार्थ  स्व-प्राणहि ते सुभक्त माराया ३५
शोधुनि दिक्त्रय आले  फिरुनि गेले दक्षिणेसि ते शोध
लागेना म्हणुनि म्हणति  तारें प्रायोपवेशना योधे ३६
अग्रज जटायुचा कथि  शोध श्रीचा परंतु शत-गावें
जलधि म्हणति शूरहि कपि  येथें बळ धैर्य लेश न नगावें ३७
शौरि पुढें जो झाला  त्या दाशरथि-प्रसूनमा स्मरला
भरला नभीं मरुत्सुत  भंगुनियां विघ्न सिंधुला तरला ३८
साधु-जनेश्वर कपि तो  जिंकी लंकाऽधिदेवता आधीं
ती विधि-वाक्य स्मरली  वदली जा कार्य विष्णुचें साधीं ३९
अनुकूल प्रभु असतां  दुर्घट भक्तांस काय हो आहे

१ पुत्रजांस्तयांवल्याचा दैन्यरूप अंधकार. २ सूर्य. ३ निष्पापा. ४ दिशात्रय. ५ श्रेष्ठ. ६ योद्धे. ७ वडीलबंधु (संपाति) ८ सीतेचा. ९ आकाशीं. १० प्रथम. ११ ब्रह्मदेवाचें वाक्य. + बृहत्-भानु-मोठासूर्य. ‡ भक्षणादि सर्व टाकून मरण येई पर्यंत एकत्र बसण्याला. ‡ बहुकाळ. # सत्-यश-उत्तमयशानें. ‡ हरणकरी

सेतु करि जलधि लंघी प्रथमचि भंगी सुकंठ त्या अरिला
सौम न करितां अंगद होय भयंद त्या जसा शरभ हरिला
भीम समर कपि राक्षस करिति भरिति मांसकर्दमें महिते
अहि-पाश-बद्ध केला लक्ष्मण राम हि घनस्वनें अहिते ५२
समयज्ञ गरुड पन्नग- पाशांतुनि मुक्तिदासि मुक्त करी
त्यातें जेणें केला नकापासूनि पळांत मुक्त करी ५३
रामला मूर्त हविर्हरि घटकर्ण हवि प्लवंगबळ खावें
सर्व म्हणे होय घन प्रभु तद्बळ थावरूनि बळ खावें ५४
अनुज-सह सर्वलक्षण- लक्षित्य प्रभुहि मेघनाद खिळी
मारुति उठवि महौष- ध्यगिरिखरें पाडि शत्रु-शीर्षकें गिळी ५५
माया-सीता वधितां लक्ष्मीकांत प्रभुहि शोकिला हाय
भ्रमहरि विभीषण व्यंक केला नौ लक्ष्मणं महामाय ५६
श्री वधितां सचिव खळा मारुत जैसा भेघां नरा फिरवी
जिरवी खळ-बळ-जलधिस क्षमितिजसुत घटज-सा जगीं मिरवी
खिक्षर-पराक्रम प्रभु स्वबळ वधाया स्वयें निघे अंती
पाडी सौमित्रिस परि बहु शक्तिकथा भवन्न-कर्ता संतीं ५८
रोहित होउनि वेदो- द्धार करी प्रभु नवासि हा काय
राय रघूंचा बैसे शक्र-रथीं क्षणाधि खळ-बळा हाय ५९
युद्धारंभीं वदला कल्याण-विचार विजित-भार्गव हो
मच्चरणावरि सीता- शीर्षासह धरुनि साम-मार्ग वहा ६०
बुडविनिलचि दशकंठा जे काम-क्रोध-लोभ हे तुज गा
बुडल्यासि म्हणसि हरिहर- से धर्मन्याय भव्य-हेतु जगा ६१

---

१ समुद्र. २ सुग्रीव. ३ संधि, एकोपा. ४ भयदेणारा. ५ सिंहाला. ६ भयंकर युद्ध. ७ इंद्रजिताने. ८ मुक्तिदेणाराम ९ हर्ता. १० होमद्रव्य. ११ बाशि. १२ इंद्रजित. १३ वायु. १४ मेघा. १५ अगस्त्यमुनीचें यश. १६ नामविशेषमत्स्य. १७ जिंकिला आहे परशुराम ज्याणें असा. १८ राम + नामविशेष (पक्षि) ≠ शत्रूनें. # होमी. ‡ वि-भक्त- गतप्राण.

धरुनि सदा मोद रहा दे सीता स्वस्थ वांच पापा या
सोडीं दुराग्रहा हा लाविल न तुळाचि कां चपापाया ६२
खळ न वळतां तयासह सभा; हो रावण रण करी अजित
अज तत्काळचि वधिता क्रीडे परि अग्निही यशें सजित ६३
कांपे मही महीधर- सहिता त्या मारितां रणीं अहिता
या विजया पर-महिमा गाति कवी विधि-शिवादि परम-हिता.
द्वेष करुनि मरुनि रणीं झाला वर्णित यशा महाभाग
जो शतशिरें हि हरितां न मंगचि म्हणे तशा महा भाग ६५
त्या जळ बिभीषणा पद देवाचि देव विधिनें तया तोकीं
अतिवेगवान पित्याचा स्नेह सदा करि हितोदया लोकीं
श्री दिव्य करी तेव्हां अमिताशान होय भान शीतरुचा
गंगाब्द-वरली न स्वर्गीच्या सावळी न शी तरूंची ६७
ज्यांपासूनि विश्वांच्या उद्भव ते आदिदंपती ज्यांतें
देवर्षींच्या स्तविलें दे यश मोठा प्रकंप नीया तें ६८
पुरुषप्रकृतिक्षोभण तो प्रभु सानुज सदार जनकाम
विनयें वंदी धरिता या शर्वाच्याच साधु-जन काम ६९
मृतकटक देवराजें सर्व उठविलें बिभीषणें भावें
प्रभु-वचनें गौरविलें मंगळ-महित हें हि यश सदा गावें ७०
वंदुनि बिभीषणानें दिधला पुष्पक-विमान वर-धामा
त्यांत प्रथम प्रेमें बसवी श्रीगर्भवास-हर-नामा ७१
परमेश्वर बहु सत्करवी त्रिजटा सरमा-कल्या-सपार्श्व-मन
देउनि अति यति-पति-मति- रति-कर निज-पाद-पद्म-भक्ति-धन.

---

१ शत्रूला. २ अपत्यीं (बाळकीं, ३ गंगेच्याडोहांत राहणें. ४ वृक्षाची. ५ जगाच्या. ६ उत्पत्ति. ७ आद्यप्रकृतिपुरुष. ८ समुदायानें. ९ अत्यंतकंप. १० स्त्रीसहवर्तमान. ११ नम्रतेनें. १२ मेलेलें सैन्य. १३ इंद्रानें. १४ श्रेष्ठसंन्यासी जे त्यांच्या बुद्धीस प्रीतिकारक. + श्रेष्ठ आहे तेज ज्याचें असा. ⁎ आनंद. # अत्यंतपूज्या. ⁑ मोठ्या. ⁂ हित-उदय कल्याणाच्याउदया. ⊙ शपथ. ❀ पुरुषप्रकृतीला क्षोभकरणारा. ✽ न्याया.

जो विश्व[1]-करण[2] कारण-[3] कर्ता भगवान् स्वयें विकर्ता[4] यां
प्रभुनें पौरांसि[5] दिला वर आनंदें करूनि वर्तायां ७३
श्रुति[6]-शास्त्र-गहन भगवान् नर होउनि करि अशा चरित्रा त्या
गाती-सुर-मुनि-कवि बहु- शान निघतां पुष्पकें चरित्रांत्या[7] ७४
स्मरूनि प्रथम गुह-भरत- शत्रुघ्नांनें निघे वर-विमाना
प्रेक्षिनि जें त्यां करवीं तो पुष्पक उन्मना करवि माना ७५
व्यवसाय राक्षमतिचा जाणुनि पुष्पक नभः पथीं चाले
झाले कष्ट कथीं प्रभु सीतेचे कर्ण त्यास रसें धाले ७६
विश्व-व्यवस्थिति जया- ठायीं श्रुति[8] म्हणति ज्या व्यवस्थान[9]
तो नळ-मंगळ-बिभीषण- यश कथि तें उरवि कव्यवस्थान ७७
संस्थान दाखवी तें जेथें विरही अतिक्रमी वर्षा[10]
पंपा दावी अवर्ग- कृत्त कथि वर्णुनि कबंध हें हर्षा ७८
वर्णी रम्यस्थान[+] पंचवटीदेश नमुनि गोदेतें
दावि जटायुवट[+] श्री[‡] आठवि तो संकटांत ओढे तें ७९
ध्रुवजय जेणें केला समयीं समरीं कथूनि संन्यास
त्या घटजाच्या आश्रम दावी हरिता त्रिताप-संत्रास ८०
मग अत्र्याश्रम दावी ज्यांत तपाची परार्धि नगरा ज्या
वर्णूनि चित्रकूटा दाखवि सुरमुनिहि गाति नग-राजा[11] ८१
शाचि परमस्पष्टनपः[12]- स्मरभि-प्रिय-तोक विप्र-यागांत[13]
योगांत भरद्वाज- स्तुत नमिला तो कवि प्रयागांत[14] ८२
प्रभु-संबोधित मारुति कथि गुह-भरतासि विजय-आगमन
त्या कुशला श्रुत-पानें झाले ते तुष्ट पुष्ट सस्वजन[15] ८३

---

१ जगताचें मुख्यसाधन. २ साहित्य. ३ करणारा. ४ जगास. ५ नगरांतील लोकांस. ६ वेदशास्त्रांचें अरण्य. ७ रक्षणकर्त्या. ८ वेद. ९ कवि-अवस्था-करवांचीस्थिति. १० वर्षाऋतु. ११ पर्वतश्रेष्ठ. १२ उत्कृष्टस्पष्टनपरूपकामधेनूचा प्रियबालक. १३ ब्राह्मणाच्या यज्ञांत. १४ प्रयागक्षेत्रांत. १५ स्वजनासह. + जटायुरूपवडाचावृक्ष. ‡ सीता.

पण पूर्ण करूनि सुदिन गुह-भरत-हृदय म्हणे शुभेक्षण[1] हो
पाहत होते प्रभुतें मोर घनातें तसे उभे क्षण हो ८४
राम प्रभुवर भेटे वाटे राकेशें[2] भक्त चातकसा
पातक मार्ग स्मरणें विश्वाचें तो करील घात[3] कसा ८५
राजा झाला देव- द्विज-शत्रूंचा विराम[4] विश्रांम
चरणें रंजवि कंजवि- शालाक्ष[5] वसवि पदीं च[+] विश्वास ८६
विरज[6] जग करि स्वयशें वैकुंठचि होय पामरा जगती[7]
कपि यातुनाथ[8] पूजी दे सर्वजनासि रामराज गती ८७
स्व-भजन सुमार्ग लावी प्रभु ते यम-भय समस्त विलयातें
दुसरा असेल कोणी जरि कवि-वर[9] यासम स्तविल यातें ८८
सव[10] सर्व सिद्धिनें ते शुचि नये[11] धर्म प्रवर्तवी प्राज्य[12]
ज्यांत अनय न स्वप्नीं श्रीराम प्रभु असें करी राज्य ८९



## पंचम स्तोत्र रामायण.

विधि वीरसार्वभौमा श्रीशा विनवी दशास्य मारावया
कीं शक्तिमनां[13] श्रेष्ठ क्षम हाचि क्षित-विपत्ति वारावया १
रक्षाया धर्म द्विज दशरथ-सदनांत चार मूर्ति धरी
नामें श्रीराम भरत लक्ष्मण शत्रुघ्न होय देव हरी २
धर्मविदुत्तम[14] भगवान् प्रथम कुशिकनंदनाध्वरा[15] पाळी
मग राम अहल्येचें श्री-चरण-रजें[16] अशेष[17] अघ[18] जाळी ३
गाधिसुतें वैकुंठ प्रभु दाउनि फार निववीली मिथिला

---

१ शुभ-ईक्षण-चांगले आहेत नेत्र ज्याचे. २ राका-ईश-पूर्णिमेचा चंद्र. ३ नाश क. ४ जगास. ५ कमलाकार विशाल ज्याचे नेत्र. ६ गतमल. ७ पृथ्वी. ८ बिभीषण. ९ कविश्रेष्ठ. १० यज्ञ. ११ नीति. १२ पुष्कळ. १३ समर्थ. १४ धर्मवेत्ते जे त्यामध्यें उत्तम. १५ विश्वामित्राचा यज्ञाला. १६ श्रीरामाचे जे चरण त्यासंबंधी धुळिनें. १७ सर्व. १८ पातक. + नीचास.

भंगी हर-चाप करी वीर शतोत्साह-शक्ति[1] जो शिथिला[‡] ४
पुरुष-मुकुटमणि वरिला सीतेनें पुरविताचि तूर्ण[+] पण
पूर्णपण जनकहृदया मोही करि मोह-गिरिस-चूर्णपण[2] ५
तो याज्ञवल्क्य[*]शिष्य स्वप्राण प्रभु-पदांबुजीं वाहे
दे लक्ष्मणादिकांला कन्यात्रय विश्व उत्सवा पाहे ६
गुरु-हर-कार्मुक-भंगें क्षोभे क्षत्रघ्न[3] भार्गव क्रोधी
त्यातें जिंकी होय प्राणद तच्चित्त-शांति दे शोधी ७
प्रणव-जप-विचारें जो जाणावा दुर्लभा तया दवडी
जोडी भू कैकेयी मौक्तिक टाकूनि मेळवी कवडी ८
सीता लक्ष्मण घेउनि जाय पृथु[#]-यशा वनासि उत्साहें
पितृसत्यावन[#] हित परि मानी प्रभु अहित मात्र कुत्सा[4] हें ९
व्हाया हिरण्यगर्भ- प्रमुख अमर हृष्ट दुष्टजन-घातें
राम निघे दुःख हरूं मुनिलक्षा दे दशास्य अनघातें १०
शोकें दशरथ मेला तेव्हां सुत एक ही न या जवळ
दूत-सुत-त्वर आले सोडुनि शत्रुघ्न भरत आजवळ[5] ११
गुरु-शोक-व्याप्त-भरत कैकयीतें म्हणे न तोक[6] रितें
पुर कुळहि पाडिलें कीं हा पापें प्रिय तिचें न तो करितें १२
तात-क्रिया करि निघे गुह वायु घना तसा बळा रोधी
दे भरता वाट तरी भरत-हृदय जेथवां बरें शोधी[7] १३
भरत-मनि भरद्वाजें सत्कार करूनि देखिली अमळा
मग भक्त चित्रकूटीं नमुनि अधोक्षज-पदांबुजें रमला
ऋतुवर वसंत जेंसा माकंद[8]वना पिका[9] तसा राम

---

१ वीर-शत-उत्साह-शक्ति-शेकडोवीरांचीउत्साहशक्ति २ चूर्णत्व ३ क्षत्रियकुळाचा नाशक. ४ निंदा. ५ दूतांनींकेलीत्वराज्यांलाअसे. ६ अपत्य. ७ मळरहीत. ८ आम्रवना. ९ कोकिला. + मलर. ⁜ पितृ-सत्य-अयन-बापाचेसत्यराखणें. ‡ सैल निरुपयोगी. # मोठें यश ज्याचें असा. ※ जनक

गुरु- जननी- प्रमुखजना भरता निववी महादया-धाम १५
पिंड पित्याला देतो सुमुख सुदर्शन म्हणे नको फिरवूं
गुरु- सत्यधर्म रक्षूं वत्सा सद्यश जगत्त्रयीं मिरवूं १६
मनुसंवत्सर काल सुमुनि वनीं वासर- क्षपा येतो
धर्म नयांचें करुनि स्व-सचिवसह वास रक्ष पा ये तों १७
आत्मा परमेष्ठीचा ऐसें सांत्वूनि फिरवि भरतातें
दे पादुका वहाया[1] जो दिधला सर्वराज्यभर तातें १८
आज्ञा-परिग्रह करी परते त्या पादुका शिरीं वाहे
राहे नंदिग्रामीं शित तापहि तुष्टि वल्कलीं साहे १९
प्रभु मग अत्रिस भेटे अनुसूया श्रीस[2] दे उटी सुमुनी
तेथें निघे यदर्थें भजति सदा उग्रतपःकुटीर मुनी २०
उद्धरुनि विराधातें बहु संवत्सर उदंड कवनांत
वाल्मीकिच्या रसिकसा प्रभु रस पाहे सुदंडक-वनांत २१
मुनि-रक्षण-दक्ष प्रभु शरभंग-सुतीक्ष्ण-घटज-चित्तातें
निववी जाणों निर्धन ते केलें[3] पात्र विपुल-वित्तातें २२
पितृ-सख गृध्र जटायु प्रमुदित करि सत्य पुत्रसा राम
गोदा-तट-पंचवटी- माजि रची उटज विश्व-विश्राम २३
बहु निववि विश्वदक्षिण भुज विभुचा लक्ष्मण स्व-शुद्ध-यशें
जेणें केलें दास्य प्रभुचें प्रेमें सदा पदाब्ज-वशें[4] २४
विस्तार काननाचा जें स्थावर पर्वतादि जें स्थाणू
उद्धरिले मृग पक्षी सर्वहि किति बोलण्यांत ते आणूं २५
श्रुति-शास्त्र-सदनुभव ज्या प्रभुचा सर्वीं प्रमाण जो बीज
अव्यय या विश्वाचें ज्या सुरसीं म्हणति कवि मना भीज
तो परम अर्थ झाला ताराया विश्व सद्यशें नरसा

---

१ आज्ञेचें ग्रहण. २ उग्रतपश्चर्येनें युक्त ज्यांचे आश्रम. ३ हर्षभरित. ४ स्तंभ. + भाजन.

श्रीचरणपल्लवांहीं ऐसी बहु निववीली कधीं न रसा[#] २७
प्रभुच्या **अनर्थ** व्हाया शूर्पणखा कामुकी गळां पडली
तद्घ्राणकर्ण[1] लक्ष्मण हरि बहु ती रावणस्वसा रडली २८
सबळ खरहि संहरिनां क्षोभे दशमुख पडावया शोकीं
मत्त **महाकोश महा- भोग महाधन** बलाढ्य जो लोकीं २९
अनय असंख्य करुनि जो नित्य **अनिर्विण्ण** सज्जन-द्वेषी
मारीचराक्षसातें श्रीचें मन लोभवावया प्रेषी ३०
वैराज[3] रूप यास्तव ज्याचे नाम **स्थविष्ठ** तज्जाया
मोहाया होय कनक- मृग तो परमापदेंत मज्जाया[6] ३१
तत्वेंकरुनि अजन्मा म्हणुनि **अभू** म्हणति ज्यासि तद्भार्या
मायामृग मागे त्या सिद्ध कराया सुरांचिया कार्या ३२
मख[+] **धर्मयूप**[#]शोभित महिवरि सर्वत्रही प्रवर्ताया
जाय मृगामागें तो ते दूर वधि त्रिलोक-भर्ता या ३३
हा सीते हा लक्ष्मण ऐसी मारी कुबुद्धि तो हाक
व्हाया **समरमहामख** ती देवी जानकी धरी धाक ३४
श्री लक्ष्मणा म्हणे जा रक्षीं पतिला जसें क्षतत्राणीं
**नक्षत्र नेमिलें** बा इतरीं तेसें दया करी प्राणीं ३५
तो तीस म्हणे एक त्रिजगीं विजयी स्वनाथ लक्षावा
अरि वधिला न क्षत्रें **नक्षत्री** काय देवि रक्षावा ३६
सर्वाऽहित माराया तारया **क्षम** समस्त- विश्वास
आलाचि आर्य आर्ये मद्वचनाचा धरींच विश्वास ३७
**क्षाम**[10] विचारा वदली त्वच्चित्तीं मदभिलाष[11] गुरु-घात[12]
सौमित्रि साश्रु तीतें मोडी जोडी त्यजूनि धृति[13] हात ३८

---

१ नत- घ्राण- कर्ण- तिचेनाककान. २ संतोषरूप. ३ विराटस्वरूप. ४ अत्यंत स्थिर किंवा स्थूल. ५ परम- आपदा- अतिविपत्तीत. ६ बुडाया. ७ जन्मरहित. ८ देवांच्या. ९ क्षत- त्राण- व्रणाच्यारक्षणीं. १० कृश आहे विचारजीचा असी. ११ मत्- अभिलाष- माझीइच्छा. १२ रामाचानाश. १३ धैर्य.
\+ यज्ञ. # धर्मरूप ध्वजानेंशोभित. # पृथ्वी.

जो खळ नव्हे समीहन[1] तो दशमुख तोंचि ये हरि सतीतें
मानी हरण कदुःसह- तर वृक-हन[##] शिशु-मृगीपरि सतीतें ३९
अशिस जटायु विरथ करि जो वृद्धहि पक्षिपति समर-यज्ञ
मोडवि कनेसि देखति कर होउनि चित्रगतिसम रयेज्ञ[2] ४०
पक्ष-छेदुनि पाडुनि गृध्रकुळेंद्रासि ईज्य-वर-महिला[3]
ती नेली दशकंठें दिधल्या अत्यंत शोक-भर महिला ४१
टाकी स्वालंकार श्री जातां प्लवग[4] पांच पाहूनि
लंकेंत महेज्यस्त्री[5] राहे प्रभु-विरह ताप साहूनि ४२
देव शतक्रतु[6]हितकर लक्ष्मण-कथित प्रिया-कटुक-वचन
परिसुनि म्हणे कुवागिषु[7] एकहि साहे असें पटु कवच न ४३
शून्य उटज पाहुनि विभु हाय वदे शोकसत्र घाली तें[8]
वर्णावें काय म्हणे अचळासहि दाखवाचि आलीनें ४४
स्त्रैणत्व[9] सतांगति तो दाखवि हुडकी करी विलापातें
पाहिल्याहुनि गुरु शोक प्रभुला पितृबंधुच्या[10] दिला पातें[11] ४५
जरि सत्य सर्वदर्शी[+] क्षतें-हेतु[::] पुसे तयासि खगतात
कथुनि मरे त्या कृतसा जळ दे कवि या यशेंचि जगतात ४६
नित्य विमुक्तात्मा हरि तरि पुनरपि हुडकि नवनवी अटवी[12]
कगति कबंधा दे प्रभु शोकें वनदेवतांसही पटवी[*] ४७
सर्वज्ञही कबंधें कथिलें हित आदरी करी शबरी
धन्य जयाच्या स्मरणें गति पावे संकटीं करीशे[13] बरी ४८
होतें प्राप्त जडाही ज्या स्मरतां ज्ञान उत्तम स्पष्ट
तो प्रभु पंपातीरीं विरहें हा[14] म्हणुनि दाखवी कष्ट ४९

---

१ चांगल्या इच्छेनें युक्त. २ वेगवान्. ३ पूज्यांत श्रेष्ठाची पत्नी. ४ वानर. ५ म हा- ईज्य- स्त्री- अतिपूज्य रामाची स्त्री (सीता) ६ इंद्राचें हित करणारा. ७ कु- वाक्- इषु- कुत्सित वाणीरूप बाण. ८ सखीतें (सीतेतें) ९ स्त्रीलंपटत्व. १० जटायूच्या. ११ पतनानें. १२ अरण्य. १३ करि- ईश- गजेंद्र. १४ हाय. + सर्व पहाणारा. ::: व्रणाला कारण. * रुजु करी. ## लांडग्यानें हरण केलेल्या लहान हरिणीचे परी.

नमिला श्रितसंरक्षण- सुव्रत शिष्य पवननंदनें रविजा
सुगळातें भेटविला तो म्हणति शरण्य गुरु असें कविज्या ५०
सुमुख प्रभु होय सखा तो दावी सूक्ष्म उत्तरीयपट
तद्वदनग श्रीचे ते झाले प्रभुसि अमृतपूर्ण पट ५१
तमा थिर्णांईकाला निवविति जैसे सुघोष देवास
तैसेचि अळंकार श्रीचे त्यां स्वहृदयांच दे वास ५२
वाळिस वधूनि देउनि सुगळा कपिराज्य सुखद होय हरी
विश्व-सुहृत्प्रभु-दयिता- प्राप्तीस्तव सुगळही प्रयत्न करी
प्रभुचें मनोहर स्त्री- रत्न पहायासि कपिबळें शिरलीं
सर्वदिशांत तयांतुनि जीं दक्षिणदिग्गतिं न तीं फिरलीं ५४
टळला अवधि न लागे शोध जितक्रोध राम परि नाथ
वधिलचि म्हणुनि मराया बसले कपि सेविती न फळ पाथ ५५
खाया ये तों ऐके संपाती गृध्र बंधुचें नाम
कपि-वीरबाहु फुगवी शोध कथुनि पूर्ण तो करी काम ५६
पर-हृदय-विदारण-पटु पवनसुत उडे समुद्र शतगावें
न तगावें इतरें सुर म्हणती होवूनि यासि नतें गावें ५७
श्रीस अशोकवनीं पुर शोधुनि मारुति विधूदयीं पाहे
स्वापन रुचे कुमति ये प्रार्थी धिक् श्री म्हणे न तें साहे ५८
व्हाया स्ववश सती-मन खळ सांगे राक्षसीस बोधाया
जातां ती मरतां कपि मुद्रा दे कळवि कुशळ तो धाया ५९
श्री चूडामणि दे घे आज्ञा मोडूनि तरु वधी पापी
दापी अक्ष वधुनि बहु देव गहना नेविं घनरवा व्यापी ६०
एकहि गमे परांला नैकात्मा मथुनि बहु वर्के अरिला

---

१ सूर्यपुत्रा. २ अंगावरचेंवस्त्र. ३ तत्-वद्-नग-त्या आंगावरीलवस्त्रांनबांधलेलेदागिने. ४ नामविशेष(ऋषी) त्याला ५. दक्षिण-दिक्-गत-दक्षिणदिशेच्या गयींगेलेलीं. ६ स्वामी (सुग्रीव) ७ उदक. ८ विधु-उदय - चंद्रोदयीं. ९ निद्रा. १० वृक्षछाया. ११ सीता. + नम्र. ⁂ रहाण्यालास्थान. ‡ आश्रितां संरक्षणरूप उत्तमव्रतज्याचें असा. ^ वणवा. ‖ अरण्या.

ब्रम्हास्त्रीं सांपडला  दाटुनि जड म्हणति घनरवें धरिला ६१
नेला सभेंसि वदला  जे धर्मन्याय भावि[1] ते सर्व
धरि नैकककर्मकृत् बळ ऐसि-सृक्कें दखिजे महागर्व  ६२
बहु वत्सर नांदाया  त्यासि बिभीषण विचार दे वारी
मग शासनार्थ पेटवि  पुच्छ क्रोधें समस्त-देवारी  ६३
वत्सलहि प्रभुसेवक  नात तसा शासनार्थ अरि-पुर तें
रक्षुनि बिभीषण-सदन  जाळी क्षम तरि न भस्म करि पुरतें ६४
प्रिय भक्त वत्स वत्सी  जो कपि वंदी तया कुशळ कळवी
बळ-विस्मित होउनि विभु  भेटे वर्णाश्रम भ्रम हि पळवी  ६५
थे रत्नगर्भ-तीरा  देव विभीषणहि तोचि धिक्कारी
हित कथितां त्या त्यजि हा  कीं खळ सदसेव्य जेविं हिक्कारी ६६
शरण बिभीषण ये त्या  दे लंकाराज्य अभय-जळधी तें
प्रभु हृष्ट धनेश्वर करि  लाजवि दृढ सेतु रचुनि खळ-धीनें ६७
द्विज धर्मगुप्[5] कर-प्रिय-  कर्ता लंघुनि पयोनिधि[6] कवेळा
गिरिवरि चढुनि स्कंठा  सांपडली विजयदा बहु सवेळा[7] ६८
जगदिष्ट+ धर्मकृत् प्रभु-  दयिताधन तस्करा दशास्याला
तोकी स्कंठ परि त्या  न विटवि जशि बहुहि दुर्दशा स्यांला[8] ६९
धर्मी प्रभु लंकेतें  वंदी सामार्थ अंगदा प्रेषी
परि तो न वळे बुडवी  स्वपर दुरभिमान-निधि महाद्वेषी ७०
सत् साम न करुनि बुडे  बुडवि सचिव-पुत्र-बंधु-सह सारे
कवि म्हणति रचित-घटज-  स्पर्धा या सर्व अंधुंस[10] हसा रे ७१
करि बद्ध असत्कर्मा  घननाद प्रभुसि नागपाशांनीं

---

१ पुढें होणारे. २ खड्ग. ३ हर्षयुक्त. ४ दुष्टबुद्धी रावणानें. ५ ब्राम्हण आणि धर्म यांचा रक्षक. ६ नामविशेषपर्वत त्यावर. ७ उत्तमवेळा. ८ मेल्हण्या ९ केली आहे अगस्त्यऋषीशीं स्पर्धा ज्याणें असा. १० विहिरीस. + जगत्-इष्ट- धर्मकृत्- प्रभु दयिता-धन-तस्कर- जगाला आवडता आणि धर्म करणारा राजा राम त्याच्या स्त्रीरूप द्रव्याच्या चोरा. * सत्- असेव्य- साधूंनीं सेवण्यास अयोग्य. ※ उचर्का रूपशत्रु. ++ म.- उक्त- चांगल्या भाषणानें.

मोडवि गरुड धरावे   जाळ्यानें काय तिमिस[1] दाशांनीं[*]   ७२
घटकर्ण वधी क्षर दश-   मुख अक्षर पुरुष रामभद्र असें
जाणति सर्व उठवितां   बळप म्हणति पवनजा चिरायु असें ७३
मेघरव वर्णि दावी   सीता मायामयी करी घाता
लीला-नररूप प्रभु   बहु हाय म्हणे जसा अविज्ञाता ७४
सौमित्रिनें खपविला   शक्र-संहस्रांशु[2]-मेघरव-राहू
तेव्हां वदले सुर-मुनि   वा हें त्वत्सुयश नित्य नव राहू   ७५
त्याच्या सुचिर विलापा   अतिकरुणा करुनि बहु विधातातें
असि धरिला माराया   ज्या स्तवि नमि नित्य बहु विधाना तें
त्यासि सचिव प्रयत्नें   फिरवी कृतलक्षण[3] प्रभु वधाया
बहुबळ मारवुनि निघे   भक्तिरसा सेवि जो खळ न धाया ७७
संतत गभस्तिनेमी   विश्वहिती जो नदीयवंशमणी[4]
क्षोभे दशकंठीं कीं   अनुजा करि शक्तिनें विमूढ रणीं   ७८
भंगुनि दशकंठातें   सत्त्वस्थहि[5] मूर्छितानुजा[6] शोचा
दे प्राणदान पूर्वी   साधु जगत्प्राणपुत्र[7] दे तोची   ७९
सिंह जसा मत्तगजा   मारी दशकंधरा रणीं राम
पूर्ण करी लीलेनें   देव-ब्राम्हण-मही-मनः-काम   ८०
भूतमहेश्वर[8] भगवान्   देवांहीं पूजिला कुसुमवर्षें
बहु वाद्यें वाजवुनि   स्तविला वर विजय वाणिला हर्षें   ८१
तो आदिदेव करवी   शत्रुत्तरकार्य[9] आर्य-धी रमवी
शमवी शोक बिभीषण   वसवी पदिं श्रीस विश्वहित गमवी ८२
जिष्णु विधि महादेव   प्रमुदित करि दशरथा नमी निववी

१ मोठे मत्स्य. २ इंद्ररूप सूर्याला ग्रासणारा इंद्रजित् रूप राहू. ३ शौर्यादिकांनीं प्रसिद्ध असा (प्रधानाचें विशेषण.) ४ भागीरथीच्या वंशामणि. ५ सत्त्वगुणविशिष्टहि. ६ मूर्छित- अनुज- मूर्छा पावलेल्या लक्ष्मणास. ७ मारुती. ८ पंच भूतांचा ईश्वर. ९ शत्रु- उत्तरकार्य. ❋ धीवरांनीं.

शिव[+]र्वातबाध[1] दे प्रभु जे रण-मृत कीश[*] शक्र ते जिववी ८३
प्रभुच्या वचनें सगळा सुगळा लंकेश दिव्य दे वेश[2]
पुष्पकनामविमानीं बैसुनि ये निजपुरासि देवेश ८४
मेन्यादिकथा सांगे नीस सुधेहुनि सर्ता बररवि मानी
तारेसि देवभृत-गुरु- दयिता श्री आणवी वर-विमानीं ८५
उत्तरदिशेंत पुष्पक गगन-पथें रविविमानसा चाले
प्रभु कथि आश्रम तीर्थें श्रीकर्ण स्वामिसूक्तिनीं[*] धाले ८६
मुदित भरद्वाज करी मग गुह शत्रुघ्न भरत गुरु माता
गोपति होय विभु जगीं मह[3] नसना जरि असीम गुरु मांता[4]·
विश्वाचा गोप्ता[5] क्षिति बरि होउनि रंजवि प्रजा माता
तात स्विता जनकाचा दिनमणि[6] करि कंज[7] विप्र जामाता ८८
कपि-राक्षस-राजांनें[8] तत्सैन्यातें उदंड सत्कारी
जो ज्ञानगम्य तो प्रभु मारुतितें भजनसहरें नारी ८९
धर्मनयपथ पुरातन उजेरी[9] सव[10] सर्वही करी राजा
सांगे जरा-गदांतें[11] सांडुनि सर्व प्रजा-शरीरा जा ९०
शत्रुघ्न भरत लक्ष्मण गंधर्व वधीं प्रमत्त जे कामी
आठ सून करी राजे स्वभुजसम शरीरभूतभृत् स्वामी
उच्छिष्ट-बदर भोक्ता होय म्हणुनि रामराय शबरीतें
तारी देयाल न कां गातां गति रामराय शबरी तें ९२

स्तोत्र रामायणप्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें

---

१ निर्दोष· २ वस्त्रांचेपोशाख· ३ उत्सव· ४ मावता· ५ पालनकर्ता· ६ सूर्य· ७ कमळ· ८ सुग्रीवाबिभीषणातें· ९ निर्मळकरी· १० यज्ञ· ११ हृदयवरोगांतें· + कल्याण· ⁂ स्वामि-सुउक्तिनीं रामाच्याउत्तमभाषणानीं· ⁂ वानर·

# षष्ठरामायण.

देवर्षि कपींद्र म्हणति भूम्युद्धारा वराह जो झाला
त्याला विधिहर विनविति दशरथदारोदरासि तो आला १
कौसल्या कैकेयी तिसरि सुमित्रा तयांसि करि माता
त्या अदिति भूरिदक्षिण तज्जठरीं अन्यथा न हरि मोता २
सोमप दशरथ देवा चवघां पुत्रांस चार जीं नामें
तीं राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न असीं सुखवर्धिचीं धामें ३
अमृतप गाधिज केला रामें राक्षस वधून यज्ञातें
रक्षूनि गौतमा सुख दिधलें तारुनि वधू नयज्ञातें ४
सोम-प्रियदर्शन विभु जनक-पुरा गाधि-नंदनें नेला
प्रभुनें हर धनु भंगुनि लीला-लेशेंचि पूर्ण पण केला ५
बहु जिंकिले निशाचर गाधिजयज्ञघ्न म्हणुनि रामातें
पुरुजित् कविवर म्हणती त्या सीता वरि सुकीर्ति-धामातें ६
पुरुसत्तम जनक सुता रामाचे अनुज जे तिघे त्यांतें
दे फिरतां मार्गे धरी भार्गव जो तुरवि हे तिघे त्यांतें ७
विनयन सोडा जिंकी भृगुरामा राम ये पुरा पौर
रौरव-हर यश गाती प्रेमें शरदिंदुहूनि जें गौर ८
जयमुदित दशरथ स्व ज्येष्ठसुता यौवराज्य जों दे तों
कैकेयी वर मागे तीस म्हणे सत्यसंध तो देतों ९
दाशार्ह-अदयपण जें तें धरि दयिताहि राज्य- लोभानें
रामा वन भरता पुर म्हणतां त्यजिलाचि साधु तो भानें १०
नें सात्वतांपति प्रभु तानाचा सत्य-धर्म रक्षाया

१ भूमि-उद्धार-पृथ्वीच्याउद्धारार्थ. २ मामावता. ३ सोमवल्लीच्यारसपानकरणारा. ४ सुखसंपत्तिचीं. ५ नीतिजाणणाऱ्यानें. ६ शरत्-इंदु-शरत्कालींच्याचंद्राहून. ७ रामाविषयींनिर्दयत्व. ८ देहस्मृतीनें. + दशरथ-दारा-उदर-कौसल्येच्यापोटास. * शस्त्रधरणाऱ्यास्त्रियांतें.
※ सत्यप्रतिज्ञ.

मान्य करि निघे वल्का फळ-मूळ चतुर्दशोऽब्द[1] भक्षाया ११
सीता लक्ष्मण घेउनि नमुनि गुरुजना निघे पुरा जीवे[2]
देहा नसा त्यजी प्रभु यन्मुख[3] जन-मधुप[4]-कुळ-कराजीव १२
ज्यास विनयिता साक्षी विश्वाचा म्हणति सर्व कवि पत्ती[‡]
जाय वना रथ दे त्या राजा मोसे न बाळक-विपत्ती १३
दे भेट मुकुंद गुहा स्तवुनि म्हणति धन्य हा निषाद मुनी
तो की हरियत्नामें शिव कंठीं धरि न हा विषा दमुनीं १४
धाडुनि सुमंत्र नगरा गुहतरिनें जाय जान्हवी-पारा
तो अमित[5]-विक्रम प्रभु कीर्ति भरद्वाज-मुनिस दे सारा[6] १५
मुनि-निकर[7] चित्रकूटीं राम-प्रभु-दर्शनीं स्करवें दाटे
अंभोनिधि[8] आल्हादे बहु पर्वविधूदयीं[‡] तसा वाटे १६
ते म्हणति अनंतात्मा देव[10] महोदधिशाय[11] प्रभो रामा
दुष्टांचा अंतक तूं सर्वसदाधार नीरदश्यामा १७
अज[12]पुत्र देह सोडी सुतशोकें तें तसें घडे शापें
मातुळ-कुळागत भरत गांजी मातेसि तो तिच्या पापें १८
संस्कारूनि महार्ह[13] स्वपित्याचा देह साधु तो भरत
स्वामीस चित्रकूटीं जाय शरण शीघ्र भक्ति-लोभ-रत १९
दे पादुका विनवितां वत्सल तो त्या बहिश्चरा[14] प्राणा
स्वाभाव्य यशोलाभें सांत्वी लावी प्रजा-परित्राणा[15] २०
नंदिग्रामीं राहे साधु जितामित्र[16] स्वव्रत ज्ञानी
ध्यानीं प्रभुच्या लावी चित्त स्तविल्या अशेष-तज्ज्ञांनीं[17] २१

---

१ चवदावर्षे. २ प्राण. ३ यत्-मुख-ज्याचेंवदन. ४ लोकरूपभ्रमर समुदायाचेंउत्तमकमळ. ५ अपरिमितज्याचापराक्रम. ६ श्रेष्ठ. ७ ऋषिसमुदाय. ८ समुद्र. ९ महा-उदधि-शाय-मोठ्यासमुद्रींनिजणारा. १० सर्व-सत-आधार-सर्वसाधूंसआधारभूत. ११ मेघासारिखासांवळा. १२ दशरथ. १३ महानूयोग्य. १४ बाहेरफिरणाऱ्या. १५ प्रजासंरक्षणाला. १६ जिंकिलेशत्रुजाणे. १७ त्याचेंस्वरूपजाणणारेजेसाधूत्यानीं. ‡ पर्व-विधु-उदय-पूर्णिमेचेंचंद्रोदयीं. ‡‡ नाशकरणारा. ‡: पादचारी.

भक्त-प्रमोदन प्रभु अर्पिस आनंद दे विराधातें
वधि उद्धरी यश म्हणे प्रभु देवांसि न मर्वे विरा धातें २२
दंडक-वन-वासी द्विज- नंदन विभु वल्कली जटायुत या
दे घटज विष्णुशास्त्रें करववी जो तातसरव जटायु तथा २३
श्रीसह सानंद प्रभु उटजीं गोदावरी-तटीं राहे
आहे कार्य मनीं जें देवांच्या तें कराक्या पाहे २४
तो देव सत्यधर्मा विधवाजी रावण-स्वसा चंडी
मायारूप धरुनि ये वकवुनि भोगावया तिला दंडी २५
दुष्ट तिचा कैवारी खरनामा जो वसे जनस्थानीं
तो मारितां त्रिविक्रम बहुतचि सत्कारिला वनस्थानीं २६
जैसा महर्षि-कपिला- चार्य सकळ सगर-पुत्र भस्म करी
तैसेचि मत्त राक्षस सर्वैर चतुर्दश-सहस्र राम हरी २७
ऐकुनि शूर्पणखोक्त क्षोभे दशकंठ कनकमृग दावी
श्रीचें हरण कृतज्ञ प्रभुहि करूं दे अनर्थ हित भावी २८
जो गृध्र मेदिनीपति जोडूं दे त्यासि कीर्ति परम-गती
देतांचि प्रभु होती न ख्याति जगत्त्रयांत पर मग ती २९
दावि स्त्रैणपणातें त्रिपद प्रभु हा वदे वनीं हुडकी
लेववि‍ली सत्श्रवणीं निर्गुणता सगुणता दुजी कुडकी ३०
त्रिदशाध्यक्ष प्रभु दे गृध्राला अग्नि पिंडतोय शतें
स्तविलें न मेळवी तो जो तीर्थे कयति हिंडतो यश तें ३१
पुनरपि शोधी लंघी राम महाशृंग गिरि वनें बाहू
योजन-दीर्घ जयाचे प्रभुसि धरि कबंध तो जसा राहू ३२
त्यानें कृतांतकृत् प्रभु मारुनि दे देव-भाव तो आर्य

---

१ पोषक. २ जटायुक्त. ३ अरण्यांतरहाणाऱ्याऋषींनीं. ४ शूर्पणखा-उक्त- शूर्पनखेचें भाषण. ५ हाय. ६ त्रिदश-अध्यक्ष-देवांचा अध्यक्ष-मुख्य. ७ क-यति-उत्तमसंन्यासी. + पंचवटींत. ✻ खर नामकराक्षसासह.

सांग रविसुत-सुगळा भेटें करिशील तद्वळें कार्य ३३
होउनि **महावराह** क्षिति उद्धरि म्हणुनि म्हणति कवि ज्याला
**गोविंद** उद्धरी तो शबरीतें अभय सख्य रविजाला ३४
प्रभु वालिनें वधिकरी सुग्रीवा प्लवगराज या आले
नाग **सुषेण** गज गवय ऋक्ष कपी प्रणत सर्वही झाले ३५
सीतेतें शोधाया अंगद **कनकांगदा** यमाशेला[1]
पूर्वादिदिशांसि इतर सुगळाज्ञेनें जसे तसा गेला ३६
ढळतां अवधि मराया यमला कपि-बळ-समेत वध+-भीता
**गुह्य** जटायु*-भ्राता कथि तो लंकेंत दिसतसे सीता ३७
ऋक्षेंद्र[2]-बोधित-बळी पवन-सुत **गभीर** सिंधु शतगावें
लंघी लीलेनें त्या कर्मी परधैर्य लेश न नगाचें ३८
शोधुनि पर[3]-पुर शोधी **गहन**[4] अशोकाख्य मग सती पाहे
तों ये अरि जें बोले अश्राव्य अवाच्य तेंहि तो साहे ३९
**गुप्त** बसे वृक्षीं श्री- धिक्कृत खळ जाय मग तिला नमुनी
प्रभु-मुद्रा दे सांगे कुशळ पुसे खूण घे क्षण नमुनी ४०
तरुवर मोडी राक्षस[5]-**चक्र गदाधर** तसाचि तो खपवी
अक्ष[6] वधी घननादा व्याकुळ करि धरि अनंत तोष[7]-पवी ४१
पवन-सुतें न गणुनि शत- मख[8]-दुःसह-मेघनाद-शस्त्रास
**वेधा**[9] बहु हर्षविला त्याच्या देखूनि मान अस्त्रास ४२
नव **स्वांग** करूं दे नेतां दशमुख-सभेसि जाय कपी
हित बोधामृत दे परि नच तो क्षीणायु मूढनायक पी ४३
**अजित**-प्रभु-दूत उडे निज-पुच्छाऽग्र्याऽनळें पुरी जाळी
पाळी बिभीषण-सदन कीं तो याच्या वधा स्वयें टाळी ४४
पुर कवळि **कृष्णवर्त्मा**[10] स्व[11]-प्रिय-सख-सूनुनें करी तुष्ट

---

१ यम-आशा- दक्षिणदिशेला. २ ऋक्षांचा स्वामी जो जांबवान् त्याणें जाणविलें बल ज्याचें असा. ३ शत्रुनगर. ४ अरण्य. ५ राक्षसांचें सैन्य. ६ नामविशेष रावणपुत्र. ७ संतोषरूप वज्र. ८ इंद्रास दुःसह. ९ ब्रह्मा. १० अग्नि. ११ आपल्या प्रियसख्याचा (वायूचा) पुत्र जो मारुती त्यानें. + वधाबद्दें भ्यालेल्या अंगदास. * संपाति.

पुष्ट समीर[१] करी त्या भ्रमले हाहाचि बोलिले दुष्ट ४५
हृष्ट बळ जलधि विलंघुनि ये कळवी अंगदादिकां कृत्य
नृत्य कराया लावी विजयीं श्रीराम-कीर्तिकर भृत्य[२] ४६
साधुत्हृदय-संकर्षण अच्युत[३] बहु सुप्रसन्न होय दया
करि भेटे श्रीचूडा- मणि देतां नेत-मयूर-तोयद या ४७
अमित सुरांऽश-कपिबळें घेउनि विभु वरुणा-सदन[+]-तीरातें
जाय बिभीषण वंदी तो सकळ-शरण्य-मुकुट-हीरातें ४८
देवनगपल्लव[‡]-वारुण- चरणयुगीं साधु जो शिर स्थापी
त्या दे लंका-राज्य प्रभु अमृत त्यजुनि कवि यशा गाती ४९
वृक्ष[⁂] सुरांचे पांचहि लाजविले या यशें अज[४]-पदानें
प्रभुच्या चरण-स्मरणें नमनें, जें भद्र[५] तें न जप-दानें ५०
तो पुष्कराक्ष[‖] निरुपम सेतु जलधि-कठिन नळ-करें करवी
पर-वीर-हृदय तापवि निववी सत्कोटि कीर्ति हे वरवी ५१
उतरे महामना प्रभु सागर पाहे चढे सुवेळ-नगीं
प्रथमचि सुगळ दशमुखा भंगी प्रकटी भुज-प्रताप जगीं ५२
लंका वेढुनि भगवान् सीताछळकाकडे स्वयें दूत
अंगद साम कराया धाडी बोले विचार तो पूत[६] ५३
साम न करी दशवदन खळ-भगहा रामचंद्र समरांत
भस्म करी बहु राक्षस विजयें दे हर्ष नित्य अमरांत ५४
दशमुख-भंग विलोकुनि घनरव-कृत नागपाश मोघ[७] हरी
आनंदी होय प्रभु परबळ-तृण पर्ण जेविं ओघ हरी[८] ५५
पाळी हें त्रिभुवन वन- माली जो तद्वधा महाकाय
ये घटकर्ण[९] विलोकिल मग काळाचें न धाम[१०] हा काय ५६

---

१ वायु. २ सेवक. ३ नम्र अशा मारुतिरूप मोराचा मेघ राम तो. ४ जन्मरहित जो राम त्याच्या चरणानें. ५ कल्याण. ६ पवित्र. ७ निरर्थक. ८ हरण करी. ९ कुंभकर्ण. १० गृह. ⁂ पांच कल्पवृक्ष. + उदकाचें स्थान जो समुद्र त्याच्या तीरास. ‡ देव-नग-पल्लव-अरुण-चरण-युग-कल्पवृक्षाच्या पल्लवासारिख्या लाल चरणद्वयीं. ‖ पुष्कर-अक्ष-कमलासारिखे नेत्र ज्याचे (राम.)

गगनीं घननाद वदे वधितों सर्वांसि आजि परिसा रे
तातासि मह भला दे युद्धीं पाडुनि धरणिवरि सारे ५७
आदित्य अंधकारा प्रभु-मोहा तेविं पवनतनय हरी
आणी महोषधी-नग- शिखर निवे स्तवि नयासि मनुज हरी ५८
घनरव माया-श्री वधि विकळ करि जगत्प्रकाशक ज्योती
मारुति-कपी श्वरादि त्यजुनि धृतिस दीन ते धवा होती ५९
माया असें बिभीषण सांगोनि करी सहिष्णु देवातें
जो पद-पद्म-रजाच्या ज्ञान स्मरतां जडासि दे वातें ६०
त्या घनरवा वधुनि दे गतिसत्तम लक्ष्मण प्रभावातें
गाय हरि हरिलि अरिची सहसा जसि दीपक-प्रभा वातें ६१
श्रीस वधूं धांवे परि मचिवें दशकंठ फिरविला मागें
बहुबळ वधी रुक्मधन्वा प्रभु खळही युद्ध मग करी रागें ६२
खर- शक्तिनें सुमित्रा- पुत्रातें अरि रणांगणीं पाडी
खंडपरशु नेता प्रभु पंक्तिवदन-मदन अल्पही झाडी ६३
त्याचि उपायें मारुति लक्ष्मण- मोह- व्यथा क्षणहि उडवी
दारुण समर करी प्रभु शक्र-रथीं बसुनि अरि-चमू बुडवी
द्रविणप्रद- बंधु-शिरें शत खंडी प्रभु तरी न तो पडला
कुंभज-दत्त रविहृदय जपतां तन्नाश रविवरें घडला ६५
झाला विजय दिवस्पृक् प्रभुचा सर्वत्र अमृत घननाचा
भक्त-मयूरासि म्हणे शोक बहु हर्ष शत्रु- हननाचा ६६
होय प्रभुसि पहातां आनंदें करुनि सर्वदृग्व्यास
दास ब्रह्मादि बहु स्तविति अति हास पावला त्रास ६७
स्तव पुष्प-वृष्टि करिती बहु कवि वाचस्पति-प्रमुख रामीं
त्या मी वर्णूं न शकें हर्षा कोणी तरा न स्फुर- धामीं ६८

---

१ धैर्यासि· २ सोसण्यासमर्थ· ३ वायूकरून· ४ वानर· ५ रावणाच्यागर्व· ६ क्षतहि· ७ कुबेरबंधूजोरावणत्याचीं शिरें· ८ अगस्त्यऋषीनें दिलेलें· ९ कमीपणा· + उत्साह· ++ हरणकरी· ‡ मनुष्यरूपीराम· ‖ सर्व-दृक्-व्यास-सर्वांच्या दृष्टीचा विस्तार·

करवी **अयोनिज** प्रभु मग उत्तरकार्य शत्रुचें सांग
बसवी बिभीषणाला राज्य-पदीं त्या यशास्तवी गांग[1] ६९
मग तो प्रभु **विसामा** श्रीकरवीं दिव्यकरवि शंकेनें
हरवि हर-विधि-स्तुत-पद लावी निजचरण-भक्ति लेकेनें ७०
**सामग**-गीत-गुण प्रभु करि सुर-मुनि-महित दशरथात्मजुनी
बाळांसि तुष्टिपुष्टिद हें यश म्हणती असें न थान मुनी ७१
**साम** पित्या-पुत्रांचें होय परस्पर रणांत मृत होते
जे ऋक्ष कपि प्रभुला वर देउनि उठवि शक जो तो ते ७२
**निर्वाण**[2]प्रद भवगद-[3] **भेषज** यश करि **भिषक्**[4]प्रवर राम
सांगुनि बिभीषणाला सबळ सुगळ पूजवी पुरवि काम ७३
स्मरला विरहें झाले केवळ **सन्यासकृत्** स्वबंधुमणी
धांवे समर्थ भेटुनि जिववाया पुष्पकीं बसोनि धणी ७४
सांगे स्वविरहतापा[5] **शम** व्हाया श्रीस रामचंद्र कथा
सबळ-सुकंठ-बिभीषण-सह हर्षे लंघितां-अमर्त्य-पथा[6] ७५
तीर्थे पर्वत गहनें[7] **शांत**मुनिवराश्रम स्वयें दावी
लावी **निष्ठा** स्वयशीं सर्व प्रभुसूक्तिनें[8] सुधा भावी ७६
पावनि **शांति** सकळही प्राशुनि ते बोल कान सेकांहीं[9]
अमृताच्या भरिति गमे वेद असा बोलका नसे कांहीं ७७
दे हर्ष तीर्थपादा तो तीर्थ-**परायण**-प्रयाग मुनी
तातसख भरद्वाज प्रभुनें केला सुखी पदें नमुनी ७८
प्रथम पवन-तनय-करें गुह-भरत-चकोर-मानसा निववी
त्यावरि **शुभांग** विभु-विधु देउनि दर्शन वचोमृतें जिववी
तापत्रय-**शांतिद**पुर गुरु-माता-सचिव बुडवि हर्षांत.

---

१ गंगेचें पाणी. २ मोक्षदेणारा. ३ भव-गद-भेषज-संसाररूपरोगाचें औषध. ४ वैद्यश्रेष्ठ. ५ स्व-विरह-ताप-आपल्याविरहरूपसंतापास. ६ देवमार्गास. ७ वनें. ८ रामचंद्राच्याउत्तमभाषणानें ९. अमृत. + सिंचनाहीं.

करिति स्तुति-गीत-मधुर- वाद्य-ध्वनि-दिव्य-पुष्प-वर्षति ८०
**त्वष्टा**- शिव-शतमख-सुर- मुनि रघुपतिच्या-महाभिषेक-मह[१]
अवलोकुनि म्हणति-अधा गात्रांच्या भस्म कां करील न हा ८१
सुर-नर-मंडल-**कुमुद** प्रभु भासे पूर्ण-चंद्र विकेसविता[२]
कीं त्या कमळवनीं हा शोभेचें पिकवि विपुळ पिक सविता ८२
तापविती कुवलेशाय धरितां दुर्धर जसे नसेचि अरी
जें कामादि त्हदय ते **कुवलेशाय** विभु जगांत शांत करी ८३
**गोहित** विप्रहित प्रभु सुरहित सुरमहित सर्व-दास-हित
ज्यासीं कारुण्य तसें नांदे औदार्य सर्वदा सहित ८४
**गोपति** रघुवीर करी प्रेमा सर्व-प्रजांवरि प्राज्य
प्रभुचें ज्यांत न आधि- व्याधि-जरा-मृत्यु-भय असें राज्य ८५
विश्वाचा जो **गोप्ता** तो दे दासांसि रामराज गती
वैकुंठाहुनि अधिका आली सर्वांहि पामरां जगती[६] ८६
**वृषभाक्ष** प्रभु कुंभज- वदनें दशकंठ-जन्म-कर्म-कथा
ऐके मारुतिची ही दाखविता जो स्व-भक्ति-मुक्ति-पथा[७] ८७
सबळ सकंठ बिभीषण पूजी परमादरें पवन-तनया
जैसा **वृषप्रिय** शिवा हा प्रभु म्हणे पुजा असा अवनत नया
**अनिवर्ती** प्रभु देता- झाला पवनात्मजासि वर महित
चिरजीविस्व स्वयशः श्रवण करि असें स्वदास परम-हित ८९
विषय-**निवृत्तात्मा** परि[८] विषयींसा रामराज नासत्य[९]
ज्याचे पायचि देती मोक्ष-सुखहि पामरा जना सत्य ९०
लयसमयीं विश्वाचा **संक्षेप्ता**[१०] देवदेव हा राम
विस्तार सर्गकाळीं करिता श्रित-कल्पभूरुहाराम[११] ९१

---

१ राज्याभिषेकरूपउत्साहास. २ प्रफुल्लकरणारा. ३ पुष्कळ. ४ रक्षक. ५ गरिबांला. ६ पृथ्वी. ७ आपल्या भक्तिरूप मुक्तीच्या मार्गास. ८ विषयांपासून निवृत्त ज्याचा आत्मा ९ न-असत्य-खरें. १० नाशकर्ता. ११ श्रित-कल्प-भूरुह-आराम-आश्रितांची कल्पवृक्षांची बाग.

यातेंचि स्थिति-समयीं म्हणति कवि क्षेमकृत् करी क्रीडा
तारायां विश्व यशें याया अमृता कल्पद्रुमा व्रीडा १२
श्रीराम श्रीराम श्रीराम असें जपे सदाशिव तें
कोणा न रुचे भाग्य स्वीकाराया स्वयें सदा शिव तें १३
स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें

---

## सप्तमस्तोत्ररामायण.

श्रीकांत भक्तवत्सल वरद क्षाळावया यशें दोष
श्रीपूर्व वत्सवक्षा दशरथ-कृत होय दे जगा तोष १
श्रीवास राम झाला कौसल्या-पुत्र धन्य रविवंश
कैकेयी-कृत दुसरा भरत महा-साधु विष्णुचा अंश २
श्रीपतिच सुमित्रा-कृत लक्ष्मण शत्रुघ्न अंश यश ज्यातें
पंक्तिरथें मेळविलें उडवुनि जड-जीव-संशय-शतातें ३
तो श्रीमतांवर नृपति गाधि-सुता याग-रक्षणा आधीं
दे राम लक्ष्मण म्हणे आर्या कार्या अनुग्रहें साधीं ४
श्रीद प्रभु शिष्यपणें अस्त्रें घे ताटका वधी रानीं
श्री त्यजुनि वरिलि ज्याचे ध्यायाला भाट कोव धारानीं ५
सिद्धाश्रम धन्य करी श्रीश जयावरि न कोपला शांत
ते सर्व वधी प्रभु जरि सदय मुनि म्हणे नको पलाशांत ६
स्वमख करुनि जनक-मखा जातां मुनिनें मुकुंद हा नेला
जी ऋषिवधू शिळा त्या उद्धरि तो श्रीनिवास हीनेला ७
श्रीनिधि गुण जोडी हळु ओढी तरि रुद्रचाप तो चुरला
पुर लागे वहु गाया सीतेचा काम बहुदिसां पुरला ८

---

१ श्रेष्ठा. २ नामविशेष-धातु भगवींवस्त्रें वरिलीं असा भाव. ३ पलाश-अंत-राक्षसांचा नाश. + लज्जा. * कल्याणरूप. ॥ श्रीपूर्वीं ज्याच्या असें जें वत्स तें वक्षस्थळीं ज्याच्या म्हणजे श्रीवत्सचिन्ह ज्याच्या वक्षस्थळीं असा.

तो **श्रीविभावन** प्रभु सीतेनें निरुपमादरें वरिला
तरि लाजली पहाया सुख ती श्री भजलि जरि तया हरिला ९

**श्रीधर**-विभुचे भाते जे त्यांसि निघी सुता दिल्या जनकें
कनकें वस्त्रें रत्नें अर्पुनि तें लग्न वर्णिलें सनकें[1] १०

**श्रीकर** होय श्रीकर भृगुरामा कीं मिळे महाशांति
आली पुन्हा स्वधर्मे जी परधर्मे विटे त्यजी कांति ११

**श्रेय** स्वमनीं समजुनि गेला भृगु-राम तप करायातें
सुत-यशचि गोड वाटे जें सुर-मत अमृत सपक[2] कराया तें १२

**श्रीमान्** दशरथ आला साकेताला[3] सुत-स्नुषा-सहित
महि[4] तज्जयें निवाली पौरहि[5] झाले तया मेहीं महित[6] १३

**लोकत्रयाश्रय** प्रभु युवराज करावया पिता पाहे
सुरहृतमति[7] कैकेयी धरि पति सांत्वी तथापि ना पाहे १४

वर घे वनवासातें हा **स्वक्ष[8] स्वंग[9]** राम पुत्र वरू
तापसता मनुवर्षे[10] होउनि युवराज भरत राज्य करू १५

कार्य **शतानंद**-कथित दशमुख-वध तात*सत्य-समवन तें
वरिलें लक्ष्मण-सीता- सहितें पितृमातृचरणसमवनतें[11] १६

कैकेयी वल्कल दे तें नेसे आदरें तिला वंदी
पतिव निघे वनवासा **नंदि**+ प्रभु सत्यधर्म शिव निंदी १७

**ज्योतिर्गणेश्वर** निघे राक्षस-भय-तिमिर-वारणा[12] राजा
स्वरथीं तरि बसुनि म्हणे बा अस्मत्प्राण-तारणारा जा १८

बसवि सुमंत पितृरथीं **विजितात्मा** राम जाय अटवीतें
पुर-जन-वृंद[13] न सोडी जें रात्रीं हळुच निघुनि फटवी तें १९

**अविधेयात्मा** प्रभु तो भेटे भक्ता गुहा निषादास

---

१ सनकऋषीनें. २ स्वादरहित. ३ अयोध्येला. ४ पृथ्वी. ५ नगरवासीलोक. ६ उत्साही. ७ देवांनीं हरण केली आहे बुद्धि जीची अशी. ८ सु-अक्ष- चांगले नेत्र ज्याचे असा. ९ सु-अंग- चांगलें अंग ज्याचें असा. १० चवदा वर्षे. ११ पितृ-मातृ-चरण-सं-अवनत- पितृमातृचरणीं अत्यंत नम्र. १२ राक्षस भयरूप अंधकार दूर करण्याकरितां. १३ नगरवासी लोकांचा समुदाय.
+ शोभा करणारा. * बापाच्या सत्याचें रक्षण.

गुरु सचिवा जाच म्हणे तो सेवी त्या वचा विषादास २०
करुनि जटा गुह-तरिनें उतरुनि गंगा पुसे निषादातें
राहवि तया दयानिधि **सत्कीर्ति** प्रभु हरी विषादातें २१
नमुनि भरद्वाजातें तदनुमतें चित्रकूटनग वसवी
जो **छिन्नसंशय** करी नामेंचि जडा कलीस न गवसवी २२
राजा **उदीर्ण**[1] शोकें मरतां मातुळ-पुरस्थ-भरतातें
आणवितां माय म्हणे घे तुज दिधला स्व-राज्य-भर तातें २३
निंदुनि तिला पित्या जळ देवुनि सत्वर निघे म्हणे रक्षू
प्रभुचि मही पावे त्या- गिरिस वसे ज्यांत **सर्वतश्चक्षू**[2] २४
प्रभुसि नमी जळ देववि ताताते मग म्हणे तया परतें
तूं ईश मी **अनीश**चि नकरि जरिहि देव तो दया-परतें[+] २५
वदला प्रभु निज धर्मा वत्सा चित्तीं विचारुनि पहा या
गुरुवच पाळावें म्या त्वांही यश **शाश्वत स्थिर** रहाया
घे अभय-पादुका[3] ये नंदिग्रामीं वसे प्रजा रक्षी
**भूशय** वल्कजटाधर भरत गुरुव्रत वरी फळें भक्षी २७
रघु-कुळ-**भूषण** भेटे[5] अत्रिस ऋतसा नमूनि तज्जाया[4]
अनुसूया श्रीस उटी दे वनवासीं स्फुरवांत मज्जाया[6] २८
मग भक्त**भूति** भगवान् राम विराधासि उद्धरी निपट
शरदिंदुहूनि[7] धवळा प्रभुचा विश्वास-शुद्ध-रीति-पट २९
भिक्षु विप्र **विशोक** करी राक्षस-भय हरुनि दंडक-वनांत
ऋषिवृंदिं होय जैसा मुनिच्या सद्रसिक थंड कवनांत ३०
तो **शोकनाशन** घटज- दत्त पुराण स्वशास्त्र पूजनिं घे
पितृसख-गृध्र-जटायु- प्रिय करुनि पुढें सबंधु-भूज निघे २१

---

१ उत्पन्न झालेल्या शोकानें. २ सर्वत्र नेत्र ज्याला असा राम. ३ भूमीवर शयन करणारा. ४ नत-जाया-त्या अत्रिऋषीची स्त्री अनसूया ५, चंदनाचा लेप. ६ बुडाया. ७ शरत्-इंदु-शरदृतूंतील चंद्राहून. + माघारां फिरणें

गोदावरी-शुचि-तटीं अर्चिष्मान् प्रभु उरीं तसा राहे
परमर्षीहीं अर्चित पंचवटी-स्थान सत्यसें पाहे ३२
तो अमृतकुंभसा प्रभु उटजीं होता सदार देवा या
ये राक्षसी शुनीसी रावण-भगिनी सजूनि सेवाया ३३
हांसोनि विशुद्धात्मा धाडी ती स्वाऽनुजाकडे नवरी
न वरी तो घ्राण हरी न करूं द्याया दहांत मान वैरी ३४
करिता पापि-विशोधन शुद्ध-यशोधन करांत शोभावा
तो त्या शूर्पणखेच्या भस्म म्हणे संगरांत हो भावा ३५
दौंव अनिरुद्ध तृणांहीं तैसा प्रभु जो रणीं परबळांहीं
मरणार्थ गांठिला तो राम मनुसहस्र-दुर्मति-खळांहीं ३६
अप्रतिरथ-रघु-नायक-हत शूर्पणखा दशानना सांगे
तो मूढ म्हणे हरितों तदसु उगी प्रथम न कथिलें कां गे ३७
प्रद्युम्न जसा रुद्रा श्रीरामा वश करावया माया
कनक-हरिण तो योजी दशमुख सदतिक्रमें लया जाया ३८
कनक-मृग-रूपखेचर सीता पाहोनियां तया धरवी
त्या अमितविक्रम प्रभु वेधा कीं परिचिता तनू बरवी ३९
हा सीते हा लक्ष्मण तो बोले कालवे मनीं सीता
तेणें मिषें निशाचरकृत हाय म्हणे लक्ष्मणा छळी सीता
कटु-वाक्-शर-क्षत-हृदय तो वीरहि धैर्य उटजही सोडी
जोडी श्रीस कर निघे स्त्रीच्या चित्तीं विचारणा थोडी ४१
शौनक-मुख मुनि ज्याच्या चरित-श्रवणीं महासुधी रमले
त्या प्रभुकडेचि गेला श्रीकूक्तें कर्ण तापले श्रमले ४२

---

१ मोकळा. २ चवदा हजार दुर्बुद्धी जे दुष्ट त्यांहीं. ३ ज्याला प्रतिस्पर्धी नाहीं अशा रामानें केलेलें. ४ रावणास. ५ तत्-असु-त्या रामाचे प्राण. ६ सत्-अतिक्रम-साधूंच्या अमर्यादेनें. ७ निमित्त. ८ श्री-कु-उक्त-सीतेच्या दुष्ट बोलण्यानें. + कुत्रीसी. ∴ वर. ॥ वणवा. ÷ मोठे बुद्धिमान्.

तों ती शूरजनेश्वर— दयिता त्या रावणें खळें हरिली
हरि लीलार्थ उपेक्षी श्वानें सिंही तसी जडें धरिली ४३
तों पत्रिपति विलोकी विरथ करुनि अरिस सोडवि सतीतें
काळचि गमे महात्मा दुष्टा त्या तात दीन दिसतीतें ४४
खळ गृध्र-पक्ष तोडुनि हरि त्रिलोकेश-हृदय-वसती तें
लंकेंत अशोकवनीं स्थापी मानी मनींद्व सती तें ४५
लक्ष्मण कथि वृत्त म्हणे लीलामानुषशरीर केशव हो
भूमि म्हणे नावरिला तरि दशमुख यौवता न केश वहा ४६
स्त्री न दिसतां म्हणे प्रभु हा सुंदरि हा सुकेशि हा सतितें
गोदेस ये प्रथम मग शोकाऽतिशयें न येचि हास तितें ४७
स्वैरत हरि स्त्रैणतसा करि नानापरि विलाप वन धुंडी
रडुनि रडवि शार्दूला सिंहा किति खग-मृगांचिया झुंडी ४८
गृध्रातें सावधपण बोलाया राम दे वदे वद या
पुत्र सुगति हो असि करि पुरवुनियां कामदेव देव दया ४९
निज-भक्त-कामपाल प्रभु गति करुनि क्रिया नया दे हें
यश साधूंचीं करि बहु रोमांचित हरुनि भवभया देहें ५०
हा सीते हा सीते वदत फिरे राम जरि न हा कामी
चित्तांत म्हणे तरतिल जड कां न प्रकट करिन हाका मी ५१
श्री-कांत कबंधा दे गति शबरीभाग्य या फळें फळलें
स्वोद्धारार्थ कृताऽगम विभु हें गुरुभक्तिनें जिला कळलें
देव अनिर्देश्यवपु हि नरसा विरह-ज्वरें हरी कंपा
पंपातटीं विलाप प्रकट करी स्मरुनि कांति-जित शंपा ५३
तो लक्ष्मण-प्रबोधित लीलानररूप विष्णु रविजातें

---

१ सिंह· २ पक्ष्यांचाराजाजटायु· ३ हाय· ४ स्व-उद्धार-अर्थ-आपल्याउद्धारार्थ· ५ कांतीनेंजिंकिलीवीजजीणें असी (सीता·) + हे स्त्रीसमूहा· ✶ अशोकवन· ✶✶ आपल्याब्रह्मस्वरूपींरममाण· ‡‡ सुग्रीवातें·

पवनसुतें भेटविला    अतिदुर्लभ म्हणति सर्व कवि ज्यातें ५४
सुगळ श्री-[1]भूषा दे    तत्प्रियसख होय पद्मकर वीर
यत्परराजा कवि म्हणति    विजय[2]श्री-केलि-सद्म-करवीर ५५
स्त्री[3]हर वधेछु वाळी    शक्रसुत अनंत बळ तया मारी
प्रभु त्याची राज्यश्री    दयिता ताराहि दे सख्या तारी ५६
ते पव[4]मान-धनंजय-    तैसे कपि-नर-पति प्रबळ लोकीं
प्रभु परि गुहेंत कंठी    वर्षा[5] बुडवुनि मन प्रियाशोकीं ५७
ज्यातें श्रुति कवि म्हणती    ब्रम्हण्य[6] ब्रम्हकृत[7] सदा शांत
ब्रम्हा[8] ब्रम्ह[9] ब्रम्हवि-[10] वर्धन जो ब्रम्हवित्[11] सभाकांत ५८
जो ब्राम्हण जो ब्रम्ही[12] ब्रम्हज्ञ[13] ब्राम्हणप्रिय स्वामी
विश्वोद्धार[14] कराया    होता विरहार्त गिरि-गुहा-धामीं ५९
सुग्रीवें पाठविले    श्रीच्या अन्वेषणार्थ[15] कपि वीर
त्यांत महाक्रम मारुति    लंघी शत-योजनांबु-निधि धीर ६०
श्रीस अशोकवनीं दे    मुद्रा वन बळ मथी न धरि शंका
सांपडुनि महाकर्मा    धिक्कारी अरिस भस्म करि लंका ६१
फिरुनि महातेजा ये    दे श्री-चूडामणि प्रभुसि वंदी
प्रभु आलिंगन देउनि    वर्णी त्यातें स्वयें जसा बंदी ६२
सबळनिघे प्रभु जेसा    कुपित[16] महोरग[17] बिभीषणा प्रणता
दे राज्य सेतु करवी    कुतुकें[18] देताचि अखिला कणता ६३
लंकेंत रण-महाक्रतु    करि अरि वरि साम न स्ववध मानी
दशवदन स्वीकारी    नर गणिला लोक-नाथ अधमानी ६४
श्रीराम महायज्वा[19]    जें राक्षस सैन्य तें विपुल-सर्पी

---

१ सीतेचे अलंकार. २ विजयलक्ष्मीचें क्रीडास्थानरूप करवीरपुष्प. ३ स्त्री. ४ वायु आणि अग्नि तसे. ५ वर्षऋतु. ६ ब्राम्हणभक्तिमान्. ७ वेदकर्ता. ८ ब्रम्हदेव. ९ परब्रम्ह. १० ब्रम्ह-विवर्धन-वेदवृद्धिकरणारा. ११ ब्रम्हवित्-सभा-कांत-ब्रम्हजाणत्याच्या सभेचा धनी. १२ ज्याच्याठायीं ब्रम्ह रहातें असा. १३ ब्रम्हजाणता. १४ विश्व-उद्धार-विश्वाचा उद्धार. १५ शोधार्थ. १६ रागें भरलेला. १७ महा-उरग-मोठा सर्प. १८ कौतुकें. १९ मोठा यज्ञकर्ता.
+ घालवी.

उग्र-प्रताप-पावक — कुंडीं संतत शरस्रुवें अर्पी ६५.
तो समर **महायज्ञ** प्रभुचा शतमख-मुख त्रिदश गाती
होता लक्ष्मण ऋत्विक् सुग्रीवादिक महर्षि बहु धाती ६६.
ज्यांत घटश्रुति तत्कृत घनरव जे हें **महाहवि** प्राज्य
पूर्णाहुति दशमुख अव- भृथ जें दिधलें बिभीषणा राज्य ६७
दशवदन-निधन-काळीं सुर-मुनिवर-कोटिनीं महा-हर्षे
स्तविला **स्तव्य** प्रभु तो स्वःपुष्पांच्या समर्चिला वर्षे ६८
सांगे **स्तवप्रिय** प्रभु बिभीषणा योग्य होय देहानें
भ्रात्याच्या संस्कारीं बा विधिनें पिंड तोय दे हानें ६९
**स्तोत्र** प्रभुचें करिती या कारुण्येंकरूनि सुर साचें
वात्सल्य हेंचि फळवी रसिका माधुर्य याचि सुरसाचें ७०
**स्तुति** केली शतधृतिनें **स्तोता** प्रभुचा महेश्वर हि झाला
मग त्या बिभीषणाच्या अभिषेकें शोक-पावक विझाला ७१
वदले **रणप्रिय** असा त्रिजगीं भूत न भविष्य यासम हा
पात्र विलोकुनि झाले सीताकृत दिव्य सर्व दास महा ७२
झाला **पूर्ण**-मनोरथ दशरथ भेटोनि नंदना रामा
क्षणमात्रहि न निवाला सुचिरहि सेवूनि नंदनारामा ७३
जो निज-मनोरथांचा **पूरयिता** प्रभु तयासि वर माग
शक्र म्हणे मागे कपि- बळ उठिव असें स्व-भक्त-परमाऽग ७४
**पुण्य**जन रणीं मेले बळ हरि उठवी प्रभु-प्रसादानें
देवद्विजां यशांची अर्पी सुरतरु न दे असा दानें ७५
मग **पुण्यकीर्ति** भगवान् स्व-प्रिय सांगे बिभीषणा बाजें

---

१ बाणरूपस्रुवेनें. २ इंद्रप्रमुख. ३ देव. ४ यजनकर्ते. ५ नृपहोती. ६ कुंभकर्ण. ७ इंद्रजित. ८ पुष्कळ. ९ यज्ञसमाप्तीनंतर जें स्नान करितात तें. १० स्तुती करण्यास योग्य. ११ स्वर्गसंबंधी पुष्पांच्या. १२ उदक. १३ ब्रह्मदेवानें. १४ उत्साहाला. १५ नंदनवना. १६ आपल्या भक्तांचा उत्तमवृक्ष. † पूर्णकर्ता. ‡ इंद्र.

या सबळा सुगळाचें पूजन करिसील सत्य तें मोजें[१] ७८
तेंचि करि बिभीषण दे पुष्पक सुविमान तो करायाला
सानुज भरत अनामय[+] वत्सल-तिलका त्रिलोक-रायाला
सबळ सुकंठ बिभीषण घेउनि सानुज सदार सुख-यान
समधिष्ठूनि[२] मनोजव[३] देव निघे कां गमेल सुख यान
तीर्थंकर वियोगाऽसुख कथि तेणें श्रीस जेविं सुख गानें
पाहों दिलें विमानें सर्व जसें वैनतेय-सुखगानें[४] ७९
वसुरेतासा[५] जो द्विज— पूज्य भरद्वाज सुखविला नमनें
गुह भरतहि पवन-सुतें हर्षविला कथित रघुविरा न मनें ८०
जेविं उदार वसुप्रद[६] करितो भेटोनि धन्य अधनातें
तेविं गुहा भरता प्रभु यांचेंचि समुच्च[७] अन्य अर्ध[८] नानें ८१
नित्य नवसुखप्रद विभु नृप होवुनि विश्व रंजवि आशी
स्वकथा शिवसा आपण जो श्रित-हित-पाद-कंज[९] विप्राशी[⁂] ८२
लवणाहि वधुनि करुनि त्रिभुवन सुखवाड[१०] वासुदेव रहा
सानंद म्हणे स्वयशें निववी सुर वाडवा सुदेवर[११] हा ८३
झाले सुतृप्त रुद्रा— दित्य वसु-प्रमुख सुर न यज्ञानें
श्रीरामें वैकुंठचि केलें साकेत-पुर नय-ज्ञानें[१२] ८४
लुब्ध वसुमना[१३] तैसा भक्त-मना प्रभु बिभीषणा सुगळा
सबळा समलंकारी पाहुनि निववूनि घे स्वदृग्युगुळा[१४] ८५
प्राशी अग्नि कथी जें श्रौत सकळ सुस्त राघवा हवि[१५] तें
होय अवभृथस्नपन[१६] प्राण्यांचें दुस्तराघ[१७] वाहवितें ८६
सद्गति अंतीं आधीं सुख-खनि बरवि प्रजांसि दे बरवी

---

१ माझें. २ आश्रयकरून. ३ मनासारिखा वेग ज्याचा असें ४ विनतापुत्रगरुडानें. ५ द्रव्य ज्याचें रेत अशा अग्नीसारिखा. ६ द्रव्यदेणारा. ७ फार मोठें ८ अर्धे. ९ आश्रितांचें कल्याण करणारें चरणकमल ज्याचें असा. १० सुखरूप. ११ उत्तमदीर (लक्ष्मण) १२ नीतिजाणणाऱ्यानें. १३ द्रव्यावर चित्त ज्याचें असा. १४ स्व- दृक्- युगुल- आपल्या नेत्रद्वयास. १५ होमद्रव्य. १६ यज्ञांतस्नान. १७ दुस्तर- अघ- तरण्यास कठीण असें पाप. + आरोग्यरूप. ⁂ विप्र-आशि- ब्राह्मणांचे आशीर्वाद.

प्रभु करि शूद्र विमानग[1] समजे वर विप्र ज्यासि देव रवी ८७
बहु सत्कृति मारुतिची केली प्रभुनें भले दिले वर हो[2]
वदला स्वयशोमृत पी कपिर चिरंजीव बा इलेवर[3] हो ८८

स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें.

---

## अष्टमस्तोत्ररामायण.

लक्ष्मीपति धर्म-द्विज- सुर-रक्षाया वधावया मत्ता
दशकंठ दशरथ-सुत होय जयाची जगत्त्रयीं सत्ता १
सद्भूति नृप करि हय- मेध दहन[4] दे तयांत पायस या
कौसल्यादि निधी तें प्राशिति पतिचे नमूनि पाय सया २
ये सत्परायण[5] प्रभु त्यांच्या पोटासि चार धरि रूपें
तन्नामें राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न ठेविलीं भूपें ३
दे शूरसेन राजा गाधिसुता यज्ञ-रक्षणा दोघे
मोघेच्छ[6] नकरि अर्थी परमानंदें करूनि ते दोघे ४
मुनि शिष्य लक्ष्मणासह होय श्रीराम नीतिदक्ष पणें
न क्षिय दुर्घट घडवी सर्व-यदुश्रेष्ठ नीति-दक्षपणें ५
जनक-पुरातें जातां श्रीमुनिसह सन्निवास तो भार्या
उद्धरुनि पदाब्ज-रजें दे बहु आनंद गौतमा आर्या ६
सुरमणि-कार्मुक[7] मोडुनि असदद्भुत[8] दाखवि प्रभु जगा या
मुनि जनक निवधि सीता वरि लावी लाख विप्र भुज गाया
भूतावास-प्रभुच्या भ्रात्यांला मानुजें निधी दुहिता
जनकें दिधल्या कौशिक- मुनि-वर-वचनें करूनियां मुदिता ८

---

1 विमानीं बसून जाणारा. 2 अहो. 3 पृथ्वीवर. 4 अग्नि. 5 सत-परायण-सा धूंस आश्रय. 6 निष्फल इच्छा ज्याची असा. 7 सांबाचें धनुष्य. 8 असत्-अद्भुत-असंतांस अद्भुत आश्चर्यकारक.

हर-धनु-भंग-क्रुद्धा भृगुरामा वासुदेव समजाया
दावी तेज तुराया शत्रुत्व द्युमणि जेविं तमें जाया ९
सर्वासुनिलय अनल चि जो क्षत्रिय-दर्प-हा महेश्वर
ज्या द्रुपद दृप्त सदा दुर्धर अपराजित द्विजप्रवर १०
त्या विश्वमूर्ति भगवान् विष्णु महामूर्ति दीप्तमूर्ति यशों
शोभित अमूर्तिमान् प्रभु नररूप अनेकमूर्ति कार्यवशों ११
अव्यक्त हि होतो शत- मूर्ति शतानन असें बरें कळलें
मळलें सुख न परि भवें यजुनि भ्रम चित्त विभुकडे वळलें १२
जो एक प्रभु झाला मायेनें नेक रूप तो विजया
जोडुनि ये साकेतीं पौर म्हणति आयु सुख दिलें निज या १३
उत्पूर्व-सव जगा दे ब्रम्हसुख म्हणुनि ज्या म्हणति कवि क
एकाक्षर किं यत्तत् तिसरें यन्नाम सत्य भा भविक १४
श्रुति म्हणति पद अनुत्तम ज्यातें तो लोकबंधु राम हरी
युवराज करूं पाहे नृप कैकेयी भ्रमोनि विघ्र करी १५
पद भरता वन रामा मनुवर्षे दे म्हणे नृपा अडवी
करि लोकनाथ तत्प्रिय कीं तातीं तत्प्रिया नसो कडुवी १६
सानुज माधव हर्षे कैकेयी-दत्त वल्क नेसून
ताताते नमुनि निघे कौसल्येची वनासि ने सून १७
पायींच भक्तवत्सल जातां राजा न दुःख तें साहे
सूत सुमंत्र तिघांतें राजरथीं राजशासनें वाहे १८
शरद भ्र वर्ण लक्ष्मण सजल-जलद-वर्ण राम तद्दार
ते शुचि सुवर्णवर्ण- व्याकुळ तद्विरह करि पुरा फार १९
ज्या हेमांग वरांग श्रुति म्हणती तो गुहें निषादानें

१ सूर्य. २ अंधकार. ३ उत्पूर्व-सव-उत् हा उपसर्ग पूर्वी ज्याला असा सव म्हणजे उत्सव. ४ कल्याणरूप. ५ तत्-प्रिय-कैकेयीचें प्रिय. ६ कडु. ७ वल्कल. ८ सारथि. ९ राजाच्या आज्ञेनें. १० शरत्-अभ्र-वर्ण-शरत्कालींच्या मेघ सावर्ण ज्याचा असा. ११ तत्-दार-त्या रामाची स्त्री (सीता) १२ हेम-अंग-सुवर्णासारिखें अंग ज्याचें असा. १३ वर-अंग-श्रेष्ठ अंग ज्याचें असा.

वल्की पाहुनि धरिला    ताप धरावा जसा विषैंदानें २०
जो राजकृत दुकूली    सुष्णीषी चंदनांगदी गेहीं
वल्की जटी फलाशी    मिरवी भस्मांऽग-राग तो देहीं २१
सचिव सुमंत्र न सोडी    जरि करि नुति-पाठ **वीर हा** यास
मागें शोकाकुळ-नर —    पतिपाशीं पाठवी रहायास २२
ज्यास सम नसे वास्तव    **विषम** असें नाम तो गुहा मागे
गंगापारीं ने हें    तरुनि भरद्वाज-मुनि-पदीं लागे २३
सर्व-विशेष-रहित या —    करितां ज्या **शून्य** म्हणति तो राम
प्रभु वसवि चित्रकूटीं    बंधुकृतोटज न आठवी धाम २४
निपट विगलिता कृतपुन-    रागमनप्रार्थना म्हणोनि नृप
होय **घृताशी** व्यस्त तो    शापें झाला दयाऽब्धि शांत-रूप २५
मातुळकुळागत भरत    निंदी मातेसि राज्य-पद-लोभें
वातें **अचळ** नसा॰    स्थिति सोडी यश म्हणे तया शोभें
अग्रज-चरणीं प्रेमा    जो **चळ** होवूं नदे॰ि तो भरत
हो भर-तम म्हणे त्या    राज्याचा जो असाधु लोभ-रत २७
नान-क्रिया करि निघे    भरत **अमानी** असें कळे सु-तरी
सजुनि निषादेश्वर-गुह —    बहु-**मानद** होय सुर-नदी उतरी
**मान्य** भरद्वाजाही    झाला तो साधु पूजिला तेणें
लेणें शीलचि कृतें    व्हावें वश या जसें स्वरा गुणें २९
उटजीं **लोक-स्वामी**    जो होता चित्रकूट-सुख-वासी
प्रभु घन तयापुढें तो    चातकसा भरत भक्त मुख-वासी ३०
आधीं **त्रिलोक-धृक्** प्रभु    हाय म्हणे दशरथासि दे तोय
मग अभय-पादुका त्या    भक्तानें स्वस्थ लेश ना होय ३१

---

१ पीतांबरपरिधानकर्ता. २ सु-उष्णीष-चांगलेंपागोटें घालणारा. ३ चंदनयुक्तबाहुभूषणेंजास आहेनअसा. ४ गृहीं. ५, फलें भक्षणकरणारा. ६ बंधु-कृत-उटज- लक्ष्मणानें केलेली पर्णशाला. ७ कृत-पुनरागमन-प्रार्थना-पुनजोरामत्याच्यापरत येण्याची प्रार्थना. ८ टाकिलीदे राज्याशे असा. ९ मातुलकुल-आगत- मावळाजोकु,धाजिनत्याच्या घरगहून आलेला असा. १० चंचल. ११, हरिगानें. + उत्तमनौका. ∗ विष भक्षणाच्यानें.

परते वसे **सुमेधा** नंदिग्रामीं धरी जटा-रीती
प्रभुचीच वन्य[1] सेवी तद्हृदयीं मातृ-मति कटारी ती ३२
हयमेधीं संभवला **मेध्वज**[2] हें म्हणुनि पावला नाम
राम प्रभु तो गिरितें सोडुनि करि पूर्ण अत्रिचा काम ३३
मुनि **धन्य** होय लागे श्रीरामा सत्य-संगरा[3] गाया
अनुसूया प्रेमें दे ज्या वर्णीं[4] श्रीस अंग-रागा या ३४
सदय-वर **सत्यमेधा**[5] राम विराधाहि वधुनि दे सुगती
प्रभुनें भेटोनि सुखें दंडकवासी तपोनिधी सुगती ३५
त्याचें तेल्स **धराधर** शरभंग-सुतीक्ष्ण-घटज-तात-सखा
गृध्राहि निववि तो प्रभु वांछी गोदा-तटीं द्विजाऽरि-मखा[6] ३६
अर्कादिकांवरि करी जो तेजोदृष्टि म्हणुनि ज्यासि कवी
**तेजोवृष** म्हणती तो कुमति-दमन[7] अवरजा[8] निजा शिकवी
शूर्पणखेच्या दंडें तद्भ्राता दुष्ट-धी खर क्षोभे
त्या सवळातें वधितां **द्युतिधर** रघुवीर बहु जयें शोभे ३८
श्रीराम **सर्वशस्त्रभृ-तांवर** विख्यात जो जयें लोकीं
त्या दशमुख कपटें स्त्री हरि मग्न करावया महा-शोकीं[9] ३९
गृध्रेंद्र जटायु तया विरथ करी सून सोडवी जीनें
**विग्रह**-मथनीं त्या श्रीहि वदलि अरिस मोडवी जीनें
भारी **निग्रह** करितां गृध्रेश्वर-पक्ष रावण छेदी
ते सीतेनें तेणें बहु होय जटायु न क्षतें खेदी ४१
लीला-नर-तनु राम श्री-विरहें **व्यग्र** होय याहून
बहुतचि तात-प्रिय-सख गृध्र क्षत-विकळ पतित पाहून
त्याची क्रिया करि तिघे शोधी प्रभु **नैकशृंग**नग गहनें

---

१ अरण्यसंबंधी (फलादिक) २ यज्ञापासूनझालेला किंवा वृद्धिस्थ. ३ सत्य प्रतिज्ञाज्याचीत्याला. ४ चंदनाच्यीउटीला. ५ सत्यबुद्धि. ६ ब्राम्हण शत्रु जेराक्षस त्यांच्यानाशरूप यज्ञास. ७ दुर्बुद्धीजेत्यांलादमविणें. ८ कनिष्ठ-लक्ष्मणास. ९ वृद्ध (जटायु) + शय्या बिछाना. ++ पृथ्वीधरणारा (शेष) ++ अरण्यें.

निववी कबंध शबरी आपण संतप्त जरि विरह- दहनें ४३
लक्ष्मण शोक गदाग्रज परि- सांत्वन- दक्ष गुरुसम स्तवना
झाला पात्र व्यसनीं हाय म्हणत हुडकितां समस्त- वना ४४
देव चतुर्मूर्ति करी पवन-सुनीं रवि-सुतीं दया भारी
मारी वाळीस पळा- माजि चतुर्बाहु तदनुजा तारी ४५
कपिराज्य चतुर्व्यूह प्रभु दे सुगळा करी कृपा मोटी
तोहि श्रीसीतेतें शोधाया पाठवी प्लवग- कोटी ४६
शतयोजन जो मध्यें गोष्पद त्या मारुती करि समुद्रा
मुद्रा चतुर्गति-प्रभु- दयितेतें दे बहु छळी क्षुद्रा ४७
श्री- चूडामणि आणुनि ये चतुरात्मा प्रभु प्रसाद करी
देवांशर्क्षकपिबळें घे शीघ्र निघे वधावयासि अरी ४८
राज्य चतुर्भाव प्रभु लंकेचें दे बिभीषणा प्रणता
सेतु करुनि उतरे जरि म्हणता देताचि सिंधुनें कणता ४९
प्रथमचि सुगळ दशमुखा भंगी मग कपि-बळें परी रोधी
दूत- मुखें साम नया राम चतुर्वेदवित स्वयें बोधी ५०
मारा म्हणे दशानन अंगद तो वालि-पुत्र कुधि चार
खळ वधुनि एकपात् प्रभु- वर्या कळवी सुरांहेद्विचार ५१
सम्यक् भवचक्राचा आवर्तक म्हणुनि जो समावर्त
तो प्रभु म्हणे खळ मरो नमितां म्हणतोचि बहुसमा वर्त ५२
जरि देव निवृत्तात्मा विषयांपासूनि तरि करी युद्ध
कपि-पति करुनि पुढें यश खल-बळ मारूनि मेळवी शुद्ध
घटकर्ण सुत तयाचे घनरव तद्धुमचिव हरि खपवी
मग दुर्जय प्रभु वधी दशकंठा धरि अनंत हरिरव पवी ५४

१ तत्- अनुज- त्या वाळीच्या कनिष्ठ बंधूला ( सुग्रीवाला ) २ चार प्रकारची गती ज्याची असा जो राम त्याच्या स्त्रीतें ( सीतेतें ) ३ देव- अंश- ऋक्ष- कपि- बळ- देवांचे अंशरूप जे अस्वल व वानर त्यांचीं सैन्यें. ४ नम्रा. ५, सुर-हृद्-अविचार- देवांचा द्वेष्टा जो रावण त्याचा अविचार. ६ आचरणारा. ७ बहुतव र्षे. ८ रहा.

सूर्यादि यदाज्ञेतें न अतिक्रमिती म्हणोनि ज्या वेद
दुरतिक्रम म्हणती त्या लंघूं जातां न होय कां खेद ५५
दुर्लभ जय सुलभ करुनि दिधला करुणा-सुधार्णवें हरि
हरिला विश्वाधि वधुनि सर्वामर-विप्र-पीडका अरिला ५६
दुर्गम लंका-दुर्ग त्रिदशांस कपींस होय तें सुगम
गंगेचा नेवि जय- श्रीचा प्रभुच्या पदांबुजीं उगम ५७
दुःखें योगी चित्तीं वसविति म्हणवूनि जो दुरावास
संस्कारवी अग्नि नो हा दुरितानें म्हणे दूरावास ५८
विधिनें दुरारि-हा प्रभु लंकेंत पदीं बिभीषणा स्थापी
या पीनें पुण्य-यशा बैसविलें उत्तमीं पदीं पापी ५९
श्रीनें शुभांग राम प्रभु मग करवूनि दिव्य घे अंकीं
हर्षे देवी नसि जसि उद्धरितां धेनु कष्टली पंकीं ६०
स्नेह तसाचि करि पिता जो प्रथम उडेल तो कसा रंग
मृत-कपि-कटक उठविलें प्रभु-चरित सुगीत लोकसारंग
प्रभु हा सुतंतु सद्गुण- मौक्तिक-मणि-धर-बिभीषणा बरवी
दे कीर्ति सुगळ गद्गळ सत्कृति सांगुनि निज-प्रिया करवी
ऋषि-सत्र-तंतुवर्धन राम प्रभु पुष्पकीं बसे सरमा
द्विजटा कळा स्वपार्श्वीहि जो त्याला स्व-पद-भक्ति दे परमा ६३
घेउनि सुगळ बिभीषण सबळ विमानें निघे जसा तरणी
श्रीस कथि इंद्रकर्मा शत्रु अहोरात्र गणि न सात रणीं ६४
मति शत्रु महाकर्मा शत-मस्तक खंडितां न कोमेला
सुत-सोदर-सचिवांसह साम-सुधा म्हणुनियां नको मेला ६५
सुनकर्मा प्रभु दावी सेतु बिभीषण-समागम-स्थान

---

१ सूर्यादिक. २ यत्-आज्ञा- ज्याच्या आज्ञेनें. ३ उल्लंघिती. ४ इंद्राला. ५ विश्व-आधि-जगाच्या आधीला (मनोव्यथेला) ६ सर्वदेव आणि ब्राह्मण यांला अति पीडा करणाऱ्या. ७ शत्रूला. ८ (रावणाला) ९ पापरूप शत्रूतें. १० दूर ज्याचा वास. ११ शपथ. १२ मांडीवर. १३ चिखलांत. १४ उत्तम गाइलेलें. १५ लोकरूप हरिणानीं. १६ ऋषींचे यज्ञ वाढविणारा. + दुष्ट शत्रूंचा नाश कर्ता. ‡ उत्पत्ति.

मग ऋष्यमूक पंपा येथें केलें म्हणे तुझें ध्यान ६६
तारा घे शबरीनें वर्णी गोदा कृतागम स्वामी
ये मन्वर प्रयागीं वंद्य भरद्वाज-मुनिप्रिया धामीं ६७
वंदुनि मुनितें उद्भव देव करी पवनजा पुढें धाडी
तो कुशळ गुहा भरता कळवुनि आनंद-सागरीं पाडी ६८
शशि-मदन-कोटि-सुंदर भेटोनि गुहा करी प्रथम धन्य
शत्रुघ्न भरत निववी माता गुरु सचिव पौर बहु अन्य ६९
त्या करुणाकर यास्तव भक्तांहीं नाम ठेविलें सुंद
कुंद[1]-प्रभ-रद[3] आणी राजा होवुनि करवें जनीं तुंदे[2] ७०
तो रत्ननाभ पूजी सवळ बिभीषण-सकंठ जे त्यांतें
स्तवुनि म्हणे विश्व तुम्हां रावू दुर्जय-सुरा[4]रिजेत्यातें ७१
त्याज्याकडे सुलोचन करुणामृत-सिंधु राम तो पाहे
राहे त्याचा न भ्रम नित्यनवें सुख बहु प्रजा लाहे ७२
अर्क जसा पद्मांतें कुमुदांतें चंद्र तात तोकातें[5]
लोकांतें हर्ष तसा प्रभु दे सुखोन मोह-शोकातें ७३
वाजसन नाम पावे अन्नार्थि[6] जनासि अन्न दे नेणे
मारुतिस लेववि प्रभु करुन चिरंजीव भक्तिचें लेणें ७४
शृंगी होउनि जो श्रुति[7] उद्धरि तोचि प्रजा नृपाल-पणें
कोणाहि न स्मरों दे ज्याच्या अंबाधिका कृपालपणें ७५
सत्य जयंत त्रिजगीं रघुनाथचि शक्र-तनुज नावांचा
सकळाऽहित[8] मथुनि म्हणे चिर लीला-मनुज-तनु[9] जनां वांचा
तो सर्ववित् प्रभु जयी शत्रुघ्न-भरत-करीं वधवि लवणा
गंधर्व-बळाहि यशों या अमृत विरस[10] न भासलें कवणा ७७

---

१ कुंदपुष्पासारिखे दंत ज्यांचे असा. २ पुष्ट (पुष्कळ) ३ रत्न आहे नाभी ज्याठाई ज्याच्या असा. ४ दुर्जय जे देवशत्रु (राक्षस) त्यांनें जिंकणारे असे. ५ बाळ कांतें. ६ अन्न-अर्थि-जन-अन्न इच्छिणाऱ्या लोकांस. ७ वेद. ८ सकलशत्रु. ९ लीलेनें मनुष्यशरीर धरणारा. १० रसरहित. + नामविशेष मत्स्य.

दुस्तर- भवार्णवातें प्रभु-नाम-सुवर्णबिंदु करितात
हरितात शिव-मनातें रक्षी न असा दयालु जरि तात ७८

स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें.

---

## नवमस्तोत्ररामायण.

श्रीपति सुर-मुनि-कथित श्रवण करि दशास्य-कृतजगत्पीडा
अक्षोभ्य तरि क्षोभे होय नर करावया रण-क्रीडा १
दाशरथि सर्ववागी- श्वरे-श्वर त्रिभुवनाऽवना झाला
या चरिताऽमृत-पानें रसिक ब्रम्हादि सर्वही धाला २
दे दशरथा सुख महो- ह्रद देतो जेविं तोय यादांस
तात तसाचि सकळही अवलोकुनि धन्य होय या दास ३
संसार-महागर्त प्रभुनें सुखरूप बहु बरा केला
कौसल्येला शोभा जी आली ती कधीं न राकेला ४
कौसल्यापुत्र महा- भूत प्रभु नाम राम हें पावे
दोन सुमित्रा-नंदन लक्ष्मण शत्रुघ्न आदरें गावे ५
कैकेयी-पुत्र भरत शील-महानिधि सुरूप हे चवघे
अवघे स्तुत-अमृताची यांच्या चरणावलोकनीं चव घे ६
क्षितिस अपरिमित सुख दे होवुनियां क्षितिपतींद्र-सुत राम
खळ- दलन-सव-समवनें पावे मुनिदत्त कुमुद हें नाम ७
कुंद- कुसुम-शुद्ध सुकृत- फळ यश गौतम-वधूसि दे वरद
पावे सुंदर कुंदर हें नाम प्रभु मुकुंद कुंद-रद ८

---

१ प्रभुजोराम त्याच्यानावांतील उत्तमवर्ण(अक्षरें) तीं. २ बाप. ३ महाडोह.
४ जलजंतूस. ५ संसाररूपमोठा खड्डा. ६ पूर्णचंद्रयुक्त पौर्णिमेला.
७ दुष्टांच्याद मारिण्यानें जें यज्ञरक्षण तेणेंकरून. ८ पृथ्वीला आनंद देणा
रा. ९ कुंदपुष्पासारिखेस्वच्छ.

क्षिति कश्यपासि देतां **कुंद** असें नाम होय तो स्वामी
कौशिकसह जनकाच्या सानुज सत्कार पावला धामीं ९
भक्त-जन-मयूरांचा **पर्जन्य** त्रिपुर-दहन-चापातें
ओढी मोडी जोडी श्री हें यश तुरवि विश्व-तापातें १०
तो विश्व-**पावन** प्रभु वरिला प्रेमेंकरूनि सीतेनें
लक्ष्मणहि ऊर्मिलो जी जनक-सुता त्याहि साधु-गीतेनें ११
कौशिक-**अनिल** प्रेरी जनक-घना पंडिता महोदारा
न म्हणेल भरत शत्रु- घ्नहि कां तैं दतुजसुतेसि हो दारा १२
**अमृतांश** पीतकीर्ति प्रभु भृगु-रामासि दारवी तेजा
झाले पावुनि भस्मचि शूरांचें भूर लारव-वीते ज्या १३
**अमृतवपु** प्रभु वदला त्या हृदयीं शांति भार्गवा राहो
न दिसो दे यक्रोधें सुटला क्षणमात्र मार्ग वारा हो १४
**सर्वज्ञ** गुरु वदे शिव तरि दशरथ भार्गवासि तो भ्याला
सुत-घातें त्या बहु भय धन-नाशें जेविं फार लोभ्याला
हरि ताप **सर्वतोमुख** दावुनि बहु गाइला पुरजनांहीं
कोणाचें अनलंकृत गृह कोठें वाजला मुरज नांहीं १६
दुर्लभहि **सुलभ** झाला जय **सुव्रत** पुत्र राम या कांत
युवराज करूं पाहे करि कैकेयी कुबुद्धि आकांत १७
भरत चतुर्दशवर्षे युवराज असो वनीं वसो राम
ऐसा करी दुराग्रह होउनि **सिद्ध** प्रभु त्यजी धाम १८
जरि **शत्रुजित्** क्षमापति सत्यव्रत परम-संकटीं पडला
रडला तरिहि न वळली शोकें मूर्छित मही-तळीं जडला
जरि **शत्रुतापन** स्त्री- पासुनि अत्यंत पावला ताप

---

१ पृथ्वीदेणारा २ नामविशेषजनकाची कन्या. ३ तनू-अनुज-सुतेसि-जनकाच्याबंधुचेकन्येस. ४ अमृतांश-पीत-कीर्ति-देवांनी प्राशनकेली कीर्तिज्याची असा. ५ अमृतशरीर. ६ यमिष्ट. ७ कल्याण. ८ मृदंग.

परि सत्य-धर्म-रक्षण- कामें रामेंहि सोडिला बाप २०
वसथि सुमंत्र नृपरथीं भेटे सानुज सदार राम गुहा
तो साश्रु न्यग्रोध- द्रुम-पय दे भक्त-काम-कल्परुहा
सानुज रची जटांतें विरहीं रक्षावया पिता धामीं
फिरवी सरथा सूता कांड-[+]फळाचा[*] उदुंबर स्वामी २२
अश्वत्थ यदि म्हणति भक्त तो भेटोनियां भरद्वाजा
करि वास चित्रकूटीं सांगे तो सूत वृत्त हें राजा २३
पुत्राच्या आणूनि ध्यानीं रूपा स्मरांतक ध्येया[1]
शोक-महा भूध्र-[2]भर तनु शत्रुनिषूदन[3] त्यजी गेया[4] २४
शोकाऽग्नि-सहस्त्रार्चि क्षोभे ग्रासावया पुरा दूत
भेषुनि मातुळ-पुर-गत- भरता आणवि महर्षि-पुरुहूत[5] २५
भरत प्रसूति निंदी विधिनें दे सप्तजिव्ह[7] ताताते
करि गमन चित्रकूटीं प्रभुसि कथी राज-देह-पाताते २६
वेदादि म्हणति ज्यातें सप्तेधा सप्तवाहन ज्ञातें
तो जळ पिंड पित्या दे जे मुक्त साधिती यशा या ते २७
जो भक्त अमूर्ति झाला तो सगुण मनुष्य-धर्म साधूनी
जीव यशें नाशायो पावाया पुण्य-शर्म साधूनीं[10] २८
अपकीर्तित्रस्त अनघ भरततयादे स्वपादुका नातें
रक्षायातातान्च्या भूरत्वनयावयादुकानातें २९
दत्ताऽभय भरत फिरे नंदिग्रामीं वसे त्यजी विषया
होय अचिंत्य-प्रभूच्या- विरहीं तापस फळांऽ[11]बुही विषया
भयकृत पलाश-पाना अत्रिस वंदूनि दंडकीं शिरला
वधुनि विराधा झाला मुनि-भय-नाशन तपोवनीं फिरला

---

१ स्मर-अंतक-ध्येय-महादेवानें ध्यानकरण्यासयोग्या. २ शोकरूपमहा पर्वताच्या भारानें. ३ शत्रूचानाशकर्ता. ४ गाण्यासयोग्या ५ महर्षीइंद्र (व सिष्ठ) ६ माता (कैकेयी) ७ अग्नि. ८ संपादून. ९ करव. १० संतानीं. ११ फळआणिउदकाहि. + सारथि * क-अंड-फळ-ब्रम्हांडरूपफळाचा.

ऋषि-भय-गिरिस अणु करी  दे कुंभज-मुनि-वरासि सुख गाथा
भेटे जटायुसि मिळे  यश गरुडासहि न तेंहि खगा या ३२
गोदा-तीरीं साऽनुज  राम बृहत्-कीर्ति-जानकी-युक्त
राहे भोगूं पाहे  शूर्पणखा त्यासि गाति ज्या मुक्त ३३
कृश-मध्य स्थूल-स्तन-  नितंब पृथु-नयन कनकवर्णअसी
कपटें होय हरि निची  नासा लक्ष्मण करांबुजस्थ असी ३४
कुपित जनस्थानाहुनि  खरवर खचर मनुसहस्र जे आले
गुणभृत्-कोदंड-धर-  प्रभु-तेजें व्यस्त रणांत ते झाले ३५
निर्गुण रावण पाहे  भगिनीतें ती न दुर्दशा साहे
मारीचातें वाहे  स्वरथीं सीता हरावया वाहे ३६
व्हाया महान्-कुळक्षय  त्यास बळें हेम-हरिणता धरवी
करवी करुनि विलोकन  मा-पतिला जाति हे म्हणे बरवी ३७
कोणीही अधृत कसा  कनक-हरिण राहिला असा रानीं
यानें धराचि एकें  जें प्रिय बहुनीं न तें अमारानीं ३८
मुदित कराया सर्व  स्वधृत-धनुर्बाण राम हरिणा मी
धरितों म्हणे निघे श्री  नापे मृग-लोभ धरुनि परिणामीं ३९
स्वास्य प्रभु दूर वनीं  जाय शरें त्या निशाचर नाडी
हा सीते हा लक्ष्मण  म्हणुनि श्री-चिन्त तो भ्रमीं पाडी ४०
दशमुख-वध करुनि यशें  प्राग्वंशज भूप गौरवायास
प्रभु वर उपक्रम करी  चुकवाया जीवगौरवायास ४१
रघु-वंशवर्धन-प्रिय-  बंधुसि राक्षसरुतार्तरवभीता
स्वास्थ्यवेना धांव म्हणे  सुर-मुनि-कार्यार्थ ईश्वरी सीता ४२
तो हे मृग कपट म्हणे  तल्लक्षण-भारभृत् खरें तरि ती
त्या गांजुनि मात्रु निघुनि  जाय बळें आहळी असें करितां ४३

---

१ मोठीकीर्तिजीची अशासीतेनेंयुक्त. २ हरिणकरी. ३ चौदाहजार. ४ गतप्राण. ५ धरिल्याशिवाय. ६ आनंदयुक्त. ७ स्व-आस्य-उत्तम मुख ज्याचें असा. ८ पूर्वींवंशामध्येंझालेले. ९ जीव-रौरव-आयास- जीवांचा रौरव संज्ञक नरक संबंधी आयास (श्रम, दुःख) १० राक्षस-रुत-आर्त-रव-भीता- राक्षसानें केलेल्या भयंकर बोलानें भयपावलेली.

परमात्मा एक असा जो श्रुति-कथित प्रभूत्तम तयाची
दयिता हरिलि दशमुखें प्रकटला यद्वध हरि श्रमत याची ४४
गृध्र जटायु मुहूर्त भक्त-दयिता सोडवी रवला मोडी
त्या धन्य म्हणति योगी तो झटला पक्ष शत्रु[१] जो तोडी ४५
पाडुनि गृध्रा सीना नेउनि लंकेंत दुष्ट तो रोधी
योगीश-ध्येय भक्त बहुल करि विलाप काननीं शोधी
गृध्रासि सर्वकामद परमेश्वर सुगति दे वरी सुतता
करुनि क्रिया तयाची सत्कीर्ति त्रिभुवनीं करी सुतता ४७
उद्धरुनि कबंधातें आश्रम बहु धन्य करि मतंगाचा
शबरीस बरी गति दे भक्तवर जो दीप परे-पतंगाचा ४८
पंपातीरीं बैसे करि फार विलाप जड-जन-श्रमण
भ्रमण प्रियार्थ आदरि परि न घडे विरहविपदतिक्रमण ४९
दयिता-विरहीं होय श्रीराम क्षाम या न संपादे
फळ-जल-सेवन स्नापण रम्याहि नवांत ताप पंपा दे ५०
श्रीराम म्हणे असतों सुपर्ण किं वायुवाहन रहातों
पलहि न चकोर चंद्रा मी तेविं प्रियतमा-सुरव पहातों ५१
लक्ष्मण म्हणे धनुर्धर तूं आर्या जाणसी धनुर्वेद
खेद करिसि कां देवा आणसिल करूनि असदुरोभेद ५२
आधीं मारुति भेटे तरणि-तनुज सुगळ कपि सखा झाला
मग द्वंदु करी वाळी शक्रात्मज कीशराज जो त्याला ५३
दे कपि-राज्य दमयिता दुष्टांचा सोदरापरि सखा तो
वानर शोधा धाडी प्रभु क्तसि म्हणे मद तुझा असि रखातो
मारुति मूर्त दम गमे जिंकुनि सुरसेसि सिंहिका मथुनी
जलधि विलंघी श्रीतें मुद्रा दे हर्षवी कुशळ कथुनी ५५

१ कोंडी. २ युक्त. ३ अत्यंतविस्तारपावलेलीं. ४ नामविशेष(ऋषि)त्याचा. ५ शत्रुरूपटोळां चा. ६ जडजेजीवत्यांलाश्रमदेणाराअसा. ७ विरह-विपत्-अतिक्रमण-वियोगरूप विपत्तीचेंउल्लंघन. ८ कृश. ९ असत्-उर-भेद-दुष्टजेराक्षसत्यांच्याहृदयाचाभे द. १० वानराचाराजा. ११ दमविणारा. १२ बंधूसारखा.

नरु मोडी रावण-कृत- अक्ष कटक वधुनि सांपडे जरितें
हित कथि **अपराजित** तो दावी त्रिपुरीं महेश जें करितें ५७.
**सर्वसह** मरुत्कृत ये चूडामणि दे नमी कुशाळ कळवी
पळ वीतें-मान थिकतें करि कृतकवुनि तन्मनोव्यथा पळवी
देयांशोक्षकपिबळें घेउनि सानुज ककंठ जळधीतें
तो जगदेक **नियंता** पावे भिववावयासि खळ-धीतें ५८
अनियम- अयम-**नियम यम** जो तो नमितां बिभीषणा आधीं
दे लंका-राज्य म्हणे बा तूं मद्बंधु कार्य हें साधीं ५९
मग **सत्ववान्** प्रकृ करी वस्त्र समुद्रासि विनविनोयानें
दे अभय सेतु करवी विभु देता शक्तिहि नवि नोयानें ६०
सेतु-पथें पारातें पावे प्रथमचि खळा मधी कगळ
दूत-मुखें **सात्विक** विभु हित सांगे न गिळ हिरकणी उगळ ६१
दूता मारूं पाहे खळ केवळ पशुकचि मान सामानें
देना तें **सत्य**-प्रकृ बदला रे अशक्चि-मानसा मानें ६२
सैन्यासि **सत्य धर्मप-रायण** तो देवदेव युध्याज्ञा
दे कीं समुचित दंड कुंधाशा दंड अयश शक्रा ज्ञा ६३
पूर्ण **अभिप्राय** करी कृरपतिचा करुनि शत्रु-बळ-कदन
मद न उरवि आर्द्र रणीं दशवदनाचें न एकही वदन ६४
सर्व-**प्रियाऽर्ह** भगवान् घनरव-कृत्-कपट-नाग-पाशानें
उडवी पूर्ण करी था अक्षातें जेविं नागपा शीनें ६५.
**अर्ह** स्तुनिसि घटश्रुति होय प्रकृसी करुनियां समर
सम-रय काळासीं हा बदले अमर स्तवूनि यास मर ६६.
उठवुनि सबळा ओष- ध्यगशिखरें शस्त्र-पीडिता देवा
झाला विश्व-**प्रियकृत्** पवनात्मज करुनि आदरें सेवा

---

१ गेली आहे स्मृती ज्याची असा. २ देव-अंश-कृक्ष-कपि-बल- देवांचे अंश जे कृक्ष वानर त्यांचीं सैन्यें. ३ मर्यादारहित आणि योगादिरहित जे त्यांचा दमविणारा. ४ माजें. ५ कोपले त्यासारिख्यास. ६ ज्ञात्यास. ७ ओलें. ८ सर्वांला प्रिय आणि योग्य असा. ९ गरुडा. १० करवें. ११ कुंभकर्ण. १२ ओषधि-अग-शिखर- ओषधि कुक्षजो द्रोणाचल त्याच्या शिखरानें.

लक्ष्मण वधुनि घनरवा होय बहु प्रीतिवर्धन स्वर्गां
स्वर्गायक या गाति प्रेमें अंधक-वधीं जसे भर्गा ६८
शक्रादि विहायसेंगति विभु मुदित करी वधूनि दशतुंडा
तुंडा त्या कवि वदले शालभवि तूं राम-बाण-शिखि-कुंडा ६९
सर्वज्योति सुरुचि धरि हिम मंद सुगंध सुख पवन वाहे
करुनि कुसुम-वृष्टि म्हणति कवि देती चरण मोह न वरवा हे ७०
हुतभुक्-प्रमुख सुरस्तुति करिति भरिति सर्व-कर्ण-नभ-वाद्यें
केलें कवि-मुनि-वृंदें राम-प्रभु-बाहु-वर्णन भवाद्यें ७१
रघुपति दशाननाची सांखूनि विभीषणा क्रिया करवी
क्षीरधि विधुसि शिभ यशा दिव्योत्तर धरुनियां प्रियाकरवी
रविमा बसुनि विमानीं दशरथ ये प्रथम बहु जसें होतें
प्रेम तसेंचि प्रभु-बहु- मत जें होइल उणें कमें होतें ७३
त्यातें नमी विरोचन- कुळ-भूषण देथ तात शिर त्याचें
हुंगी दृढ आलिंगुनि वपु निववी भुज-युगांत शिरल्याचें ७४
रण-मृत ऋक्ष-कपि-बळ त्रिदशेंद्रें जिवविलें अभून-वर्षे
पूजी विभीषण तथा सूर्यसुतासह सु-भूषणें हर्षें ७५
पुष्पक-विमान-रत्नें प्रभु गमला लंघितां नभा सविता
बहु कुळ-गुरु-प्रियार्थचि भासवि रुचि अन्यथा न भासविता
रविलोचन सुरवद प्रभु- सबळ बिभीषण-सुकंठ-सह तूर्ण
भेटोनि भरद्वाजा गुह-भरत-मनोरथा करी पूर्ण ७७
होय अनंत-सुख-प्रद- दर्शन हर्ष न जगांत तो मावे
राजा झाला प्रभु कीं निज-विरहें जन पुन्हा न कोमावे ७८
पूजी सबळा सुगळा लंकेशा बहुत अंजनाभूतें
हुतभुक् सुर मुनि तर्पी प्रभु निववी करुनि रंजना भूतें

१ स्वर्गसंबंधी गाणारे गंधर्व. २ महादेव. ३ आकाशामध्यें गति ज्यांची असे. ४ उत्सव किंवा तेज. ५ अग्निप्रमुख. ६ भव-आद्य- महादेव आदि ज्याला असे (कविवृंदाचें विशेषण) ७ दिव्य-उत्तर- सीता अग्निप्रवेश करून आल्यानंतर. ८ प्रवेश करणाऱ्याचें. ९ सूर्यनेत्र ज्याचा असा. १० अंजनेचा पुत्र जो मारुति त्यानें.

भर्ता **भोक्ता सुखद** प्रभु **नैकज**[१]नौघपापतापहर
भरताचा **अग्रज** या– परि कविनीं वर्णिला वसुप्रहर ८०
नित्य **अनिर्विण्ण**-मना सत्पालक सत्य हा **सदामर्षी**[२]
**लोकाधिष्ठान**[३] परम **अद्भुत** म्हणती असें सुधीमर्षी ८१
कितिक बुध[४] **सनात्सनातन**- नेम **कपिल** असें रघूद्वहा म्हणती
कपि पापांचा **अव्यय** यापरि संस्तविति करिति या प्रणती ८२
स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें

---

## दशमस्तोत्ररामायण.

**स्वस्तिद** श्री[५]-लक्ष्मि-भर्ता दशरथ-सुत होय राम या नावें
तदनुजनि[६]-भरत लक्ष्मण शत्रुघ्न तयां तसेंचि मानावें १
अवतरला रवि-वंशीं देव[७]-नुत **स्वस्तिकृत** प्रभूत्तम हा
प्रथमचि मख संरक्षुनि विश्वामित्रासि दे प्रमुद-महा २
ज्या **स्वस्ति** म्हणति कवि तो गौतम-मुनिची समुद्धरी भार्या
आर्यानंद-कर-प्रभु- चरण-रजें होय विश्व-सत्कार्या ३
तो **स्वस्तिभुक्** प्रभुवर प्रेक्षुनि धन्या करी पुरी मिथिला
तिथिला त्या पुण्य म्हणवि पाडी स्वप्रेक्षक-प्रिया शिथिला ४
विसरे समाधि जनकहि पाहुनियां **स्वस्तिदक्षिण**-प्रभुला
तो याज्ञवल्क्यहि सुले नामारूपासि जो म्हणे न भुला ५
रुद्र-धनु **अरौद्र** प्रभु मोडी पण-पूर्तिच्याचि अवमानीं
वरिता झाली सीता श्री श्रीरामा अनेक-नवमानीं ६
जनकें केला मुकुटीं केयूरीं रत्न-**कुंडलीं** हारीं
कटकीं निष्कीं प्रेमें ध्यानां तो सर्व पाप संहारी ७

---

१ न-एक-जन-ओघ-पाप-ताप-हर–अनेकजनसमुदायाचें पाप आणि ताप यांतें हरण करणारा. २ सदा-अमर्षि- निरंतरक्रोधिष्ट. ३ लोकांचें राहण्याचें स्थान. ४ देव. ५, सुख आणि लक्ष्मि यांचा पति. ६ तत्-अनुजनि–त्या रामाच्या पाठीमागून झालेले. ७ देवांनीं स्तुत.

**चक्री** प्रभु जामाता जैसा केला तसाचि तो भरत
लक्ष्मणही शत्रुघ्नहि जनकें कीं हा सुकीर्ति-लोभ-रत ८

जो **विक्रमी** रहन करि मधु-कैटभ-शत्रु-दर्प तो कांत
श्रीचा त्योंहीं जिंकी ज्या पडले क्षत्रे-गर्भ-तोकांऽत ९

**ऊर्जित-शासन** राम— प्रभु रामा होय धर्म-शांतिद या
प्रभुची तो बहु वर्णी निर्दोषा शक्ति कीर्ति कांति दया १०

**शब्दातिग** महिमा तो प्रभुचा दशरथ-वसिष्ठ-मन-मोही
हुंगिति शिरीं म्हणों दे माया प्रभुची मनींहि न न मोही ११

स्तनि-**शब्दसह** स्त्राऽर्चित दशरथ घेवूनि ये पुरा तनया
साकेत हर्ष पावे प्रभुसम पति नावडे पुरातन या १२

जरि **शिशिर शार्वरीकर** तापहरहि रामभद्र-सम नाहीं
प्रभु-यश जें पौरांच्या स्तविला बहु हाचि मद्रस मनांहीं १३

**अक्रूर** सदा **पेशल** **दक्ष**हि **दक्षिण**हि पौर-मत राम
**क्षमिणांवर** करितां युव- राज स-भरत प्रभु पुरवि काम

**विद्वत्तम** सत्यव्रत दशरथ तद्धर्म-सम वना सिकवी
बंदी करी नि घे प्रभु सेघाया वन्य-सम वनासि कवी १५

राम सदार सलक्ष्मण दशमुख-पीडित अमर्त्य तापस जे
ते **वीत-भय** कराया न हरुनि तातादि-पौर-ताप मजे १६

फिरवि रथ तरे गंगा नमुनि भरद्वाज तीर्थ-शांत-धामी
करि वसति चित्रकूटीं तो **पुण्यश्रवणकीर्तन** स्वामी १७

**उत्तारण**-सुत-विरहें दशरथ नृप शोक-सागरांत बुडे
मग मातुळ-सदनागत भरतहि गत-शोष पौर-धैर्य उडे १८

मातेची **दुष्कृति हा** म्हणवी भरतासि कराचि कुत्सा ही
तातक्रिया करि निघे फिरवाया प्रभुसि साधु-उत्साही १९

**पुण्य**यश भरत-गुहा कळवि भरद्वाजमुनिसही श्रुविना

---

१ परशुरामालाहि. २ क्षत्रियांच्या गर्भांचा नाश. ३ परशुरामा. ४ सुंदर. ५ सहनशील समर्थश्रेष्ठ. ६ गतभय. ७ निंदा. ८ शुद्धपणा. + शब्दाला अगम्य.

देती मार्ग प्रेमें त्या शुद्धा करुनि सत्क्रिया उचिता २०

**दुःस्वप्न-नाशन** प्रभु भरतें पावोनि चित्रकूट-नगा
नमिला पितृ-वृत्तें हा वदला यद्यश करी विशोक जगा २१

मनुवर्षे क्रमुनि वनीं येतो रघुवीर हा असें भावा
सांत्वूनि पादुका दे फिरवी निववी दयारसें भावा २२

**रक्षण** करी प्रजांचें नंदिग्रामीं वसोनि तो धर्मे
चर्मे वल्कें घे फळ भक्षी धरि जीव पादुकाशर्मे २३

अत्रिस नमी विराधा मारुनि विभु सर्व **संत** निवविं वरी
नमुनि तदोशी प्रेमें ज्याचे सद्गुण सदैव शिव विवरी २४

तो विश्वाचा **जीवन** शरभंग- सुतीक्ष्ण- घटज बंधु असे
वहु तापस धन्य करी भक्षुनि फळमूळ तदुटजांत वसे २५

विश्वव्यापक वास्तव ज्या म्हणती **पर्यवस्थित** ज्ञानी
त्या वैष्णव-शस्त्रें दे घटज कराया सुरारिची हानी २६

भेटे **अनंतरूप** प्रभु गृध्रा पितृसरव्या हरी तापा
त्या पावनकीर्ति म्हणे रक्षी सीतेसि या वनी बापा २७

तो सांगे पंचवटी रम्या गोदावरीतटीं आहे
तींत **अनंतश्री** प्रभु तदनुमतें पर्ण-गृह करी राहे २८

**जितमन्यु** प्रभु करवी शूर्पणखा-घ्राण-कर्ण-कर्तन हो
ते लक्ष्मण-कर्म म्हणे सुरराज-सभेंत गान नर्तन हो २९

खपवी **भयाऽपह** प्रभु खर-दूषण-सहित मनु सहस्त्रबळ
कनक-मृग कपट करिहरि वधुनि जटायुसि मही-सुनेमि खळ

**चतुरस्त्र** प्रभु लीला- नररूप स्त्रैणसा वदे हंते
संतप्त होय शोकें गृध्रा दे पिंड कथिति हें संत ३१

तारी कबंध शबरी ज्याचें कुतुकांचि मोह नाम हरी

---

१ योग्या. २ नमस्कारिला. ३ शोकरहित. ४ बंधुला. ५ पादुकारूपसुखानें. ६ मन्-अशी-त्यांचे आशीर्वाद. ७ विस्तारकर्ता. ८ होवो. ९ खेदार्थी अव्यय. १० हरण करी. + दशरथाच्या मरणाच्या वर्तमानें. + त्यांच्या पर्णकुटिकेंत. ※ भावनाकरा.

परम गंभीरात्मा तरि करि नानापरि विलाप राम हरी ३२
विविध फळ विशेषें दे अधिकारि जना म्हणोनि ज्याति कवी
**विदिश** म्हणति तो मारुति- हृदय-क्षेत्रीं महत्करवा पिकवी ३३
शक्रादिकांसि विविधा आज्ञा करितो म्हणोनि ज्या वदतो
व्यास **व्यादिश** रविजा झगडा दे वधुनि हरि-कृता परतो
श्रुतिरूपें कर्माचें फळ दे **दिश** हें म्हणोनि ज्या नाम
राम प्रभु तो होउनि मित्र पुरवि भानु-सूनुचा काम ३५
विरहा-खिन्न-**अनादि**- प्रभु-दयितेतें भजोनि तो धोया
यन्माता **भू** तीतें धाडी मैन्यें झकंठ शोधाया ३६
लंकेंत **कपोलक्ष्मी**- प्रभु-दयिता कथि जटायुचा बंधु
मारुतिनें शतयोजन मकरालय लंघिला जसा अंधु ३७
मैनाकाऽचळ करसा ठकवूनि **कवीर** सिंहिका दुष्टा
मारी प्रभुची मुद्रा देवुनि करि जनक-नंदिनी तुष्टा ३८
सवळा अक्षा मारी कुंठित करि दशमुखा पुरी जाळी
**रुचिरांगद** प्रभु निघे ऐसें करि मारुती विजयशाळी ३९
विधि-**जनन** जयापासुनि तोऽ**जनजन्मादि** देव मारुतिचें
यश करि भेटुनि की दे प्रेम शिरोमणि-मिषें सुचारु तिचें ४०
सानुज सकंठ निघे प्रभु खल-दलना रवें गगन भरिती
ते **भीम** ऋक्ष वानर **भीमपराक्रम** करीं नगचि धरिती
अपमानिला दशानन- गुरुनें सागर- तटीं शरण आला
त्याला **आधारनिलय** लक्ष्मीचा राज्य अर्पिता झाला ४२
जलनिधि काम प्रभुचा जग रचिता न उतरे कसा **धाता**
जरि शोषिना करविना सेतु न तरि हर यशें कसा धाता ४३
उतरुनि पारीं करिती भक्षुनि बहु कफळ-**पुष्पहास** हरी

१ इंद्रपुत्राला (वाळीस) २ तृप्तव्हाया ३ पृथ्वीच्याठायींलक्ष्मीसारिखीअसि. ४ शंभरयोजनें असा. ५ मकर- आलय-समुद्र. ६ विहीर आंड. ७ अत्यंत. सुंदर असें. ८ शब्दें. ९ कसोटीस. १० तृप्तहोता. ॐ गंभीरज्याचा आत्मा असा. + ब्रम्हदेवाची उत्पत्ती. ‡ संपाति.

प्रथमचि दशवदनाचा मद-गद सुग्रीव राम-दास हरी[1] ४४
विश्वोवनीं[2] **प्रजागर**[3] अतिकरुण महाविभूतिचा भर्ता
सामार्थ अंगदातें प्रेषी सद्धर्मनीतिचा कर्ता ४५
तें **उर्ध्वग** प्रभुवचन न करी वर-मत्त पंक्तिकंधर[4] तो
राम म्हणे खळ मारा राज्यश्रीसीं न संपदंध[5] रतो ४६
साम करावें म्हणतां झाली जी ती कथी कथा चारें[6]
त्या दुष्टाचारातें भंगी श्रीराम **सत्पथाचार** ४७
साधु-**प्राणद** राम प्रभु दुष्टांचे रणीं हरी प्राण
बाण प्रभुचा पवि[7] गुरु काय करिल त्यापुढें तनुत्राण[8] ४८
जो **प्रणव**[9] वाच्य यातें घनरव करि नाग-पाश-बद्ध रणीं
दुर्लभ यश ये गरुडा प्रभु-नर-लीलेंकरूनि नद्धरणीं[10] ४९
जनकाचा **पण** पुरवी हर-धनु भंगी तयापुढें कोय
किति दृढ घटकर्णाचा म्हणेल गिरि अशनि नें कुढें काय ५०
वधितां घटकर्ण गमे सर्व बिभीषण-वच **प्रमाण** तरी
न करी साम[12] त्रमला पापें शापें मदें गतायु अरी ५१
होय ससैन्य-प्रभुचा घननाद **प्राणनिलय** भासविना
प्रभु मारुति-सदुपायें धरि जैसा राहु-मुक्त भा[13] सविता ५२
स्तवुनि सुर सकळ वदले त्या विश्व-**प्राण-भृत्**-पवन-तनया
औषध्यगशिखरधरा[14] झाले मुनि कोण हो अवनत न या ५३
दे **प्राणजीवन** प्रभु यश मारुतितें अनंत भय अरितें
कपिचक्रें खळ खपवी जो धरि जोडावयासि जय अरितें ५४
**तत्वज्ञ** जसा मोहा रामानुज घनरवा तसा रगडी
अनुकूळ प्रभु त्याला हा दहनाला जेविं वातमार्ग गडी ५५
बहु **तत्ववित्** सुरर्षि व्याकुळ झाले दशास्य-शक्तीनें

---

१ हरणकरी. २ विश्व-भवन- जगाच्यारक्षणाविषयीं. ३ जागृत. ४ दशग्रीव (रावण) ५. संपत्-अंध -द्रव्यानें आंधळा. ६ दूत. ७ वज्र. ८ शरीराचेंरक्षण. ९ ओंकारशब्दवाच्य (ओंकारस्वरूप) १० नत्-हरण-या नागपाशाच्या हरणस मर्थानें ११ शरीर. १२ संधि. १३ कांति १४ औषधि-अग-शिखर- धर-औषधीयुक्तपर्वताचें शिखर धरणारा.

लक्ष्मण मूर्छित पडतां मारुनि उठवी तयासि भक्तीनें ५९
एकात्मा प्रभु हर्षे शक्रर्थी बसुनि तुमुळ युद्ध करी
सप्त-अहोरात्र भटे श्री[2]म्हे[2] व्यक्त होय तो दशास्य अरी ५
जो देव जन्म-मृत्यु-ज-रा:तिग[*] आपण असेचि दास करी
तो पूजिला सुरांनी पुष्प-स्तुति-वृष्टि करुनि राम हरी ५
करुणाब्धि भूर्भुवस्व-स्तरु राम दशानन-क्रिया करवी
तार[+] प्रभु-वर विधिनें राज्य-पद-स्थिति बिभीषणा बरवी ५
धन्य करी दास पिता विश्वाचा प्राण-पद्म-वन-सविता
धरि पाप-शोक-पर्वत- भेदीं प्रभुच्या प्रताप हा पविता ६
प्रपितामह राम प्रभु दिव्य करवुनि क्ष्मासुतेसि वरी
प्रभुच्या प्रियार्थ उठवी रण-मृत कपि अमृत-वृष्टि करुनि हरी
होतां समाप्त राक्षस- यज्ञ प्रभुला महेंद्रसरव जनक
भेटे वंदी सगुण- ब्रह्म तया स्तविति स- हर- विधि- सनक ६
सबळा सुगळा पूजी भक्त बिभीषण तयासि यज्ञपती
घे पुष्पकीं बसे ये स्वपुरा दुतकीं बहु प्रजा जपती ६३
सुदिन करि भरद्वाजा त्याहि गुहा सा:नुजा नता भरता
राजा होवुनि यज्वा होय प्रभु दाखवी जगीं नरता ६४
यज्ञांग यज्ञवाहन जो भगवान यज्ञभृत सदा सुर
तो होय यज्ञकृत् सुर- भूसुर- कवि- कोटि- तर्पणीं युक्त ध
यज्ञी संतत दीक्षित झाला तो यज्ञभुक् प्रभु प्रेमें
जो मुख्य यज्ञ-साधन वांटी यज्ञांतकृत् स-मणि हेमें
जरि यज्ञगुह्य आपण सर्वात्मा देव अन्न अन्नाद
जनें[11]संग्रहार्थ ऐसे करि विस्तारी स्व-कीर्ति-सन्नाद[12] ६७
दे आत्मयोनि भगवान रंजवुनि यशें प्रजांसि सुख भारी

---

१ दारुण. २ ब्रह्मास्त्रें. ३ गतप्राण. ४ वज्रत्व. ५ पृथ्वीचीकन्याजीसी तानिला. ६ इंद्र. ७ शीघ्र. ८ मनुष्यत्व. ९ निरंतर. १० रत्नासहवर्तमान सुवर्णें. ११ लोकसंग्रहार्थ. १२ आपल्याकीर्तीचाउत्तमनाद. + अतिउच्चकिंवाश्रेष्ठ. * जन्ममृत्यूजरायांहींरहित. + अतिशय.

श्रीरामाचा महिमा झाला कामादिशत्रुसुखभारी ६८
पूजी बिभीषणानें बहु सगळानें भक्त **स्वयंजात**[१]
पवन-सुतीं श्रीराम प्रेम करी बहु सुतीं जसें तात ६९
क्षितितें खणुनि विशेषें दैत्य हिरण्याक्ष जो तया मारी
[२]किटिरूपें वास्तव हा **वैरवान** भक्त यशें जगा तारी ७०
हा **सामगायन** भक्त लोकार्थ महाविभूतिस त्यागी
लवणादि दुष्ट मारुनि करिता झाला जगांत सत्यागीं ७१
[५]हो पृश्नि-देवहुती- कौसल्या-**देवकी**-सती जाया
**नंदन**[६] होउनि सुखवी भक्त चरित करी तरावया गाथा ७२
हा **स्रष्टा** विश्वाचा हा पालक बहु दयाई[७] हा हर्ता
वर्ता म्हणे तराया जैसा मी वर्ततों रमा-भर्ता ७३
राम **क्षितीश** जिववी मृत-मुनि-सुत- जन असा रमे यम न
राष्ट्राकडे विलोकी भक्त तापों दे न सारमेय[८]-मन ७४
तो **पापनाशन** भक्त चवघांचे आठ सुत करी राजे
जपती धर्मन्याया राष्ट्रा बहुत न निजा शरीरा जे ७५
सुख **शंखभृत** प्रभूत्तम दे रुद्र[९]-सहस्र-वत्सर प्राज्य[१०]
राज्य प्रेमें करि तो सुचिर[११] वसिष्ठर्षिचा असे याज्य[+] ७६
वाल्मीकि-कृति-स्वकथा केवळ कल्याणराशि कुशलवती
सप्रेम **नंदकी**[१२] भक्त ऐके गाती सुपुत्र कुश लव ती ७७
**चक्री** भक्त दिव्य करी श्रीस म्हणे मान्य करुनि पुनरपि ती
शिरली महींत देवी हें यश होऊनि साश्रु सुनर पिती ७८
तो देव **शार्ङ्गधन्वा** भक्तवर निज-सत्य[१३]-संधता-त्राणा
आज्ञा-लंघन घडतां त्यागी अनुजा बहिश्चर-प्राणा ७९

---

१ स्वयमेव झालेला. २ वराहरूपानें ३ खरी. ४ वाणी. ५ राम. ६ उत्पन्नकर्ता. ७ दया-आई- दयेनें ओला. ८ कुत्र्याचें मन. ९ अकरा हजार वर्षें. १० पुष्कळ ११ बहुकाळ. १२ नंदकसंज्ञक खड्ग धरणारा. १३ आपल्या सत्य प्रतिज्ञेच्या रक्षणार्थ. + यजमान.

मग देव **गदाधर** घे शत्रुघ्न-भरत-कपिकंठ-सह सैन्य
सर्व प्रजा विमानीं बसवी त्यांचें न पाहवे दैन्य ८०
शरयू-स्नानें देउनि सर्वांतें दिव्यरूप वर-लोकीं
वत्सळ **रथांगपाणि** स्थापी स्वाश्रित बुडों न दे शोकीं
**अक्षोभ्य** प्रभु राम प्रकटी अत्यद्भुता चरित्रास
जें सेवंगि त्यांचा श्रोत्यांचा सर्वही हरि त्रास ८२
वदला म्हणतां सर्वा संरक्षीनचि बुधाबुध स्वामी
भक्त-मयूर-दया-घन हा **सर्वप्रहरणायुध** स्वामी ८३

स्तोत्ररामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें.



समाप्त.

उत्सव चरितें द्याया निर्जर-गो-ब्राम्हणास विश्वास
मायानर हरि होय स्वपदीं स्थापावयास विश्राम[1] १
उत्पन्न होय दशरथ-सदनीं अतिरम्य देह चार धरी
माता तिघी जगद्गुरु धन्या होऊनि सुगुण पुत्र करी २
उत्तमतम राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न हीं धरी नावें
मावें सुख नमनीं अघ ज्याच्या श्रवणींहि तत्क्षणीं जावें ३
उर्वीपतिला[+] कौशिक मुनिवर भेटे सलक्षणा रामा
मागे मखाऽवना[++]दे दशरथ करि पूर्ण साधुच्या कामा ४
उपदेशी गाधिसुत क्षुत्तृड्बाधा[2] शमावया रामा
मार्गीं बला अतिबला गात अस्त्रें साऽनुजा रमा-धामा ५
उग्राकारा चंडी दुर्वृत्ता ताटका वनीं रामें
मार असें मुनि वदतां गुरुवचनें मारिली घनश्यामें ६
उद्दाम निशाचर-बळ आलें सिद्धाश्रमांत तें सर्व
मारी मख-सिद्धि करी प्रसन्न बहु होय मुनि तसा शर्व[+++] ७
उद्धरुनि अहल्येतें जाउनि मिथिलेसि मुनिवरसहित
मानुषरूप प्रभुवर मोडी जें रुद्र-धनु जगन्महित ८
उज्ज्वळ-गुणा[+] क्षिति-सुता होतां पण पूर्ण हर्षली आली
माळा प्रभुच्या कंठीं प्रेमें पूर्वी जशी तशी घाली ९
उचित कुशिक-सुत सांगे जनका व्हाया जगत्त्रयीं धन्या
मान्या द्याव्या रामाऽवरजां पूजुनि तिघी कन्या १०
उपयम[3] नृप करि विधिनें कन्या-वधू जनांसि दे चवथी
माहात्म्य-प्रोत्साहित[4] अर्पी संपत्ति आपुली अवघी ११
उग्र-प्रभुचा शिष्य क्रोधें गांठी पथांत देवास

---

१ जराम. २ क्षुत्-तृट्-बाधा-क्षुधातृषांची पीडा. ३ विवाह. ४ महत्वानें उत्साह पावलेला. ५ महादेवाचा. ६ परशुराम. + पृथ्वीपतीला जो दशरथ त्याला. ++ यज्ञरक्षणार्थ. + स्वच्छ गुण ज्यांचे अशी. +++ शिव.

मारूं पाहे जो त्या स्व-पदीं सावध करूनि दे वास १२
उरु-मोह-मग्न दशरथ सुत-विजयें सावधान होय महें[१]
मानुनि पुनर्भव[२] म्हणे साध्वस[३] देईल काय हो यम हें १३
उदयें पति-विजयाच्या साकेतें[+] स्वर्गही उणा केला
मातुळ भरत रिपुघ्न प्रेमें घेउनि निजालया गेला १४
उपरत[४] नृप धरि इच्छा युवराज वरात्मजा करायाची
मानवती कैकेयी लोभें पूर्वी दिल्या वरा याची १५
उत्सृष्ट[⁂]-भोग वल्की[५] राम वनीं निरत अब्द चवदा हो
माझा सुत राज्य करू व्हा सत्य अवश्य-शब्दच वदा हो १६
उद्विग्न-चित्त दशरथ हाय म्हणे सत्य सुतहि या इष्ट
मानुनि दिष्ट[६] सुदुस्तर धीरहि बहु विकळ होय नोशिष्ट
उत्साहें राम निघे गुरुचा गुरु-धर्म जो नद वनातें
मानी वैकुंठाचा नांदोनि करावया पद वनातें १८
उच्चल स-दाराऽनुज भगवान् दे चित्रकूट शैलास
मानी परम प्रिय सख वसतां जगदीश यास कैलास १९
उत्क्रमण प्राणाचें राजाच्या राम होय सुत-शोकें
मालिन्य पुरें राष्ट्रें वरिलें केवळ न याचिया ओकें[७] २०
उत्कृष्ट-वेग दूत प्रेषुनि भरतासि सचिव आणविती
माता येतांचि तया राज्य-श्री-प्राप्ति-युक्ति जाणविती २१
उद्वृत्ते निर्लज्जे ऐसें नीतें म्हणे बहु क्षोभे
मानिति बहु साधु तया शत्रु-गुरु-प्रेम-सद्गुणें शोभे २२
उठला जननीपासुनि कौसल्येच्या गळां भरत पडला
मानस शुचि समजुनि ती समजावी शिशु तसाचि बहु रडला
उत्तर-कार्य पित्याचें करूनि यथाविधि न राज्य करि सोडी

---

१ तेजानें. २ पुनर्जन्म. ३ भय. ४ संसाराला कंटाळलेल्या. ५ वल्कलें धारण करणारा. ६ दैव. ७ स्थानें. ⁂ टाकिले भोगण्याचें असा. + अयोध्येनें.

मातेचें गुरुचेंहीं वचन प्रभु-भक्त भरत तो मोडी २४
उत्कंठित-चित्त निघे गुरु-जननी-सचिव-पौर-बल्सहित,
मार्ग न दे प्रभु-सख गुह मानी भरता निषादपति अहित२५
उतरी मग तो सुतरी देउनि गंगेंत समजतां भक्त
मासा भरत ह्रद विभु राम भरद्वाज समजला व्यक्त २६
उशनासा गुरुसा मुनि सुविचक्षण मग निरोप दे पावे
मापतिस चित्रकूटीं ब्रह्मांडीं या सुखें न तो मावे २७.
उदकें पिंडें आर्धी प्रभु ताता दशरथा स्वयें तर्पी
माथां हुंगुनि सांत्वुनि भरता पद-पूत पादुका अर्पी२८
उन्नतहृदय परतें स्वपुराबाहेर भरत तो राहे
मानस शरीर नियमी वर्न्याऽशी उष्ण वृष्टि हिम साहे२९
उडुपति जसा चकोरा बहु निववी अखिला तसा राम
माहेरचि अनुसूया भासवि सीतेसि आपुलें धाम ३०
उद्धार विराधाचा करि शरभंगा मुनीस दे सुगती
माधुर्यें प्रभुच्या मुनि- वर्य सुतीक्ष्णादि बहु सुखें कुरती३१
उदधि प्राशी जो त्यां भेटे शरचें मुनींद्र दे तो या
मानी जटायुनें गुरु तत्सूक्ता तेधि तृप्ति घे तोया ३२
उटजीं गोदातीरीं पंचवटीमाजि राहिला राम
मायारूपवती तों शूर्पणखा वरुनि दे मनीं काम ३३
उशिर न सौमित्रि करी तत्कर्णघ्राण सदसिनें कापी
माराया तद्भ्राता खर ये सकटकहि तो मरे पापी ३४
उच्छेद जनस्थान- स्थित-सैन्याचा दशास्य तो परिसे
मानी दाशरथि प्रभु विश्व-प्रिय परम सदयही अरिसें३५

---

१ शत्रु. २ सु-तरी-उत्तमनौका. ३ शकला. ४ लक्ष्मीपतीस. ५ तृमकरीध्यायानंतर. ७ उन्नत-हृदय-अत्यंत उन्नत हृदय ज्याचें. ८ अरण्यांतील कंदमूलादि भक्षिणारा. ९ समुद्र १० अगस्त्यमुनींना. ११ तत्-सु-उक्त-त्याच्या उत्तम भाषणाला. १२ उदकाला. १३ पर्णशालेंत १४ तत्-कर्ण-घ्राण तिचे नाक कान. १५ सत्-असि-उत्तम खड्गानें. + गृह. + चंद्र.

उच्छृंखल खल माया- कनक-हरिण करुनि आग्रहें धाडी
मारीचातें सीता- देवीच्या दृष्टिला वनीं पाडी ३६
उत्तमरूप मृग धरीं ऐसें प्रार्थी प्रिया निघे राम
मागें लक्ष्मण ठेवी सीता-संरक्षणा घनश्याम ३७
उरवाया निजजीविन कपटमृग पळे वनांत दूर वर
मारी शर तन्मर्मी चिंतुनि सुर-कार्य सर्व शूर-वर ३८
उच्चस्वरें म्हणे हा सीते हा लक्ष्मणा असें खोटा
मानीं त्या हाकेला ऐकुनियां घात जानकी मोटा ३९
उद्धैर्या सौमित्रिस धांव म्हणे जानकी वदे तो हें
मायामृग वदला न प्रभु तव मन देवि चळ नसो मोहें ४०
उलटें समजे सीता अति कटु वचनें तयास आयकवी
मानी बहु दुःख निघे ठेउनि उटजा म्हणोनि हाय कवी ४१
उदिताश्रु मुनिव्यासुत जाय प्रभुला स्वदुःख कळवाया
मागें तों दशमुख ये नकरी श्रीतें विलंब पळवाया ४२
उडवी रथ खळ गगनीं श्री निज-पति-देवर-श्वशुर-नामें
मारी हाका धांवे गृध्रेंद्र जटायु दुष्ट-वध-कामें ४३
उरवी न रथ बळ धृति क्षत विकळ दशाननासि करि तोंडीं
मान भुज श्मश्रु कच भ्रमुनि खळ श्रीस घावरे सोडी ४४
उतरुनि महिवरि सीता खळ खड्गें गृध्र-पक्षति छेदी
मान-धन जटायु वधू नेतां अत्यंत जाहला खेदी ४५
उत्तरपटीं अलंकृति बांधुनि कपि-पंचकीं सती सोडी
मारुतसा ने श्रीतें लंकेत स्वकुल-हानिते जोडी ४६
उष्णांशुकुळवतंसा लक्ष्मण सीतान्क काननीं सांगे
मागें धांवे बोले हा वदलिस सुमुखि कटु असें कां गे ४७

---

१ उत-धैर्य-गळे धैर्य ज्याचें असा. २ उदित-अश्रु-उत्पन्न झाले नेत्रोदक ज्याला असा. ३ जटायूच्या पंखांचीं मुळें ४ उत्तरीयवस्त्रीं (आंगवस्त्रीं.) ५ दागिने. ६ उष्ण-अंशु-कुल-अवतंस- सूर्यकुळामध्यें तुऱ्यासारख्या रामाला.

उद्वस[1] उटज[2] पहातां जगदीश स्त्रैणसा[3] म्हणे हाय
मानुषभावचि दावी वनधुंडित पितृसखाकडे जाय ४८
उदकें स्व-वल्कलांचल—वातें[4] सावध करी तया वदवी
मागिल सोडी प्रभु तो गुरु-शोकाची धरी नवी पदवी ४९
उन्मत्तें दशवदनें सीता नेली असें कथी लक्षी
मा-सर्वस्व-सुखातें[5] अंकीं प्रभुच्या तनु त्यजी पक्षी ५०
उत्संगीं[6] शिर ठेवी प्रभुच्या वदनीं असें जया मरण
मान्य दशरथाहुनि हा याचें गति-हेतु शेवटीं स्मरण ५१
उत्तरकार्य खगाचें करि दाह श्राद्ध मुक्तिचा दाता
मागावें या प्रभुला याचें यश सर्वही तरे गाता ५२
उद्धरुनि कबंधातें शबरीतें मग मुकुंद गति दे हा
मानी इच्छ्या विमानीं पाहुनि अत्यंत रम्य रवि देहा ५३
उत्फुल्ल-सरोज-वना[*] हंस-मधुव्रत-निनादिता पंपा
मार-विकार[7] प्रकटुनि विरहीं प्रभुच्या मनासि दे कंपा ५४
उत्कंठित कामीसा स्मरुनि श्रीतें विलाप राम करी
मात्सर्य[8] श्रीचें श्री पंपेची काय ती मनांत धरी ५५
उर्वी प्रभुला सांगुनि लक्ष्मण दे धैर्य संगरीं अरिला
मारूं चाल सुकंठा भेटों आर्या मनांत जो धरिला ५६
उमगाया सुगळानें जातां तेणेंहि धाडिला शोध
मारुति नियोनि निववी भेटवुनि प्रभु इनात्मजा[9] योध ५७
उष्णकरसुत प्रभुसीं मैत्री करि धन्य रवि तया भावी
माणिक्यादिमणिमय श्रीचे नग सोत्तरीय-पट दावी ५८

१ ओस. २ पर्णशाला. ३ स्त्रीलंपटसा ४ आपल्या वल्कलाच्या पदराच्या वाऱ्यानें. ५ लक्ष्मीचें सर्वस्व अशा सुखातें. ६ मांडीवर. ७ मदनविकार. ८ मत्सरत्व. ९ इन-आत्मज-सूर्यपुत्र सुग्रीवाला. * प्रफुल्ल आहेत कमलवनें जीच्या ठाईं.

उत्कलिका प्रभुची तो दूर कराया स्वयें करि पणातें
मारी प्रभु शक्रसुता जो धरि भक्ताऽनुजा अरिपणातें ५९
उपकार करि सख्यावरि देउनि कपि-राज्य दाशरथि भारी
माहेंद्रिं मधुनि स्वगळा नेंक्र वधुनि करिवरा तसें तारी ६०
उत्तराई व्हाया कपि धाडी श्रीचा करावया शोध
मारुतिस करी संपा- त्युक्तें विधिपुत्र जांबवान् बोध ६१
उसळे गगनपथें घे न विसावा उपर्गतोंहि मैनाकीं
मारी स्वरसेसि मुखीं शिरुनि निघे हर्ष होय तें नाकीं ६२
उदरांत सिंहिकेच्या शिरुनि तिला वधुनि सिंधु शतगावें
मारुत-सुत गोष्पद करि हें यश होऊनि यासि नत गावें ६३
उतरी लीला-लेशें आधीं लंकाऽधिदेवता-गर्व
मार्जारसा मरुत्सुत धुंडाळी पुर दशास्य- गृह सर्व ६४
उपवन अशोक-नामक जें त्यांत श्रीस पुण्यवान् पाहे
माकंदीं पिकसा तो प्रमुदित कपि शिंशपा-नगीं पाहे ६५
उतळो वीर्य शत्रीं श्रीतें प्रार्थावया कुधी आला
मातेला मन्महिषी हो ऐसें मूढ बोलता झाला ६६
उन्मार्गगा नचा ती धिक्कारी श्री म्हणे बरोका मी
मान-धन-सुता-भार्या बुडवि धन-कुळा कलेवरा कामी ६७
उरग-मद मयूरीनें श्रीनें खळ-मद तसा लया नेला
मापारा विगत-प्रभ होउनि दशकंठ तो कुधी गेला ६८
उदयाचल-तिलक-कुळा वर्णुनि दे जानकी-करीं मुद्रा
मारुति गमे प्रभु-विशिख देवीस न ती गणी परा क्षुद्रा ६९

१ उत्कंठा. २ स्वसर. ३ संपाति— उक्त— जटायूच्या वडील बंधूच्या भाषणानें. ४ श्राम झालेल्या असताहि. ५ मैनाक पर्वतीं. ६ आम्रवृक्षीं. ७ कोकिलसा. ८ शिसवाच्या वृक्षाखालीं. ९ माजला. १० मत्- महिषी- माझी स्त्री. ११ उत्-मार्ग-ग- आड मार्गानें जाणाऱ्या. १२ हेनीचा.

उचित कथुनि संदेश[1] श्री चूडामणि निरोप दे कपिला[2]
मानवुनि महत्-कृत्या आशी[3]ही होय जी महाकपिला[4] ७०
उपडी अशोक-वन-गत बहु पुष्पित फलित तरु लता भारी
मारी रक्षक राक्षस- बळ अक्ष-कुमार[5]ही रणीं मारी ७१
उध्दत घननाद बळें- क्षय होतां ब्रम्ह[6] यो जिता झाला
मानद कुतुकी+ कपि तो गांजाया अरिस सांपडे त्याला ७२
उन्मत्त निशाचर तो बांधुनि ने कपिस रावणाजवळ
माकड मानुनि कोपें दशमुख पाहे करावया कवळ ७३
उत्सिक्ता* दशकंठा अत्यपराधें[7] विनाश जो भावी[8]
मारुत कळवि म्हणे दे सीता गोरी शिवांच शोभावी ७४
उपमी असि खळ-मणि नय- निष्ठुर वदनां कपीस माराया
मा मा[9] म्हणे विभीषण वागी यत्नें निजाग्रजा राया ७५
उजवा घालावा जो वंदावा त्याहि हरिजना तुच्छ
मानुनि खळ तैलार्द्र वस्त्रें वेष्टूनि पेटवी पुच्छ ७६
उसळे प्रभुवर-शरसा नेतां फिरवावया पुरींत बळें
माड्या प्रासाद[10] कनक- मय जाळी रिपजविला वडौंद्र खळें ७७
उल्लंघुनि जलनिधितें श्रीचूडामणि नमूनि दे हरितें
मारुति भरी स्फुरणें जें प्रभुचें होतें श्रमूनि देह रितें ७८
उर लावूनि उरासीं मारुतितें प्रभु भुज द्वयें कवळी
मान्य त्रिजगांत करी सर्व ब्रम्हांड या यशें धवळी ७९
उदधि-तटातें पावे सर्वकीशाप्लवंगबळसहित[11]
मानधन विभीषण ये शरण तया राज्य दे करी मैंहित# ८०

---

१ निरोप. २ वानराला (मारुतिला) ३ आशीर्वादहि. ४ मेघकाय येतु. ५ अम्हारूय. ६ पास. ७ अति-अपराध. ८ होणारा. ९ नकोनको. १० राजवाडे. ११ सर्व-कूर-अंश-प्लवंग-बळ-सहित-देवांचे अंशजे वानर त्यांच्या सेनेसहित. + कौतुकयुक्त. * गर्विष्ठा. # पूज्य.

उपळांहीं[1] सेतु रची शतयोजन लांब रुंद दश-गावें
मागें झालें न पुढें होइल कवि म्हणति हेंचि यश गावें ८१
उखळाया सीता-धृति-[2] मेरु प्रभु-शीर्ष-चाप खळ दावी
मायेनें मन मोहीं बुडवी बहु हा म्हणावया लावी ८२
उडवी मोह बिभीषण- भार्या सरमा क्षणांत भीतेचा[3]
मातेचा कन्यासी जोडी परम प्रसाद सीतेचा ८३
उतरुनि सागर-पारा पावे प्रभु बंधु-सकळ-बळ-सहित
माशुमारी प्रथमचि करुनि सकंठें विडंबिला अहित ८४
उशनासा[4] गुरुसा कवि अंगद सांगे दशानना राम
माथा पदीं वहातां तुज देइल अभय या करीं साम ८५
उर्वारुक[5] काळ-मुखीं होणारा दुष्ट-धी कसा वळतो
मारावयासि धरवी सांगुनि चौघां निशाचरां[6] खळ तो ८६
उडुनि भुज-द्वय झाडुनि पाडुनि अंगद पळांत धरि त्यांतें
माना लववायाला लावी जे घनरवादि[7] अरि त्यांनें ८७
उग्रतर समर करिती कपि-राक्षस-वीर होय जरि मोड
मानी दशमुख न म्हणे हृदया अहिता दुराग्रहा सोड ८८
उरग-मय-महा-दारुण- पाशांहीं सानुजा अजा बांधी
मायावी[9] मेघध्वनि सीतेची विकळ होइना कां धी ८९
उरगाशन[8] मुक्त करी मोह-व्रण-वेदना हरी रक्षी
माक्षिक पिपीलिकांला[10] प्रभुला प्रिय होय तो नसा पक्षी ९०
उठवुनि घटकर्णातें दशमुख सर्वाहित-क्षया धाडी
मारुनि कपि-बळ सकळा धरुनि फिरे शेष संकटीं आडी ९१

---

१ पाषाणांहीं. २ सीतेचा धैर्यरूप मेरु. ३ भय पावणारी असा. ४ शुक्रसा. ५ नाम विशेष (नवसें कांकडी) ६ राक्षस. ७ मेघनाद (इंद्रजित) ८ सर्प भक्षण करणारा (गरुड) ९ मायेनें केलेला (अ.ध.) १० मुंग्यांला.

उसळे स्फुटोनि सावध होतां नव-घ्राण-कर्णही-खंडी
मागें फिरे वधी गिळि कपि-बळ बहु कांपवी जसी थंडी ९२
उन्मूळी त्या त्रिभुवन-हृच्छल्या प्रभुवर स्वयेंचि रणीं
मार्तंडाच्या प्रभुच्या बाणीं जें तेज तें नसे किरणीं ९३
उल्हासें मेघरवें प्रभुसह स्रगळादि सर्वही खिळिले
मारुति दुजा बिभीषण हे मात्र न दोन करें+ मलें गिळिले ९४
उल्कांधर[1] हे शोधिति सर्व रण तयांत जांबवान् कांहीं
मारुतिस पुसे कथितां कुशळ म्हणे तरि बळासि भय नाहीं
उक्तोपाया[2] नमि त्या कैलास-समीप थोन-भू जाय
मागें घडींत घेउनि औषध्यगश्रृंग[4] ये महाकाय ९६
उठवी विशल्य निर्व्रण निजलेसे प्रभुसमेत सर्व कपी
मारुति महौषधींच्या गंधें हें स्फुयश कोण साधुन पी ९७
उलटे तसाचि श्रृंग स्थानीं स्थापुनि घडींत ये मागें
मातेला नानाला धन्यत्व दिलें जगीं महाभागें ९८
उच्छेद करित स्फुटले कपिभट तेव्हां रणांत खवळून
मारण-पण करुनि निघे घनरव निज-जन्म-हेतु-जवळून ९९
उभवुनि रणांगणांत त्रिदश-मुनि-मनासि सत्य जी वाटे
मायामयी जनकजा मारी प्रभुचाहि बहु गळा दाटे १००
उकलुनि बिभीषणानें सर्वांचा भ्रांति-पाश मग मोठा
मायावी मारविला लक्ष्मण-हस्तें रणांत तो खोटा १०१
उपजावा रथ होमीं तेणें व्हावेंचि निश्चयें अमर
मारावे नर वानर लीलेनें विधिवरें करुनि समर १०२
उद्योग असा करितां विघ्न करुनि बंधु पुत्र हारविला

1 मशाली धरणारे. 2 उक्त-उपाय- सांगीतला उपाय ज्याणें त्याला. 3 वायुपुत्र मारुती. 4 औषधि-अग- श्रृंग- औषधियुक्त पर्वताचें शिखर. + मोहानें किंवा मूर्छेनें.

मारविला यत्नानें आपडला फार साधु हा रविला १०३
उत्तप्त पुत्र-शोकें होउनि दशकंठ जानकी-नाशा
मानी जाय अशोकीं प्रेक्षवलें खिजुनि ज्या न कीनाशा
उपरम होय तशा अघ- कर्मापासूनि असें वदे मंत्री
माघारां जाय खळहि कीं प्रेरक राम तत्तनूगंत्री १०५
उद्भट चतुरंग बळ प्रेषी बहु- कोटि रामभद्र वधीं
मारवि बंधु सुत सचिव धरि दुष्टाची तरीहि न ह्रव धी
उरशक्तिनें बिभीषण- रक्षक-सौमित्रिचें रणीं फाडी
मारुति उठवि पुन्हा त्या प्रभुच्या प्राणासि अरिजया पाडी
उसरांसी बाळविली जेणे श्री तद्वधा सजे राम
मातलि वसवि हरिरथीं पुरवी दशमुख-वधें जगत्काम १०८
उन्नाद दिव्य दुंदुभि होय कुसुमवृष्टि नृत्य नुति गीत
माजे आनंद जगीं झालें खळ भीन साधुमन शीत १०९
उदक दशास्या देवुनि लंकेंत पदीं बिभीषणा स्थापी
मारुति-मुखें कळवि जय सीता तें अमृत धरुनि अस्थापी
उद्यज्वाळहुताशीं शिरली गंगाह्रदीं तसी देवी
मानाविधिंची स्तोत्रा प्रभुच्या अंका महोत्सवें सेवी १११
उल्लंघित दशरथ घे भेट प्रभुची निवोनि वत्स लहा
मान्यें राज्यपद म्हणे प्रेमें करि मान्य भक्त-वत्सल हा ११२
उठवी रण-मृत-कपि-बळ भगवत्प्रियकाम अमृत वर्षोनि
मातलि-सारथि घनरव- दशमुख-निधनें प्रकाम हर्षोनि ११३
उजवी भाग्य बिभीषण रामनिदेशें ससैन्य-सुगळातें
माळांगदपदकांहीं शोभवि निवधी स्वनेत्र-युगळातें ११४

---

१ अतिशयसंतापपावलेला. २ यमीला. ३ लक्ष्मणास. ४ उद्यत्-ज्वाल-हुताश-निघाल्याज्वालाज्यापासून अशाअग्नींत. ५ मातलि आहे सारथी ज्याचा तो (इंद्र) ६ रामाच्याआज्ञेनें. + दुखित होऊन * तत्-तनु-गंत्री-त्याच्या देहरूप गाडीचा. ‡ सुख भाजीसी. *, माघारा फिरणे. ‡‡ पाव

उत्सुक चित्तीं भरता भेटाया पुष्पकीं बसे राम
मान्य सकंठ बिभीषण बळहि विमानांत घे घनश्याम ११५
उतरुनि सर-कार्य निघे सेतुपथ श्रीस दाखवी सारा
माना[१]र्ह आणविली श्रीनें त्या पुष्पकीं प्रिया तारा ११६
उद्भवे शत्रुघ्न-भरत- गुरु-माता-सचिव-पौरवर्गानें
मारुति-सुरेंद्र प्रथम मग आपण दे सविधि शक्रभर्गानें[३]११७
उत्तम-लग्नीं प्रभु घे करवुनि राज्याभिषेक मह[२] भूतें[४]
मानाधिक दे सर्वें धन्य करि पशु-खगांहिसह भूतें[५]११८
उधळी घन जेविं जळें वस्त्रें मणि-भूषणें तसीं राम
माहात्म्य दे सकंठा सबळा लंकेश्वरा घनश्याम ११९
उपमा-रहित-प्रेमें गौरविला भक्त विश्व-पितरांहीं
मारुति-सत्कार तसा वरिला नाहीं जगांत इतरांहीं १२०
उदय यशश्चंद्राचा प्रभुच्या हरि सर्व-जन-चकोर-मती
मानुनि वर यांचि रसीं म्हणुनि बहुत अमृतही नको रमती१२१

उमारामायणप्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें.

---

# लघुरामायण

दशमुख-वध-मति विधि-सुर- नुत-पद जगदधिप अजित वरद हरि
परम करुण म्हणवुनि दश- रथ-नर-वर-तनुज मनुज-पणाहि धरी
कुशिक[६]-तनय-सव-समवन करि मुनि-वर-युवति-दुरित-गिरिस-रणि[७]

---

१ मानकरण्यास योग्या असी. २ उत्साह. ३ इंद्र आणि महादेव याला. ४ पृथ्वीतें. ५ प्राणि. ६ विश्वामित्राचे यज्ञाचें रक्षण. ७ मुनिश्रेष्ठ गौतम त्याची त्या स्त्रीच्या पापरूप पर्वताला. ८ खणनटांकी.

मग पुर-हर-धनु त्रुटि करि   अवनिज[1]निस सकळ-सुभट-मुकुट-मणि
जनक निज-दुहितृ-पति करि   दशरथ सुत सकळ परम मेह[2] करुनि
पुर बहु सुरववि परशु धर-   स्वर रुडन ळसहित भुजज[3]-भय हरुनि ३
अवितथ जनक-वचन करि   पुरवुनि अभिलषित सुखवि बहु जननि
अनुज-युवति-सह वरि वन-   वसति धरुनि हृदय दशवदन-हननि ४
दयित-तनय-विरह-दहन-   विकळ नृपति अहह[4] वदत असु त्यजि
दशरथ-निधन बहुत पुर   भरत-धृतिस त्रुटवि अतुळ असुख रचि ५
प्रभुसि भरत चरण धरुनि   विनवि परम करुण नारिहि न परतला
धृत-मुनि-पथ समजुनि महि-   समवन गुरु-कथित विहित[5]-तप रतला ६
शम-धन वन रुचि शुचिसुधि   बहुत मुदित[7] करुनि घटज मुनिस नमि
पितृ-सख खग[8] मग जगदिन[9]   सुखवि परम कुमति खरहि सबळ दमि[10]
वाहिण न कटि निरखुनि खळ   दशमुख करि कनक-हरिण सुवनि हरि
स्वरत अजित तरि विलपुनि   खग-मृग-कुळ सकळ परम विकळ करि ८
दशमुख[11]-हत-पतग-पतिस   दहन सलिल सुगति दुरित[12]-वन-दव दे
श्रुति भज गतिस असि गिळत-   पर रिपुसहि दुरित-दहन[13]-वनद वदे ९
प्रभु-वर-चरण-परिचरण   करुनि मिळवि अतुळ मुदतिशय[14] शबरि
गुरु-पद-रुचि सुचि तरि कवि-   बहुमत कसि करिल विमळ न यश बरि १०
प्रथम पवन सुत-मन हरि   मग रघुवर निववि रविज सुगळ हरि
निवडुनि हरि[15]-तनु-जनि अरि   कपि-महिपति तदनुजतनुस वरद करि ११
सुगळ महिजनिस हुडकवि   कपि-भट-चर-वदन-हृदयगद मळवि
स्थिति दशरथ-सख-खग-गुरु   कथि विधिसुत पवनजतनुस बळ कळवि
जलधि उडुनि करुनि अतुळ   कुतुक हुडकि सकळ-दशवदन-वसति

---

१ पृथ्वीपासून झालेल्या सीतेला. २ उत्साह. ३ बाहूपासून झाला जो दशरथ त्याचे भय. ४ हाय हाय ह्या अर्थी अव्यय. ५ योग्य तप. ६ शांतिद्रव्य ज्याचें असें (अ- पाचें विशेषण) ७ आनंदयुक्त. ८ पक्षि (जटायु) ९ जगत्-इन-जगाचा धनी (राम) १० दमवी. ११ रावणानें मारिला जो पक्षिश्रेष्ठ जटायु त्यास. १२ पातकरूप अरण्याला वणव्या सारिखा गम १३ पातकरूप अग्नीला मेघा सारिखा. १४ मुत्-अतिशय-आनंदाचा अतिशय. १५ इंद्राच्या शरीरापासून झालेला.

वतें[1] वन जप करि पवनज   हरि जंववरि निरखि सु-गुण[2]-खनि न सति १३
उपवन[3] बहु कपिस निवावि   वळखुनि निस[4] निरखि असुखमति समुदि[5]
खळ विनाशि द्रिमट सुख करि   मग निरखवि नमुनि चरण सतिस मुदि[6] १४
कुशळ कथि पुसुनि खुण मणि   वरि हरि[7] मग सदुपवनज[8] सु-तरु चुरि
खळ-बळ-कृत मथि हितवच   नगणि म्हणुनि रडवि करुनि भसित[9] पुरि
पुनरपि जलधि उडुनि कपि—बळ सुखवुनि विभुसि नमुनि रुचिर मणि
नयन-विषय करि कथि तव   असि हित मित वदलि अतनुरुचि[10] रमणि १६
प्रमुदित-हृदय विभु कपिस   पसरुनि भुज उठुनि सुचिर दृढ कवळि
स्तवुनि बहु तदुपकृतिभर[+]   मिरवि सुयश विरवरि सकळ जग धवळि[11] १७
सवळ सगळ-सह अनुजनु[12]—युत रघुपति निघुनि जलधि तट वरि तें
द्विषदवरज[13] उपगत[14] नत   निशिचर-पति करुनि विरुचि करि अरितें १८
भिवुनि जलधि कथि नळ कपि   करिल सुपथ धरुनि स-बळ उतर मला
तदुदितचि[‡] करुनि उतरुनि   यश करि बहु पिवुनि कंजज[15] सुते[16] रमला १९
प्रथमचि सगळ अरिस कुटि   मुकुट उडवि अनय-दुरित-फळ कळवि
तरिहि कुमति शम नच करि   जरि परिभव भवन बुडवि सुख मळवि २०
घनरव विभुस तदनुजनि-सह अहि-सित[17] करुनि उडवि कपि अवघे
खगपति अतितर वर यश   तुरवुनि विष-जनित विकळपण नव घे
दशमुख अनुज[18]निस उठवि   समजुनि हत कटक कुपित परम निघे
कपिबळ मथुनि पळवि धरि   सगळहि भय बहुत सकळ पर मनि घे
कपिपति सगळ सदुनि हरि[19]   बहु मत तदवयव[20] परम हरिखें[21] रचि

---

१ खेदार्थी अव्यय. २ उत्तमगुणांची खाण. ३ बाग. ४ सीतेस. ५ आनंदयुक्त. ६ आगर्ता. ७ वानर (मारुती) ८ सत्-उपवन-ज-उत्तम बागेंत झालेलं. ९ भस्म. १० अतनु-रुचि-मोठें तेज जीचें असी. ११ शुभ्र करी. १२ अनु-जनु-युत-लक्ष्मणयुक्त. १३ द्विषत्-अवरज-शत्रु रावणाचा कनिष्ठ बंधु (बिभीषण) १४ आलेला. १५ कमळापासून झालेला १६ पुत्र ब्रह्मदेव. १७ नागपाशांनीं बद्ध. १८ कुंभकर्णास. १९ हरण करि. २० तत्-अवयव त्याचे अवयव (अंगें) २१ हर्ष.
+ तत्-उपकृति-भर-त्याच्या उपकाराचा भार ‡ तत्-उदित-त्या समुद्राचें भाषण.

प्रकुपित अनिबळ निशिचर- वर परतुनि बहुत सुभट हरि[1] खरचि २३
तदवयव भुज-चरण-शिर विखरुनि वर-विशिख-निकर अजितहरि
अवरज[2]नि-निधन परिसुनि हळहळ दशवदन कुमति बहुत करि २४
गगनग घनरव खर शर विखरुनि कपि-कटक सविभु विकळ करि
पवनसुत अगद[3] मिळवुनि तदपटुपण तरणि तिमिरसमचि हरि २५
निपट कपट-पटु घनरव पुनरपि करि विकळ वधुनि महिजनिते[4]
भ्रम नव-निशिचर-पति[5] हरि भगवदनुज खपवि मग दुरित-खनिते
सुत-वध-विकळ कुपित खळ खरतर असि[6] कवळि अवनिजनिकदना
सचिव कवि विनवि परतवि कथि रघुवर-वधचि हित कुमति-सदना
प्रभुवरि खळ बहु बळ-वध कथुनि उठवि अजित सकळ परि खपवि
निरखुनि अप[+]सर निशिचर सुनटन धरि हरिहि[7]परिस हरिख[8] पवि[#]२८
मग जगदहित दशवदन वरि जय कपि-कटक सुगळ्सह दमुनि
भगवदनुजनिसहि विकळ कुरि[9] धरि भय परम सुजन-महद मुनि २९
पवनतनय कपि पुनरपि सपदि उठवि भगवदनुजनुस अगदे[10]
प्रभुसि रति दिधलि बहु असि निपट अव[++]सु मतिसहि न कनक-नगदे
हरि करि हरि-रथ-मणिवरि चढुनि तुमुल[11] समर सदरिसह सुचिर
शुचि रसभरित निजनयन[#]-चषक करिति अमर म्हणति बहु रुचिर ३१
पतन नवरि अरि जरि हरि[12] हरि[13] शतमित रचवि अवनिउपरि शिरे
दशहि दिसति अनुपहतचि विभुसि म्हणति विशिख अचुक तरिहि विरे ३२
पटज मनि रवि-हृदय कथि जप करि हरि निववि जहि[14] म्हणुनि तरणि
रविवर विधि मनु विभु-शर मग मृति कसि वरिल सवहितहि नरणि
प्रभुवर-खरतर-शर चिरि सुहृदहि उर[15] उरवि न उरे[16] परम रणा

---

१ वानर. २ कुंभकर्णाचें मरण. ३ औषध. ४ पृथ्वीपासून झालेल्या सीतेनें. ५ नूतनराक्षसपति (बिभीषण) ६. खड्ग. ७ इंद्रापरिसही. ८ हर्ष. ९ तत्क्षणीं. १० औषधें. ११ तुंबळ. १२ राम. १३ हरणकरी. १४ जिंक. १५ वक्षस्थळ. १६ १६ ऊरउरणे. + वज्र. # निज- नयन- चषक- आपलें नेत्ररूपपात्र. * पळाय नकेलेले. ++ निश्चयकरू.

वरिं विभ्रमसि म्हणति जय जय- सुर मुनि गुरु करिति सुकवि परमरणा
स्तवन कुसुम-मुदिर नटन विधि-मुख सुर सुमुनि सकळ मह करिति
स्वरनिपुण मुरज[+] मुखरित[++] करुनि समर-जनित परम श्रिण हरिति ३५
मृत- दशवदन-विधि करवि तदनुजनिस कथुनि परम सदय हरि
मग भगवदनुज चिरतर- वरपद-गत-रचित-चरण-नतिस करि ३६
मग महिजनि निज-शुचिपणा कळवि शिरुनि वसुनि वसुनि[1] चिर दहनि
सुर-मुनि-जन- मतिस गमलि रमलि भरुनि निघुनि सरसिरुहगहनि
शिव विधि शतमख दशरथ दहन अमर मुनिहि वदति शुचि रमणि ३७
नचिटिव तुज हरिसचि चिर भजलि मिरिव वरुनि अजड रुचिर मणि ३८
विभुवर-तनुस बरि निवचि जगहि विनय धरुनि जनक-पद नमुनि
जयजय म्हणानि अजित-गुण- नुतिस करिति सतत सदन वदन मुनि ३९
शतमख उठवि समर-मृत कपिबळ जळसमचि अमृतरस शिखरि
प्रभु निज-पद- कमल-निकट भरवुनि यश रसिक-सुमनि वसवि खरि ४०
प्रिय-खचर-पतिस कळवुनि सबळ सुगळ पुजवि विभु कुसुम[2] कबरि
प्लवग-रजनिचर- पति-युत निघुनि अवनि दुहितृ-हृदय मुदित करि ४१
नळ-कपि-कृत पथ निशिचर- पति-कपि-पति-समधिगम सुपद कळवि
विरह-जनित बहु असुखहि विभु महिजनिहृदय मुदित करि वळवि
कपि-पति-सुतनुस महिजनि - निजनिकटचि बसवि सुखवि बहु परमा
वदलि सखि ममपतिस तव— पतिच जवळि मजहि सदयमति सरमा ४३
प्रियसखि पति-शिर- धनु मज निरखवि बहु सुमुखि रडवि परि सरमा
कपट कळवि तरिच मिनलि महिजनु रघुपतिस जशिच हरिस रमा ४४
परिचित अपरिचितहि तिस विभु कथि मुनिवसति सुनग परम धुनि[3]
प्रहित[4] पवनतनय उडवि सकळ असुरव गुहक-भरत-मनिम धुनि ४५

---

१ कमलवनीं. २. पुष्पयुक्तकेशाभूहज्ज्याचा समागम. ३ नदी-(भागीरथी)
४ पाठविलेला. + नामविशेष (मृदंग) ++ शब्दित.

सुरसरिदुपपदपितृसख[1] मुनिस नमुनि पुसुनि निघवि गुहमनिनें
भरत-अनुजसहित जिवावे निघवि विरह-विकळ सकळ पुर अतिनें ४६
सुरवर कुसुम-घन[2] करिति रघुपतिसह अनुज कपिहि रुचि धरिति
पुरजन परम मेह[3] धरिति विभु-नृप-गुण अखिलजगदहित[4] हरिति ४७
निघवि शिव-विधि-हृदय बहु वश यश करि रसिक न शिकतिच इतर
जित-रण वितरेण-पटु[5] विभु सुखवि करुनि महित अहित जन पितर ४८
हरि[6] हरि[7] भय हरि हरि[8] नय-जय-पद करि करिपवरद[9] पर दमुनि
वदति सदति सुखकर विभु भव-जलनिधि-पतित-पतित-करद[10] मुनि ४९

सुख रामायण ऐसें मयूरें रामनंदनें
श्रीराम-चरणांभोजीं अर्पिलें रुनवंदनें.

---

# विद्युन्मालां*रामायण

श्रीभर्ता ब्रम्हयाच्या स्तोत्रा[11] मानी श्री दे भास्वद्गोत्रा[12]
कौसल्येच्या पोटा आला स्वभ्रातेंहि स्वांशें झाला १
भव्या रामाख्या स्वीकारी संपादी सद्विद्या सारी
आधीं सद्यज्ञानें पाळी साध्वीच्या ग्रावत्वा[13] टाळी २
मोडी त्र्यक्षाच्या[14] चापातें वारी सीतेच्या तापातें
वैदेहाच्या चोघी कन्या जोडी योग्या रम्या धन्या ३
गावी होती ज्या न क्षांती त्र्यक्षछात्रा[15] त्यों[16] दे शांती
मातेच्या पूज्यत्वा लक्षी ताताच्या सत्यातें रक्षी ४

---

१ सुर- सरित्-उपपद-पितृ-सख-मुनि- भागीरथीजवळराहाणाराजोबापाचासखाऋषीत्याला. २ पुष्पांनींदाट ( दाटपुष्पवृष्टीकेली असाभाव ) ३ उत्साह किंवातेज. ४ अखिल- जगत्-अहित- सर्वजगाच्याशत्रु किंवा अकल्याणत्याला. ५ दानदेण्याविषयींकुशल. ६ राम. ७ हरणकरी. ८ वानर. ९ गजेंद्रालावरदेणारा. १० संसारसमुद्रीं पडलेजे पापीत्यांलाहातदेणारा ( संसारांतूनवरकाढणारा ) ११ स्तुतीला. १२ भास्वत्-गोत्र-सूर्यवंशाला. १३ पाषाणत्वाला. १४ त्रि-अक्ष- महादेवाच्या. १५ महादेवाच्याशिष्याला. १६ परशुरामाला.
* नामविशेष ( छंद ) याछंदानें केलेंरामायण.

अत्र्यादिर्षि[1] प्रेमें वंदी ज्याचे वेद स्वर्गी बंदी
जो पारावारातें[2] प्राशी त्या विप्रेंद्राच्या घे आशी[3] ५
गृध्रेंद्रा ताताच्या मित्रा भेटे योजी लीला चित्रा
सांगे गोदातीरीं प्राज्ञा राहे वंदीं त्याची आज्ञा ६
जीचा आशाकंठ[4] भ्राता जो दे कंप स्वर्गिव्राता[5]
त्या पापेची नासा खंडी नीचे केवारीही दंडी ७
मारीच स्वर्णैणच्छद्मा[6] दिक्कंठ प्रेषी त्या पद्मा
पाहे स्वामीपासीं मागे त्यामागें तो धन्वी लागे ८
बाणें मर्मी एणा हाणी हा सीते सौमित्रे वाणी
ऐसी बोले रामावाणी ऐके भी रामाची राणी ९
सौमित्रीतें खिन्न-स्वांता सांगे जा संरक्षीं कांता
तो प्रार्थी हे रक्षो माया स्वामीच्या वाणीची छाया १०
ती मानी त्या भक्ता खोटा दे खेद क्ष्माकन्या[7] मोठा
रामातें सांगाया जोडी हस्त श्रीतें शाला सोडी ११
संन्यासीसा ये शाळेतें ने दिक्कंठ क्ष्माबाळेतें
ती स्त्री नेतां हाका फोडी आल्या गृध्रा खड्गें तोडी १२
कीशामध्यें[8] टाकी भूषा[9] पावे मंदत्वातें पूषा[10]
लंकेंत स्वारामीं स्थापी दापी कामी क्रोधी पापी १३
राम श्री विश्लेषें[+] शोका स्वेणाच्या तो दावी लोका
भिउवाचा जो धाता तो या दे गृध्रेंद्रा ताता तोया १४
ज्या मूर्धा[11] नाहीं तो[12] स्पाया पाहे स्वामी दे तोषा[13] या
दिव्या भक्ता भिल्ली केली श्रीरामें स्वस्थाना नेली १५

---

१ अत्रि-आदि-ऋषि २ समुद्रातें. ३ आशीर्वाद. ४ दशकंठ. ५ स्वर्गी रहाणाऱ्यांचे समुदाया. ६ स्वर्ण-एण-छद्म-स्वर्णमृगी वेषें कपट करणारा. ७ पृथ्वीची कन्या (सीता). ८ वानरांमध्यें. ९ अलंकार. १० सूर्य ११ मस्तक. १२ कबंधराक्षस १३ संतोषा. + सीतेचे वियोगानें.

पाहे जेव्हां रम्या पंपा श्रीविश्लेषें पावे कंपा
तो भेटे वाताच्या तोका सुग्रीवाचा वारी धोका १६
उद्धृत्ता वाळीतें मारी मित्रा दे राज्यश्री भारी
तो राजा लावाया शोध श्रीचा धाडी मोटे योध १७
वाताच्या पुत्रानें सीता केली हृष्टा चिंता-भीता
दे तीस स्वामीची मुद्रा जाळी लंका गांजी क्षुद्रा १८
श्रीश श्रीच्या चूडारत्नें केला हृष्ट प्राज्यें यत्नें
आलिंगी प्रेमें भृत्यातें वर्णी त्याच्या त्या कृत्यातें १९
कीशांच्या ऋक्षांच्या कोटी जीमध्यें ऐसी ती मोटी
सेना ने सिंधूच्या तीरा हें सांगे सुग्रीवा वीरा २०
ज्याचे बाहु स्वर्गी गावे तो पारावारातें पावे
वंदी शत्रु-भ्राता प्राज्य प्रेमें दे त्या लंका-राज्य २१
निर्मी पारावारीं सेतु स्वामी जो विश्वाचा हेतु
मत्ता हंता तों भासेना पावे फार क्षोभा सेना २२
मानी मानीना सामातें खोटें मानेना रामातें
मर्दी त्या द्विष्टयाचें सैन्य स्वामी दे योध्यातें दैन्य २३
सेनापाळा कुंभश्रोत्रा भंगी जैसा वज्री गोत्रा
मेघध्वानीच्या ज्या माया मानी लीला विश्वें गाया २४
तार्क्ष्या अक्षय्या दे थोरी स्वज्ञाना सामर्थ्या चोरी
लीलामर्त्य ब्रह्म-श्रेष्ठा कीर्त्यर्थ स्वीकारी कष्टा २५
द्वेषी मायासीता मारी सौमित्री त्यातें संहारी
पुत्राच्या शोकें दिक्तुंड श्रीतें मारूं पाहे पुंड २६
त्यातें ज्ञाता मंत्री वारी युद्धा धाडी सेना भारी
तीतें सीता-भर्ता मारी क्रुत्स्पांतीं जैसा कामारी २७

---

१ बालका. २ कुंभकर्णा. ३ इंद्र. ४ पर्वता. ५ इंद्रजिताच्या. ६ गरुडा.

सौमित्रीतें वक्षीं ताडी  दिक्कंठ क्ष्मा-पृष्ठीं पाडी.
त्या श्रीभर्ता भंगी आधीं  क्षोभे जेविं व्याघ्री व्याधीं २८
भ्रातृस्नेहें तो ही वाणी  बोले अन्याजीवा बाणी
अक्षारी त्या शृंगो आणी  सौमित्रीची मूर्छा खाणी २९
देवेंद्राच्या बैसे यानीं  ज्याचे पाय ज्ञानीं-ध्यानीं
सप्ताऽहोरात्र क्रूरासीं  भांडे स्वामी त्या शूरासीं ३०
तच्छीर्षे बाणांहीं झालीं  छिन्नें होतीं तैसीं आलीं
वाटे स्वामीला कीं कांहीं  शक्ति स्वांगीं शस्त्रीं नाहीं ३१
कुंभोत्पन्नर्षि श्रीसूरा  प्रार्थूं बोधी आद्या शूरा
तो सांगे या मारीं बाहूं  भव्य त्रैलोक्या दे पाहूं ३२
योजी ब्रम्हास्त्रातें बाणीं  तेणें तद्वक्षातें हाणी
पाडी मागों नेदी पाणी  झाले हर्षी सर्व प्राणी ३३
नेतां अंता तो सर्वांचें  झालीं उन्मादें स्वर्वाद्यें
गंधर्वांहीं गातां कृत्य  सर्वेस्त्र्यांहीं केलें नृत्य ३४
देवांनीं पुष्पांच्या वृष्टी  केल्या हर्षे कोंदे सृष्टी
ब्रम्हा आरंभी स्तोत्रा त्या  प्रार्थी कैवारी हो त्राता ३५
केलें नैशाचेंही गात्र  श्रीशें सत्काराचें पात्र
तोही लंका-भर्ता दास  स्पर्शेना ज्या काळ त्रास ३६
दिव्योत्तीर्णा सीता देवी  स्वामीच्या वामांका सेवी
भेटे वंदूं दे तो तात  प्रह्व ज्ञानी ज्या होतात ३७
त्या युद्धीं जे मेले होते  शक्रें जागे केले हो ते
बैसे वित्तेशाच्या यानीं  स्वामी जैसा योगी ध्यानीं ३८
सेत्वालोकें चित्तीं हर्ष  प्रेमाश्रु श्री देवी वर्षे
तारा सुग्रीवाची राणी  जी तीतें त्या यानीं आणी ३९

---

१ हात. २ मारुती. ३ द्रोणपर्वताच्याशिखराम. ४ शरीर. ५ नम्र. ६ सेतु-आलोक सेतूच्यापहाण्यानें.

श्रीश श्रीतें गोदा दावी   गावी जी सप्रेम ध्यावी
विप्रांचीं हीं भव्य स्थानें[1]   जाती पापें ज्यांच्या गानें ४०
वाताच्या पुत्रातें ध्याल्या   आलों हें सांगाया भ्याल्या
आधीं वात्सल्यें तो प्रेषी   ज्याचे होती मुक्त द्वेषी ४१
शत्रुघ्ना बुद्धा सेवासक्ता   भेटे श्रीश भ्याल्या भक्ता
राजस्थानीं ठाके तातें   जें द्यावें दे साकेतातें ४२
तो वारी भूतापा राजा   संसाराब्धीच्या पारा जा
हें मागे जो दासा मोरा   घे द्याया मोदा सामोरा ४३

रामात्मजें मयूरें हें रामायण कथासुधा
वाहिलें राम-चरणीं तर्पाया रसिकां बुधा

---

## मंत्रगर्भसाकीरामायण.

भावें सघरा रामाचें गावें जगदभिरामाचें[+] ॥ ध्रु. ॥
श्रीरघुवंशीं ब्रह्म-प्रार्थित   लक्ष्मीपति अवतरला
विश्व-सहित ज्याच्या जनकत्वें   कौसल्या-धव तरला १
राघवि सिद्धि आश्रमि जो तो   गाधिज मागुनि ने त्या
शिकवि बळाऽतिबळा विद्या शत   अस्त्रें विधिच्या[2] नेत्या २
मथुनि ताटका सुबाहु मस्तक   बाण प्रेरुनि खुडवी
मारीचातें प्रभु शतगावें   पुंखसमीरें[4] उडवी ३
जनक-मखातें मुनिसह जातां   प्रभुनें गौतम-भार्या
उद्धरिली ती पतिसह पूजी   स्तवुनि अहल्या आर्या ४

---

१ आनंदा २ नामविशेष. ३ खुडूनटाकी. ४ बाणवायूनें. + जगत् अभिराम- जगामध्यें सुंदर जो राम त्याचे.

यश करि भारी भर्व-धनु भंगुनि हर्षे सीता बाळा
माळा घालुनि वरिती झाली रामा त्रि-जगत्-पाळा ५
राजा आणवि दशरथराया पूजी सबळा धन्या
इंता झाला श्रीरामासह चवघां चवघी कन्या ६
महिपति-शत-यम भृगुराम पथीं परतुनि येतां अडवी
कडवी दृष्टि तयाची वृद्ध क्षणभरि मोही रडवी ७
जगदीश्वर त्याच्या तेजानें हरि परि चित्त न दुखवी
करुनि पराभव भर्व-शिष्याचा वहु सज्जन-मन सुखवी
यमसा क्रूरहि शांति वरुनियां गेला भार्गव हा या
लोकीं वृत्तांत शिरे लागे क्षत्रिय-मार्ग वहाया ९
जगती-पति रुत-विजयें पावुनि सुख साकेता पावे
जन म्हणति प्रभु-शरभ-रवें जे अरि-द्विप ते तापावे १०
यद्यपि भरत-वियोग क्षणही अतिदुःसह राजाला
तरिहि मातुळें नेला स्नेहें भेटाया आजाला ११
रात्रिदिवस सद्गुण रामाचे वर्णिति हर्षे पौर
श्यामलमूर्ति परि यश असवे हर-हासाधिक-गौर १२
मदायक राम लहानातें तेथिं जसा थोरातें
चंद्र चकोरातें कीं जैसा घन चातक-मोरातें १३

बालकांडसमाप्त

# अयोध्याकांड

स्व-श्री रामा द्याया दशरथ युवराज करूं पाहे
शिकवि मंथरा कुमति हितद्विषे कैकेयीमन न साहे

---

१ महादेवाचें धनुष्य. २ शेंकडो राजांचा नाशकर्ता ३ कडू. ४ हरणाक्षी. ५ महादेवाच्या शिष्याचा 'परशुरामाचा,' ६. पृथ्वीपति दशरथ ७ अयोध्येस. ८ शत्रुरूपसिंह. ९ नगरवासी १० हर-हास-अधिक-गौर-शिवहास्यापेक्षां अधिक गौरवर्ण. ११ उत्सवदायक. + दशरथ.

ती रायासि म्हणे वर द्यावे त्वां जे द्याया केले
देय न देतां सत्य-भ्रष्ट प्राणी नरका गेले २
हो मत्नंदन नृप वनवासी राम चतुर्दश-वर्षे
नचुके देणें द्यायाचें तें राया द्यावें हर्षें ३
मजला यांचिव सांचिव सद्यश दयिते मयि ते स्तु दया
ऐसें बहु विनवी परि नवळे धवळेतरबुद्धि तया ४
सु-यशस्कर तें प्रभु मान्य करी सीता-लक्ष्मण-सहित
महित गुरुसि करि नमुनि पुसुनि धरि वन-पथ लक्षुनि अहित
त्वरा करुनि नृप-रथीं बसुनि विभु भेटे सख्या गुहातें
नमुनि भरद्वाजानें सुखवी रवि जेविं जलरुहातें ६
रमणीय चित्रकूट-नगरीं मुनिसा उटजीं राहे
हें सचिवमुखें परिसुनि नृप असु राम-वियोगा वाहे ७
आजवळाहुनि सत्वर गुरुनें आणविला तो भरत
निंदी बहु मातेतेंही कीं तो न विषय-लोभ-रत ८
तोय पित्यातें दे पद घे हें गुरुचेंहि वचन मोडी
सुखवूनि गुहा भरद्वाजा तो श्रीरामा कर जोडी ९
अज-जनकाची ऐकुनि वार्ता हाय म्हणे मग अर्पी
मुन्यन्नरचित पिंड तिलोदक सुश्रद्धेनें तर्पी १०
प्रिय भरत म्हणे श्रीरामातें जोडुनि हात परतणें
न वनीं तूयां असमर्थ साहुनि घर्म हिम आतप रतणें
सौरा उक्ति वदे प्रभु सरतां वा हायन चवदावें
येइन तुज मज गुरु-धर्म-वचन हा हाय नच वदावें १२

---

१ द्यावयाचें. २ मत्-नंदन-माझापुत्र ( भरत ) ३ माझ्याठायीं. ४ ते-अस्तु- तुझी असो. ५ धवळ-इतर-बुद्धि-कृष्णवर्णबुद्धि ( कैकेई ) ६ दशरथा. ७ पूज्य. ८ शत्रु. ९ कमलातें. १० पर्णशालेंत. ११ अजराजा चा पिता त्या दशरथाची. १२ मुनि-अन्न-रचित-देवभाताचा. १३ पर्जन्य. १४ थंडि. १५ उष्ण. १६ वर्षं. ** श्रेष्ठा.

हेम- पादुका घेवुनि समजे नंदिग्रामीं राहे
मग अत्रि- स्त्रीपासूनि सीता अतिसत्कारा लाहे १२

---

# अरण्यकांड

राम श्री[1]मद्दंडकविपिनीं राक्षस- हत मुनि पाहे
शेषांतें दे भेटि मग मनीं त्यांच्या ताप नराहे १
न विराध मनीं अपराध करी उद्धरि तदपि तयातें
न जयंताच्या देववतें कृत- नुतिसहि पद पितृयातें २
आश्रम शारभंग सुतीक्ष्ण घटज यांचे तो अज पावे
ते म्हणति चरण सोडुनि याचे कल्पद्रुम न जपावे ३
गृध्र जटायु त्वत्पितृ-सरव मी ऐसें कळवी नातें
कां वत्सल-वर-विभु-हृद्गत गुरु- शोका पळवीना तें ४
आलय पंचवटींत करुनि विभु गोदातीरीं राहे
शूर्पणखा सद्व्रतभंगेच्छा धरितां कुदशा लाहे ५
प्रभु राक्षस खर जो त्या सबळा वधी जनस्थानीच्या
ती सीता-हरणा प्रेरी त्या आधि- जन-स्थानीचा ६
हेम-मयमृगें लोभवुनि करी विफळ अवन-यत्नातें
उटजीं यतिसा शिरूनि खळ हरि प्रभुच्या स्त्रीरत्नातें ७
अंडज पाडुनि नेतां श्री नग [11]कीशा-पंचकीं सोडी
ठेवी लंकेंत अशोकवनीं प्रभु-धृति राहे थोडी ८
हृदय प्रभुचें पितृ-सरव-घातें व्याकुळ झालें [12]शोकें
त्या जळ देउनि केलें दयिता- विरहीं जेंसें कोकें ९

---

१ श्रीमत्-दंडक-विपिन- शोभायमानदंडकारण्यांत. २ थांक. राहिले त्यांतें. ३ नामविशेष(इंद्रपुत्राच्या) ४ केली स्तुति ज्याणें अशाला. ५ नामविशेष (ऋषी) त्यांचे. ६ जन्मरहितराम. ७ रहाण्याचें स्थान. ८ सत्-व्रत- भंग-इच्छा. ९ पंचवटीच्या. १० जटायु. ११ पांचवानरांत. १२ नामविशेष (पक्षि) त्याणें.

जो योजन-बाहु कबंध धरी वारी त्याच्या शापा
सुग्रीवासीं सख्य करी हें सांगे विधिच्या बापा १०
उदय होय भाग्याचा पाहे प्रभुतें पूजी शबरी
भगवत्-प्रसादा पात्र नहोतां उत्तम जातिहि नबरी ११
बदरा ऽ शन देव म्हणे नग्ना स्पर्शोनि हेतु हो माया
ब्रम्हपदाप्रति गेली आज्ञा मागुनि तनु होमाया १२
उत्तम-रूपें बसुनि विमानीं लज्जा दे शंपेतें
ती शबरी विधि-लोका पावे साऽनुज विभु पंपेतें १३

---

## किष्किंधाकांड

पंपेची श्री पाहुनि रामें आठविली निज कांता
शांता करि लक्ष्मण पीडा त्या वीजुनि सिंचुनि तांतों १
मारुति राघव-सुग्रीवांसीं सख्य करी शुभ-लग्नीं
नग दाखवुनि सुगळ धृति आणी रामीं चिंता-मग्नीं २
प्रभुला मग वैराचें कारण अतुळ वालि-बळ-कळवी
सप्त शाल भेदुनि झगड्याचा संशय रघुपति पळवी ३
शक्रात्मज एकशरें वधिला सुगळ कीश-पति केला
प्रभुमैत्रीनें लज्जा दिधली देवांच्या लतिकेला ४
प्रभु-प्रियतमा-शोधा वानर बहु सुगळें पाठविले
दक्षिण-दिग्गत-कपिनीं मरतां प्रभुचे गुण आठविले
फार बरा मृत्यु घडेल जरी प्रभुच्या झटतां कार्या
आर्या जटायुला हें घडलें सोडवितां प्रभु-भार्या ६

---

१ काया शरीर. २ विजेतें. ३ ब्रम्हलोका. ४ वाराघालून. ५ श्रमलेल्या.
६ अलंकार. ७ धैर्य. ८ नामविशेष (ताडवृक्ष) ९ इंद्रपुत्र (वाळी).
१० वानराचापति ११ वल्लीला. + हनुवटी.

गृध्रोत्तम संपाती ऐसी ऐके त्याऽनुज-वार्ता
शोची जळ दे निज वृत्त कथी कपिचक्का तापार्ता ७
जातां तेजस्वि-वर-रविकडे तेजें पक्ष जळाले
पोटाखालें अनुज रक्षिला नगाऽवयव गळाले ८
पतन यदृच्छेनें[1] मज घडलें मुनि-वर्याश्रम-निकट
ज्याचें नाम निशाकर तेणें ताप शमविला विकट ९
मातें द्विज-वर वदला जेव्हां कथिसिल सीता-शोध
तो धर्म तुला पक्षद होइल नच विसरें हा बोध १०
मत्तनय कथी मज दशवदनें नेतां सीता पाहे
ती शत-योजन-सिंधु-पलिकडे लंकेंत सती आहे ११
गृध्र-वराला ऐसें कथितां पक्ष पळांतचि आले
झाले उडतां तो प्रमुदित कपि परि जल-निधिला भ्याले
ऋक्षेश[+] मेह स्तवुनि वाढवी जगत्प्राणतनयाचें[3]
स्व-बळ-परिज्ञानोत्साहें या सिद्ध करी मन याचें १२

## सुंदरकांड

जैसा वेगें श्री[4]-कंठाचा बाण त्रिपुरा गेला
तैसा लंकेवरि तो मारुति मदहित रिपु रागेला १
मैनाक-धरा धडकुनि पाठीं ठकवुनि सुखवी सुरसा
वधुनि सिंहिका पावे पारा साधु विमान-ग सुरसा २
हरुनि श्रम लंकादेवीचा लघुदेहें पुर शोधी
पाहे प्रमदवनीं धीरेतें त्याहि तिला जो रोधी २

१ स्वेच्छेनें. २ तेज. ३ जगत्-प्राण-तनय- वायुपुत्र मारुतीचें. ४ विष कंठ जो महादेव त्याचा. ५, मत्- अहित-रिपु. ६ मैनाक पर्वताला ७ नाग विशेष (राक्षसी) ८ देवसा. ९ त्या रावणालाही. १० सीतेला. + जांबवान्.

न गणी रजनिचरातें पाहे कुळ वर्णुनि दे मुद्रा
चूडामणि खुण घे प्रिय सांगुनि कळवी वळ त्या क्षुद्रा
सु-तरु-क्षय सबळाक्ष व्यय करि घननादाला गांवे
गावे ऐसे बोल वदे जे गुरुहृदया लागावे ५
बहु कोपे रावण खळ पेटवि जितें आणुनि पुच्छातें
लंका जाळुनि सुहृद रक्षुनि अघ-फळ दे तुच्छातें ६
श्रीस पुसे मकरालय लंघी बहु करवी युवराजा
झाले पात्र महाकपि व्हावे वरुनि गतिद सुवरा ज्या ७
ते परम जवन पवन-सुत-सहित माहित मधुवना लुटिती
वन-रक्षक दधिमुख जो त्यातें अंगदवचनें कुटिती ८
सांगे अप्रिय दधिमुख समजे सुगळ सिद्धि कार्याची
परिसुनि मधुवन-मथन करवावे गति त्याही आर्याची ९
ने पाठीव जवें जा ऐसें सुगळ दधिमुखा सांगे
करुनि निरोप तयांसि म्हणे तो स्वमनिस खिन्ना कां गे
वायुतनयसह जांबवदंगद नळनीळादि उसळले
तद्वत अद्भुत मंदर तेणें दिक्प्रांताऽब्धि घुसळले ११
वानरतनुज राजीवाक्षातें चूडामणि दे वंदी
आलिंगन देवुनि त्या त्याचा प्रभुवर झाला बंदी १२
प्रेमें म्हणे मरुत्पुत्रा त्वां ऋणी राम हा केला
सांडुनि शत कार्यें म्यां द्यावी हाक तुझ्या हाकेला १३

---

१ नीचा रावणास. २ उत्तम वृक्षांचा नाश. ३ स-बळ-अक्ष-सैन्य आणि अक्ष नामक रावणपुत्र यांसह. ४ मिळे. ५ जीवंत. ६ सत्-सुहृद्-साधू जो बिभीषण त्याचें गृह. ७ समुद्र. ८ वेगवान्. ९ खरेंने. १० तन-य-व-त्यांचा नाद.

# युद्धकांड

तेजें विजयश्री साधाया साऽनुज सकगळ सबळ
राम निघे सुमुहूर्ती घाया स्व-शरांतें अरि-कवळ १
जलनिधि-तीरा जातां प्रभुला शरण बिभीषण आला
झाला प्रसन्न लंकाराज्य स्व-नमन-फळ दे त्याला २
नळ-कपि सुमहान् सेतु रची त्या- मार्गे प्रभु तो उतरे
पति*मथनें अरि सुगळा[1] झाले हरिला[3] जैसे कुतरे ३
प्रभु ताराऽत्मज-दूतमुखें[2] त्यां हित कथिलें परि नगणी
त्यांत वक्रपण आदीं मध्यें अंतींहि जसें भगणी ४
समरीं सहाय सचिव सुत सुभट कुंभकर्णही खपला
इंद्रजित् तसा मायावीही जरि बहु विजया जपला ५
खळ-बळ-पारावारातें तो प्रभुवर-कुंभज भेटे
कीं राक्षस-कुळ-कक्षीं[4] रघुवर तो प्रलयानळ पेटे ६
गरुडाहून मरुत्सुत आला समरीं बहु कामाला
आणुनि औषधि-गिरि-शिखरातें हृष्ट करी रामाला ७
संप्ताऽहोरात्रें जन्य[5] करुनि दशमुख तो खपवीला
संपादुनि विजयश्री रामें दिधला तोष[6] पवीला[7] ८
झाले जयजयकार बहु स्तव दिव्य वाद्यरव हर्षें
नृत्यें गीतें केलीं कल्प-द्रुम-कुसुमांचीं+ वर्षें ९
दश-कंठाऽनुज पदीं बसविला मग दिव्य करी सीता
गुरु स्करवुनि कपि उठवुनि केली कीर्ति कवि-सभा गीता
मग वरि वियेद्यान[9] विभ्रम प्रिय-जन भेटे भरतातें

१ सिंहाला. २ तारेचापुत्र जो अंगद दूत त्याच्या मुखानें. ३ रावणाला. ४ राक्षसकुळरूपगवतांत. ५. युद्ध. ६ संतोष. ७ वज्राला. ८ शपथ. ९ आकाशींजाणारें (पुष्पकविमान) * स्वामीजो रावण त्याच्या मथनानें. + वर्षाव

प्रभु तद्दुर्वह आपण घे जो दिधला भू-भर तानें ११
सहपरिवारा रुगला पूर्जी त्याही लंकापतितें
ध्यावें शुचि रुचिर-यशें ज्याच्या क्षाळुनि अंकापतितें
रुग्य निरुपम दे सर्वजनानें राज्य श्रीरामाचें
आधि व्याधि भय हरि ज्याचा उच्चारण नामाचें १३

# उत्तरकांड.

कुंभज-वदनें श्रीराम प्रभु दशवेदन-कथा परिसे
ज्या सत्ता विधि-दत्त महावर घातक झाले असे १
घे स्वाऽग्रजा कुबेरापासुनि केकस्यात्मज लंका
कथितां हित अरि पुष्पक उपडी हरगिरि न धरी शंका २
वेदवती शाप मरुत्तकतु मुनि-विध्वंसक खोटा
अनरण्यातें हांसुनि शाप स्वीकारी जो मोटा ३
जिंकी नृप दिग्विजयीं भग्ना काळाच्या करि सेना
काळदंड आटोपी विधिचें उक्त कोण परिसेना ४
असुर-पराजय मात्र न घडला त्यांसीं विधि सख्य करी
वासुकि-वरुण-पुरें तो जिंकी सर्वस्त्रीरत्नें हरी ५
भगिनी-रत्नहरा मधुवरि तो कोपे परि सख्य घडे
अक्षोहिणि सहस्रचतुष्टय घे हरिसीं गांठि पडे ६
घनरव शतसख्य धरुनि पुरानें वरद विधि करी सुक्त
अर्जुन वाळी हरिति म्हणुनि मद सुर मुनि झाले युक्त ७
रवि राहु स्वर्ग-जय-फळ-मति शिशु वज्रें मूर्च्छित झाला
क्षोभे पवन उठवि विधि बहु वर सुरवर देती त्याला ८
हें मुनि कथि जाय मग स्व-सदनें सत्कारुनि बोळविले

१ रावण.

सुरवर-मुदित-पवनजें प्रभुपदिं स्वशिरोलक[1] लोळविलें ९
गर्भवतीसहि जन-निंदेस्तव यश रक्षाया टाकी
लवणासुर मर्दुनि शत्रुघ्न प्रमुदित करि मुनि नाकीं १०
मृत विप्र-तनय उठवी प्रभु हय-मेधीं कुश-लव-गीता
स्वयशा सेवी दिव्य करवितां क्षितिमाजि शिरे सीता ११
आठां पुत्रांनें दे राज्य प्रभुवर करि सत्या गी
धर्मी अत्यादर कळवि जना इंद्रजिदरिस त्यागी १२
माता तारुनि अमर-सुत-गति दे पुरवी श्रितकाम
संतानक-लोकीं जन ने वरि वैकुंठ-प्रिय-धाम १३
मंत्रगर्भ हें श्रीरामायण रामनंदनें रामीं
नमुनि वाहिलें हृदय रमाया प्रभुच्या चरितां नामीं १४

---

## घनाक्षरीरामायण

श्रीरामाच्या नामें पाप नाशे भंगे सारा ताप
ऐसा अन्याचा प्रताप कोणाहि मंत्रीं नसे १
घेतां श्रीरामाचें नाम लाभे श्रीवैकुंठीं धाम
होती सिद्ध ध्यातां काम इच्छा न स्वल्पा वसे २
सिद्धी सर्वा दासी स्पष्ट विघ्न-स्थानीं मोठे कष्ट
षड्वैरी[*] ते स्थान-भ्रष्ट धाके वांचावे कसे ३
नामीं निष्ठा होतां मात्र व्हावें स्वःसत्कारा पात्र
शक्रादि स्वर्गस्थ छात्र[3] जैसे आचार्या नमे ४
श्री-सूर्याच्या वंशीं भूप दशरथ सिंधु धर्म-रूप
तदन्य कासारादि[4] कूप[5] तैसे राजे वाटती[+] ५

---

१ स्व-शिर-अलक-आपल्या मस्तक संबंधी केश. २ स्वर्गलोकींच्या सत्कारास. ३ शिष्य. ४ सरोवरादि. ५ विहीर. + वाणि. * षड्रिपु (काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर)

तो श्रीवसिष्ठाचा याज्य अयोध्येंत करी राज्य
प्रजांसि दे सुख प्रोज्य शत्रु उरीं फाटती
शौर्यौदार्यादि उदार ज्याचे श्रेष्ठ गुण फार
सुधारसाहुनि सार त्रैलोक्यांत दाटती
ज्याच्या यशें साधु तुष्ट तेजें नम्र-ग्रीव दुष्ट
अर्थी नाहीं झाले रुष्ट कीं कामना आटती २
प्रजाऽवनीं जाय काळ वृद्ध होय धरा-पाळ
संतान-चिंताऽग्नि-ज्वाळ तप्त करी त्या सदा
सुमंत्र-सचीव युक्त सनत्कुमाराचें उक्त
सांगे होय आधि-मुक्त रघुराज तो तदा
यथाविधि हयमख करी शतक्रतुसख
उरों दे पहायास खे न विमान-संपदा
अग्नि दे पायस-पात्र भूप रोमांचित-गात्र
पाहे योग्य नतिमात्र ऋष्यशृंगाच्या पदा ३
पायसीं प्रवेशे अज जेणें उद्धरिला गज
ज्याचें पाद-पद्म-रज दुर्लभ विधातया
दिव्यान्नाचे तो विभाग तिघींस दे महाभाग
ज्याच्याठायीं साऽनुराग त्या जोडिती हात या
गर्भवती होतां काय पाहे सुप्रभ न माय
हर्ष विश्वांत न राय लावी पातें पातया
झाले तयांचे दोहद शक्रसखासि मोहद
वाटे आपण लोहद त्या सुवर्णदानया ४
कौसल्येसि झाला बाळ विष्णु त्रिभुवन-पाळ
तें शुभ मध्यान्हकाळ . पूनर्वसू नवमी

१ पुष्कळ. २ भाषित. ३ आकाश. ४ शृंगऋषीच्या. ५ जन्मरहित (राम)
६ शरीर. ७ डोहळे. ८ लोखंड देणारा. + दशरथ. ⁂ यजमान.

होय हर्ष अतितम[१] जाय हृदयींचें तम
उत्सव उत्तम सम अवेमीं[२] अनवेमीं[३]
लंकेंत उत्पात-शत राक्षस वदले बत[४]
रावणाचि चित्त-गत जाड्य-विष न वमी
मोठा आनंद पुरांत[५] बहु त्याहुनि स्फुरांत
वदों किती भिदुरांत[६] तो काय मानव मी ५
राजा होय पूर्णकाम कौसल्यापुत्रासि राम
ऐसें गुरु-मतें नाम ठेवी करी बारसें
दुजा कैकेयीचा सुत तो भरत साधु-स्तुत
तद्रूप शील अद्भुत त्या निवाला बा रसें
सुमित्रेचे दोघे वीर लक्ष्मण शत्रुघ्न धीर
यद्यशें नवाटे क्षीर अमृतहि सारसें
तोक-चतुष्टयें[७] जाय आधि ताप बहु धाय[८]
तत्स्पर्शें चुंबनें राय जैसा भृंग सारसें[९] ६
वसिष्ठ पढवी वेद ज्यांहीं लया जाय भेद
स्वप्नींही नराहे खेद मग मागे पांचवा+
म्हणे करा विश्व वश तुम्हीं हरी** अगी शश
शंभु-वर्ण-सख[१०] यश फक्त नित्य सांचवा
नमीतील जे चरण त्यासें येतील शरण
करा तत्ताप-हरण सर्वथैव वांचवा
पुरवा भक्तांचें कोड रक्षा दीन जैसे फोड
प्रकटुनि गुण गोड रसिकांस लांचवा ७
विश्वामित्र तपोधन त्याचें तोषवाया मन
तृषितें तृषीता वनें पीतां द्यावें ज्यापरी

१ अतिशय. २ कनिष्ठीं. ३ मोठीं. ४ खेदार्थ (हाय) ५ अयोध्येंत. ६ वज्रांत. ७ चारपुत्रांनीं. ८ तृप्तहोय. ९ कमलानें. १० महादेवाच्या कांतीसारखा पांढरेपणा. ११ उदक. ** सिंह. + धनुर्वेद.

गुरूक्तें दशस्यंदन[1]   राम लक्ष्मण नंदन[2]
अर्पी करूनि वंदन   चित्तीं म्हणे हा परी
बळातिबळाख्या दोन   विद्या दे गुण वदोन
प्रवास राज्यपदोन[3]   नवाटे त्याउपरी
प्रेमें अस्त्र-शत-दान   दे रामास बहुमान
गाधिज[4] सत्कथा-पान   करवी परोपरी   ८
मुनी गुरु म्हणे हाण   तोंचि सोडूनि सुबाण
ताटकेचे हरी प्राण   राम लावी न क्षण
सिद्धाश्रम-निशाचर   सुबाहु प्रमुख खर
संहारी हाणूनि शर   करी यज्ञ-रक्षण
पुंखघातें[5] महाशूर   मारीचा उडवी दूर
दैवें झाला नाहीं चूर   तो कीं तें विलक्षण
विश्वामित्र सभाजन[6]   करी स्तुतीस भाजन[7]
सर्वऋषि सभाजन[8]   झाले तेव्हां सक्षण[9]   ९
अहल्येचा ग्राव-भाव[10]   करी पादरजें वाव
पाप-शाप-दव-दाव[11]   राम विश्व-तारक
गौतमासि गृह-धर्म   प्रवर्तवूनि दे शर्म[12]
म्हणति तयासि चर्म-   चक्षु नरदारक[13]
उद्धरिले मुनि-दार[14]   वदले तूंचि उदार
उघडिलें मुक्ति-द्वार   चुकविला नारके[15]
पोटीं अपराध लक्ष   घालिसी सदय दक्ष
षडरींपासूनि रक्ष   रामा हेंचि मारक   १०
सेवीत त्या भूसुरास[16]   गेला जनक-पुरास

१ दशरथ. २ हाय. ३ राज्य-पद-ऊन—राज्यपदापेक्षांउणा. ४ विश्वामित्र. ५ बाणवायूनें. ६ पूजन ७ पात्र. ८ सभासद. ९ सानंद. १० पाषाणत्व. ११ पापशापरूपवनाचा दावानल. १२ सुख. १३ मनुजपुत्र. १४ मुनिस्त्री (गौतमपत्नी अहल्या) १५ नरकगति. १६ ब्राम्हणास (विश्वामित्रास)

द्याया शत्रूच्या उरास  कंप जय जोडुनी
करी प्रकट प्रताप  हरी महेंद्राचा ताप
वरी जानकीस चाप  ईश्वराचा मोडुनी
ऊर्मिळादि-कन्या-त्रय  लक्ष्मणादिकां दे नय-
धर्मज्ञ मैथिल भय  संसाराचें सोडुनी
मिळाला जामाता राम  योगिजनाचा विश्राम
नता देता मोक्ष-धाम  बंधलेख खोडुनी ११
रुद्र-शिष्य भृगुराम  रोधी मार्ग महोद्दाम[1]
रघुरामें त्याचें धाम  लीलेनेंचि हरिलें
मग रक्षो-वध-कार्य[2]  करावें सुर-सत्कार्य
निववावे सर्व आर्य  ऐसें मनीं धरिलें
कैकेयीचें व्हाया इष्ट  ताताचेंही सत्यादिष्ट[3]
सफळ करावया शिष्ट  मुनि-व्रत वरिलें
अग्नीनें सोडावें आज्य  तैसें ज्यांत सुख प्राज्य
त्यजिलें समृद्ध राज्य  यशें विश्व भरिलें १२
सीता-लक्ष्मणा-सहित  वना जाय सन्महित
करी मुनि-जन्म-हित  तप सिद्धि नेउनी
चित्रकुटीं नगीं वास  आदरी लक्ष्मी-निवास
वल्कल अजिन[4]-वास  आंगावरि घेउनी
स्व-जन-सह स्मरत  तेथें साऽश्रु ये भरत
म्हणे श्रीरामा परत  पायीं शिर ठेउनी
तातासि दे तिळ-तोय  मग सुप्रसन्न होय
राखे सद्बंधुची सोय  त्या पादुका देउनी १३
अत्रि अनुसूया नात  माय मानी जोडी हात

---

१ महा-उद्दाम-मोठाउद्धट, दांडगा. २ राक्षसवधरूपकाम. ३ सत्य-आदिष्ट-खरें सांगितलेलें. ४ चर्मरूपवस्त्र. + तेज.

विराध-राक्षस-घात करी काननीं मग
महामुनि शरभंग भेटे तयास-श्रीरंग
सुतीक्ष्णासी पुण्य-संग साधी स्वामेरनग
घटजाऽश्रमीं रमून काळ सद्वृंदीं क्रमून
वैष्णायाऽस्त्रें घे नमून यशें भराया जग
धरी पंचवटी-पथ विश्व-गीत पुण्य-कथ
सुखी करी दशरथ- सख जटायू खग १४
तेथें शूर्पणखा रांड म्हणे रामा सीता सांड
मजसीं विलास मांड बळें गळां पडली
बोले लक्ष्मणा जा वर ऐसें योगि-ज्ञानि-वर
तोही नबधं त्यावर सीता-घाता अडली
दंडी सौमित्रि सुज्ञान खंडी खड्गें नाक कान
चंडी ती त्या जनस्थान- नाथापुढें रडली
श्रीरामें स-सैन्य खर संहारितां निशाचर-
पतिस सांगे हे नर- हस्तें गति घडली १५
आहे मनुष्य-स्त्रीरत्न तयापुढें तुच्छ प्रत्न
त्वदर्थ करितां यत्न ऐसें केलें मानवें
लंघिलासि नरें आज त्याची कांहीं धरीं लाज
साधिलें त्वां जें तें काज न देवें न दानवें
सोड वज्राऽधिक शर मार रणांत ते नर
हो त्या स्त्रीरत्नाचा वर यश जोडीं बा नवें
ऊठ बैसलासि काय लावि त्या म्हणाया हाय
शूरा तेजचि सहाय द्विजा जेविं जानवें १६
करी मारीचा सहाय . मायावी राक्षस-राय
पंचवटिप्रति जाय राहे नभीं दडुन

---

१ स्वजनकल्पतरु. २ अगस्त्यऋषीच्या आश्रमीं. ३ प्रयत्न. + साधुसमूहीं. + नामविशेष (ऋषि) त्यासि

हेम-मृग होय खळ  सीता-मनो-मीना गळ
ठाके एकत्र न पळ  देवी मागें अडुन
सांगे लक्ष्मणा अवन  सोडी उटज-भवन
धांवे श्रीराम जवन-  शरें ताडी जडुन
रामापरि फोडी हाक  हंस-स्वर करी काक
घाली भूजा-मनीं धाक  पृथ्वी-पृष्ठीं पडुन  १७
जानकी वदे हा तात  झाला सर्वस्वाचा घात
धांव जोडूं काय हात  जा लक्ष्मणा नीघ रे
तेव्हां तीस तीचा दीर  सांगे तत्व धाया धीर
माते टेंकुळसा हीर  जळीं काय वीघरे
सौमित्रिच्या पाडी कोप- करुनी विवेक- लोप
हाणुनि कुशब्द-रोप  हृदयास ती घरे
करी सीतेसि नमन  साश्रु तेथूनि गमन
म्हणे त्या तमास मन  राम-हृदीं रीघ रे  १८
सौमित्रि जातांचि पाप  मेघनादाचा ये बाप
गरुडाच्या गृहीं साप  तैसा शिरे दांडगा
सीतेतें गो-द्विज-काळ  हरी राक्षस भूपाळ
जेविं कुळ-भ्रष्ट-बाळ-  हरिणीतें लांडगा
जटायु-सोडवी सून  नगमे विभावसून
चूर्ण करी गीवसून  रथ जसा मांडगा
रावण कपट-दक्ष  तोडी खड्गें त्याचे पक्ष
म्हणे ये वधूसि रक्ष  ऊठ पुन्हा मांड गा  १९
स्कंधीं वाहोनि ने मग  ऋष्यमूक लागे नग
पांचांवानरांत नग  सोडी सोत्तरीय ती

---

१ पर्णशालारूप गृह. २ पृथ्वीपासून झालेली जी सीता तीच्या. ३ दुःशब्दरूपबाण. ४ इंद्रजिताचा. ५ विभावसु-ऊन-अग्नीहून उणा. ६ धरून. ७ पर्वत. ८ भूषणें. ९ स-उत्तरीय-पांघरलेल्या वस्त्रासह. ≠ सुनेला. + हिरा.

बळें सीतेसि हरून   मृत्यु-भय नधरून
पावे लंकेसि वरून   तो खळ वायुगती
तेथें अशोकवनांत   तेणें रक्षस्त्री-जनांत
नम करूनि मनांत   ऐसी ठेविली सती
येरीकडे रामराय   लक्ष्मणें वंदूनि पाय
स्व-वृत्त सांगतां हाय   म्हणे व्याकुळ-मती   २०
लंघुनियां बहु कोस   उटज देखतां ओस
लागे दर्शनेच्या सोस   राम हुडकी वनें
पुसे साश्रु तो [२]अगांस   मृग-भुजग-खगांस
उच्च-शिखरां नगांस   अति-व्याकुळ-मनें
नाहीं मत्संगीं [४]धालीस   प्रेमें प्रवासा आलीस
न स्मरलीस आलीस   मोहिलीस न धनें
हा सीते कां आला राग   सोडिला कां [६]अनुराग
हा देवी हा प्रिये आग   काय केलें याजनें   २१
ऐसे विलाप करीत   धैर्य सोडित धरीत
वृक्ष वल्ली उद्धरीत   आलिंगुनी जो [७]दवीं
देखिला मूर्छित तात   म्हणे घातीं महाघात
घालूनि वल्कलें वात   सिंची जळाच्या लवीं
सांगे वृत्त व्यसु होय   संस्कारूनी त्या [१०]दे तोय
पोषितां रसदा कोय   तसी [११]कथा हे भवीं
पुन्हा धुंडाळीतां वन   अयोमुखी-नासा-स्तन
कापी लक्ष्मण स्तवन   हास्यें वादवी नवीं   २२
जो योजन-भुज अंध   धरी वनांत [१२]कबंध

---

१ आकाशमार्गे. २ वृक्षांस. ३ पर्वतांस. ४ तृप्त झालीस. ५ सरलीस. ६ प्रीति. ७ अरण्यांत. ८ बापासारिखा (जटायू) ९ वांगा. १० संसारीं. ११ लोहासारिखें मुखजीचें त्या शूर्पणखेची नासिका आणि कान. १२ नाभिविहीन (राक्षस)

त्याचा वारी शाप-बंध अर्पी उत्तमा गती
तपःश्रीच्या कबरीस भेटे मग शबरीस
राम तें दे त्या बरीस जें सद्भक्त मागती
पंपा-श्रीनें वाढे ताप प्रिया-वियुक्त इलोप
करी स्त्रैणसा विलाप बंधु बोधी मागुती
प्रभुचा पटतां शोक म्हणे अयशासि ओक
झाल्यें निंदितील लोक मानी परमा गती २३
भेटे मारुति पंडित व्हाया कीर्तीनें मंडित
सुग्रीवाशीं अखंडित सख्य होय तें करी
नग कीश-महीवर दावी ये त्या गहीवर
ज्याच्या नामें वहीवर यम खडी विखरी
मूर्त गौतमसत्यय सुगळासि दे प्रत्यय
कोंडे वालीचा अत्यय करुनी यशें भरी
सुकंठ राज्य लाहून किष्किंधेमाजि राहून
सेना आणवी बाहून बहु कोटी लोकरी २४
सीतेचा कराया शोध करूनि दिग्देश-बोध
धाडी ऋक्ष कीश योध त्यांत दक्षिणेकडे
जांबवदादि जे वीर गेले हुडकीत धीर
धावले सागर-तीर लंघुनी वनें कडे
लोटला अवधि-मास सुग्रीवाचा दंड त्रास
झाले जीवनीं उदास प्रायोपवेश घडे
महेंद्रीं संपातीनाम जटायूचा तेजो-धाम
अग्रज तयासी राम म्हणतां गांठी पडे २५
शोध सांगे द्रष्टा दक्ष आले त्याचे दग्ध पक्ष

१ पृथ्वीपति (राम) २ स्थान. ३ अलंकार. ४ सुग्रीव. ५ गौतम-मुनि-श्व-अहल्येचें शापभेद. ६ ब्रह्मांड. ७ नाश. ८ बोलावून. ९ अन्नादि सर्व टाकून मरावें वाइटलें एकामनीं स्मरणें. १० तेजाचें स्थान. + स्त्रीलंपटसा.

स्तवें वाटे शत्रु[1]कक्ष वन्हि-मारुती उडे
अत्याश्चर्यांत तें नाक[2] सुरसा-सह मैनाक
सिंहिका देवूनि हाक काळाच्या मुखीं बुडे
शत-योजनाऽब्धि-पार पावे लंका कांपे फार
मुद्रा[3] देवीस दे सार सांगे वारवाणी चुडे
धैर्य सीतेसि देवून त[+]च्चूडामणि घेवून
संदेशा[4]ऽमृत सेवून पाडी प्रासाद-[5]हुडे २६
मोडी वृक्ष बहुलक्ष मारी शत्रु-पुत्र अक्ष
जाय रावणा समक्ष बांधोनी घे तो बळें
करीत तेजाचा लोप हाणी उरीं शब्दरोप
आणी निंदूनीयां कोप म्हणे वांचा यावेळे
कल्पद्रुम पुष्प-गुच्छ तो मानूनी कपि तुच्छ
पेटविलें भव्य पुच्छ वस्त्रीं वेष्टूनी खळें
बिभीषणाचें न घर जाळी राक्षस-नगर
स्वर्गीं भीजवी मगर पुष्कळ-प्रेम-जळें २७
पुरीं अग्नीस पेटोन पुनःसितेसी भेटोन
उडे नगमे खे[*]टोन लंघी सागरा जवें
हृष्ट अंगदादि कीश करी मग जानकीश
तेव्हां वदले नाकीश[10] मस्त ते हें गौरवें
चूडामणि देतां राम भेटोनि पुरवी काम
अत्यद्भुत दान साम मिळे सभाग्या नवें
देवर्षि तद्यश गान नाचे शक्र जोडी हात
झाला धन्य तात[11] वीत पूजिला स्तवें भैवें २८

१ शत्रुरूपगवत. २ स्वर्ग. ३ मुद्रिका, आंगठी. ४ निरोपरूपअमृत. ५ राजवाडयाचींशिखरें. ६ शब्दरूपबाण. ७ नामविशेष (राजे रामचंद्राचे पूर्वज) ८ वेगानें. ९ जानकी-ईश. १० शंभु-अस्त-कल्याणअसो. ११ वायू. १२ सदाशिवानें. + तत्-चूडामणि-त्यासीतेचेंशिरोभूषण. * खेट-ऊन-आकाशींफिरणारे जेपक्षीत्याहूनउणा.

भाट करावया वैन्य  निघे धाया रवळा दैन्य
सिंधु-तीरासि ने सैन्य  तेजें[1] रारवे राखवी
बिभीषण ये शरण  वीरी तज्जन्म-मरण
लंका-राज्य दे चरण-  नति-फळ दाखवी
रुंद दश लांब शत[3]-  गाथें सेतु अब्धि-मत
करवी अद्भुत नत  यशोमृत चाखवी[4]
ज्याचा धरुनी आधार  माया अंडाचा विस्तार
करी नित्य चमत्कार  नवे नवे लाख वीं[5] २९
नसतां उत्साह-हीन  कोण्ही मंद बाळ जीर्न
तऱ्ही अहोरात्रें तीन  उतराया लागलीं
सैन्यें रामा रक्षायास  नगणुनि लक्षायास
फल दल[6] भक्षायास  नगुंतोनि जागलीं
अगानगांतें वाहून  तळीं नभींही राहून
क्षुधा तृषाही साहून  कांहींच न भागलीं
वीर-जनपदेशांत  शिरोनि शत्रु-देशांत
सुग्रीवाच्या निदेशांत  एकमतें वागलीं ३०
सुवेळावरी चढून  क्रोधें मनांत कढून
शत धिक्कार पढून  सुग्रीवानें ताडिला
बळें दोर्युद्ध करून  लंका-प्राकारावरून
मुकुट-सह हरून  नेज तळीं पाडिला
विलासियासि अंगद  तैसा प्रिय जो अंगद
शत्रु-शातासि भंगद  तो दूतवें धाडिला
रामें वैद्यें जसा गद[12]  कीं मारुतें शुष्क छदें[13]
संदेशें[14] रावण-मद  लीलेनेंचि झाडिला ३१

---

१ दूरकरी. २ पायांपडल्याचें फळ. ३ विस्तृत. ४ ब्रह्मांडाचा. ५ जीर्ण (म्हातारा) ६ पर्ण. ७ आहेत. ८ फजयुद्ध. ९ लंकेच्या तटबंदीवरून. १० बाहुभूषण. ११ नाशदेणारा (मारणारा) १२ रोग. १३ पर्ण (पान) १४ निरोपानें+प्र तवे.

प्लवंग[1] राक्षस क्रुद्ध झाले आरंभिते युद्ध
धर्मन्याया अप्रबुद्ध[2]. दशामुख नवळे
मरती तेजस्वी भटे[3] काळें फार केले गट
तों तो मोठा खोटा धट अधिकचि खवळे
नादें मेरु-कंदराग[4] सिंह त्रासी मंदराग[5]
करी भासे मंदराग[+] सेना-सिंधु ढवळे
रामें देतां पराभव वाटेना त्या खरा[6] भव[7]
खोटा हर्ष बरा भव[8] यशें विश्व धवळे ३२
इंद्रजितें ऱ्हाया नाश दाशरथी नाग-पाश-
बद्ध केले अजयास सुग्रीवादि रडले
खळ नेववी सतीस द्याया शोक त्रास तीस
शोची ती त्यांच्या गतीस कीं निश्चेष्ट पडले
त्रिजटा म्हणे न बध मोहा नाहीं झाला वध
आतां होतील सावध मूर्छेस सांपडले
धांवोनी ये पक्षिपाळ[9] सर्व-सर्प-कुळ-काळ
धाकें पळाले जे व्याळ[10] अंगा होते जडले ३३
मुख्य सेनानी[11] प्रहस्त[12] होता सेनेसह धस्त[13]
ज्याचें कर्म अप्रशस्त तो स्वयें करी रण
लक्ष्मणोरीं[14] ब्रम्ह-दत्त शक्ति हाणी महा-मत्त
त्या भंगीं होउनी यत्त[15] गम नहोतां क्षण
म्हणे त्या झालासि भग्न प्राण-संकटांत मग्न
उद्यां ये साधूनि लग्न रावणा वरें म्हणे
जाय पुरीं लाजे पाप चित्तीं स्मरे प्राप्त-शाप

---

१ वानर. २ अज्ञाता, नजाणता. ३ बोथडे. ४ मेरुपर्वताच्या गुहेंत रहाणारा. ५ मदोत्साह. ६ गर्दभा. ७ संसार. ८ जन्म. ९ गरुड. १० सर्प. ११ सेनापति. १२ नामविशेष. १३ नाशयुक्त. १४ लक्ष्मण-उर- लक्ष्मणाचेवक्षस्थलीं. १५ सज्ज. + मंदर-अग-मंदराचल.

पावे मोठा अनुताप  खोडी सोडीना पण  ३४
करवी दुर्गेचिं[1] त्राण[2]  उठवूनि महाप्राण[3]
कुंभकर्ण धाडी बाण— तसा वेगें तो निघे
लंघी प्राकार[4] पळांत  और्व[5] सिंधूच्या जळांत
तेसा त्या कीशों-बळांत[6]  वनीं वन्हीसा रिघे
पाहे भंगे जय लेश  न बळीं धरी बलेश
किमर्थ मिळतां देश  घ्यावे चावर[7] बिघे
शत्रु-सर्पाचा सुपर्ण[8]  जाय पुरीं घटकर्ण
सुकंठ छेदुनि कर्ण  दोनी तन्नासाहि घे  ३५
क्षोभे वाटे मूर्त काळ  त्याचे राम विश्व-पाळ
बाहु-पाद-कंठ-नाळ  तोडी बाणांनीं रणीं
बिभीषणाचे ते बोल  मिथ्या म्या मानिले फोल
मेला ज्या न लोकीं मोल  तो वीर-शिरोमणी
सिद्धीस न नेतां काज  गेला झाली मोठी लाज
हाय काय करूं काज  म्हणे लंकेचा धणी
बोले मत्त अतिकाय  ताता मर्त्य-भय काय
सर्वा म्हणवीतों हाय  मी पक्षींद्र ते फणी  ३६
अतिकायादिक शूर  पुत्र तेणें महाक्रूर
अमर्त्य-व्याळांचे धूर  महाबळ धाडिले
लक्ष्मणादिकांहीं पर  ते जरी अत्यंत खर
रणांगणीं नक्तंचर[10]  केले व्यस्त नाडिले
मेघनादें पुन्हा वीर  ब्रम्हास्त्रें ते महाधीर
दाशरथी योध-हीर  सर्व-मर्मी ताडिले
बिभीषण वात-जात[11]  दोघे न पावले पात[12]

---

१ किल्याचें. २ रक्षण. ३ बलाढ्य. ४ तटबंदी. ५ वडवानळ. ६ वानरसैन्यांत. ७ एकशेंवीसबिघेजेंक्षेत्रतें. ८ गरुड. ९ भार (समूह) १० रात्रीच्याठायींफिरणारे (राक्षस) ११ वायूपासूनझालेला (मारुती) १२ पतन.

अन्य ऋक्ष[1] कपि-व्रात[+] ते मूर्छित पाडिले ३७
ऋक्षेश सांगे उपाय मारुति वीरांचा राय
औषध्यद्रिप्रति[2] जाय आणी त्याचें शिखर
तद्गंधें विशल्य[3] योध झाले स्वस्थ लब्ध-बोध
शृंग[4] क्षणें अनिरोध नाप तसाहि खर
शृंग पावूनी ये तूर्ण करी स्व-जनाधि[5] चूर्ण
राम म्हणे यशें पूर्ण हो हें विश्वीं विखरे
कुंभकर्ण-पुत्र कुंभ ससैन्य दुजा निकुंभ
आले ते शुंभ निशुंभ तसे युद्धासि खर ३८
सुग्रीव वात-कुमार त्यांचा करिती संहार
मेळविती यश सार जें न प्राप्त वासवा[6]
मकराक्ष खरजात त्याचा अब्ज-बाणें घात
पाहोनी देवर्षि गात होते त्या महासवा[7]
माया-सीता-शिर च्छिन्न रामाचें हृदय भिन्न
सुग्रीवादि सर्व खिन्न करूनी शोकासवा[8]
पाजी शक्रारि हर्षास देव भ्याले त्या अरीस
कीं तो कल्पांतापरीस[9] वर्तला अघोमवा ३९
बिभीषण हरी खेद सांगे माया-तत्व-भेद
मग त्याचा शिरच्छेद वीर लक्ष्मण करी
पुत्र-शोकें पंक्तितुंड[10] तापे जैसें वन्हिकुंड
सीता माराया तो पुंड चंड[11] नग्नासि[12] धरी
स्मरे जानकी श्री-राम-चरण स्व-वध-काम
अति-निर्दय उद्दाम देखतां पुढें अरी

---

१ आस्वल. २ औषधि-अद्रिप्रति. ३ शल्यरहित. ४ शिखर. ५ स्वकीय जनाचीमनोव्यथा. ६ इंद्राला. ७ मोठ्यायज्ञास. ८ शोकरूपमद्य. ९ मनासबाधिलतसा. १० दशमुख (रावण) ११ भयंकर. १२ नग्न-असि-नागवीतलवार. + वानरांचेसमूह.

स्रूपार्श्व अमात्य त्यास  स्त्री-हत्या नरक-वास
देती ऐसी उक्ति त्रास— हेतु ऐकवी बरी  ४०
प्रेषी रावण कटक[1]  चतुरंग तें चेटक-
श्येनसे[2] विभ्र-घटक  राम-बाण भासले
बहुकोटी बहुलक्ष  महाबळ युद्ध-दक्ष
भिन्न होतां शिर वक्ष[3]  पडले ते पामले
उठले कबंध[4] फार  रडले राक्षस-दार[5]
झाले देव प्रिय गार  सर्व ताप नासले
मरतां राक्षस लोक  दशास्याच्या तो अस्तोक[6]
हृदयांत भंग शोक  लोह-कीलसा सले[7]  ४१
शोक-क्रोध-पराधीन  दशास्य विचार-हीन
निघे म्हणे मी वधीन  दाशरथी या रणीं
करितां विरथ रक्ष[8]  ईश्वर-शक्तिनें वक्ष[9]
लक्ष्मणाचें भेदी दक्ष+  तो नशके वारणीं
मोडी शक्तीनें काढून  राम त्या भंगी ताडून
देवदृष्टीचीं झाडून  मद फेडी पारणीं
ओषध्यग-शृंग[10] पेळ— मात्रे आणी महाबळ
उठोनि सजे तो खळ  रक्षोराज मारणीं[11]  ४२
भंगाचा नधरी वीट[12]  पुन्हा युद्धास ये धीट
तो उन्मत्त मानी कीट  नर-कीश-वर ते
राम प्रभु महीवर  दिव्य-रथीं रात्रिंचर
देखती स-महेश्वर  सर्व देव वरते
प्रेषी महेंद्र स्वरथ  तयावरी पुण्य-कृथ
चढे करी त्या स-व्यथ  झाले रक्त क्षरते[13]

---

१ सैन्य. २ चिमणी आणि श्येनपक्षीसे. ३ वक्षस्थल. ४ मस्तकरहित धडें. ५ राक्षस स्त्रिया. ६ मोठा. ७ लोखंडाच्या खिळ्यासारिखा. ८ राक्षस. ९ वक्षस्थल. १० ओषधि-अग-शृंग. ११ मारण्याविषयीं. १२ किडे. १३ स्रवते. + चतुर.

दोघेही परम क्रुद्ध अस्त्रज्ञ मांडीति युद्ध
अन्योन्यांस्त्र तेजोरुद्ध कोण्ही न उपरते ४३
रघूत्तमें मग खळ केला व्याकुळ निखळ
क्षतांतुनि खळखळ रक्त त्याच्या वाहिलें
भ्रमे मंत्रें जसा भूत स्यंदन काढी प्रभूत
क्रोधें तेणें स्फुज्ञ-सूत- कृत्य तें नसाहिलें
सारथि धर्म-स्मरण दे त्या तो हस्ताऽभरण
नगणूनियां मरण आरंभीं जें राहिलें
सक्रोधें सिंहें करीस जैसें शरभें हरीस
तैसें दशास्याअरीस रघुवीरें पाहिलें ४४
कुंभज मंत्र रामास सांगे वाढवी धामास
मूर्त रथीहि कामास पुरवाया दे वर
सप्त-अहोरात्रें रण ज्यांत विश्राम न क्षण
खळा धिक्कारुनी पण करी शची-देवर
जें खंडी तें उठे शिर पळ नलावी उशीर
शतदां भ्रमांत शीर म्हणे थकले वर
देव रामा बाण सोड हुं पुन्हा मस्तक तोड
म्हणतां होवूनी खोड पडे न कलेवर ४५
मातली म्हणे बा जाण जो ब्रम्ह-निर्मित बाण
तो याचे नाशील प्राण त्वदाज्ञा नमोडितां
श्रीरामा देतां स्मरण शत्रु पावाया मरण
नकरी काळ-हरण ब्रम्हास्त्रासीं जोडितां
झालें ब्रम्हांड सकंप तेजों-जित-शान-शंप

---

१ परस्परांच्यातेजानें कोंडलेले . २ मोगा. ३ नामविशेष(पक्षी) त्याणें. ४ सिंहास. ५ रावणाला. ६ अगस्त्यमुनि. ७ तेजास. ८ विसावा. ९ इंद्राणीचादीर ( राम ) १० नामविशेष ( इंद्रसारथि ) ११ तेजानें जिंकिल्या आहेत शंभर विद्युल्लता ज्याणें.

उसळे म्हणत संप नादें खळा सोडितां
होय शब्द कड्डड्ड दिगंतांत गडडड
दशकंठ धडडड पडे ऊर फोडितां ४६
पडतां दश-कंधर हत-शेष निशाचर
पळों लागले पामर ते कपींनीं मारिले
मत्त मद्य-मांस-पुष्ट देव-द्विजां-वरी रुष्ट
ऋक्ष-प्लवंगांहीं दुष्ट सर्व शत्रु सारिले
श्रीरामें मारुनी पाप दशास्य राक्षस क्ष्मोप[1]
देव-ब्राम्हण-ताप ऐसे सारे वारिले
केले चक्षुः[2] शास्त्र-पूत न स्पर्शले यम-दूत
झाले पूज्य पुरुहूत-लोकीं[3] भवीं तारिले ४७
झाली दिव्य-पुष्प-वृष्टी देवांची निवाली दृष्टी
आनंदें कोंदली सृष्टी दिव्यें वाद्यें वाजलीं[4]
पायलीं सद्वृंदें[5] मह[6] नाग-खग-मृगांसह
तेजें स-नक्षत्र-ग्रह- मंडलें तीं साजलीं
जयजयकार शत- कोटी प्रतिनाद तत[7]
त्यांहीं सत्य-लोक-गत गेहोदरें[8] गाजलीं
लाजले विघ्न सकळ दोष जाहले धिकळ
पडे दुःखांसि नकळ रामोत्कर्षे भाजलीं ४८
हर्षल्या चुकतां जाच अप्सरा करीती नाच
चारणांनीं स्तोत्र साच रामापुढें मांडिलें
गंधर्व-श्रेष्ठांचें गान संतर्पी सर्वांचे कान
राम-यश-पानें भान मुनींद्रानीं सांडिलें.

१ पृथ्वीपति. २ नेत्र आणि शास्त्रें यांहीं करून पवित्र. ३ इंद्रलोकीं. ४ संमरीं. ५ सत्-वृंद-साधुसमूह. ६ उत्साह (आनंद) ७ विस्तृत. ८ गेह-उदर-गृहाचे मध्य भाग.

करुनी राक्षस-क्षय संपादिला महाजय
रामें नामें भव-भय मूळाऽज्ञान खंडिलें
जैसें पृथ्वीचें वसन तैसें दुस्तर व्यसन
गोष्पदसें तें सहन करुनी ओलांडिलें ४९
मंदोदरीस+ काय नगणुनी मृदु पाय
तरी धांवल्याचि हाय वदत त्या बायका
म्हणती तूं सिंह शश देव प्रख्यात हें यश
झाली गति ऐसी वश होतां पुष्प-सायका
कोण तें संकट खोल स्नेहाचें उडालें ओल
काय अपराध बोल राक्षसांच्या नायका
श्रोतृ-चित्त सव्यथ न हो साही शोक-ग्रथन
साधुरीतीचें कथन प्रभूच्याचि आयका ५०
बिभीषणा-दयाघन म्हणे नापे माझें मन
करीं विलाप-शमन समजावीं या सती
माळा तापल्या गचीस तशा शोकाच्या कचीस
सांपडल्या ज्या शचीस मान्या दीना भासती
क्रिया प्रिया साधायास योग्या पापा बाधायास
जी गती ते लाधायास व्हावी प्राप्त यास ती
ममाप्येष-यथा तव ऐसें वदे सीता-धव
ज्याच्या नामें यशें भव-ताप सर्व नासती ५१
बिभीषण-श्रीमदुक्त प्रेतत्वा पासूनि मुक्त
जें करी तें कार्य युक्त साधी जैसा नंदन
पूजिला मातली पाय वंदूनी घेऊनि जाय

१ वरुण (समुद्र) २ स्वाधीन. ३ मदनाला. ४ ऐकणारांचें अंतःकरण. ५ व्यथायुक्त. ६ सहनकरी. ७ इंद्राणीस. ८ यथातवतथाममापिएषः म्ह० जसा तुझा तसा माझाही हा असा भाव. ९ सीतापति (राम) १० संसारसंबंधीसंताप. ११ श्रीमत्-उक्त. १२ पुत्र. + देह.

जेथें त्रिदशांचा[1] राय[2] तेथें दिव्य स्यंदन[3]
रावणाचा साधु-वर बंधु श्री-जानकी-वर-
प्रिय जो संताप-हर-गुण जैसा चंदन
लक्ष्मणाभिषिक्त[4] पद पावे ज्यांत नाहीं गद[5]
करूनि श्रीराम-पद-पद्मा भावें वंदन ५२
राम म्हणे मारुतीस बिभीषणाऽनुमतीस[6]
घेऊनि जा भेट तीस[7] अवसर[8] पाहुनी
सुग्रीव मी मदनुज[9] हा लक्ष्मण महाभुज
आह्मीं कुशल नीरुज[10] युद्धा यास साहुनी
भस्म झालें रक्षो-बळ[11] मेला दशकंठ खळ
त्याला दिलें तिळ-जळ बिभीषण बाहुनीं[12]
ऐसें सांगुनि तदुक्त ऐकोनी चे खरायुक्त
जैसा हंस लब्धे-मुक्त[13] मानमान राहुनी ५३
राम-विश्लेष-भीतेस[14] पाहे मारुनी सीतेस
जैसा मुमुक्षु गीतेस गुरूपदेशा[15] वरी
मागे प्रभूचा निरोप होवूं न दे वर्ण-लोप
जैसें कल्पद्रुचें रोप बहु जतन करी
संदेश-श्रीराम-सुख देवीस दे महाभाग्य
निर्धन देवाचा रुख भेटतां जयापरी
त्या संदेशाऽमृतें[16] धाय म्हणे त्रैलोक्याची माय
योग्य नाहीं द्यावें काय होय प्रसन्ना वरी ५४
मारुती म्हणे त्यावर मज आवडे हा वर
देतां न हात आवर ज्यांहीं तुज जाचेलें.

१ देवांचा. २ राजा (इंद्र) ३ रथ. ४ लक्ष्मणअभिषिक्त. ५ रोग. ६ बिभीषणाच्या अनुमतास. ७ सीतेस. ८ समय. ९ मत्-अनुज-माझा बंधू. १० निरोगी. ११ राक्षससैन्य. १२ बोलावून. १३ मिळालें आहे मोती ज्याला. १४ रामवियोगानें भ्यालेलीस. १५ गुरु-उपदेश-गुरूच्या उपदेशास. १६ निरोपरूप अमृतानें.

त्या या राक्षसी मारीन दुःख चित्तींचें सारीन
राहिलें पाप वारीन म्यां हें प्रिय यांचिलें
सीता म्हणे राम राम यांहीं केलें उक्त काम
जैसें अन्न मांस आम याचकातें याचिलें
दासींकडे काय दोष यांवरी नकरीं रोष
ज्यांत दया तेंचि तोष ह्याया कर्म वाचिलें ५५
सदुक्त ऐकोनि वात- पुत्र वंदी जोडी हात
म्हणे धन्य तुझी मात +कौतीसींच तोलती
युक्ता रामाची तूं धर्म- पत्नीवत् संयश- धर्म
विश्वाचें पावोनि शर्म शीलें साधु डोलती
सांग निरोप पतीस ऐसें प्रार्थी तो सतीस
जीच्या गुणाच्या ततीस नाहीं कांहीं मोल ती
तन्मूळें ज्या महायास वांछीत्यें त्या पहायास
पायांपाशीं रहायास ऐसें झाली बोलती ५६
कपि सीतोक्त रामास अर्पी तो भक्ति- धामास
कथुनी तिच्या कामास पुरवाया आणावी
बिभीषण सरमेस सांगे सत्यच रमेस
अळंकार परमेस यांया आधीं न्हाणवीं
शिबिकेंत ती वाहून स्वयें जवळ राहून
येत्या प्रभूतें पाहून पाय आली जाणवी
तीकरवीं अग्नि- स्नान करवूनी शुद्ध- ज्ञान—
मूर्ति जीचें लोक स्थान त्या शंकेतें खाणवी ५७
ब्रम्हादि देव गंधर्व योगी ज्ञान- सिंधु शर्व
शुद्धत्व वर्णिती सर्व देव व्योमीं राहुनी

१ हिरवें. २ उत्तमयशोरूपकवच. ३ कल्याण. ४ विस्तारास. ५ महादेव. + वेदामींच.

अग्नी स्वयें आणी तीस  स्थापी रोमांकीं[1] सतीस
शोभे शोभवी पतीस[2]  दिव्य प्रभा लाहुनी
पुत्रातें सबहुमान  तात सोडूनी विमान
आशीर्वाद शतमान  दे आलिंगी बाहुनीं ५८
सीतेचें पवित्रपण  एणें जय-प्रद रण
पावला सिद्धीस पण  आनंदलों पाहुनी ५८
श्रीरामातें म्हणे शक्र  उद्धरीला हस्तीं चक्र-
धरें त्वां वधूनी नक्र  जैसा तैसा हा जन
गर्व-विषाच्या उरवास  मारूनी दशमुखास[3]
देवराज श्री-सुरवास  केला भव्य भाजन
राघवा तूं साऽनुराग  सभाग्यांत महाभाग
कांहींतरी वर माग  घडोंदे सभोजन
सागर तूं अन्य कूप  तकीरीट दीपुरूप
त्यांहीं त्वसदाचें भूप  करूत नीरांजन ५९
ऋक्ष कीश झाले प्रेत  तेणें माझें खिन्न चेत
ते उठीव मृत-शेत  जैसा ऊठवी घन
ऊठवीले जैसे सुप्त  सद्गुण नहोतां लुप्त
होते प्रभु-प्रेम-गुप्त  ते जेविं लुब्ध धन
वंदिती प्रभु-चरण  ज्यांहीं वरिलें मरण
पावे करीतां स्मरण  विस्मया त्याचें मन
होवूनी आनंद-वश  गाजवीती दिशा दश
म्हणती श्रीरामें यश  दिलें भक्त जे जन ६०
विभिषण म्हणे पाव  माझा त्वत्सत्कारीं भाव
भक्त-वत्सल हें नाव  प्रभो तुला साजतें.

---

१ सम-अंक-रामाच्या मांडीवर. २. दशरथ. ३ पात्र. ४ आरती, ओंवाळणें. ५ लोभी. + पूजन.

श्रीरामा त्यां बलहीन   बंधु-त्यक्त जैसा जीर्न
तारिला व्यसनीं दीन   यश विश्वीं गाजतें
राम म्हणे मद्वियोग   वत्सा भरता हृद्रोग
त्यावीण भोगाचा भोग   बापा मन लाजतें
मना तुझें हरिशील   केलें फार करीशील
जें त्वच्चित्तीं बरीशील   इष्ट राहो आज तें   ६१
सकीश सुग्रीव पूज   यांत मत्पूजन तूज
सख्या सांगितलें गूज   नशकें रहावया
आतां मला न होकर   बापा उपाय तो कर
जेणें पावेन लौकर   भरता पहावया
करी तसेंच तो धीर   पूजी सुग्रीवादि वीर
कीं भक्तांच्या नसे धीर   वियोगा सहावया
यश मेळवी धवळ   जेवीं सुधेचा कवळ
शीघ्र आणवी जवळ   पुष्पका वहावया   ६२
रक्षःकपीशांचा हेत   जाणुनि तयांचें चेत
हर्षवी सैन्या-समेत   त्या सख्यांतें घेउनी
सदार साऽनुज राम   पुष्पकीं विश्वाऽभिराम
भक्तकल्पद्रुमाराम   बैसे स्तुती सेउनी
निज-विजयाचा हेतु   महा-पाप-धूमकेतु
सीतेतें दाऊनि सेतु   अत्याश्चर्य देउनी
युद्ध-वियोग-चरित-सुधा कर्णांत भरित
जाय गुहेतें त्वरित   भान लया नेउनी   ६३
श्रीचा पूरवाया काम   तारेतें आणवी राम
मुख्य-स्त्रियांसह धाम   सोडुन ती पातली
वेदाचें मानिती उक्त   सर्व श्रोतें व्हाया मुक्त

१ जीर्ण ( म्हातारा ) २ राक्षस आणि वानर श्रेष्ठ त्यांचा. ३ भक्त-कल्पद्रुम-आराम- भक्तांची कल्पवृक्षांची बाग. ४ गृह.

मानूनी प्रभूचें युक्त  देवरासीं रातली
साध्वींच्या पंक्तींत ठाव  पावलें जयेचें नाव
रामीं शुद्धप्रेमें भाव  भाग्यें नाहीं मातली
श्रीमत्प्रीयेनें ती फार  आदरूनीयां उदार
गणासह परिवार  पुष्पकांत घातली  ६४
श्रीतें सांगे शत्रु घूक  सूर्य तो हा ऋष्यमूक
जेथें वियोगाची हूक  सुग्रीव-मंत्रें शमे
हे पंपा सरसी जाण  येथें तापले मत्प्राण
त्वद्विश्लेषीं काम बाण  हाणी काळसा गमे
स्वच्छ स्वच्छीलसें अर्ण  पद्म त्वदाननवर्ण
पिके तापवाया कर्ण  पंचम विष वमे
कांते हा मतंगाश्रम  येथें गेला माझा श्रम
शबरी उडवी भ्रम  चित्तींचा मनोरमे  ६५
चारकोस ज्याचे हात  हा त्या कबंधाचा घात
करी तुझा दीर वात  जैसा तरूचा सये
तो हा घट येथें तात  जटायू पावला पात
नाकीं तद्यश गातात  जयाचा वीट नये
या गोदेलें प्रणिपात  करीं तीर्थ तीर्थव्रात
इच्या पोटीं म्हणे मात— रवलं महादये
जीचें अमृताऽवदात  तोय सर्वदा अयात
याम पंचवटी शांत-  स्वनी हे शुभायशें  ६६
कुंभजाचा मनोरम  शरभंगाचा आश्रम
हा अत्रीचा जेथें श्रम  आमुचा नगाहिला
तो हा चित्रकूट-गोत्र  ज्याचें पुण्यप्रद स्तोत्र

१ दिरासीं (सुग्रीवासीं) २ घुबड. ३ सरोवर. ४ उदक. ५ त्वत्-आनन-वर्ण. ६ कोकिळ. ७ तीर्थसमूह. ८ गोदेच्या. ९ अमृतासारिखेंशुद्ध. १० सुखाचीखाण. ११ अगस्तीचा. १२ चित्रकूटपर्वत. + स्वरभेद. ॐ मातः अवलं- आइ रक्षणकरतं.

साधूनीं जो अग्निहोत्र तैसा प्रेमें पाहिला
कालिंदीतें हस्त जोड श्रांता इचें नाम लोडें
इणें करूनियां रोड महामोह दाहिला
ज्याचे देव-मान्य दास भरद्वाजाचा आवास
हा दे दोषा जैसा त्रास पक्षींद्र महाहिला ६७
गंगेतें डोळे भरून पहा नमन करून
संकटाब्धीतें तरून आलीस इच्या बळें
सीते करीती हे धन्य भक्ता असें तीर्थ अन्य
नाहीं ताप भव-जन्य सर्व वारिती पळें
उद्धरीती नित्य लक्ष जीव नम्हणतां रक्ष
लाजविलें गुप्ति-दक्ष पीयूष इच्या बळें
देती पीतां मुक्ति-पद गंगाप्लवें मोह-गद
केला तेजें ध्वस्त-मद जैसा तो कळी तुळें ६८
हें गुहाचें शृंगवेर सीते तें साकेत हेरें
नमस्कारीं वाटे येर पूर यापुढें दुजें
याचें शक्राधिक रूप त्राते सिंधु अन्य कूप
लोभें झाले भग्न भूप फार करूनी झुजें
बहु मान्य हें हरीस नाकींच्या पुरापरीस
वाटे वृत्राच्या अरीस पद आपुलें खुजें
देवि शरयूंत स्नान करीशील सुधापान
देसील अर्थिष्ट दान प्रिय पूरेल तुझें ६९
कपी पाहती उडून ते नभासती उडून
आनंदाब्धींत बुडून आले-देव वानिती
सुग्रीव राक्षस-वरें नभीं गेले दूरवर
मिळाला दुर्लभ वर ऐसें मनीं मानिती

---

१ श्रमकेल्यास. २ लोडासारखें विश्रांतिप्रद. ३ मोहरूपरोग. ४ अयोध्या. ५ पहा. ६ अर्थि-इष्ट. ७ उड-ऊन- नक्षत्राहूनकमी. + इंद्रास.

श्रीरामाची सेवा-जोड पुरवीती सर्वे कोड
शक्राची संपत्ति गोड नव्हे मोटी हानि ती
म्हणती हर्षोनि जय कीर्ति महा लाभें नय-
धर्मज्ञेशा प्रभुरेय- मेवं भाग्य वानिती ७०
श्रीभरद्वाजाचे पाय वंदी प्रेमें रामराय
तो म्हणे मी करूं काय प्रिय सांग वासरा
श्रांत-तृषीतांही पान करीतां त्या तृप्तिदान
देतां मानूनीयां होन वीट नयावा सरा
केलें देव-द्विज-कार्य सखा मानुज सभार्य
आलासी नीवाले आर्य जोडाया नर्मासरा
भरता-शत्रुघ्ना-सह पावा द्या स्वाश्रिता मह
करा दीनीं अनुग्रह भीतांस व्हा आसरा ७१
कल्पद्रुमाधिकसेव नता मुक्ति-सुख मेव
म्हणारा राम देव सद्धूतें आठवी
जेवीं शंकर गुहास नेवीं सुसखा गुहास
सुखें कराया सुहास मारुतीनें पाठवी
राम-सेवा-लाभ-रत निषाद तोही भरत
सात्विक भाव स्मरत दयाघना आठवी
असता तरी पाहून वेगें हर्षातें लाहून
रोमांच देहीं वाहून तो स्पर्शना पाठवी ७२
पायीं मस्तक ठेवून चित्ता आनंद देवून
आज्ञा मुनीची घेवून दृष्ट कराया बळें
फळ-समृद्धि हा वर मागोनि तो क्षमावर
चढे व्योमयानीवर भेटे गुहातें पळें

१ धर्मज्ञ-ईश-धर्मजाणत्यांचा स्वामी. २ प्रभुः-अयं-एवं-प्रभु हा असें. ३ हानि. ४ सरोवरास. ५ दिवसास. ६ आनंद. ७ सेवनकर. ८ कार्तिकेयाते. ९ कोळी. १० विमानावर. + कल्पद्रुम-अधिक-सेव-कल्पवृक्षापेक्षां अधिक सेवा ज्याची असा.

तयासह निघे मग तोयद[1] चातक-खग-
सह जैसा सर्व जग तर्पाया प्राज्यें जळें
पादुका शिरीं स्मरत स-गुरु-जन भरत
आला प्रेमाऽश्रु क्षरेंत[2] बाष्प-निरुद्ध-गळें ७३
उतरे यानावरून पायीं पादुका वरून
भेटे उरासीं धरून त्या साऽनुजा तापसा
नाहीं हर्षविला चीर वाहून चरणीं शीर
म्हणतां बा मागें फीर ऐसें करी तापसा
त्याचा हरी सर्व खेद बोले प्रिय जैसा वेद
तुरवी तिळही भेद बहु द्रवे बापसा
जोडी गुरुजना हस्त पौर तोषवी समस्त
ज्याच्या नामें होती ध्वस्त वैरी महापाप सा ७४
नंदिग्रामीं तो श्रीरंग भरतादिक अभ्यंग
सर्व-लोक-शोक-भंग करावया करवी
स्वसख्यांचे युद्ध[4]-क्लेश नाशी स्वसमान-वेश
रम्य-रूप मानवेश रामचंद्र धरवी
कपि-राक्षस-भटांस संगर-रंग-नटांस
जय-मंगल-घटांस आणी शोभा बरवी
स्व-श्री-सुधाऽंबु-वृष्टीस करी मातांच्या दृष्टीस
राम समस्त सृष्टीस पुरीं जातां भरवी ७५
शिरे साकेतीं गेहांत दीप कीं प्राण देहांत
लेश न्यूनत्व स्नेहांत न प्रयासें दाविलें
करूनीयां बहुमान प्रार्थूनी देवासमान
वित्तेशा[5]कडे विमान रामभद्रें लाविलें

१ मेघ. २ स्रवत. २ सहा (कामादि) ४ मानव-ईश. ५ वित्त-ईश-कुबेराजवळ.

सामें कैकेयीचें मन निववी तो दयाघन
मंथरा-दुर्मत-वन- वन्हिनें जें ताविलें
अभिषेचितां स्व-याज्य देतां श्रीवसिष्ठें राज्य
विश्वें आपुलेंचि प्राज्य भव्य भाग्य भाविलें ७६
युवराज तो भरत केला जो न लोभ-रत
ज्याचें हृदय भरत जाय भक्तिच्या रसें
करूनी तेजो-विस्तार हरूनी शोकाऽब्धि-भार
चित्तें हृष्टें केलीं फार सूर्यें जैसीं सारसें
रामें प्रजा प्रजासेम पाळिल्या न त्रासी यम
मानिति पावुनि शम न कैवल्य सारसें
ज्याच्या गेहांत यदुक्त वेद ज्यातें ध्याती मुक्त
तत्क-सभिधान-युक्त लग्न सुंज वारसें ७७
विश्व-गीत राम-राज्य ज्यांत पूरुषार्थ प्राज्य
जैसें स्करभीचें आज्य पूज्य सर्वसेर्पितें
अमृताचें यश काय सेवील्या म्हणवी हाय
करूनी अजर काय देवांतेंचि तर्पितें
पंक्ति-भेद करी खळ छेदवी राहुचा गळ
विषय-सेवना बळ मत्तपण अर्पितें
नाहीं दया जया लेश मेल्या दावीतें स्व-देश
देतें अर्थिजना क्लेश साध्वमान्य दर्पितें ७८
ऋषि भेटले रामास जयश्री-क्रीडा-धामास
प्रेमें त्या पूर्ण-कामास कुंभसंभव स्तवी
देव-गो-ब्राम्हण-काळ मारीला राक्षस-पाळ
केला विश्वाचा सांभाळ ,कीर्ति गातील कवी

---

१ राजाच्याहातारवालीं कामकरणारा (दिवाण) २ कमलें. ३ अपत्यतुल्य. ४ मोक्ष. ५ श्रेष्ठसें. ६ सकलघृतांतें. ७ जरारहित. ८ गर्विष्ठ. ९ अगस्त्यमुनि. + साधु-अमान्य.

बुधा तुझी कथा-माय क्षुधा इच्यापुढें काय
इतें आयके जो गाय त्या हे सर्वदा नवी
धाक काळा भैरवास तुझा आम्हीं स्वैर वास
करूं जगा-कैरवास तूं प्रभो शीतच्छवी ७९
उग्र रावणापरीस मेघनाद जो हरीस
जैसा शरभ हरीस धरी संगरीं बळी
श्रीरामा-मीनाचा दाश लीलेनें करितो नाश
शत्रु-कंठीं काळपाश तो तैसा पाडि च्छळी
करूनीयां सत्ता पद घेना शक्र-दत्तापद
हा दुःसहसंत्तापद जेवीं स्वयुगीं कळी
त्याचा सुदुर्घट अंत करें काळाऽहीचा दंत
उन्मूळीला झाले मंत या यशांबुजां अळी ८०
श्रवणीं धरूनी काम पुसें रक्षःकथा राम
सांगे सत्तपःश्री-धाम कुंभभू महामती
ब्रम्हज पुलस्त्य-सुत तो विश्रवा साधु-नुत
वैराग्यादि-गुण-युत ज्याची स्वधर्मी रती
त्या दे कन्या भरद्वाज सुमालीही रक्षोराज
ती कैकसी मुनिजाज यक्ष-गुह्यक-पती
त्याचें नाम वैश्रवण दुजीचे पुत्र रावण=
कुंभकर्ण बिभीषण तीसरा भला अती ८१
दशानन निशाचर तपें होमी शिरें रवर
ब्रम्ह्यापासूनी घे वर कपी नर नगणी
शत्रु-सर्पाचा सुपर्ण निद्रा मागे घटकर्ण
बेगड घे त्यजी स्वर्ण भ्रमवीला त्याक्षणीं

---

१ स्वच्छंद. २ जगद्रूपकमळास. ३ चंद्र. ४ इंद्रास. ५ सिंहास. ६ कोळी. ७ इंद्राला दिलीं आहे विपत्ती ज्याणें. ८ यश-अंबुज-कीर्तिरूपकमळीं. ९ अगस्त्य. १० सापूर्भास्कत ११ भ्रमर. १२ दुःसह-सत्-तापद-सोसण्यास कठीण असा सापूलासं ताप देणारा. १३ मुनिजा-ज ऋषिकन्येपासून झालेला

विभीषण वरी धर्म पावे चतुर्मुख शर्म
त्या पाहोनी क्रूर कर्म अमरत्व दे धणी
कुंभकर्णाऽनुजा नाम जीचें शूर्पनखा धाम-
महाबळाचें जी काम- रूपा होय देखणी ८२
अग्रजाचें तात-दत्त लंकापद हरी तेंत-
दसत्कर्म करी मत्त होय वरांच्या बळें
विश्वकर्म्याचा सपत्न मय त्याचें कन्यारत्न
केलें स्व-कलत्र यत्न- परें दशास्यें खळें
कालकेय जो दानव विद्युज्जिव्हाख्य तो धव
शूर्पणखावरी सव भंगावे जेणें छळें
वैरोचन-कन्या- नाव तिचें वज्रज्वाळा भाव
कुंभकर्णीं धरी वाव मानी ती अन्य स्थळें ८३
शैलूष गंधर्वेश्वर तत्कन्या सरमा वर
तीचा बिभीषण हर शैलपुत्रीचा तमा
वंदूनि गुरुचे पाद पुत्राचें अविसंवाद
नाम ठेवी मेघनाद की त्याचा तैसा घमा
मांजे राक्षसांचा राय लागे कराया अन्याय
ऐके श्रीदे म्हणे हाय धाडी दूताऽऽस्यें क्षमा
धर्मे माझा मरवा गर्व झाला या नाधर्मी गर्व
अधर्मे बुडतें सर्व नव्हे आपली रक्षा
संदेशें कोप प्रभूत यावें मारी श्रीद-दूत
नावरे क्रोधाचा ऊत जाय अग्रजावरी
शस्त्राग्नींत यक्ष-होम करूनी यक्षेश सोम
राहु तो पुष्पक व्योम- यान तयाचें हरी

---

१ शत्रु. २ आपलीस्त्री. ३ यत्न. ४ पार्वतीचा. ५ प्रतिबंधरहित. ६ कुबेर. ७ महादेव. ८ पृथ्वी. ९ निरोगानें. १० पुष्कळ. + तत्तत्-असत्कर्म- तेंतेंबाईटकाम.

झालें तें विमान रुद्ध हास्यें नंदीश्वर क्रुद्ध
होय शापी कीं न शुद्ध- बोधातें मनीं धरी
विश्व-वंद्य जो कैलास तशा उन्मूळी शैलास
रुद्धबाहु त्या बैलास चिर महेश करी ८५
भेटे स्तवें सोडी रोष अर्पी खड्ग आशुतोष
ज्याच्या नामें महादोष भस्म होती तो वळे
रावण हें ठेवी नाम शापानाश्य आशु वाम-
देव दे असे न काम— प्रद अन्य कोंवळे
वेदवती सती शाप दे जळें दावि प्रताप
कीं करी स्पर्शोनी पाप अवयव ओंवळे
नी श्रीसीता तूंही विष्णु विश्वत्राना प्रभविष्णु
त्वद्दास सदैव जिष्णु त्वद्गुणचि सोंवळे ८६
दीक्षित मरुत्त युद्ध नकरी होउनी क्रुद्ध
संवर्ताज्ञा मानी शुद्ध यशा भूप तो अरी
म्हणे म्यां जिंकिला भूप मी सिंधु हा तुच्छ कूप
भक्षी ऋषी कालरूप मोठा अनर्थ करी
गाधिज सुरथ दुष्यंत गय पुरूरवा संत
म्हणती भंगलों अंत त्याचा नचित्तीं धरी
अनरण्या हांसे पाप रावण त्या तो दे शाप
केली दाऊनि प्रताप वाणी त्याची त्वां खरी ८७
नारद रक्षःपाळास म्हणे जिंकावें काळास
बळी सोडुनी बाळास मानी वीर नच्छळी
भंगी तो यम-भटास जैसा मुद्गर घटास
कीं सिंह करि-घटांस, करी काळासीं कळी

१ पुष्कळप्रकारानीं होणारा, किंवा विश्वाचें उत्पत्तिस्थान. २ इंद्र. ३ विहीर. ४ हस्तीच्यासमूहांस. + शाप- अनाश्य- शापानेंनाशनपावणारें असें.

पाडी नरकातें ओस  ब्रम्हा सांगे बा हें सोस
माझें वाक्य नहो फोस  राहो दंड हा. बळी
काळ-गुप्त होय राय  राक्षसांचा म्हणे काय
माझ्यापुढें अन्य जाय  अन्यत्र जैसा अली ८८
गर्व दे आत्म-मतीस  जिंकूनि भोगवतीस
दुर्बळ सर्प-पतीस  मानी रावण मनीं
निवातकवच योध  करी तत्पुरीचा रोध
पेटे तदा त्याचा क्रोध  जैसा दावाग्नी वनीं
ब्रम्हवाक्यें तयांसह  सख्य सोडुनि आग्रह
साधी मायांचा संग्रह  मान्यता दैत्य-जनीं
कालकेयाचाही मोड  रणीं जयाची ही जोड
शूर्पणखा-भर्त्या दोंड  मारी संगरीं घनीं ८९
वरुणाच्या पुरा जाय  तत्पुत्रांचा समुदाय
भंगी तेथें वंदी गाय  सुरभी जीच्या पयें
झाला विशाल क्षीरोद  त्यांत श्रीसह प्रमोद
युक्त करीसी विनोद  रामा विष्णु तूं स्वयें
ब्रम्ह्याच्या लोकीं वरुण  ऐके हें तो निष्करुण
नेत्रें जयाचीं अरुण-  वर्णे मत जो जयें
देवर्षि-राजर्षि-नाग-  कन्या हरी जोडी आग
शापीती करिती राग  नकांपे शाप-भयें
जोडोनी विजय थोर  जाय लंकेंत तो घोर
शूर्पणखा ताडी स्वोर  रडे वदे फार हा
भ्राता म्हणे वीरलोक  झाला त्याचा मोठा शोक
तुला शोकद हें ओक  खरापाशीं जा रहा

१ पोल. २ भ्रमर. ३ हाड. ४ क्षीरसमुद्र. ५ लाल. ६ अप राध. ७ स्व-उर- आपलेंवक्षस्थल. ८ स्थान.

जनस्थानातें ती जाय  मावसी खराची माय
काहीं काळजाचा घाय  पावे परीहार हा
ऐसें दशास्याचें कर्म  वाटे ज्या अधर्म धर्म
धाता वेर-वज्र-वर्म  दे त्या तोही मारहा  ११
श्रीशुक्रमुखें जपून  मेघनादानें खपून
सिद्धि साधिली तपून  हें ऐकिलें रावणें
म्हणे तो योगेंचि वित्तें  व्हावें तप-महावित्त
कठिण निश्चळ चित्त  योगमार्गीं लावणें
कैसें सोसलें भूतल्प  या फळा लागाया कल्प
वत्साला घडलें अल्प  काळें कसें पावणें
जाणोनी मोठा उत्कर्ष  पावोनी अत्यंत हर्ष
प्रेमाऽश्रु सोडिले वर्ष  भारी जसें श्रावणें  १२
बिभीषण सांगे त्यास  बा, म्यां केला जळीं वास
कुंभकर्ण तो आवास  निद्रेचाचि हा सदा
योगीं यागीं नित्य मग्न  मेघनाद ध्यान लग्न
तों झालें महत्व भग्न  जें नभंगलें कदा
माल्यवंताची जी नात  या घनध्वानाची आत
नेली मधूनें या लात  हाणिली तुझ्या पदा
परस्त्रीहरण छळ  त्याचें झालें प्राप्त फळ
भंगा पापकर्मा स्थळ  शून्य वन श्वापदा  १३
हें ऐकतां कोपे फार  तो घे अक्षौहिणी चार
सहस्र निघे विचार  दुजा चित्तीं नधरी
मधुवनाप्रति जाय  कुंभीनसी धरी पाय
द्रवे राक्षसांचा राय  तीच्या त्रासातें हरी

---

१ पंचवटीतें. २ वररूपवज्रकवच. ३ शिव. ४ तपकरून. ५ पृथ्वीच्या ठायींनिजणें. ६ वृष्टि. ७ श्रावणमहिन्यानें. ८ रहाण्याचेंस्थान. ९ नामविशेष ( राक्षस ) त्याची. १० इंद्रजिताची. ✝ लंपट.

तीणें भेटवीला कांत झाला दशानन शांत
पावोनी कैलास प्रांत उतरे त्या भूधरी
नळकूबर दे शाप कीं न कांहीं गणी पाप
रंभेपरी यातुक्ष्माप नो बळात्कार करी १४
गेला अमरावतीस जिंकाया शचीपतीस
प्रार्थी विश्वाच्या गेतीस तेव्हां वृत्राचा अरी
विष्णु म्हणे त्रास सांड जा त्या रावणासीं भांड
काळीं संहारीन मांडे त्याचा सारा मी हरी
ऐके वैकुंठाचें उक्त होऊनी स्व-सेना-युक्त
होय भंग-शंका-मुक्त महायुद्धातें करी
धराया राक्षस-पाळ झटे पाक-जंभ-काळ
मेघनाद भेका व्याळ तैसा देवेंद्रा धरी १५
केला राक्षसांचा क्षय झाला दिक्तुंडाचा जय
पावे फार स्वर्ग भय नेला लंकेला धणी
मोठे जंभ वृत्र पाक त्यांचा ऐसा नाहीं धाक
भ्याला मेघनादा नाक जैसा पक्षींद्रा फणी
नावडे भोजन रोज पडलें काळजा वेज
देवौघ-नागांचें तेज जाय नेतां तो मणी
ब्रह्मा म्हणे शक्र सोड वत्सा इष्ट वर जोड
मागे अमरत्व गोड हें दे पुरीच धणी १६
धाता म्हणे तूं सत्तोक इंद्रजित् तुजला लोक
म्हणोत न द्यावा शोक मेघनादा वा वळ
अमरत्व न भूवर देतों मी आत्मभू वर
घरें यांजूनीयां वैरें ऐसेंचि, ज्याचें फळ

१ राक्षसराज. २ विध्वंस. ३ माडुणावळ, सिद्धता. ४ नामविशेष दैत्य त्यांचाना शकर्ता. ५ दशमुखाचा (रावणाचा) ६ स्वर्ग. ७ सर्प. ८ छिद्र. ९ सत्- तोकउत्तम अपत्य. १० पृथ्वीवर. ११ घे.

मागें अग्नींत शतांग[1] जन्मो होतां होम सांग
त्यावरी बैसतां गांगें[2] धवळ जैसें जळ
तैसें मिळो यश रण— रंगीं नघडो मरण
शत्रूचें प्राण हरण घडो मोठें दे बळ १७
तथास्तु म्हणे लोकेश शक्राचा बंधन-क्लेश
वारी भंग दुःख-लेश— मात्र बोधें उडवी
अहल्या-धर्षण-फळ झालें कर्मापुढें बळ
न चाले न चुके पळ भोग तेज बुडवी
रक्षी कन्या-रत्न-न्यास दे पुन्हा नधरी आस
म्या प्रसन्नें दिली त्यास तुला लोभ[3] जुडवी
काम झाल्याही बल्लव करी न हित तल्लव[4]
विवेक स्वर्द्रु-पल्लव लोभ-हस्तें खुडवी १८
पापें झाला पराभूत वैष्णवें अध्वरें पूत[5]
होऊनी तो पुरुहूत[6] पुन्हा स्व-पदावरी
राम पुसे जेव्हां क्रूर रावण नदर्व चूर
करी ऐसा काय शूर नव्हताचि भूवरी
कुंभज[7] सांगे अर्जुन सहस्रबाहु अर्जुन
जो प्रख्यात तो अर्जुन[8] लीलेनेंची या धरी
शक्र म्हणे झालें युक्त पुलस्त्याचें मानी उक्त
बंधनापासूनि मुक्त करूनि सोडी अरी १९
दशास्य-गर्वाची राख करी वाळीचीही[9] काख
तो त्या वंदी म्हणे राख[10] दे अभय हो सखा
ऐसे पावोनि आयास प्रार्थी कीशांच्या रायास[11]
तो त्या आज्ञा दे जायास. म्हणे कपींतें नखा

१ रथ. २ गंगेचें ३ ठेवा. ४ तत्-लव. ५ पवित्र. ६ इंद्र. ७ अगस्त्य. ८ संपादून. ९ दडवून. १० रक्षणकर. ११ वाळीस. + स्वयंपाकी अथवा गवळी.

नोही खां मारीला खळ रामा रक्षीला सकळ
लहाणा सेविजे बळ नारसिंहाच्या नखा
सुरवें कोडीं न मातील प्रेमाऽश्रु-भरें न्हातील
चतुर्मुखादी गातील या युद्ध-महा-मखा १००
राम म्हणे शत्रू भेक सर्प तस सुधासेक
हनूमान समर्थ एक याणें मातें तारिलें
याच्या प्रतापेंचि खेर्व करूनी हरूनी गर्व
राक्षसांचें सैन्य सर्व रण-रगीं मारिलें
न दीलें अभय दान शौर्य स्व-पक्षाऽभिमान
तरी सुग्रीवाचें कां न येणें दुःख सारिलें
वाटे स्व-सामर्थ्य-ज्ञान नव्हतें देहाचें भान
व्हाया विश्वीं यशो गान न व्यसन वारिलें १०१
मुनी म्हणे ऋषी-शाप तेणें याचा या प्रताप
न समजे जैसा साप तेणें मंत्रें भारिला
गिळूं खां हा महाबळ उडे सूर्या मानी फळ
सांगे राहु रुसे खळ शक्रें वज्र मारिला
पाडितां मूर्छित बाळ वायु क्षोभे जैसा काळ
मोह सत्य-लोक-पाळ-हस्त-स्पर्शें वारिला
देवानीं वज्रशरीर केला हा भास्करें धीर
तत्प्रसादें यशें वीर विश्वांत विस्तारिला १०२
शक्रादिक लोक-पाळ ब्रम्हा नोही काम काळ
वराही वायूचा बाळ पूजितां पूज्यास या
विश्वकर्मा वदे अस्त्र किंवा मन्निर्मित शस्त्र
याच्या देहीं पुष्प वस्त्र होऊं न देऊं भया
केलें अत्यद्भुत काज दीलीं वेगें मना लाज

१ ब्रह्मांडीं. २ लहान.

म्हणे यशीं मातें साज शत्रु नेऊनी तथा
ऋक्ष-वानर-गणांत ज्याचा संग न पणांत
झाला विजयी रणांत तुझी होतो वा दया १०३
मुनी ऐशा कथा फार सांगे करी कर्ण गार
निघत्यातें नमस्कार घाली जानकी-पती
म्हणे स्वामी झालों धन्य या युष्मद्दर्शनें अन्य
मज ऐसा न राजन्य मद्वशा नसे क्षिती
या सर्व अश्वमेधास पुन्हा हर्षवा हा दास
साधूंच्याचि सहवास—सुखानें निवे मनी
ऐसें प्रार्थी रघुराय वारंवार वंदी पाय
पूजूनी पाथिव जाय ते मागती ज्या गती १०४
बहुमान्य सनकास जो त्या पूजी जनकास
वश केलें मन कास घालूनीं जेणें सदां
अर्ची मातुळातें राम जयाचें युधाजिन्नाम
राजे झाले पूर्ण-काम गेले आपुल्या पदा
कपी कपि-राजसह राक्षस तन्नाथ मेह
पावले कीं सुखावह यश-देत्यांच्या सदां
लेववी सर्वांतें सार सहस्रें रत्नालंकार
कल्पवृक्ष जे उदार त्यांच्या लाजवी मदा १०५
वात-वाळी-पुत्र वीर अंकीं रणरंग धीर
घे प्रेमें करुणा नीर-निधी वर्णूनी वरें
स्व-मूर्तीवरील मग काढी भक्त-कल्पनग
लेववी तयांसी नगे दिव्य आपल्या करें
पूजिले गणेश स्कंदे जैसे जगल्लताकंद

---

१ नागा· २ उत्सव· ३ मांडीवर· ४ भक्तकल्पतरु· ५ अलंकार· ६ कार्तिकेय· ७ जगत्-लता-कंद·

रूपें स्वगुणांहीं छंद उदन्वन्मुखें[1] हरे
आज्ञा जाया स्वस्थळास बाष्प-निरुद्ध गळास
दे कीश-रक्षो-बळास आलिंगूनी आदरें १०६
हनुमान् म्हणे हा वर देतां न चित्त आवर
त्वद्दास दीन यावर असावी कृपा सदा
तुझ्याठायीं असो स्नेह माझ्या भक्तीस हें गेह
तव-यशःपानीं देह- भान नसावें कदा.
जोंवरी त्वत्कथा-काय तोंवरी असावा काय
मत्ते म्हणवावें हाय जन्म मृत्यु या गदा[4]
अप्सरांहीं गावें यश मनो मृगें व्हावें वश
या सिंव्हा हो काम शश या दया-सुधा नदा १०७
तथास्तु म्हणे ऊदार आलिंगी कंठिंचा हार
घाली गळां द्रवे फार राम जैसी माउली
ग्रीष्मीं मरूदेशीं वाट मध्यान्हीं क्रमितां पाठ
शीत-शीतांबूचा दाट न्यग्रोधाची सांवली
अथवा[6] अकस्मात्ताप नाशाया हराया पाप
अतिक्षम जीचें आप[7] ती श्रीगंगा गावली
सोडीतां तीतें जे कष्ट झाले तदधिक स्पष्ट
त्यजिली सुरभी नष्ट- भाग्यांहीं जी पावली १०८
पुष्पक ये कीं त्या देव म्हणे आत्मजे त्या सेव
राम म्हणे माझी ठेव तूं चिंतितां ये वरें
गर्भिणी विश्वाची माय होय तीतें रघुराय
पुसे प्रिये इच्छा काय तर्पूं[8] कोणत्या वरें
ती म्हणे तया वनास पाहावें वाटे मनास

---

१ उदन्वत-मुख- समुद्रमुखें. २ गृह. ३ शरीर- . ४ रोगाला. ५ वडाची.
६ अत्यंतसमर्थ. ७ उदक. ८ तृप्त करूं.

द्याया तेथील जनास वस्त्रें रत्नें जीं वरें
निंद्रा ऐकोनी सतीस टाकी तच्छुद्ध मतीस
वाटे प्रार्थिलें पतीस त्याजें तें केलें खरें १०९
झाले तीन चार मास तेव्हां पाठाया श्रमास
वाल्मीकीच्या आश्रमास ती लक्ष्मणें पाविली
मुनी तीचा वारी ताप स्नेह करी जैसा बाप
नक्षोभली अभिशाप- रावें जरी ताविली
विप्राऽधीतें वारायास लवणातें मारायास
जातां आर्यें तारायास शत्रुघ्नातें दाविली
तो पुत्र-द्वय पाहून रात्रिं आश्रमीं राहून
निघे हृदयीं वाहून प्रीति-लता लाविली ११०
तो सोडुनी बाण-वर्ष खळ मारी विप्रां हर्ष
दे रची मधुरा वर्ष तरावें तों लागलें
प्राचेतसाचा आश्रम पावे तेथें नाय श्रम
जेथें त्यक्त-वैर-भ्रम सर्व सत्वें वागले
पीतां कुश-लव-गीत राम-यश झालें शीत
शत्रुघ्न-हृदय प्रीत तत्सैन्यही जागलें
प्रभु क्षिप्र पहायास स्वीकारूनी महाऽयास
आले दूर रहायास जरी होतें भागलें १११
रामाचे वंदूनि पाय पुन्हा मधुरेसि जाय
शत्रुघ्न करील काय आज्ञा पाळणें पडे
द्वारीं ठेवी मृत बाळ विप्र म्हणे धरापाळ
दोषें खातो प्रजा काळ गांकें तपोनि रडे
श्रीनारद करी बोध राया राष्ट्रीं स्वयें शोध

---

१ लोकापवादरूप वणव्यानें. २ नामविशेष दैत्यातें. ३ बाणवृष्टी. ४ वाल्मीकीचा ५ आणि + मधुरानगरी.

अधर्माच्या मार्गा रोध शूद्र-तपें हें घडे
स्मरतांचि ये विमान बैसे भास्करासमान
शोधी लंघी पवमान तैसा अरण्यें कडे ११२
पाहे वृक्षीं लंबमान स्वर्गार्थ जो धूम्रपान
करी शूद्र त्याची मान खंडी निस्त्रिंशें खरें
होतां शंबूकाचा काळ उठे तत्काळ तो बाळ
वर्षे पुष्पें नाकपाळ म्हणे बा केलें बरें
कुंभोद्भवातें वंदन करी श्री-रघु-नंदन
तो वदे पक्षि-स्यंदन तूं हें मद्वाक्य खरें
त्वद्यश पावो न लय गुण-चंदन-मलय
मूर्त हें दिव्य वलय अलंकारावें करें ११३
ब्रम्ह-लोक-वासी श्वेत भक्षी नित्य निज प्रेत
त्याच्या उद्धारें साकेत- पाळ विस्मया वरी
इक्ष्वाकूचा पुत्र दंड नामा विरजेचें लंड
तो व्रत बुडवी दंड तस्तिता शक्र करी
पांसु-वर्षे बुडे देश मरे तो जनपदेश
सत्व सर्व पावे क्लेश नेथें न धैर्य धरी
दंडकारण्य हें नाम झालें ऐसीकथा राम
ऐके मग आत्म-धाम पावे दुष्टांचा अरी ११४
बंधुस पुसे विचार राजसूय यज्ञ सार
वर्णिती ब्राम्हण फार मत तुमचें वदा
भरत जोडुनि हात म्हणे यांत भूप-घात
तूं या लोकां जैसा तात तैसा पाळिसी सदा
श्वोलूकांचा केला न्याय मांगावी स्वरूपा काय

---

१ वायू. २ विष्णू (गरुड ज्याचा रथ.) ३ कडें. ४ धुळीच्या वर्षावानें. ५ जनपद-ईश-देशाचा स्वामी. ६ आणि. ७ आपलें गृह. ८ श्वा-उलूक- कुतऱ्याचा आणि घुबडाचा. + खड्गानें.

भजा न म्हणोत हाय तुझ्या गाऊन पदा
अश्वमेधही नसाच त्याहूनी हा हित साच
यांत तैसा नाहीं जाच या दया-सुधा-नदा ११५
लक्ष्मण म्हणे प्रताप अश्वमेधीं भारी पाप
वृत्र-वधें घडे ताप शक्रा जो त्या हो हरी
राम वदे वत्सा साच याचा महिमा असाच
स्त्रीत्व दोषांतूनी हाच इला राजा उद्धरी
गुर्वाज्ञा घे रघुवीर नैमिषीं गोमति तीर
तेथें यज्ञवाट धीर मतें भरत करी
सौमित्री फिरवी हय संपादी सर्वत्र जय
कोणालाही न दे भय झाले सर्व जे अरी ११६
सर्वत्र धाडिले दूत आले आहूत नाहूत
रक्षःकीश-पती पूते व्हाया शीघ्र पातले
धांवला शत्रुघ्न तूर्ण विप्र राजे झाले पूर्ण
केले दोष-नग चूर्ण रामें सुखीं घातले
गोमतीच्या तटीं वाट वाल्मीकीचा जेणें थाट
केली तीणें आटोकाट मन्मुक्तासीं रातले
तीवर्णाची कथा काय शूद्रांचेही समुदाय
रामाचे पाहूनी पाय अत्यानंदें मातले ११७
अत्युदार गुण-पात्र राम-मूर्ति-तुल्य-गात्र
रामायण गाया छात्र वाल्मीकीनें लाविले
ऐके स्वसभेंत राम आदिकाव्य पुण्य-धाम
कर्त्यांचें त्याचेंही नाम पुसे पुत्र भाविले
प्राचेतसातें स्व-काम सांगे प्रार्थी मेघश्याम

१ अश्वमेध. २ नामविशेष अरण्यांत. ३ यज्ञस्थान. ४ बोलावलेले. ५ पवित्र. ६ वाल्मीकीतें. + शिष्य.

दिव्योत प्रकटी धाम¹ तीं कीं प्राण नाथिले
सीता क्षमोदरीं जाय⁺ प्रभूनें म्हणोनी हाय
शोकक्रोधें जेविं काय भोग जना दाविले ११८
समजावी चतुरास्य भित्तीं आवरूनी हास्य
कुशा लवा सांगे दास्य त्या शोकातें मालवी
हेमेमयी² सीता राम पार्श्वी घे अन्य स्त्री-काम
सोडी पावाया विश्राम नाना यज्ञ चालवी
ऐसे अयुत-वत्सर करी सन्मीन³-सत्सर
जे लोभ मद मत्सर ते दिगंतीं घालवी
यज्ञांत अर्थिजनास अर्पाया इष्ट-धनास
हृष्ट कराया मनास यशोंचळें⁴ पालवी ११९
माता पावल्या गतीस नाकीं भेटल्या पतीस
झाल्या शक्राच्या सतीस मान्या कीं त्या सासवा
वर्णू तद्गुनी मी काय ज्याचे मुक्ति-प्रद पाय
तो करी विश्वाचा राय उत्तरक्रिया सर्वा
देव सांगती स्त्रियांस दशरथाच्या प्रियांस
करूनियां सत्क्रियांस आत्मा दास भासवा
वाढवूनि बहु मान देणारा अभय-दान
यांच्या नंदनासमान नाहीं अन्य वासवा १२०
चवघांचे पुत्र आठ⁼ शत्रूला न देते पाठ
त्यांला सर्व विद्या पाठ राज्यपदीं स्थापिले
भरतें रणीं गंधर्व तीनकोटी महागर्व
सवर्तास्त्रबळें सर्व लोक वैरी कापिले
तक्ष पुष्कळ कुमार दोंपुरींत कुकुमार

१ तेज. २ स्वर्णरूपा. ३ सुधारूप नत्स्याला उत्तम सरोवर. ४ यश-अंचल-कीर्ति रूपपदरानें. ⁺ क्षमा-उदर-पृथ्वीच्यापोटांत. ⁼ सीता * अवगत

स्थापूनी शत्रूंचें वीर महातेजें दापिले
जे अंगद चंद्रकेतु रक्षिते मर्यादा-सेतु.
त्यांहीं देश वृद्धि-हेतु पुरद्वयें व्यापिले १२१
बोले विप्र-रूपी काळ मंत्र तुजसीं जों बाळ
तों जो प्रवेशील बाळ तो मारावा यापरि
लक्ष्मणातें सांगे राम विप्राचा कराया काम
वसे त्या रहस्य धाम द्वारीं दुष्टांचा अरी
यावें वैकुंठ-लोकास ऐसें दयेच्या ओंकोस
प्रार्थी तो घाया शोकास दुर्वासा म्हणे जरी
वारीतोसि देतों शाप मत्ता पहा मत्प्रताप
पुढें धांवे तुझा बाप आज्ञा मस्तकीं धरी १२२
सौमित्रित्रासें शापास जैसा मंडूक सापास
सांगे श्रीराम-क्ष्मापास श्रीदुर्वासा पातला
काळा नीरोप देऊन रामें धांवत येऊन
पायीं मस्तक ठेवून प्रेमें जेवूं घातला
मुनी जेवूनियां जाय राम चित्तीं म्हणे हाय
पण त्याज्य नव्हे काय वधूं न हा मातला
सुज्ञमतें वध त्याग समसंकटें न भाग
गुरु सांगे जाणे डाग शोक मनाआंतला १२३
काळें पडवीलें आग सौमित्री न धरी राग
करीतां श्रीरामें त्याग सरयू-तीरीं बसे
रामभद्राच्या मनांत सर्व-साकेत-जनांत
जेविं दावाग्नी वनांत शोक सारीरवा धसे
पुढें सांजली राहून देव प्रसाद लाहून
नेती विमानीं वाहून वर्णिती बंदीतसे

---

१समूह. २स्थानास. ३रामराजास. ४अपराध. ५ भाटसे.

राम म्हणे मला राज्य ज्वरार्ताला[1] जसें आज्य[2]
जानों मीही दुःख भोज्य[3] सुख साकेतीं नसे १२४
भरतातें म्हणे दक्ष आहेस राज्यातें रक्ष
तो वदे हे पाय लक्ष सत्सुखाचे आकर
चातक सोडील काय मेघांऽबु देवांचा राय
म्हणेल न म्हण हाय घे अमृत आकर
मी तुझ्या दास्यंचि धन्य नावडे राज्यादि अन्य
सेवील सोडुनी[4] स्तन्य कैसा बाळ साकर[6]
दे पादाऽब्जसंनिधान[5] हेंचि माझें सन्निधान
तुझा देतां द्युदान नचें आळसा कर १२५
अयोध्यापुरींचे लोक पावले अत्यंत शोक
सोडुनि स्व-नोक[7] ओक[8] सारे गळां पडले
दुःखें मोकलूनी धाय हृदयीं धरूनी पाय
अंगणीं म्हणोनि हाय वृद्ध बाळ रडले
होणार वियोग माय ज्याला नाहीं ऐसे पाप
काळजा अत्युग्र ताप नैमे त्यांच्या जडले
राम अभय दे त्यांस तोडी संसाराचे फांस
भरवी बोधाचे[9] घांस ज्यांला क्लेश पडले १२६
उत्तर कोशल-देश तेथें राम मानवेश[10]
दोघां पुत्रांतें न क्लेश ज्यांत ऐसीं दे पुरें
अहो-रात्र-त्रयें पूतें[11] शत्रुघ्ना भेटले दूत
त्या वृत्तें अश्रु प्रभूत[12] त्याच्या सेविलें उरें[13]
सुबाहु नंदन ज्येष्ठ शत्रुघाती नरश्रेष्ठ

---

१ज्वर-आर्त- २ घृत. ३ पुष्कळ ४ दुग्ध. ५ चरणकमलाचें सांनिध्य. ६ सत्व-निधान-उत्तमनिधान. ७ आपली अपत्ये ८ स्थान. ९ ज्ञानाचे १०मानव-ईश. ११ पवित्र. १२ पुष्कळ. १३ वक्षस्थलानें.

साधुनीति-कीर्ति-मेघ वर्षाले सुखें सुरें
दोघांतें राज्य देऊन एकाकी येऊन
समाची भेटी घेऊन म्हणे सेवातें तुरें
आले ऋक्ष कपि-वीर सुग्रीवही महाधीर
बिभीषणा प्रभु धीर म्हणे तूं सुखें रहा
मारुतीतें सांगे राम माझ्या कथांहीं विश्राम
पाय ठेवीं सुखीं क्षम धैर्यें वियोगा सहा
मैंद द्विविद ऋक्षेश तयांतें करी निदेश
कल्या गमतां अक्लेश देश सोडावा न हा
निघे सर्वांसह साम गानें पावाया स्वधाम
पावे सरयूतें राम घ्याया देवातें महा १२८
आले ब्रम्हादि बिमान गंधर्व करीती गान
झाले दिव्य-वाद्य-ध्वान नाचती वराप्सरा
करूनि सरयू-स्नान धरूनी श्रीराम-ध्यान
शोभविती व्योमयान सर्व वरूनि त्वरा
सुप्रसन्न पद्मनाभ जो तो सूर्य रात्रिपाभ
झाला दिव्य-रूप-लाभ श्वाना शूकरा खरा
स्वीकारी स्वायुध वेश श्रीराम देव देवेश
त्याकाळीं सात्विका वेश नारदा झाही हरा १२९
सरयूंत गोप्रतार तीर्थ अत्यंत उदार
तत्स्पर्शें दिव्य मार्जार आखु सर्प कावळे
झाले पिशाचही नीट श्वपचांना नाही वीट
लाजले पाहून कीट स्वर्ग देव आवडे
ऐसें विलोकितां चित्रें भासे नाकी-वृंद चित्र

१ हिरा २ आज्ञा ३ दिव्यवाद्यांचे शब्द ४ उंदीर ५ रोषे ६ आश्चर्य
+ चंद्रासारिखा ✱ आनंदाने.

यशें त्या देवर्षिमित्र कवी केले बावळे
आलें अद्भुत कानांत ज्याच्या राहिलें ध्यानांत
साधु स्नानांत पानांत हेंचि स्वर्गी चावळे १२०
रम्य संवानक लोक नित्यानंद-संपदोक
ज्यांत कांहीं नाहीं शोक त्यांतें स्थापी ते जन
करूनी षड्शत्रु भग्न कीर्ति-सुधा-रसीं मग्न
आत्म-पद-ध्यान-लग्न करी तयांचें मन
ठेवी देवूनि विश्राम ताराबया दास नाम
सेवी श्री-वैकुंठ धाम भक्त-मयूर घन
यश साधूंच्या मनीस वाढवावया रतीस
जैसें शंभु दे सतीस कल्पवृक्षाचें वन १२१
सागरांत जळकण देतां काय भावे पण
घनाक्षर रामायण रामभद्रा वाहिलें
तुळसीचें एकदल वाहे वंदूनी दुर्बळ
रत्न-पूजा-पुण्य-फल त्या हे ग्रंथीं पाहिलें
यश विश्वातें सकल शरणागत-वत्सल
पापि-पावन निर्मल हें व्यापुनी राहिलें
चित्तीं न धरिला राग केले सर्व महाभाग
मोठें आत्म-निंदा-आग तेही शीरीं साहिलें १२२
कोणी समर्पिती फल कोणी तुळसीचें दल
कोणी गोड स्वारें जल कोणी पुष्पें चंदन
कोणी विधियुक्त पूजन करूनी स्वन्न भोजन
अर्पिती सभाग्य जन वाजी हस्ती स्यंदन
कोणी निर्मिती भवन कोणी करीती स्तवन

१ वेडे. २ नित्य-आनंद-संपत्-ओक. ३ आत्मनिंदारूप अपराध. ४ विधियुक्त. ५ सु-अन्न-भोजन-उत्तम अन्नयुक्त पान. ६ रथ.

कोणी साष्टांग भव न· साधावया वंदन

सर्व हे सारखे दास नेतो उत्तम-पदास
बंध अन्य-वरदास राम रघु-नंदन १२३

श्रीरामासि घनाक्षर- रामायण पद्य अर्पिला भावें
ज्याच्या चरितांत अमृत जैसें दुग्धांत सर्पि लाभावें १

हातीं न चित्त वित्तहि नघडे जप तपहि शब्द बुद्धि नसे
परि हरिजनहा प्रभुच्या हृदयीं तुमच्याहि वत्सलत्व वसे २

ज्याचा यशापुढें कवि- वर म्हणति सुधाब्धि चाल वो वींची
तो प्रभु नर-रीति धरी तैसा हा ग्रंथ चाल वोवीची ३

समाप्त·

## पृथ्वीछंदरामायण·

रमोपतिस निर्जर स्तविति पीडितां रावणें
नसे उचित पन्नगें गरुड- संश्रितां चावणें
विपज्जलधिच्या तटीं प्रभुवरें नता लावणें
तुलाचि अतिवत्सला सुकर धावणें पावणें १

विधि- प्रमुख आर्त जे अभय दे तयांतें मग
स्वयें दशरथात्मज प्रकटहि होय हर्षे जग
सुनाम धरि राम तो प्रथम दाविल्या विग्रहें
दुजा भरत लक्ष्मण त्रितै चतुर्थ शत्रुघ्न हें २

दिला कुशिक- नंदना दशरथें नृपें राम हा
महास्त्र-शत घे मुनि प्रवर- दत्त पोषी महो
महा गुरुसि रे पथीं वधुनि ताटका वीसवा

१ ब्रह्म· २ लक्ष्मीपतीविष्णूस· ३ देव· ४ विपन्न-जलधि- विपद्रिरूपसमुद्राच्या· ५ करावयासयोग्य· ६ पीडित· ७ शरीरें ८ विश्वामित्रास· ९ तेजास १० आनं-दान· + कहरि· ** तिसरा· * इंद्राला·

[1]सवा जपुनि हर्षवी मथुनि सेविले आसवा[2] ३
तयावरि समुद्धरी पदरजें अहल्या शिळा
यशें कथि असें जळो अघ[3] मदंघ्रिसी या[4] मिळा
प्रताप करि शत्रुचा हर-धनुष्य-भंगें शिळा
वरी जनकजा बळें निवथि तो भृगूंचा[5] टिळा[6] ४
पुरासि चवघी सुना जनकजा नृपें आणिल्या
महोत्सव-सुधा-ह्रदीं सकळही प्रजा न्हाणिल्या
वसिष्ठमुनिला किती दशरथा किती गाधिजा
किती स्तविति त्या पुरा रघुकुळा त्यजी आधि ज्या ५
स्व-मातुळ-कुळा सुधी भरत जाय पृथ्वीहिता
प्रभूसि युवराजता गुण-गणज्ञ योजी पिता
न केकयसुतेस तें सुखद होय राज्या मिता
भुले सुतमणीस[7] दे वन वरा वराया चिता ६
प्रभूत्तम मनीं म्हणे परम वत्सला मावली
पितृ-व्रत-सुरक्षणें[8] यश मिळावया पावली.
चतुर्दश समा वसों विपिनिं सर्व-पापाऽरि घे
प्रियाऽनुज हरावया सकळ-विघ्न-तापा निघे ७
पिता[9] स्वरथ पाठवी वरि सुमंत वाहे रिते
[10]निकाय पडले तदा वदति पौर ही हे रिते
रथा फिरवि पावुनि प्रभु सुरापगेच्या[12] तटा
वटाहि करि धन्य तो रचि पयें जयाच्या जटा ८
गुहें उतरिला प्रभु त्रिदश-सिंधु-पारा तया
दयार्णव पुसे निघे करि सुखी भरद्वाजया

---

१ यज्ञास. २ मद्यास. ३ पातक. ४ गतरम्यखंड. ५ भृगुकुलीमान्याचा.
६ श्रेष्ठ(परशुराम)त्याला. ७ पुत्ररत्न रामयास. ८ दशरथास. ९ वर्षे. १० गृहें.
११ हाय. १२ सुर-आपगा—भागीरथीच्या. ** मद-अंघ्रि. + कैकेईने पा
हणारे. # निकानें.

तरुनि यमुना नदी चढुनि चित्रकूटाचला
पलाश विभवी महामुनिजनांत आणी कला ९
सुमंत कळवी जटा रचुनि चित्रकूटीं नगीं
कुमार वसले असें नृप न लाभ पाहे जगीं
म्हणे वससि काननीं प्रियकरा शिशो केधिं रे
सुखें म्हणत राम हा सुकृत- राशि शोकें विरे १०
नृपें असु विसर्जितां भरत आणिला सत्वर
भरें कथि तया कृत द्रुत न लंघितां चत्वर
तिचा तनय तो करी जरिहि साधु कुत्सा हया
कशा नंसि विलंघना कुमति दे न उत्साह या ११
तिला त्यजुनि जाय तो सुमति राम-मातेकडे
रडे नमुनि तत्पदें विकळ होय मोहें पडे
दडे न निज कर्म या दुखवितात कांटे खडे
घडे विधिबळें म्हणे न सुविवेक तीचा दडे १२
यथाविधि सुधी करी गुरुमतें स्व-तात-क्रिया
निघे शरण जाय तो म्हणत वत्सला स्वप्रिया
पथीं प्रभु-सखें गुहें अडवितां म्हणे हाय तें
शृंगिबेर कथि जान्हवी उतरि नौपथें आयतें १३
परिक्षुनि निरोप दे पद-नता भरद्वाजही
न लक्ष्मण भला म्हणे धरि धनुष्य कांपे मही
तया प्रभु म्हणे उगा भरत हा नसे वावगा
मला फिरविणार या सुमतिचा असा भाव गा १४
वसिष्ठजननी पुढें करुनि अग्रजा वंदन

---

१ राक्षस २ कांतीः ३ प्राण. ४ माता (कैकई) ५ आंगणें. ६ निंदा. ७ घोडयास. ८ दैववशानें. ९ नौकामार्गें १० दार्थें. ११ अभिप्राय. + चाबूक

प्रसन्न मति व्हावया करि तसा जसा नंदन
स्व-तात-गति जी कथी भरत आयके साश्रु ती
अशोक म्हणती जया कवि जगन्निवासा श्रुती १५
पित्यासि जळ अर्पिल्यावरि पद-द्वयांतें धरी
करी विनवणी दयामृत-निधीस नानापरी
तयासि समजाउनी प्रभु म्हणे वनीं सारितों
चतुर्दश[2]-समाप्ति यो[3] न तव लोचनीं वारि[4] तों १६
असेंचि ऋषि बोलती त्रिदश-विप्र-काल-क्षया
मनीं धरुनि जाहल्या स्व-गुरु-पादुका लक्ष्य यो
जळेन दहनांत मी अवधि लंघितां हा पण[6]
प्रभुप्रति कथी निघे नमुनि तां म्हणे हा[8] पण १७
द्विजादि-वदनें पुरीं जरि जपोनि बोहे[9] रहा-
वया तरि बसे जटाधर तपोनि बाहेर हा
वरी प्रभु-नमस्कृत[10] प्रिय मदार जें अत्रि तें
वशीकृत[11] न एकनें[12] सुयश न द्वितें[13] न त्रितें[14] १८
नमी जनकजा प्रिया बहु जसी सुता[15] धाकुटी
महामुनि-सतीहि दे तिस अयातयामा[16] उटी
तसीच कुसुमावली तिलक कांत[17] वेणी रची
निघे नमुनि ते गमे अदिति-वर्धित-श्री शची[18] १९
धरी जनकजेसि जो खळ मृगीस जैसा हरी[19]
करी सु-पद-पात्र त्या वधुनियां विराधा हरी[20]
गतीच्छु[21] शरभंग भूसुरें[22] तयासि दे राम ती[23]
नती करुनि उद्धरी शुचि-तपीं जयाची मती २०

१ वेद. २ चवदावर्षेचि. ३ येवो. ४ उदक. ५ भरताप्रत ६ प्रतिज्ञा. ७ हाय. ८ परंतु. ९ बोलावी. १० रामचंद्रानें नमस्कार करणें. ११ वशीकरण. १२ एकानें. १३ दुसऱ्यानें. १४ तिसऱ्यानें. १५ कन्या. १६ जाचेरून मऱ्हरगेल्या नाहीं असी (ताजी असा भाव.) १७ सुंदर. १८ इंद्राणी १९ सिंह. २० राम. २१ गति-इच्छु-उत्तमगतीइच्छिणारा. २२ भूदेव (ब्राम्हण) २३ नति.

सुतीक्ष्ण घटजाऽनुज-प्रमुख-तापसांचीं शतें
नतें त्रिजगदीश्वरें निववलीं गुणौघें ततें
न तें सुख यश व्रती वरिति हें कवींच्या मतें
यतेंद्रियमनस्क जे म्हणति ते मिळालीं क्षितें ७१
जयार्थ धनुरादि जें शतमखें दिलें आणुनी
सुशास्त्र घटयोनि दे प्रभुसि तत्वता जाणुनी
जटायु गुरुचा सखा सुखवुनी स्वयें गौतमी-
तटीं वसुनियां तिला म्हणवि जाहलें धौत मीं
कुधी दशमुख-स्वसा कपटसुंदरी ये वरा
वदे तदपराध तो खवळि जानकी-देवरा
करी महिसुतेहुनि स्व-गुण-वर्णना साहसा
सुरांप्रति म्हणे सुधी हरुनि कर्ण नासा हसा
खराहि मथि जो वधी मुनिजना वनस्था नया-
त्यजी जय असो म्हणे प्रभुवरा जमस्थान या
सुवर्ण-मृग दाखवी दशमुख भमाया सती
धरूं पतिस पाठवी द्रुत अदभ्रमायाम ती
वनीं न मृग यां तु हें समजतांचि मर्मीं खरें-
शरें क्षत करी प्रभु क्षिति-सुता नरोर्जस्वरें
खरें व्यसन मानुनी प्रभुसि हा म्हणे देवरें
वरेंहि कुथिनी वदे कटु जया न मावें गरें
त्यजी उटज लक्ष्मण स्मरुनि रामभद्र क्षण
स्व-धैर्य-सह जी वदे बहु दुरुक्ति नद्रक्षण

१ विस्तार पावलेल्यानें. २ यत-इंद्रिय-मनस्क-जिंकिलीं इंद्रियें व मन ज्यांहीं ते. ३ अगस्त्यऋषि. ४ शस्त्र ज्याचा. ५ स्वच्छ. ६ रावणाची बहीण शूर्पणखा. ७ सीतेच्या दिराला (लक्ष्मणाला.) ८ खर नामक राक्षस. ९ अतिशय माया ज्याला असा. १० राक्षस. ११ नर-आर्त-स्वर-आहिरणाच्या शब्दाप्रमाणें शब्दानें. १२ कटु. १३ विष. १४ पर्णशाला. १५ नत-रक्षण-यामीं तेचें रक्षण. + बुजाली, मिटली. ॥ छिद्र.

तशांत दशकंठ जो परम-दुष्टधी तो यती-
स्वरूप धरि ये हरी सुविकळा सती होय ती २६
तदार्तरव ऐकतां धरि जटायु धी मारुणी
सुतेसि लघु सोडवी करुनि भग्न भीमा रणीं
कृपाण वरि जावया वरुनि उग्र पाप क्षया
करी विकळ खंडुनी त्वरित गृध्रपा पक्ष या २७
जरी विरथ विक्षत क्षतजे धैर्य तेंही गळे
पळे खळ नभःपथें हरुनि तीस पापें मळे
त्यजी प्लवग-पंचकीं जनकजा अलंकार तीं
अशोकवन पावली खलहृता अलंकारती २८
वधूनि कुणपाऽशना रघुपती त्वरेनें फिरे
स्वदुःख कथि लक्ष्मण प्रभुहि ऐकतां तें शिरे
विलोकुनि विशोकही उटज शून्य शोकीं शिरे
विलाप करि ऐकतां हृदय देवतांचें चिरे २९
वनीं हुडकितां क्षताकुल जटायु तो देखिला
मनीं परम घात त्या परमवत्सलें लेखिला
दशास्य हरि मत्स्नुषा करुनि मत्क्रेच्छेदना
असें कथि मरे वधू-हृदिं नसीच त्या वेदना ३०
तया करुनि दाह दे प्रभुहि पुत्रसा पिंड तो
अशा परमवत्सला न भजतां भवीं हिंडतो
कबंध धरि साऽनुजा भुवन-रंजना भक्षणा
नराहि गति अर्पितां नलिनि कंज-नाभ क्षणा ३१
करूनि स्वविमान तो रविसुता सकंठा सखा

---

१ सन्याशाचें स्वरूप. २ हरणकरी. ३ तत्-आर्त-रव-त्यासीतेचा पीडायुक्तशब्द. ४ भयंकर. ५ तलवार. ६ रक्त. ७ पांचवानरांमध्यें. ८ शोभादेणारी. ९ राक्षसा. १० पर्णशाला. ११ मत्-स्नुषा-माझीसून. १२ नामविशेष (राक्षस.) १३ कमल[illegible]नाभीं[illegible]झाले तो राम. + मत-गरुत्-छेदन-माझ्यापक्षछेदना.

करीं करिल कार्य हें कथुनि जाय लंघून खा
तशीच शबरीसही गति भली दिली पावनें
हिनें गमति नंदनोपरिस ती दिलीपा वनें ३२
असह्य विरहीं गमे प्रभु-मनास पंपादि ती
निज-प्रसव-वैभवें असुख होय संपादिती
मरुत्तनय भेटतां सुहित कंजनोभास ती
यशें करुनि जाहली अदिति अंजना भासती ३३
मरुत्तनय राघवा तरणि-सूनुला भेटवी
करी सुगल-सख्य तो सविधि अग्निनें पेटवी
समस्त नग दाखवी प्रभुसि रक्षिले आयते
कथी अनुज नूपुरें म्हणविती तया हाय तें ३४
करी बहुत सांत्वन प्रियसखा तया तो म्हणे
त्यजीं न निजधैर्य बा सकल-धीर-चूडामणे
प्रिया हरुनियां जपे वडिल बंधु अंता पहा
तरी कपिहि साहतों धरुनि धीर संताप हा ३५
तुझी प्रियतमा तुला वधुनि रावणा सानुगा
असंशय रघूत्तमा त्वरित भेटवीतों उगा
पुसे प्रभु सविस्तर व्यसन ऐकवी आपलें
सकंठ-करुणाऽब्धिचें हृदय ऐकतां तापलें ३६
वधू हरुनि ज्या खळें अनुज भक्तही वाळिला
करूनि सुगळा पुढें प्रभु वधी तया वाळिला
सख्यासि कपि-राज्य दे सुमति तीहि तारा वया
विलोकुनि असें करी कळवि तेज तारावया ३७

---

१ आकाश. २ नामविशेष (राजा) त्याला. ३ आपल्या फलपुष्पादिकांच्या ऐश्वर्यानें. ४ संपादन करणारी ५ मरुत्-तनय-वायुपुत्र (मारुती) ६ कमलना भजो रामा याला. ७ नामविशेष (मारुतीची आई) ८ अलंकार ९ [illegible] १० नूपुर. ११ संकट. १२ टाकिला - नंदनवनापरीस.

दयाळु युवराजही करि तदात्मजा अंगदा
सुकंठ मग मेळवी कपिचमू दिषेस्संगदा
सतीस हुडका म्हणे करुनि एक-मासाऽवधी
निदेशा चुकतांचि जो परम उग्र दासा वधी ३८
कपी भ्रमुनि दिक्त्रयीं श्रमुनि खिन्न ते पातले
कृतावधिविलंघनें इतर संकटीं घातले
प्रवृत्ति कथि जी म्हणे निज असूसि संपा तितें
पहा उडुनि सागरा मरण वारि संपाति तें ३९
उडे पवनभू म्हणे मनिं तयास मैनाक वी
क्षितीश करितां स्तुती गमति कीर मैना कवी
शिरूनि सुरसामुखीं वधुनि सिंहकेतें हरी
समुद्र शतयोजनें करुनि गोष्पद श्रीवरी ४०
पराभव करूनियां प्रथम जोडि लंका करा
सतीस अवलोकित्या दशमुखाहि पंकाकरा
निरखून कुधी निघे स्तवि यशः समुद्रा हरी
भ्रम श्रमहि दे हरी नमुनि तीस मुद्रा हरी ४१
करी हरि तुरं वनीं तरु रणीं चमू अक्ष तें
घनध्वनिस सांपडे मग कलेवरं अक्षतें
जरी अजित मान दे कपि पितामहास्त्रा रणीं
वृथा विकळ होय तो पटु न बंधनानें गणी ४२
सभेंत वचनें वदे जनकसा अघातोचितें
दटावुनि कथावया पटु तया अघा तोचि तें

1 राजाच्या हातारवालचा मुख्यकार भारी. २ द्विपत-भंग-द-श
२ त्र्याचानाश करणारी. ३ आज्ञा. ४ कृत-अवधि-विलंघन-केलेल्याम
वींदेच्याउल्लंघनानें. ५ धानी, शोध. ६ नामविशेष (पर्वत) ७ पक्षि.
८ बानर (मारुती). ९ हल्ला. १० पंक-आकर-चिखलाची खाण अ
सा. ११ मुद्रिका, आंगठी. १२ नामविशेष (रावणपुत्र अरवया) १३ इंद्रजिताम
१४ अघात-उचित-घातनकरण्यामयोग्य असो. १५ पातरूपीरावणाला.
+ हरणकरी.

विभीषण वधूं नदे गणुनि तुच्छ तो[1] खापर
स्वबल्क करु पेटवी धरुनि पुच्छ तोरथा पर ४३
पलोश[2]-धृति ने पुरी मति करूनि होळी लया
म्हणे द्रुहिण[3] धन्य[4] तूं इतर कोण चोळील या
सुगीर्ण हुनि निर्जर-श्रुतिस हर्ष दे हा कृपी
सुरर्षि यश तें करी अमृतवर्ष दे हाक पी ४४
महेश-ऋर-दीस जें विझवि पुच्छ तें अर्णवीं
रमा परनता म्हणें यश महन्मुखें वर्णवी
जयें निववि अंगद-प्रमुख सर्वही तो हरी
करी प्रभुवरापि जो गुरुगिरी तया मोहरी ४५
कथी कुशल देउनी प्रभुवरासि चूडामणी
प्रसन्न बहु होय त्या वरद-वत्सल-ग्रामणी
सुदुर्लभ मुनीस जो प्रभु कपीस तो[10] खेंव[11] दे
तदीय भुज-विक्रम स्तउनि धन्य तोखें[12] वदे ४६
निघे प्रभु म्हणे अरीवरि मदांध हो धावरा
स्कंठ भर देत ज्या बळसरस्व[13]दोधा बरा
कपी करिति गर्जना प्रळय-मेघसे नाचती
गमे गिळिल त्या बळासह खलास सेनाच ती ४७
अतित्वरित पावला रघुकुळेंद्र पृथ्वीपटा[14]
तया लवणसिंधुच्या कपिबळासिं वेष्टी तटा[15]
सभेंत अपमानिला विहित मागतां रावणें
बिभीषण नमी म्हणे शरण आलिया पावणें. ४८

१ संतोषा. २ राक्षसरावणाचें धैर्य. ३ ब्रम्हदेव. ४ देवांच्याकानास. ५ प्राशन करी. ६ महत्-मुख्य-साधूंच्या मुखानें. ७ मारुती. ८ पर्वतासारिखामोठा. ९ वर देणारे आणि दयाळु जे त्यांमधें श्रेष्ठ (राम) १० आलिंगन. ११ मारुतीचा. १२ संतोषें. १३ बळ-सरस्वत्-ओघ-सैन्यसागराच्या ओघास. १४ पृथ्वीरूप वस्त्र अग्रासमुद्राला. १५ तीराला. + अग्निनें मदीस.

महाधन-सभालयाप्रतिहि होय तो भंगद[1]
प्रभूसि फळवी करी अरि न साम हें अंगद ५४
बळें धरिति उत्सवें मनुजविग्रहाऽज्ञा नतें
सुधी म्हणति काय जें रुचवि विग्रहा ज्ञान तें
सती-हरण-कर्म हें परम नीच मूढा लहा[3]
लया म्हणविल क्षया वरुनि हे चमू ढाल हा[4] ५५
भटासि खळ तो म्हणे नर महा निघो राहवा
प्रहार नकरी हठें वरुन हानि घोराहवा[5]
कबंध[6] बहु नाचले पलल-पंकही सांचले
पलाश[8] खपले रणीं बहुत थोडके वांचले ५६
गभीर[9] रुधिरौघ त्या बहु रणांऽगणीं वाहिले
सुरर्षि वदले अहा नच कधीं असे पाहिले
सुदुःसह सुरांसि जे कपि रणीं न ते राहिले
अतिक्रम करावया चरित ईश्वरें[10] साहिलें ५७
घडे स्मरण तांचि जो पुरवि नागपाशा हरी
दयार्णव तयाचिया गरुड नागपाशा हरी[11]
कवी म्हणति मृत्युमीं परम उग्र जो खा यशीं[12]
नशाहि वधि उद्धता प्लवग-वीर जो खाय शीं ५८
मरुत्तनय ओषधि क्षितिधराचिया घेउनी
क्षणांत शिखराशि यें पुनरपी स्थळीं ठेउनी
असें सुयश याद्रषा करुनि शल्य मोहादि जे
अरी जय म्हणे तया अजित देव तो हा दिजे ५९
दशास्य-सुत दाखवी तसिच रूप-शोभा वधी

---

१ भंग-द-नाशदेणारा. २ शरीर. ३ पाव. ४ हाय. ५ घोर-आहव-भयंकरयुद्ध. ६ मस्तकरहितधडें. ७ मांसाचेचिखल. ८ मांसभक्षणकरणारराक्षस. ९ गंभीर. १० नागप-आशा-गजेंद्राचीइच्छा. ११ हरणकरी. १२ शेंकडो. + नाश.

जरी समजल्या स्वयें कपट सर्व तो भाव धी
म्हणे प्रभु अहा तया सफळ कर्म तें वाटवी
यशोनिधि विभीषणा करि यशें भवा आटवी ६०
तयाउपरि लक्ष्मणें घनरवाचिया मारणें
सुराधिपति-दृष्टिचें रुचिर फेडिलें पारणें
न लवमिन याम तो धृति उरे दिल्या या रणें
म्हणोन न अनुष्ठिलें श्रवणवारणें वारणें ६१
म्हणे दुरित दिङ्मुखा वरुनि पुत्र-शोका जळें
मळे अपयशें गमे सकळ लिंप तो काजळें
निघे जनकजा-वधा असि धरी करीं नागवा
स्व-नाथ-चरणांसि ती विनवि संकटीं वागवा ६२
सुपार्श्व-सचिवाननें प्रभु दशानना वारवी
पुन्हाहि बहुकोटि तो प्रभु-करें वरें मारवी
तया परम जाहलें पुर विलाप संतापद
स्व-जीवित नको जसें जरि समृद्ध सत्ता पद ६३
समस्त उरलें बळ स्व-चतुरंग घे वत्सळ
सवाण शर तो जळप्रद तसाचि वर्षे खळ
न दे कुळ पडो पळ प्लवग-सैन्य कांदी पळ
प्रभूत भरि तो पललक्षतज-पंक पृथ्वी-तळ ६४
बिभीषण वधावया सत्वर शक्ति जी सोडिली
स्व-भक्त-हित-लक्ष्मणें तदैवना रणीं तोडिली
म्हणूनि तदुरीं दुजी त्रिदशशत्रुनें अर्पिली
यशोर्थ निजशोणितें रघुवरिष्ठ ती तर्पिली ६५
प्रभूत्तम दशाननावरि तदा बहु क्षोभला

---

१ खड्ग २ संभाळा ३ मेघासारिखाचि ४ शिराचा ५ तुकडे ६ मांस आणि रक्त यांचा चिखल ७ तनू-अवन-त्या बिभीषणाच्या रक्षणार्थ. ८ तत्-उर-त्या बिभीषणाच्या वक्षस्थळीं

विशल्य विरथ क्षणें करुनियां जयें शोभला
पुन्हा शिखर वायुचा सुत नसाधि आणी शया-
वरूनि कुसुमापरी स्तवं शके न वर्णीश या ६६
महौषधिरसें व्रण क्षण न लागतांही शमे
उठे मुदित लक्ष्मण प्रभु निजोनि जैसा गमे
हरि स्वरथ पाठवी प्रभु दशास्य तोही शमे
न सप्तदिन संगरीं स्मर-मुनींद्र-चित्त-भ्रमे ६७
शिरें दशहि संहरी प्रभु रणीं दहादां परी
तशींच दिसती अरी व्यसु पडेचिना भूवरी
नरत्व कुतुकें धरी तदनुरूप चिंता करी
रविस्तुति कथी वरी घटज तेज भास्वान् वरी ६८
तन स्व-जन-रक्षणीं असुर-वायुचा जो फणी
पुराणवर मार्गणीं कमलजास्त्र योजी रणीं
चिरूनि उर तत्क्षणीं सकलराक्षसांचा धणी
वधूनि असुरवें रणीं वरद वीर-चूडामणी ६९
अशेष सुर हर्षले कुसुमराशिनें वर्षले
जय-ध्वनि हि माजले अमित दुंदुभी वाजले
बहु प्रभुयशोरतें नर्तति अप्सरांचीं शतें
सुरर्षि-सह-पर्वतें महित गाति गंधर्व तें ७०
बिभीषण त्रिभुप्रिया करि वरी दशास्य-क्रिया
तयापरिस हा भया प्रभु न गाति कां या अया
अरीसहि महादया अजित दे न सोडी दया
म्हणे करिन भव्य या गति सुखें वरा अव्यया ७१

---

१ हातावरून. २ महा-ओषधी-रस-मोठ्या औषधीच्या रसाने. ३ इंद्र ४ वि-असु गतप्राण. ५ सूर्य. ६ सर्प. ७ बाणी. ८ कमलज-अस्त्र-ब्रह्मदेवाचें अस्त्र. ९ प्रभु-यश-रत-प्रभु जो राम त्याच्या कीर्तीच्या प्रीतीने. १० नामविशेष (ऋषि) त्यांच्याशी. ११ कल्याणा. + ब्रह्मदेव किंवा ब्रहस्पति * चांगल्या रे बाबा

बिभीषण वरासनीं बसविला मग क्षमासुता
तया पुसुनि आणवी स्वदयिता त्रिलोक-स्तुता
स्व-दिव्य-चरितें हरी जडजनापवादास ती
निवे प्रियतमांऽकगा द्रुहिण-पूज्य-पादा सती ७२
पिता दशरथ स्वयें निज-विमान ये सोडुनी
प्रियाऽनुजसह प्रभु द्रवधि हस्त या जोडुनी
निवे निवति पाहते स्मर शिवादि कीं तो लवे
न यच्चरणरेणुसीं सविधि अंडही तोलवे ७३
प्रियार्थ विभुच्या हरी उठवि सर्व मेले हरी
समाधिरत आदरी नुति म्हणे तदा हा दरी
बिभीषण सभाजना विनविल्या रमाभाजना
नये भरत-कामना न पुरतां प्रभूच्या मना ७४
ससैन्य-स्तगलार्चनें मुदित मी वदे तोहि तें
प्रभूक्त करि या क्षितीं स्वनतिवत्सला मोहितें
नभीं बसवि पुष्पकीं भरत-दर्शना हा बरा
उपाय रचि कीं महोदय मनीं न हो घावरा ७५
बिभीषण सुकंठ हे सबळ तो रमाजानि घे
सबंधु निववायया स्वपुर मत्समाजा निघे
म्हणे सुदति निर्मिता नळ कुनी न हा सेतुला
प्रिये-जरि न पावतों तरि सुधांशु हासे तुला ७६
स्मरे भरत आइला करुनि जेविं आ लेंकरूं
तया मुदित पुष्पक प्रभुसमेत आलें करूं
विमान बहु मेळवी शुचियशा तदा वानना
धरी प्रभु निजाऽनुजा परम शांत दावी नता ७७

---

१ ब्रह्मदेवानें पूजा करण्यास योग्य पाय जीचे असी २ यत्-चरण-रेणु- ज्याच्या चरणधूळीसीं. ३ इष्ट. ४ वानर ५ पूजना. ६ आश्रय करणाऱ्यांच्या ठायीं स्नेह करणाऱ्या. ७ लक्ष्मी स्त्री ज्याची असा राम. ८ मत्-समाज- माझ्यांच्या समूहा. ९ वि-इनता-गरुडत्व. + गुहा. * ब्रह्मदेवासह. ** ब्रह्मांडही.

[1]मरुज्ज भरता कथी प्रथम राम आला पहा
सख्या फलवि त्या मृगा परम हृद्य आलाप हा
तया तृषित-चातका जलद-नाद तो टाकवी
सखेदपण तस्करवा कथि असा न मोठा कवी ७८
स्व[2]हार्द-निधिच्या भरीं भरतवत्सल क्षिप्र ज्या
तता उपगता जसा भरत वत्स लक्षि प्रजा
समर्चि करुनि स्वयें कुसुम-वर्ष देवा [3]सेवा-
परीस बहु तो महोत्सवचि हर्ष दे [4]वासवा ७९
वसिष्ठ-जननी-मही-सचिव-बंधु-पौरादि जे
तया स्मरव म्हणं प्रभू यश कुलाहि [5]मोरा द्विजे
परेश अभिषेक घे करुनि होय राजाचि तो
सदा सकल रंजवी इतर सोयरा जाचितो ८०
कथा विधिप्रदान ते वरिति रामराजा स्तव
प्रमोद भजला चिर प्रचुर पामरा ज्यास्तव
बिभीषण सुकंठहा न [6]हनुमद्यशा लाभला
त्यजी [7]प्रभुकथेतरा गणुनि मद्यशाला भला ८१
समस्त कपि गौरवी यश सुधांशुसें गौरवीं
दुरापपण हारवी हरि भजत्तमोहा रवी
प्रभू [10]स्वरग लाजवी सदयता भली राजवी
नमी निपट जो [11]भवीं जन तया परीं शोभवी ८२

पृथ्वीरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामाच्या पाद-पद्मीं अर्पिलें कृतवंदनें

समाप्त.

---

१ मरुत्-ज- वायुपुत्र (मारुती). २ आपल्या प्रेमाच्या ३ यज्ञा परीस. ४ इंद्रा. ५ सूर्याच्या. ६ हनुमत्-यश- मारुतीच्या कीर्तीला. ७ प्रभु-कथा-इतर-रामाच्या कथेहून दुसऱ्या ८ प्रसवे ९ भजत्-तम-हा आपल्या भक्तांचें अज्ञान घालविणारा. १० स्व-अग-कल्पतरू. ११ संसारीं.

[1]श्रीश विधि[2] विनवि यास्तव दशवदन-वधार्थ दशरथनृपातें
सुखवि तदंगज होउनि गावें यश जें जगीं करि कृपा तें १
स-सुमित्रा कौसल्या कैकेयी तनय या तिघी आर्या
श्रीराम भरत लक्ष्मण शत्रुघ्न प्रसवल्या नृपति-भार्या २
नर-पति बहु तोष धरी स्वच्छात्रखें[3] वसिष्ठ गाधिजही
गौतम दारोद्धारें[4] जामातृत्वें विदेहराज मही[5] ३
क्षत्र-क्षय-कर रामहि तोषें निज दुरभिमान सोडून
साधूनि शांति गेला प्रभुतें हृदयांत हात जोडून ४
पूतें[6]-चरित निज-गुरूचें सत्यव्रत मातृ-चित्तही रक्षी
लक्ष्मी राज्य तृणतसें वल्कल जटा धरि वनीं फळें भक्षी ५
शाप[7]-विधुंतुद दशरथ-विधुस गिळी प्रभु[9] कुमार विरहातें
साहों नशके शोकें वदनें साकेत[8]-राष्ट्र चिर हो तें ६
भरत म्हणे दुष्टें कैसी आम्हां दिली पहा कु-गती
तात-क्रिया करि निघे प्रभु विरहीं जी घडी[10] तया युग ती ७
घेऊनि सचिव नागर गुरु माता बळ गुहा भरद्वाजा
भेटोनि चित्रकूटीं प्रभुसि नमी पिंड देववी[11] राजा ८
सं-कृप-प्रभुचें[12] शासन विश्व-हित म्हणोनि पादुकासहित
घेवुनि शिरीं फिरे तो नंदिग्रामीं वसे सुधी महित[13] ९
सीता-लक्ष्मण-युक्त प्रभुवर अत्रिस[14] नमी कथुनि[15] नाम
विश्व नुता अनसूया शीला दे अंगराग वरदाम[17] १०
केला विराधहि शान्[16]ति श्रामद जो शरवणोदय[18] विश्वास

१ श्री-ईश-लक्ष्मीपति (राम) २ तदंग-अंगज-त्या दशरथाचा पुत्र. ३ [illegible] न्यासि थल्याने. ४ दार-उद्धार-स्त्रीच्या उद्धाराने. ५ पृथ्वी. ६ पवित्र चरित ज्याचें (रामाचे विशेषण) ७ शापरूप राहु ८ अयोध्याप्रांत- ९ हाय. १० घटिका ११ दशरथास १२ आज्ञा. १३ पूज्य. १४ उ-ज्य. १५ उत्तममाला १६ शब्द. १७ शरवन-उद्य-निरंतर. १८ ज-ती. राम ॐ या ग्रन्थेक आर्येत प्रत्येक राजाचें नाव सांगितले आहे म्हणून याचें नाव पंतांनी राजरामायण असे ठेविले आहे.

शरभंगादि निवधि मुनि कीं त्याचा प्रभु-पदींच विश्वास ११
दुष्ट खरादि निशाचर ऋष्यंतक[1] जे तयांसि माराया
शांन-मख-दत्तें[2] वैष्णव- शास्त्रें[3] दे घटज साधु ताराया १२
पितृ-मख जटायु-गृध्रा भेटे पक्षीश्वरप्रभा[4] वदिला
श्रात्रांण[5] भरतया[6] दे ज्या वृद्धाचाहि न प्रभाव ढिला १३
ज्या मघवा बहुमानी प्रथम दंडकवन-क्षमा-पतितें
त्या पुसुनि गौतमी तट[7] वसवी प्रभु तन्मना रुचे अति तें १४
रजनीचरी[8] मन करी वस्त्र श्रीचें धरूनि शोभा जी
तद्दुर्दशा[9] करविजो प्रभु सबळ खरादिकांसि तो भाजी १५
फिरतां अदृष्ट राक्षस- वर यम-पुर-पथ धरावया दावी
कनक-मृग हरि मनीतें गृध्रेंद्रा हा म्हणावया लावी १६
प्रभुवर ही लघु-हृदय स्त्रैणत्वसा[10] हा म्हणे श्रमी होय
स्त्रीगति ऐकुनि विधिनें तातसखातें नशांत दे तोय[11] १७
हरि खेद कबंधाचा शबरीतें सुगति दे वरी पंपा
सरसी[12] थरथर कांपवि विरहीं प्राणांसि विभु म्हणे संपो[13] १८
सुगेला[14] सूर्य-कुमारा मरुदात्मज[15] भेटवी सुसख्य घडे
तो श्रीत्यक्तालंकृति[16] दे त्या हृदयीं धरूनि राम रडे १९
निज-दुःखा ऽति शाय कथी शमवि प्रभु-शोक सुगळ दे धीर
रवि बिंब दुरभ्रलयीं[+] तवि द्युति धरी पुन्हा महावीर २०
भस्म करी गीर्वाणाधिप-पुत्रा[*] वाळिला शरें एकें[20]
वांचावें चक्षुर्गर[18]- सख सत्यथ[19] करुनियां कसें भेके २१
हरि-राज्यश्री देतां सुग्रीवा निजसख्यासि साधूनीं[‡]

---

१ ऋषि-अनक-ऋषींचे नाशकर्ते. २ इंद्रदत्तें. ३ अगस्त्य. ४ गरुडासारिखा (जटायूचें विशेषण). ५ राज्यरक्षण. ६ इंद्र. ७ पविता. ८ राक्षसी. ९ तन्-दुर्दशा-मीचा दुष्टदशा. १० स्त्रीलंपटसा. ११ नामविशेष. १२ सरोवर. १३ पुरेल्हा (निपुनजा) १४ सुग्रीवा. १५ वायुपुत्र (मारुती) १६ श्री-त्यक्त-अलंकृति-सीतेनें टाकिलेले दागिने. १७ शांति. १८ दृष्टिविष सर्पसखा. १९ यथायुक्त. २० वेडकानें. + दुष्ट अभ्ररूपलयांत. * इंद्रपुत्रा. ‡ ग्रास करून.

स्तविला श्रित-दुःस्थ-नमे[1]- श्रीचंडकिरण रामभद्र सोधूनीं[2] २२
श्री हुडकाया बहु कपि सकळ प्रेषी मरुत्तनय मात्र
पात्र यशा होय सुखी प्रभुचें करि मानस श्रवण गात्र[3] २३
दृष्ट श्रुत नसतांही सिंधु विलंघूनि मत्त-मूढ-पुरी
शोधी श्रीतें मुद्रा[4] दे परे निज-मथन-सिद्ध सर्व धुरी २४
श्रम हो दूर[5] हो न परा म्हणुनि बळें सांपडे खळा बोधी
तो धीरा हित कथितां मारूं[6] पाहे दशानन क्रोधी २५
अनल-प्रज्ञ बिभीषण या दूत अवध्य हें वदे यारी
पुच्छ प्रदीप्त करवी अतिकर्कशा[7] भूमिदेव-देवारी २६
एवं जो ऐश्वर्ये[8] मत्त न तो कां करील अन्याया
रक्षी प्रिय-सख-पुत्रा[9] श्री-संप्रार्थित कृशानु धन्या या २७
कपि रंजवी सुरांतें- बहु रक्षोधमपुरीस[10] जाळून
अति साधु बिभीषण जो त्या एकाच्या गृहास पाळून २८
कवळी इध्मोच्चयसे[11] कार्तस्वर[12]-निलय दहन[13] हा वदवी
पुच्छ समुद्रीं विझवी श्रीस नमी धरि पुन्हा नभःपदवी २९
सर्व-पर-मद[14]-क्षय-कर - तेजा कपि-चक्र[15] हर्षवी वंदी
श्री-चूडामणि दे या प्रभुवर भेटे स्तवी जसा बंदी ३०
अंता न्याया अग्निं[16] प्रभुसह कीशर्क्षबळ निघे प्राज्य
सागर-नटीं करी द्विष-[17] दनुज नमन राम दे तया राज्य ३१
अस्त्रभयाऽकुळ[18]-सिंधु- प्रार्थिन[19] ऐकूनि रचावया सेतु
नळवानरासि सांगे प्रभुवर जो विश्वहेतुचा[20] हेतु ३२

---

१ आश्रितांच्या दुःखरूप अंधकाराविषयीं सूर्य २ योग्यानीं ३ वायुपुत्र ४ शरीर ५ शत्रू ६ मय ७ या प्रकारें ८ वायुपुत्रा ९ अग्नि १० नक्ष-अधम-पुरी- राक्षसांमध्यें अधम जो रावण त्याचे नगरीला ११ इध्म-उच्चय-काष्ठ समुदायसे १२ सुवर्णस्थान १३ अग्नि १४ सर्व शत्रूंच्या मदाचा नाश करणारें तेज ज्याचें १५ कीश-ऋक्ष-बळ- म्हणजे वानर यांचें सैन्य. १६ पुष्कळ १७ द्विषन- अनुज-रावणाचा कनिष्ठ बंधू (बिभीषण) १८ अस्त्र भयानें व्याकुळ जो समुद्र त्याची प्रार्थना १९, विश्वाला कारण जो ब्रम्हदेव त्याला कारण

क्रूरैकराज रावण जेसें प्रभु-शीर्ष धनु तसेंचि करी
श्रमवी श्रीस बिभीषण-दयिता सरमा परंतु मोह हरी ३३
शत-योजन-सेतुपथें कुतुकें उतरूनि पयोधितें सबळ
ससुगळ चढे सुवेळीं प्रभु दुर्गी तोंहि मृत्युचा कवळ ३४
संतप्त होय कोपें सुग्रीव उडे दशानना ताडी
पाडी मुकुट खळाचा बाहुरणा मुहूर्त करुनि मद झाडी ३५
कामांधा ताराया प्रभुनें अंगदहि धाडिला सामा
परि अरि नवळे खवळे आरंभी स्वक्षयार्थ संग्रामा ३६
तुमुलीं रणीं परस्पर नचुकति कपि-यातु-कुंजर क्ष्माया
रक्त-प्रवाह वाहति चाले करि इंद्रजित् परि न माया ३७
प्रभु मनुज-भाव-निन्हुत-तेजा यश वाढवावया लोकीं
घन-रव-कृत-फणि-पाशीं पडुनि चमू श्रीहि मग्न करि शोकीं
पृथ्वीसुतेसि धैर्य त्रिजटा दे कथुनि तत्व वरपक्षी
उडवी नागांतें प्रभु सानुज गुरु-तात-सम तया लक्षी ३९
भूमि त्रस्ता ज्याच्या पादन्यासेंकरूनियां झाली
तो घटकर्ण अमर-भा नु रवी सुगळा धरी चमू भ्याली ४०
तत्रासा श्रुति हरि परि खवळे शत्रू करी बळ त्रस्त
सगळेचि गिळी झाले निशितसदस्यु घनरव कपि ध्वस्त ४१
विश्वेप्सितविजय प्रभु खंडुनि भुज पाद शिर तया मारी
भारी शोक दशास्या होय तया घनरव स्वयें वारी ४२
प्रभु-भंग-काम हा खळ खरशर वर्षोनि सेश सैन्य खिळी
मारुति होय भिषग्वर पाडी घननाद-रोग-शक्ति शिळी ४३

---

१ कौतुकें. २ सैन्यासह. ३ रावणही. ४ यास. ५ दोनघटिका. ६ राक्षस वानररूप हत्ती. ७ मनुष्यपणानें दूषित तेज ज्याचें. ८ श्रेष्ठपक्षी-(गरुड.) ९ त्रासयुक्ता. १० पायठेवण्यानें. ११ कुंभकर्ण. १२ देवांचें तेज. १३ निशित-सत्-असि-उग्र-नग्न-तीक्ष्ण जो उत्तम खङ्ग त्यासारिखीं उग्र नखें ज्याचीं असे. १४ विश्व-ईप्सित-विजय-विश्वाला इष्ट ज्याचा जय. १५ वैद्यश्रेष्ठ. + क्रूर-एक राज-भयंकरांचाच एक राजा. * सीतेस. ‡ स-ईश-धनी जो सुग्रीव त्यासह.

राक्षस-बळ-हानि अमित- बळ कपिभट करिति अजित शस्त्रे तें
पाहुनि वधि मायाश्री पळभर गमलें असत्य न रैसेतें ४४
घमवी अनिष्टकर्मा अमरखमद शांतांग जन्माया
होम करी एकांतीं कळवी ती नत्त्विवृध्य तन्माया ४५
लक्ष्मण-शर-सर्पांहीं त्याचें समरांत सारिलें आयु
हा युद्ध अहोरात्र- त्रय करि अहिताभ्रघनमहावायु ४६
सुतशोक-क्षुब्ध निघे दशमुख परमेश्वरीस माराया
वाराया होय घना सद्बुद्धि सुपार्श्व सचिव वारा या ४७
चतुरंग सैन्य बहु शत- कोटि मग पलाश-नायक प्रेषी
प्रभुच्या दक्षेषुपुढें युद्धीं एकहि न वांचला द्वेषी ४८
क्रोध-प्रतप्त-चेता असरूत् भंगे तथापि ये युद्धा
मर्दन करि कीशांचें मेले गांठूनि कीशप क्रुद्धा ४९
कपि-बळ दिसे तृणोपम दावोपम राक्षसेंद्र तो ताडी
खरु-शक्तिनें दुसरिया दाशरथिस खळ रणांगणीं पाडी ५०
जगद् स्कदायाद सखा गरुडाचा होय तें पुन्हा शिखर
आणी या यश दे प्रभु का शाका न म्हणता सुधा विखर ५१
खलदलना नळस प्रभ दशवदनासीं करी समर भारी
प्रभुसीं तोही निर्भय अतितेजा शतमखाघमर भारी ५२
लीला-मनुष्य भगवान् दशकंठाचीं शिरें शत छेदी
तरि अरि नमरे म्हणुनि प्राकृतसा होय संगरीं खेदी ५३
घटज महर्षि रघि-हृदय उपदेशी होय तो जपें तुष्ट
मघोरिपु स्वरथ नसा वर दे समयीं वधावया दुष्ट ५४
ब्रह्मास्त्रें अभिमंत्रुनि कोदंड-गुणीं पृषत्क-वर जोडी

१ रथ. २ इंद्रजिताचा (बिभीषण.) ३ भीतोस ४ दक्ष-इषुपुढें. ५ या रंवार. ६ वणव्यासा (मारुती.) ८ र सा. ९ शत-म १० अगस्तीनें घाला. [illegible] -सुत- असु-दायाद- जगत्प्राणजो वायु त्याचा पुत्र. [illegible] -लस- शत्रूंच्या नाशाविषयीं आळशी न व्हे अ- [illegible] -अरी- इंद्रादि देवरूप शत्रूंच्या तेजाचा नाश- [illegible] निष्ठ. ११ अहित- अभ्र-घन-महा-वायु- शत्रुरूप [illegible] शोकानें क्षोभला.

सोडी गृध्र-गति-प्रद देवद्विषदुर अमोघ परि फोडी ५५
प्रमुदित सुर मुनि करिती स्तुति पडतां शत्रु पुष्पवृष्टि पडे
ध्वनि दिव्य दुंदुभींचा गंधर्व-गान-प्रगायनांत दडे ५६
शांत उपद्रव होतां शंका सोडुनि देव-तनु-मध्या
नाचति गाति प्रफुल्ला प्रभुचरितोद्दीपका हि त्या वंध्या ५७
जेविं अजगरापासुनि दोषापासुनि तसा अरिहि मुक्त
करि करवुनि क्रिया प्रभु या परमालाचि हें परम युक्त ५८
राज्य-सुखाची छाया प्राप्ति पद-नता बिभीषणा बसवी
सिंहासनीं न गर्हित-वृत्तीं प्रफुल्ल कीर्ति-संपदा वसवी ५९
करि दिव्य इला-कन्या भेटे दशरथहि उठवि कपि शक्र
मानस भिक्षा करि कुशल वदले पथ सुयश हें इतर नक्र ६०
सबळा सुगळो अर्चीं पुष्पक लंकेश दे नतस्वर गा
प्रेम सुरर्षिस सांगे प्रभुपुण्ययशोमृता नतेस्वर गा ६१
लंकेशा कपिराजा सबळा घेऊनि मनुजरूप हरी
बसुनि विमानांत निघे स्थिरजंगमजीव अनघ धन्य करी ६२
कथि पुष्कराक्ष विरह-क्लेश म्हणे श्री अशेष परिसे न
अरुरवहि न असरुवसें कीं सु-यशास्कर जेविं अरिहि अरिसेन ६३
युद्ध-क्षिति दाविन जल-निधिवरि सुविमान वरुनि विभु गेला
श्रीस म्हणे बिंबोष्ठि प्रेक्ष नळें रुचिर सेतु हा केला ६४
सुग्रिव बिभीषण येथें भेटे मजला तसाचि सागर हा
या ऋष्यमूकगोत्रीं स्वस्थ म्हणे सुगळ साऽनुराग रहा ६५
स्तुति अलंकार तुझे अर्जुन रक्षुन दिले मला येथें

---

१ जटायूला गति देणारा २ देव द्विषत्-उर-देवशत्रु जो रावण त्याचें वक्षस्थळ. ३ प्रभु-चरित-उद्दीपक-रामचरितास उत्तेजन देणारा. ४ वधास जो योग्य [illegible] ण त्यास. ५ शत्रूही ६ पुष्कळ सुखाची. ७ निंद्य वृत्तीन. ८ शपथ. ९ पृथ्वीची कन्या (सीता) १० प्रभु-पुण्य-यश-अमृत-प्रभूचें पुण्यकारक कीर्तिरूप [illegible]. ११ विस्तृत स्वर. १२ कमलनेत्र. १३ [illegible] ज्याले त्यानीं डुलीच्या फलासाठी [illegible] जीवे. १४ पहा. १५ ऋष्यमूक पर्वतीं. १६ [illegible] चंद्र तजीचे असी. १७ प्राप्त [illegible] नत-स्वः-अग-नम्र आहेत [illegible] स्थावर जंगम [illegible] एकेन.

देणें प्राणाचें हें याचें यश देवि आमुचें लेणें[१] ६६
पवन-कुल-दीप येथें भेटे विध्वंसिना असाधूर[२]
हो जेविं अरींस करी न फणीस विकल बिलीं असा धूर ६७
या पंपेच्या तीरीं दयिता-[+]सहचर विलोकिले पक्षी
रडलों बहुत तुझा हा देवॅर मत्प्राण संकटीं रक्षी ६८
बसुनि विमानीं गेली त्या लोका योगिराज ज्या जावे
शिष्या मतंगमुनिची शबरी यश या सदाश्रमीं गावें ६९
विश्व-भयंकर योजन-दीर्घ-भुज कबंध माऽनुजा भजला
धरि मृग-[++]मृगेश्वराऽशन देवि वरविमान यास्थळीं भजला ७०
रंभोरु सति[५] प्रमदे हे ती गोदावरी स्व-देशाला
स्मरलों न यदुत्संगीं चिंतामणिची असी न दे शाला ७१
क्रमिला बहुकाळ सुखें या पंचवटींत उटज[६] सुंदरि तें
दिसतें दीन-मधु-श्री मधुप-कथ-म्लान जेविं कुंद रितें ७२
केयारी श्वशुर तुझा आर्य जटायु प्रिये वसे नाकीं
जनकें ज्ञान शिकविलें गुरुशोक त्यन्मनीं असेना कीं ७३
भीष्म-ग्रीष्मार्कांच्या जेविं करें बिंदु सिंधु तेविं करें
ज्याच्या आटे आश्रम त्या मुनिचा[१०] हें सुकेशि जाण बरें ७४
सांब[११] शिव जसा बिल्वें[१२] झाला नमनें प्रसन्न जो सीने
त्या अत्रिचे चरण स्मर कथिति नता नत्वनख जोंसी ते ७५
शोकार्त भरत येथें विनवी नगैधर्य[१३] चित्रकूट पहा
देतो प्रयाग गंगा- यमुना संगमहि लोचनासि मुदा[१४] ७६
दयिते नीट पहा तें दिसतें साकेत[१५] पदक वसुधेचें[१६]

१ अलंकार. २ असाधु-उर-दुर्जनाचें वक्षस्थल. ३ मारुती. ४ दीर (लक्ष्मण.) ५, यत्-उत्संग-जीच्या मांडीवर. ६ पर्णशाला. ७ गेली आहे मरून शोभा ज्याची. ८ स्वर्गी. ९ किरणानें. १० अगस्त्यमुनिचा. ११ पार्वती सह. १२ बिल्वपत्रानें. १३ पर्वतश्रेष्ठ. १४ आनंदा. १५ अयोध्या. १६ पृथ्वीचें. + सीतेचे सोबती. ++ हरिण आणि सिंह याना भक्षण करणारा.

रघु कीर्तिचें रुचे हें पात्र रसज्ञासि जेविं न सुधेचें ७७
उतरे प्रभु प्रयागीं मुनि-चरण-ग्रहण करुनियां राहे
भासे नमनीं सुतसा तोहि भरद्वाज तातसा पाहे ७८
श्रीरामें पाठविला मारुत-सुत गरुडसा उडे तूर्ण
गुह-भरत-मनोरथ करि कथुनि प्रभु-सत्यसंधता[1] पूर्ण ७९
मुनिस पुसुनि बळु पुष्पक-यानीं बाहुनि निघे गुहा पहिला
महे[2] दे विश्वस्त-भरत-शत्रुघ्न-गुरु-प्रजांसहित महिला[3] ८०
दे वेष घे यशास्वी कैवल्यद-पद[4]-महें पुरीं गेहीं
सुदिनीं प्रभु प्रवेशी जीवात्मा जेविं सोडिल्या देहीं ८१
श्रित-कल्पद्रुम भगवान् स्वीकारी तात-राज्य-पद भरता
युवराज करी न रता अन्यत्र म्हणे असी धरी नरता ८२
ग्रिवादि सर्व सुरवरी कपि राक्षसनायकासि गौरव दे
टकमक सुरपति पाहे त्यातें प्रभु बंधु सकळ पौर वदे ८३
अक्षांतक[6] दास्य कुशल सविनय[7] सत्स्थिरशील-पर वक्ता
पवनसुत तया पूजी प्रभु चिरजीवित्व सुवर दे भक्ता ८४
प्रिय-वर-मारुतिला दे सत-कल्प-व्रतति-निज-कथाश्रवण
लवणघ्नाग्रजचरितीं[10] कवण न होईल सुरसिक प्रवण ८५
उत्तम आनंद दिला हृत्तापन[11] उरविला जनीं कांहीं
पाप-षडरि[12] दमिले प्रभु-नामेंचि अजेय जे अनीकांहीं ८६

राजरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें

समाप्त.

---

१ रामाची सत्यप्रतिज्ञता. २ उत्सव. ३ पृथ्वीला. ४ मोक्ष देणारे पायांचें. ५ राजाच्या हाताखालचा कारभारी. ६ अक्ष नामक रावणपुत्राचा नाश करणारा. ७ नम्रतायुक्त. ८ उत्तमवृद्ध. ९ बोलणारा. १० लवण-घ्न-अग्रज-चरित - लवणासुराचा नाश करणारा जो शत्रुघ्न त्याचा वडील बंधु (राम) त्याच्या चरितीं. ११ हृत्-ताप-हृदयासंबंधी संताप. १२ पापरूप कामक्रोधादि सहा शत्रु. + उत्तम कल्पवल्लीरूप जी आपुली कथा तिचें ऐकणें. * नम्र. ‡ मनुष्यत्व.

हरिनर्तन छंदः

श्रीश पद्मज-ऋष्यशृंग-सनत्कुमार-तपोबळें
अश्वमेध-वसिष्ठ-सत्कृतें स्वकीय-कुतूहलें
दिग्रथात्मज होय चार धरी सुमूर्ति समुज्वळें
आदिसत्कवि-विश्व-भाग्य-भरें दशास्य-कृत-च्छळें १
कोसलेश्वरजा जया प्रसवे तया शुभ राम हें
नाम देवुनि दिग्रथप्रभु रंजवी भुवना महें
केकयप्रभवात्मजा भरत प्रिया तिसरी तिच्या
भव्य लक्ष्मण हें अरिघ्न असें पदासि सु-रीतिच्या २
श्रीवसिष्ठ तयां करि द्विज आदरें पदवी श्रुती
गाधिजा गुरु राम लक्ष्मण देववी करुनि स्तुती
दे बळातिबळा तयां मुनि सर्व अस्त्र पथीं कथी
ताटकेसि मखघ्न राक्षस जे तयांसहि तो मथी ३
गौतमर्षि-वधूसि पादरजोनिळें प्रभु उद्धरी
शंभुच्या धनुचे पळांतचि ओढितां तुकडे करी
जानकी पण-सिद्धि पाहुनि हर्षुनि प्रभु तें वरी
दे तिघांसि सुता तिघी जनकासि कीर्ति मिळे बरी ४
होय भार्गवरामहि प्रभु-दर्शनेंचि तपोनिधी
शुद्ध शांतिमती करि श्रुतितें जपोनि तपोनि धी
हर्षली नगरी करी यश फार लज्जित कापुरा
सानुजा भरतासि मातुळ ते धृतोत्कुतुका पुरा ५
दिग्रथाप्रति योजितां युवराज राम करावया

---

१ श्री-ईश-लक्ष्मीपति (राम) २ आपल्या कौतुकानें ३ दिग-रथ-आत्मज-दशरथाचा पुत्र. ४ वाल्मीकिच्या सर्व भाग्याच्या भरानें (अतिशयानें) ५ उत्सवानें. ६ कैकयीपासून झालेल्या पुत्रास. ७ शत्रुघ्न. ८ नामविशेष (विद्या) त्या. ९ गौतम-ऋषि-वधूसि-गौतमऋषीच्या स्त्रीला. १० पाद-रज-अनिल-चरणधूली संबंधी वायूनें ११ धृत-उत्कुतुक-धारलें उत्कट कौतुक ज्याणें अशा. + कौसल्या.

सप्रधान म्हणे वसिष्ठहि हा विचार बरा बघा
मध्यमा दयिता वदे वर दोन हे रुचले मना
मत्सुता अभिषेक राम चतुर्दशाऽब्द भजो वना ६
राय तीस म्हणे दिलें तुज राज्य दृक्कुतुकानना
राघवा सनि सख्य आठिव तूं न पाठिव कानना
मंथरा-हृत-बुद्धि ती नवळेचि तें कळतां निघे
राम साऽनुज-दार मातृनिदेश वेद गणूनि घे ७
तात-सत्य-महाव्रताऽवन-काम राम महापथीं
चालतां जन हा म्हणे बसवी नरेंद्र तया रथीं
वल्कलीं प्रभु जो सखा गुरु त्यास भेटुनियां जटा
यत्पयें रचि साश्रु धन्य करी निषादवरा वटा ८
त्यास्थळींच सुमंत्र सोडुनि देवसिंधुसि तो तरे
यद्यशःकथनें गुरूसहि होति संमत तोतरे
श्री-प्रयाग-गत स्व-तात-सखा महामुनितें नमी
चित्रकूटनगीं करी मग धन्य सर्व यमी शमी ९
राम-वृत्त कथी सुमंत्र पुरासि येवुनि दिग्रथा
ऐकवी महिषीस तो निज-शाप-कारण जी कथा
राम राम असें वदे सुत-शोकरूप-महाव्यथा
पावुनि व्यसु होय लंघुनि जाय संसृतिच्या पथा १०
दूत धाडुनि साऽनुजा भरता गुरु द्रुत आणवी
भेटतांचि तयासि ती जननी स्व-कौशल जाणवी
तो वदे तिस धिक् तुझें कृत लाजवीलचि यो तुतें
हा जडें त्यजिलें सुधाफळ काय गे हित या तुनें ११

१ दृक्-कुतुक-आनन-दृष्टींला कौतुक देणारें मुख ज्याचें अशा रामास. २ आईची आज्ञा. ३ बापाचें सत्यरूप जें महाव्रत त्याच्या रक्षणाची इच्छा करणारा. ४ वडाला. ५ बोलण्यावेळीं अडखळोन एक एक अक्षर दोन तीन वेळ ज्यांच्या बोलण्यांत येतें ते. ६ शांत-अक्षुब्ध ७ दशरथा. ८ वि-असु-गतप्राण. ९ संसाराच्या. १० आपली मसलत. ११ राक्षसातें १२ तुला. + स्त्रीस. ॥ इंद्रियें जिंकिलीं ज्यांहीं असे ऋषी.

क्षिप्त तैल-निमग्न तात-शरीर काढुनि न प्रिया
राम मात्र मन प्रसन्न करूनि साधु करी क्रिया
राज्य घे म्हणतां गुरूक्तहि तो विलंघुनि अग्रजा[1]
गाय जाय धरावया शिरिं पापपर्वतधग्रजा[2] १२
भेटतांचि सुशील तो बुध संहरी गुह-संशया
गौरवी मुनि विष्णुचा[3] समजे मनीं शुचि अंश या
चित्रकूट-नगीं नमी गुरुची[4] कथि प्रभुला गती
तो पित्या जळ दे यदंघ्रिस पद्मजादिक लागती १३
भक्त तो विनवी दयाब्धिस दीनपा[5] परत क्षण
स्वप्रजेप्रति देचि एकहि[6] मा न पापरत क्षण
माय बालिश-बुद्धि केवळ काय ते धरिसी मनीं
हाय हे न प्रसाववया मृदु पाय योग्य नगीं[7] वनीं १४
दे प्रभो अभया मला घन दे नसें[8] खगपा घना[9]
पाव[11] नाम यशस्वि हो द्रवलासि या गजपा[10] वना
पावना तव कीर्ति मोहिति जेथिं जंतुसि अप्सरा[12]
आ सरो[13] करिती तुला जन दे नताप्रति आसरा[14] १५
साश्रु होय वदे तया कुरवाळुनि प्रभु तापसा
तापसा[15] न गमो अनुग्रह भार हा मज या पसा
कीं तुलाहि मलाहि युक्त गुरूक्त-पालन-धर्म हा
शर्म-हानि करी जना म्हणवी सदा परधर्म हो[16] १६
पादुका प्रभुच्या शिरीं धरि संपतां चवदा समा[17]
तूं नयेसिल होमिन ज्वलनीं तनू समिधासमा

---

१ रामा. २ पाप-पर्वत- धक्- रज- पापरूपपर्वताला जाळणाऱ्या धूळीला. ३ भरताला. ४ पित्याची. ५ अनाथरक्षका. ६ उत्साह. ७ पर्वतीं. ८ चातकपक्ष्यास. ९ उदका. १० गजेंद्राला. ११ पवित्र करणारी. १२ अप्सरा, पिशाच, जलदेवता. १३ सरोवरा. १४ थारा. १५ संतापासारखा. १६ हाय. १७ वर्षें.

स्पष्ट यापरि तो वदे भरत स्वयें परते करी
वास बाहिर वल्कलाऽजिन वन्यवृत्ति करवें वरी १७
आय तेथुनि सत्तपःफळ अत्रिचें मन लोभवी
तत्प्रिया बहु मायसी जनकात्मजा-तनु शोभवी
जो विरोध धरी हरीहि समुद्धरी प्रभु हा तया
जाणवी उदयार्थ जोडुनि कीं न जोडुनि हात या १८
दंडकीं शरभंग आणि सुतीक्ष्ण कुंभज सन्मुनी
जे स्व-दर्शन-काम संतत सत्तपोरत जन्मुनी
त्यांसि भेटुनि तन्मतें शरणागताऽभयदायकें
गृध्र तातसखा जटायुहि पूजिला रघुनायकें १९
यास पंचवटींत लक्ष्मण-निर्मितीं उटजीं करी
यातुपत्यनुजा कुबुद्धि करूप शूर्पणखा धरी
ये गळांचि पडं रतार्थ जसी वके हरिच्या खरी
घ्राण कर्ण रघूत्तमाऽनुज तो तिचे असिनें हरी २०
मूढ बंधु तिचा न जो प्रभुची धरी परवा खर
राम तो सदसि प्रशस्त महा गमे पर बांरवर
जे सहस्र चतुर्दश क्षपादाचर त्रिदशाऽरि ते
संगरीं पडले एकांतचि हारवूनि यशा रिते २१
राम हर्षवि जिष्णुची जय-फुल्ल-दृष्टि सभा जन-
स्थान शून्य करी वरी स्तव पुष्पवृष्टिस भाजन
ती कुबुद्धि निशाचरी दशकंधरा मुरव दाखवी
जानकी-गुण-रूप-लक्षण-सत्कथा-रस चाखवी २२
जानकी-हरणार्थ युक्ति मनीं दशानन आठवी

---

१ वनवासता. २ राक्षस. ३ यातु-पति-अनुजा-राक्षसपतीजोरावण त्याची कनिष्ठ भगिनी. ४ सिंहाच्या. ५ गर्दभस्री. ६ खड्गानें. ७ शत्रु. ८ वस्त्रा. ९ राक्षस. १० इंद्राची. ११ पात्र. + दंडकवनीं. *सत-असि-उत्तमखड्ग.

स्वर्ण-रत्न-मृग क्षपाचर आश्रमीं खळ पाठवी
श्री विलोकुनियां कुरंग कुरंग हा अजि तापसा
दर्शनें न पळो धराचि म्हणे करी अजिता पैसा २३
स्वानुज क्षितिजा वना उटजांत ठेउनि राघवें
दूर ओढुनि ने पळे परि मारिला मृग लाघवें
हाय जानकि हाय लक्ष्मण धांव यापरि हाकली
वाटवी शुचि मानसांतहि तत्क्षणीं अरि हा कली २४
हाक आयकतां सखी करि कांपल्या कदलीस ती
दे वरा मज देवरा द्रुत धांव हें वदली सती
तो म्हणे कपरि-क्षपाचर-शब्द होय परा मैहा
मुख्य आश्रय दैव देवि कधीं म्हणेल न राम हा २५
श्री म्हणे अभिलाष मद्विषयीं तुझा प्रभु-हानितें
दुर्जना तव दुष्ट मानस इष्टसिद्धिस मानितें
साश्रु तो उटज त्यजूनि निघेचि बोलत हाय नें
रंध्र सांपडलें सती-हरणा अरातिस आयतें २६
पूजनादृतमानसा कषिरक्त भावुन होय ती
स्वाश्रमांत म्हणे प्रसन्न अभीष्ट पावुन हो यती
तोंचि दावुनि रूप सुंदरि सर्व-सद्गुण-संपदे
चाल हो महिषी दशास्य असें वदे बहु कंप दे २७
श्री म्हणे निघ रे कधींहि न कर्म हें शुचि राक्षसा
भस्म होसिल देखिला न तुवां जगीं रुधिराक्षसा
तों बळेंचि महासतीस घडावया खळ हा निपे
भग्न होय जटायुसीं करुनि स्मयें कलहा निपे २८

---

१ राक्षस, २ सीता, ३ मृग, ४ संतापसा, ५ रामास, ६ अजुर्दा, ७ सीतेच्या रक्षणास, ८ हाक मारी, ९ कलह, १० केळीस, ११ दिराला (लक्ष्मणाला), १२ नेजा, १३ पुजन-आदृत-मानसा- पूजेविषयीं सादर चित्त जीचें अशी, १४ रुधिर- आहेत नेत्र ज्याचे असा. +हाय.

पूर्ण षष्टि-सहस्र-वत्सर ज्या जटायुस जन्मुनी
सून सोदायं शत्रुपासुनि तो असें कथि सन्मुनी
वृद्ध गृध्र खरासिनें दशकंधरें मग ताडिला
पक्ष-मूळ पळांत तोडुनि धर्म सोडुनि पाडिला २९
ती म्हणे रघुनाथजी करितां उपेक्षण काय हो
हाय लक्ष्मणजी छळीं परि दूर न क्षण कोय हो
कीर्ति मीं तुमची अहो मज शीघ्र धांवुनि सोडवा
खोडचाल ललाट-लेखहि शत्रुला कर जोडवा ३०
हाय हाय म्हणे सती दशकंठ तीस बळें हरी
सो[४]त्तरीय नग त्यजी कपि-पंचकीं अचळावरी
ने जड स्वपुरींत जी अजिताग्रिची कुणगी तितें
हात जोडितसे क्षुधा शतदा जिच्या गुण-गीतितें ३१
रामभद्र मृगासि मारुनि होय शंकित धी फिरे
साधु लक्ष्मण ये नमी कथि वृत्त आयिकतां थिरे
येवुनि द्रुत शून्य आश्रम पाहुनि प्रभु हा वदे
तो[६] नगांसहि मोह आ[+]त्त-वियोगि-मानव-भाव दे ३२
शोधितां गहनांत मूर्छित गृध्र दूरुनि पाहिला
द[८]क्षिणोरुवरी द्रवोनि तदीय मस्तक वाहिला
रावणें हरिली वधू कळवूनि हें श्रम राहिला
हा म्हणोनि रघूत्तमें विधिनें खगोत्तम दाहिला ३३
धुंडितां विपिनें पुन्हाहि कबंध राक्षस मारिला
तारिला शबरी महामति जी तिचा भय सारिला
वारिला ह[११]नुमन्मनोगद तो स्कंदहि पाहिला

---

१ अहो, २ देह, ३ होवू, ४ स-उत्तरीय- अंगावर ज्याच्या आहे असा, ५ राम, ६ दुसरी, ७ अरण्यांत, ८ उजवे मांडीवर, ९ गतप्राण, १० अग्निसंस्कार केला ११ हनुमत्-मनोगद- मारुतीचा अंतःकरण संबंधी रोग. + स्वीकारिला आहे वियोगि मनुष्यपणा ज्याणें असा. (रामाचे विशेषण).

वाळिला निवटूनि तत्क्षण राघवें कुरवाळिला ३४
वैसवी अनुजासि सांगुनि कीश-राज्यपदीं नता
केविं पाहिल वैज्रभृत्कपिलावराज्यप दीनता
धाडिले हुडकावया कपि कोटि ते श्रमले मुधा
मारुत शंकर-हाससें यश होय वायुसुता बुधा ३५
दारवर्या बळ तोषवी न बसे हिमाद्रिसुतावरी
रंजवी सुरसेसही बहुयोजनें मुख जी करी
सिंहिका वधिली पळांतचि सावुलीसहि ती धरी
सिंधु लंघुनि शत्रुपुर्यधिदेवताश्रम तो हरी ३६
रात्रि होवुनि ओतुसा हुडकी पुरींत न देखुनी
होय खिन्न मनीं उणें निजदैव केवळ लेखुनी
तो अशोकवनीं शिरोनि विभूतितें मग पाहुनी
शिंशपातरुतें कपी बहुमान दे नग राहुनी ३७
तों दशास्य महाविभूतिस रात्रि ये विनवी रहा
मंदिरीं तुज चिंतितों दुनगांसि सेवि न वीर हा
श्री वदे म्हणुनि स्वमानसिं राम राम रणा रची
सद्रुमीं अहि तूं नयापरि पामरा मरणा रची ३८
मास-विकूनि रावण क्षणदाचरींस म्हणे दिला
स्पष्ट मासयुगावधि त्यजितां मदुक्त वधा इला
मांस भक्षिन मी इचें मज मानुषी अपमानिती
मत्तपा हुनि आपुलें गृह उग्र हे नृप मानिती ३९
जाय दुष्ट असें दटावुनि राक्षसी अति गर्विनी

---

१ वानरांच्या राज्यपदीं. २ वज्रभृत्-कपिला-वर-आज्यप-इंद्र संबंधीजें कपिलेचें श्रेष्ठ आज्य त्यातें पिणारा. ३ व्यर्थ. ४ शत्रु-पुरि-अधिदेवता-श्रम-लंकाधिष्ठात्री जी देवी तिचा श्रम. ५ मार्जारसा. ६ सीतेतें. ७ शमी वृक्षातें. ८ मनु-वी-उत्तम गरुडासी. + श्रेष्ठ जो वृक्ष त्या पक्षीं.

पाश घालि गळां म्हणे क्षितिजा असूंमति जोंचिती
मुद्रिका तिस दे मरुत्सुत जानकीहि शिरोमणी
तो महोपवना चुरी विपे होय शत्रु करी फणी ४०
मत्त राक्षस लक्ष अक्षकुमारही करि चूरहा
शूर हा वदले म्हणे अमरर्षि जों रवि भूरहा
इंद्रजित् मकरी सरोज- भवाऽस्त्र सांपडला बळें
बोलिला गुरुसा सभेंत विशंक बोलवितां खळें ४१
पेटवी खळ पुच्छ पावक होय या कर[+]का पुरा
भेटवी चुलत्यासि लावपि तो जसा कर कापुरा
दोन भाग करूनि भस्म निघे कृती स्वरिपूंस हा
हा असें म्हणवि प्रशांत नदीश्वरीं करि पूंस हा ४२
जानकी नमितां पुन्हा वदली द्रवोनि शर्मस्कतें
वायुजें वरवाक्य घेउनि शर्व-शक्र-यम-स्कतें
क्षिप्र गोष्पदसा पयोनिधि लंघिला शत योजनें
हर्षले बहु अंगदादि जसे सुधारस-भोजनें [∗] ४३
जानकी हुडकावयास्तव धाडिलीं बहु जीं बळें
आपुलें मधुसंज्ञ जें वन तें तिहीं लुटिलें बळें
ताडिला दधिवक्त्र हें कथि कार्य-सिद्धिस जाणुनी
हृष्ट होय सुकंठ आंग मनांत लेश न आणुनी ४४
पातले कपि हृष्ट होवुनि वंदुनि प्रभुतें फणी[10]
तेविं मारुति बाहु दे अति-भव्य-दीप्ति-शिरोमणी
सुप्रसन्नमनें रघूत्तम भेटला पवमानजा[11]

---

१ जा, गह्नका. २ महा-उपवन-मोठी बाग तिला. ३ गरुड. ४ ब्रम्हास्त्र. ५ हृहस- तीसा. ६ सागरांत. ७ पुच्छ. ८ शं-अस्क-कल्याणअसो. ९ अपराध. १० सर्प ११ वायुपत्र(मारुती)स्याला. + गारा. ∗ सैन्यें.

त्या म्हणेल न धन्य कोण मिळे असा नंच मान ज्या ४५
कार भारचि घातला उपकार हा भवभंजना
वातपुत्र-मनाचिया करि भेटुनि प्रभु-रंजना
होय धन्य जगत्त्रयीं प्रसवोनि सन्मणि अंजना.
कंजनाभ यदाश्रितांप्रति दे यशा कनिरंजना ४६
कोटि कोटि करांश-संभव ऋक्ष वानर बाहुनी
चंड पर्वत तच्छिला शिखरें महाद्रुम वाहुनी
गर्जती घनसे महाबळ युद्धकामुक पाहुनी
शोभनीं समयीं निघे प्रभु राजसंमत लाहुनी ४७
वाहिला पवनात्मजें प्रभु राम लक्ष्मण अंगदें
पावली करकें पयोनिधिच्या तटा परं-भंगदें
रावणें अपमानिला ककुली बिभीषण पातला
सत्करवीं शरणागत प्रभुनें फळोलचि घातला ४८
त्या स्व-बंधु-करें ननां अभिषेक तो करवि प्रभू
क्षिप्र राक्षस-राज्य दे करवी दिवाकर बिंब भू
अब्ध-भीत समुद्र भेटुनि सेतुनें रचवी रते
या यशीं जग सर्व भीति कदुर्जया नच वीर ते ४९
सिंधुतें नळ-निर्मिताऽद्भुत-सेतुरूप-पथें तरे
राम रावण-दून सांडवि भासले कपि जे खरे
राक्षसासि विलोकितांचि उडे सुकंठ गळां पडे
बाहु-युद्ध करी हरी मुकुटा मदांहि असें घडे ५०
ये फिरोनि कृती करी अमृतासि नीरस हा यशें
त्या म्हणे प्रभु काय हें असतांहि वीर सहाय शों

---

१ नूतन. २. नामविशेष (मारुतीची माता) ३ क्षणमुहूर्ती ४ दुसऱ्याला नाश देणारी. ५ पृथ्वी. ६ सुग्रीव. ७ हरण करी. ८ ज्ञान.

घातली कसि गे सख्या उडि उग्र तो दशसा हसें
येतसे तुज बा नये मज कांपलें तव-साहसें ५१
रावणें प्रभुचें धनुष्य शिरोब्ज[1] कृत्रिम दाविलें
श्रीहि हा वदली मनीं क्षणमात्र सत्यचि भाविलें
ये बिभीषण-गेहिनी[2] सरमा वदे सखि आइक
व्यर्थ शोक नको करूं गमलें खरें परि मायिक[3] ५२
प्रेषिला प्रभुनें महामति दूत अंगद बोलिला
धर्म तो गुरुभीं महाकविनीं प्रभुप्रिय तोलिला
दे जना प्रभुरत्न हें म्हणवी न हाय कसा जिवे
राहुला रस नयशीं रघुवीर-सायक साजिरे ५३
प्रेरुनि क्षणदाचरांसि दशास्य तो धरवी रया[4]
नेणते धरिती मदांध भुजद्वयीं परवीर यां[5]
अंगदें गगनीं उडोनि महाबळें भज झाडिले
पाडिले मदमत्त चार यमाकडे जड धाडिले ५४
साम सोडुनि मांडिलें नय धर्म लंघुनि उद्धतें
युद्ध तेथिं न ऐकिलें करि वर्णितां अतिशुद्ध तें
आंत बाहिर वीर वीररसें निरंतर रंगले
अंग लेखिति ते तृण त्यजिती न संगर भंगले ५५
नाचले समरीं कबंध असंख्य रक्त-नदी-शतें
चित्र जें करिती निशाचर-कीश तेंहि तदीश[6] तें
वाजि-वारण-मार्ग-रोधक मांस-कर्दम सांचलें
राम-लक्ष्मण-सन्मुखागत मानुषाद[7] न वांचले ५६
कीश वृक्ष-महा-शिला-शिखरें धराधर खाणिती

---

१ शिर - अब्ज - शिरकमळ. २ विभीषणाची गृहस्वामिनी. ३ मायावी. ४ वेगा. ५ अंगदा. ६ तत् - ईश - त्याचे स्वामी. ७ मनुष्यभक्षण करणारे राक्षस.

लक्ष्मणासि अहर्निशात्रय न दूधा मग लागलें
भागलें बहु कीश-सैन्य नभक्षिलें फळ जागलें
बंधुच्या विजयें प्रभूत्तम मानसीं बहु हर्षला
तच्छिरीं कुरवाळितां तनु शीत दृग्जळ वर्षला ६३
घे प्रतत्न दशास्य जे प्रभुदार तच्छमना असी
श्रीस वांनापि कीर्ति जोडि स्वपार्श्व अच्छमना असी
शोक कोप न आवरे दशकंठ फारचि बावरे
काळसा बळि धावरे प्रभु त्या म्हणे धर आवरे रे ६४
रावणें खरशक्तिनें स्वकता ऽरिचें उर फोडिलें
तोंचि आणुनि शृंग तें पवनात्मजें यश जोडिलें
प्रार्थुनि प्रभुतें रणीं बसवी रथावरि मातली
ढिंडिम प्रगटोनि संयमिनी-पथावरि मानली ६५
राम-रावण-दर्शिता मुनि वर्णिती परमा रणा
काळ सप्त-दिन-क्षपामित लागला पर-मारणा
मस्तकें शत खंडिलीं उठलीं नवीं परि मागुतीं
ब्राम्ह योजुनि भेदिलें उर त्यां दिशी परमागतीं ६६
कुंभजा रविलाहि गातलिलाहि दे यश राम हा
मागुन प्रभू आपुल्या करि तद्गन-गेय-शाग-महा
पारिजात-समुद्भवे कुसुमें प्रभूवरि वर्षले
शक्र-गर्व-सरोजसंभव सर्वही सुर हर्षले ६७
दिव्य दुंदुभि वाजला गमला महाघन गाजला
सत्यलों प्रभु साजला त्रिजगीं महोत्सव माजला
या सुरद्रुम लाजला जन-दोष सर्वहि भाजला

---

१वानरसैन्य. २स्वल्प. ३ दृक्-जळ-नेत्रसंबंधीजळ. ४खड्ग. ५स्वच्छमना
६ प्रभाव. ७लक्ष्मणाचें. ८ इंद्रसारथी. ९शत्रुचमू. १० परंतु. ११ फिरुन.

धन्य शील तुझें जसें प्रभुचें तसेंचि महा सती
तूंचि या उचिता न जी असि पात्र या न महासती ७४
भक्त-वत्सल-राम-दर्शन-काम सन्मति जाणवी
तोहि त्या प्रभुला तिला प्रभुहि स्वसंनिधि आणवी
आपणां न शिवाचवया अपवाद दिव्य करी सती
लोपवी स्वयशां पयोधिस हीं न दिव्य करी सती ७५
शक्रसा स्वविमान सोडुनि भेटला प्रभुला पिता
स्थापिता शिर होय तच्चरणीं स्मराद्यरि दांपिता
तांपिता निववी तया भरताहि घे वर शापिता
पापिता हरि या यशेंचि न लावुं दे कर नापिता ७६
त्वद्यशश्रवणीं सुखीं अमृत श्रुतज्ञ न ओतु तें
ओतु तें जय देवु घे पद याद्य हो तम-ओतु तें
पुत्र-वत्सल-तात दिव्य यापरि प्रभुला वदे
भाव देव तदीय वर्णिति पुण्य तच्छुभ नाव दे ७७
सर्वहा उठवी मृत स्वकपि प्रभूत्तम दृष्टिनें
वर्णिती मुनि आत्मभूपधिमन्त्रकृतामृतवृष्टिनें
दे तया यश राम हा महिमा स्वयें बहु वाढवी
संकटांतुनि आपणासहि भक्तमानद काढवी ७८
प्रार्थुनि प्रभुला बिभीषण हार्द-सद्रस-भाजन
घे म्हणे सगळा बळासह विश्व-भद्र सभाजन
बोलिला प्रभु पूज कीं शप हें न कों भरताविना
जो जटाधर कष्टतो मज काय हो भर तांविना ७९
शिव तो मज भेटव प्रिय हेंचि पूजन बा सरा

---

१ नारद. २ अज्ञानरूप मार्जारास ३ भीतिरूप उत्तमरतानें पाय. ४ पूजा. ५ पूजारूप ६ नारविना. + चौरागीहूनहि महापातकी प्रकरणाच्या श्रवणानें पवित्र होतात. ÷ देवांच्या हत्तीस (ऐरावतीस). × स्मर-आद्य-अरि-कामादिशत्रु. ⊕ दव विणाव ÷ तप्त झाले त्यास. ‖ पधिमन्त्र-कृत-अमृत-वृष्टि-इंद्राने केलेल्या अमृतवृष्टिनें.

मानसा भजु हंस गाय मिळो ऋक्ष धाकुळ-वासरा
ज्यांत पाहिन त्यास धन्य म्हणेन त्यांचि ऋक्षवासरा
कीं असूंसि म्हणे सदा नधरूनि नो परवा सेरा ८०
तो ससैन्य ऋक्षकंठ पूजुनि पुष्पक द्रुत आणवी
क्षिप्र नेइल हें असें प्रभुला बिभीषण जाणवी
रामभद्र म्हणे अशाहि भजोनि यानुपने लया
पावला जन होय काम धनंजया तुप नेल या ८१
पुष्पकीं बसवी स्वयें रचिन स्वकार्य सरेव दया-
पात्र ऋक्ष कपीहि देववती न आर्य सरेवद या
श्रीस घेउनि सानुज प्रभु तो वसे मग नोतु न
त्यांत येइल कां स्फुरे यश गावया गगनांतुनं ८२
श्रीस दावुनि युद्धभू कथि ज्या चमत्कृति जाहल्या
होय तो व्यक्त जो म्हणे शमुनाचिया पळ जाहल्या
सिंधुला भव हे महापथ वेद या नळ-सेतुला
मुक्ति मी म्हणतों न जी कथंव दया नळसे तुला ८३
यास्थळीं सहसा बिभीषण पावला विरहाकुला
धैर्य दे करि कार्य हो मन भानुच्या चिर हा कुला
प्रार्थिला नवळेचि सागर राग-रम्य-तनू मला
भेटला तंव हाहि सेतुपथा उपाय कथी भला ८४
देखि हा नग ऋष्यमूक ऋक्षकंठ गन्सरव या नगीं
दाखवी नगं यास्थळीं रमल्लास दुर्लभ तूं जगीं
भेटवीन तुला प्रिया तुज होउनि स्थिर धी म्हा
हें वदे सति दे करीं कर मन्मनीं बहु धीर हा ८५
वाळिचा वध यास्थळीं सति ती ऋक्षकंठ-गुहापुरी

---

१पंपा. २नारद. ३चमत्कार. ४यमाच्या. ५रेवा. ६पर्वतीं. ७अलंकार + स्नान-दिवसा.

ते कपीश्वरदार ईंत जयां बहु स्तविती सुरी
जानकी भ्रमला कथी प्रभु कौंशपा तिस आणवी
श्रीपुढें तसि ती दिसे समर्थापुढें जसि दाणवी ८६
रामचंद्र पुन्हा कथी बहु शोक-पावक पेटला
देखि मारुति हा महाघन यास्थळीं मज भेटला
ऋभु हे मरेंसा पहा म्हणतो तया मग याडुतें
सत्पथें करितो सदा सति जें करी प्रिय आइतें ८७
हा मतंग-मुनीश्वराश्रम पुण्य-देश बरीस ती
होय फार बरी मला स्मरव देखि हे शबरी सती
यावनीं वधिला कबंध जिच्या यशें जगधीत मी
सत्तराश्रित हे नमूनि पहा महासति गौतमी ८८
राम पंचवटीस दाखवि तात-बंधु-खगालया
दावि हाय म्हणे कसें कपि हो सदैव न गाल या
कुंभजा:त्रि-मुनीश्वराश्रम चित्रकूटहि पाहवी
सूर्यजा हरिजा प्रयागपदीं स्वपुष्पक राहवी ८९
सज्जना भरताचिया प्रभु निश्चयांतिस आठवी
वायुजा कळवावयास निजागम द्रुत पाठवी
तात-मित्र-मुनीस वंदुनि राम भक्तिचिया बळें
ज्ञान मुक्ति-फळप्रद स्वकपीस मागुनि घे फळें ९०
तेथुनि द्रुत रामचंद्र निघे निषाद-चकोरसा
होय हर्षित जो म्हणे इतरा मनांत नको रसा
स्पष्ट चातकसा जगीं भरत ज्ञधीस गमे घमा
वाळवी विरही प्रभूत्त मही न कां मग मेघसा ९१

१ देवांगना. २ वारंस. ३ सरोवर. ४ ऋष्यावा. ५ वाळीला. ६ निज-आगम-आपलें येणें. ७ कोळी-(गुह). ८ ज्ञात्याच्या बुद्धीस. + ऋकंठगुहापुरींत. ✽ ऋगळा. ⊕ नामविशेष (आकारविशेषाचें दीपलावण्याचें पात्र).

राम पावुनि भेटला भरतासि जेविं कलेवरा
प्राण हे त्रिजगांत सेवक-बंधु रीति कळे वरा
पौर हृष्ट मयूर नाचति राम हा वळला घन
श्रीद होय वसंत तो प्रभु भासलें पुर तें वन १२
भेटुनि स्व-गुरु-प्रधान-जनांस मातृजना मग
यातुकीशप भेटवी भरतासि हृष्ट करी जग
बंधुच्याहि निजाहि तो करवी जटा अजटा कवी
वर्णिती कपि राक्षसा कथि रूप तो अज राऊवी १३
जीवसा प्रभु बंधुतें असुसे प्रवेश करी रसें
शोभलें पुर तें महापुर तें महास्य शरीरसें
जानकीसह वानराधिप-दार फारचि शोभले
पौर-दार तयांसि पाहुनि तेहि त्यांमहि शोभले १४
राजवेषविराजित प्लवगक्षिपा वरि मानले
त्यांसि त्या परमोत्सवीं अवलोकितां नृप लाजले
लाज अक्षत पुष्पराशि पुरस्त्रिया बहु वर्षल्या
त्यां परीस सुरस्त्रिया अति भाग्य वर्णिति हर्षल्या १५
कीश पाठविले मदें सकळाब्धि पंचनदीश ते
प्रार्थुनि द्रुत तीर्थ आणिति दे गुरूसि नदीश तें
श्रीवशी अभिषेक होय महोत्सवें कविराज ने
वर्णिति श्रुतिवृंद पुष्कळ याविना न विराजनें १६
अमर-गायक गाति नाचति अप्सराहि न राहुनीं
अधिक भाग्य न जिष्णुचें पुर पामराहि न राहुनीं
विविध-वाद्य-रव स्तव प्रवरर्षि आरति मौही

१ श्रेष्ठा. २ राक्षस आणि वानरयांचा पति बिभीषण आणि सुग्रीव- ३ लाह्या. ४ वानर. ५ पंचनदीश. ६ उत्सवी

रघुपुरी किति देउरों नच साधुवाद रिती मही ९७
मुकुर सन्मणिहार पाठवि शतमख भक्त आदरीं
करि रित्या चिर मेरुच्या बहु-मत्त महोत्सव हा दरी
कनक-रत्न-रथाश्व-वारण अमित गोधन देववी
भक्तवर स्वकरें कपींसहि विविध भूषण लेववी ९८
मारुतीस अमूल्य मौक्तिक-हार दे महिजा सती
गौरवी करि धन्य धन्य जगत्त्रयीं निजदास ती
प्रेम फार मरुत्सुतीं भक्त अंगदींहि करी मुलें
तेथिं भूपवि अंक दे गणि नाक-सत्तरुचीं फुलें ९९
जांबवान् सकळ प्लवंगप सर्व यूथप यातुप
श्रीश पूजि नयांसि जें स्व-चरित्र-भोजन या तुप
रामराज्य तसें जगांत न भूत पूर्व न भावि कीं
नित्य तेंचि अभाविकां कविगीत जें सुख भाविकीं १००
ज्यांत न मशक दंश मत्कुण मक्षिका न उवा पिसा
मधुप न खळ-चोर जार न खेळता न जुवा पिसा
व्याघ्र-वृक-पवनाश-वृश्चिक-रोग-आधि जरा जन
नेणतिच सकळ प्रजा सधना महा रय-भाजन १०१
काम कोपहि सों असे परमोग्र जे सहजारि ते
सर्वही पडलेच सोडुनि दुर्गुणा सहजा रिते
आळ घेउनियां कधींहि न वाळही कलहा निघे
राम-राज्यपदांत केवळ वासना-बळ हानि घे १०२
होय विप्रशिशु व्यस्त भक्त त्यासि सत्वर वांचवी
सांचवी यश गोड तें कविमानसें बहु लांचवी

---

१ गुहा. २ पृथ्वीपासून झालेली (सीता) ३ मच्छर, जबार. ४ ढेकुण. ५ माशा. ६ मस्तकांतील कीर. ७ पुशा. ८ वेडा. + सहा

तीन कोटि अमर्त्य गायक मारिले भरतें रणीं
लक्ष्मणानुज तो स्वयें होय करी खळा लवणा फणीं १०३
दोन दोन कुमार त्या चवघांस होउनि शोभले
तातसेचि यशें महाकवि तद्गुणा बहु लोभले
श्रीकरें अभिषेचिले विधिनें स्वनंदन अष्ट ते
भूभरें जरि शिक्षिले नमते स्वयें तरि कष्टते १०४
आदिकवि-वर-शिष्य कुशलव राम-कृत-गुण-शेवधी
तात-सुचरित-गान-रसमनि रंजवीति मुनि-देव-धी
श्रीश करि हयमेध निज-कृत-गीत निजयश आपण
स्वाप्तजनसह पी करवि न पुरे रसिकपति हा पण १०५
त्रिजगदघहर परम सुखकर चरित रघुवर वरदया
स्तविति सुरमुनि म्हणति करि असि पक्षहि वरि नच परदया
अजित-गुण-यश सकल-नत-जनि-मरण-जलधिमि सेकवितें
अमर-तरुहुनि अधिक शतगुण-फळद बहुमत सुकवितें १०६
सर्व-भक्त-मयूर-हर्षद-राम-मेघ-महोदया
हेतु या भक्तचीच हो दुसरी कदापि न हो दया
पुष्पसें विबुधप्रियाख्य चरित्र हें शुचि वाहिलें
वंदुनि भक्तच्या पदांवरि मस्तकासह वाहिलें १०७

**समाप्त**

## ओवि रामायण

आर्या ओवींत दिसे ओवी आर्येंत पाहतां नीट

---

१ गरुड. २ त्रिजगतु-अघ-हर-परम-सुखकर-चरित-भैलो ज्याचें पाप घालविणारें आणि सुखकारक चरित ज्याचें. ३ शुष्क करितें. ४ उत्तम कवितें. + सर्व नम्र जना-च्या मरणरूप समुद्रास. ✳ या आर्या असून त्यास पंतानीं ओवी ही साधिली आहे- ओवीच्या प्रत्येक चरणास समजण्यास्तव विरामचिन्ह केलें आहे त्यावरून- ओवी समजावी

हरि-हर-गुणसे सद्रस हे रसिका सेवितां नये वीट १
वाणी देवी चित्तीं भावें, ध्यावी सदैव वानावी
नावें, अघ हरि ईचें गावें, यश हेचि माय मानावी २
वंदुनि सरस्वतीला ध्यातां, कुलदेवतेस कवि सर्व
गातां, निजपूर्वज गुरु- मूर्ती, हरि-गुरु तथैव कवि शर्व ३
कैलासीं नगतनया निज.पतिची प्रार्थना करुनि बोले
गुज, कांहीं सांगा जी मज, ऐसें ऐकतांचि हर डोले ४
सीताकांता मेघ- श्यामा, हा दीनदास लक्षावा
रामा, अनुदिनि वदनीं नामा, वसवोनि नित्य रक्षावा ५
हरिली त्वां गाधिज-मख- पीडा, रामा दिली खलजनातें
व्रीडा[1], सन्मुनि-मानस- खग-नीडा, सुख दिलें सुर-मनातें
उद्धरिली ती गौतम- भार्या, छळिली तपस्वि-वक्रानें
जी आर्या, सर्व-सतो- जन-सत्कार्या जयोनि शक्रानें ७
हरिलें खंडुनि ईश्वर- चाप, श्री जनकनंदिनी-चित्त
ताप, हरुनि जग केलें निष्पाप, सुहृष्ट सत्तपो-वित्त ८
क्षोभे भृगुराम महा शूर, सदोद्दाम अस्त्र-शस्त्र-बळें
क्रूर, तयाचा केला त्वां दूर, क्रोधसह अधर्म पळे ९
ताताचा सत्यव्रत- धर्म, त्वां रक्षिला त्यजुनि राज्य
शर्म, सदुकर केलें कर्म, स्वीकारुनि श्रम प्राज्य १०
पाखंडजनें जैसी गीता, रात्रिंचरेश्वरें हरितां
सीता, तव मतिनें हे ज्वरभीता, जन विडंबना करितां ११
त्या सख्य माकडासीं केलें, सिद्धीस जडहि तत्कार्य
नेले, सुयश दिगंतीं जें गेलें, तें त्रिलोक-सत्कार्य १२

---

[1] लज्जा.

रचिला सेतु समुद्रीं मोटा, संहार करुनि खळसहित
पोटा, काळाच्या अति - तर खोटा. ओपिला सुधा अहित १३
दिधली बिभीषणाला लंका. मग दिव्य करुनि ती देवी
अंका. क्षाळुनि निरसुनि शंका. लोकांत शुद्ध यश ठेवी १४
भक्त भरथ हर्षविला राज्य, करुनियां दिलें प्रजांसि सुख
प्राज्य, यशा या कविचें साज्यसिता पायसाहि घे न मुख १५
नेली प्रजा निजोत्तम - लोका, रामा हरेनि मोक्ष भवा
शोका तूं जपसि नता तोका, जसि माय करुनि लोभ नवा १७

ओवीरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें स्तवचंदनें

समाप्त.

## सत्स्वरामायणप्रारंभ

श्रीश ब्रम्हद राम गर्षिवचनें सूर्यान्वयीं जन्मला
झाला सर्वजगीं यशें करि सदा सारा मही सन्मला
कौसल्या जयतीडय राम जयतां वारी यमोपद्रवा
ज्याचें भावुकराशि नाम रुचलें अत्यंत दुर्गाधवा १
कैकेयीसुत तोचि होय भरत श्रीला वरामत्र हा
पावे नंदन जन्मतां यम कमिचाही उदारा महा
तेजस्वी नय - धर्म - जन्य यश ज्या सेवी सुधी लक्ष्मण
श्रीशत्रुघ्न दुजा विराजति मना देती जनाच्या क्षण २
श्रीमान् गाधिजराज या दशरथा मागे महात्मासखा
ओजस्वी तनय क्षपाचरहता राख्यावयाला मखा
देहा या जयरामलक्ष्मण जे गर्छे यस्कर क्षमापती

१ कलंका. २ स - आज्य - सिता - तूप आणि साखर यांही युक्त असा. ३ बालका. ४ ब्रम्ह - हा ... वचन - ब्रम्हदेव, महादेव, देवर्षि यांच्या वचनें. ५ कल्याणरू ... स्माह. + जयति - ईडय.

ते रात्रिंचर मर्दुनी विनविती त्या कौशिकाची मती ३
श्री तें पावविली सुन्हा पदरजें दारा महर्षींची
गानी सद्विज हें यश्ना द्रुत करा याला म्हणाला शची
जेथें त्या भुजयत्न कुंठित जगंनाथ प्रिय ख्यात या
कां तें दिव्य शरासन प्रभु मथी दोःशक्तिलेशें तया ४
श्री सीता प्रभुला पराक्रमजिता प्रेमें वरी दे स्फुना
हर्षें तीन तिपांजणा करि यशा राजा महाधिश्रुता
जिंकी राघव बाहुज-क्षयकरा रामा जय क्ष्मास्कर
ध्याती वर्णिति हा नरामर जगीं झाला महाभास्कर ५
श्री त्या क्षोणिवरा पित्याहि मग दे धन्यत्व सत्याऽवनें
सख्या साऽनुज जाय राज्यपद तें सोडूनि हर्षे मनें
तो राज्य श्रय जन्मदान यश हा दुःखें प्रभूतें नमी
धीरार्यस्कृत पादुका भरत घे मध्येंच राहे श्रमीं ६
श्री सेवी न धरावनीं परि मन स्थापी तपस्वीपण
स्वीकारी निज निश्चय स्थिर धरी राहे म्हणे आपण
भक्त-ज्ञानि-मुनि-प्रज-प्रिय करी देते जनाशीं भय
क्रूराऽराति मथी प्रियाहि हरवी त्याचा कराया क्षय ७
श्री संत्राण-करा जटायुस महाप्रेमें गती दे हरी
हा निर्व्याजदय स्मरासम अतिक्रूरा कबंधा करी
पूजी जी शबरी जगन्नय मता जन्मात्यय व्यापदा-
हीना तीस करूनि पावविवरा निःसीम भव्या पदा ८
श्री दे मारुतिला तसीच सकळा ताराहि दावी महा
तेजस्वीय हरादि गाति महिमा अन्यत्र कोठें न हा
शोधी भूजनितें प्रभु प्रिय करी साधी जय देवितें

१ परशुरामा. २ नामविशेष राक्षस, त्याला. ३ शत्रुनगरी लंका. सी.
+ जन्म-मरण-भय-शिम्भापदा-हीना-जन्ममरणरूपजीविताघषिपसित इहिता.

जाळी रावण-सैन्य उभहि मग्रीं चिंतेंत घाली रिपू ९
श्रीचें हृद्य करावया मन निघे घे कीश-सेना-शतें
भारानें जगती धरी भय तदा राजाहि मस्तें नतें
झालीं जों जळधीस ये प्रयत तों वरुंजळी तो यदा
जैसा मोर तसा बिभीषण नमी सारा मनोज्ञा पदा १०
लंका श्री खचरा नमस्स्तुतिपरा [१] देय दाथी दया
बांधी सेतु जळांत आयतवरा गावें महेंद्रें जया
दास्यांस्थें रजनीचर-क्षय करी जेन्यांत अन्यायशें
ज्यांचे त्यां गति-दे प्रभु श्रुतिपरा मर्त्यांहि धन्या यशें ११
श्री कंदा चतुरानना अमर[+]भूपा जो नमानी तपा
नाशी जन्म खळा वियच्चरवरा मांसाशना मघपा
मारी राम मुकुंद तें जयजय ध्यानें स्तवें दाटलें
ब्रम्हांडोदर सर्व-सज्जन-नरा[२] मर्त्यां वरें थाटलें १२
श्री तें घेवुनि राक्षसाऽरि स्वमनोयानीं वसे ये पुरा
सम्यक्ताऽनुजन्-हृत्प्रिय प्रभु करी राज्यं महीच्या सुरा
सर्वांही निववी जगासि सुयशें अर्पी निज श्रेय तें
राजीवाक्ष कवींद्र कोटि महितें तारी चरित्रें ततें १३
सत्स्वरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं आर्पिलें कृतवंदनें १४

समाप्त.

## अथ पुष्पिताग्रारामायण.

[३]रघु-नृप-कुळ-सद्म-दीप राजा

---

१ दृष्टांत. २ पुष्पक विमानीं. ३ रघुराजाचें कुळ जें तेंच गृह त्यासंबंधी दीप. ४ देवराजा (इंद्राला).

दशरथ जो बहुमान्य जेथिं आजा[१]
दशमुख-हननार्थ तत्कृतत्वा[+]
वरि बहु ज्या श्रुति गाति सतु-सु-तत्वा[=] १
प्रथम तनय राम दार ज्या मा[#]
भरत दुजा वर-शील-भव्य-धामा
पुरवि सुगुण लक्ष्मण स्वकामा
तनुज तिजा चवथा रिपुघ्ननामा २
अनुज-सहित राम[२] आधिं ज्याचा
गुरु मख रक्षि[३] सलील गाधिज्याचा
निवधि पदरजोनिळेंचि[४] तप्ता[५]
भजुनि शिलापण[६] जी मुनींद्र-शप्ता ३
गिरिश-धनु जगन्मनोभिरामें[७]
तृणसम ओढुनि मोडितांचि रामें
विनवुनि चवघांसि चार धन्या
जनकनृपें विधिनें दिल्या स्वकन्या ४
उडवि पवन पर्ण तेंवि सर्व
प्रकुपितभार्गव-राम-वीर्य-गर्व
स्व-पितृ-वचन-पालनार्थ सोडी
पर सुसमृद्धहि की यशींच गोडी ५
निघवि बहु तपस्वि-वृंद-चेत
अनुचर लक्ष्मण-जानकी-समेत
रचितजट[८] सवल्कचाप[९] सासि[१०]

१ रघुराजा. २ मोठा. ३ लीलायुक्त. ४ पद-रज-अनिल-चरणधूलीच्या वायूनें. ५ तापलेली. ६ पाषाणत्व. ७ जगत्-मन-अभिराम जगाच्या मनाला सुंदर असा. ८ केल्या जटा ज्याणें असा. ९ सवल्क, चाप-वल्कलें आणि धनुष्य यांसहित. १० स-असि-खड्गासह. + तत्-कृतत्व-त्या दशरथ राजाच्या पुत्रपणाला. ≠ साधूच्या उत्तम तत्वा. # लक्ष्मी.

रक्तनि वरि होउनि चित्रकूटवासी ६
भरत परतवावयासि गेला
दशरथ होवुनि शोकतप्त मेला
तरि नपरतला तया धराया
क्षितिभर दे निजपादुका तराया ७
मुदित करुनि अत्रि दे विराधा
गति वदला न पुर्ये मनीं विराधा
पिवुनि निज-तपःप्रधानदास
द्विजवर हो कथि हा मुधा न दास ८
घटजमुनि जटायु यासि पाहे
तदुपरि पंचवटींत राम राहे
दशमुख-भगिनी कुबुद्धि चंडी
रत-रुचि जी विधवाहि नाम दंडी ९
खळ खर हननार्थ सैन्य आणी
निवटि तया प्रभु चाप-बाण-पाणी
दशमुख खबळे अदभ्र माया
मृग करि पुण्य यशःपद भ्रमाया १०
कनकमय कुरंग दुष्ट धाडी
मरुनिहि अंतर तो निघोन पाडी
गिवसुनि उटजांत एकलीला
हरि उरगी अनुमोदि भेकलीला ११
विरथ करि जटायु तीस सोडी

---

१ आनंदित. २. नामविशेष (राक्षस) त्याला ३. हृष्टहा. ४ आपल्यातपश्चर्यारूप अमृताच्या नदीला. ५. व्यर्थ. ६. पुष्कळ. ७ पाहुनि. ८ सर्पीण. ९. बेडकाचीक्रीडा.

क्षण मग शत्रु तदीय पक्ष तोडी
स्वखग पळवितां कृपांत टांकी
हळहळले बहु हर्षकेहि नोकी १२
नमुनि अनुज साऽधु वृत्त सांगे
प्रभुहि म्हणे कटु बोललीस कां गे
विषयिविरहि-जंतुसींच तोले
उटज विलोकुनि शून्य हाय बोले १३
प्रभु हुडकि वनीं करी विलाप
त्रिदशा-वधू विरही जसा इलाप
विकळ पितृसख्या खगासि पाहे
पुसुनि निमित्त न शोक-भार साहे १४
हरिलि दशमुखें सती वदे हें
त्यजि असुता गमला दुजा न देहें
प्रभु पिवपि करूनि दाह तोया
वरचरिता मनिं साधु वाहतो या १५
धरि असुर कबंध त्यासि मारी
प्रभुवर तद्गत-शाप-ताप वारी
शुचिमति शबरीहि धन्य केली
प्रभुसि रुचे न कधींहि अन्य केली १६
करुनि वरयशासि पाप पंपा
पवनसुताहि करी महानुकंपा
त्वरित सुगळ ताप सांग वारी

---

१ त्याचे. २ आपले अलंकार. ३ स्वर्गी राहणारे देव. ४ रडत. ५ घडलेली गोष्ट ६ विषयी आणि विरही जे प्राणी त्यांच्या वाटीच. ७ राजा. ८ पक्षीराज (जटायुस.) ९ दुसऱ्याची क्रीडा. १० नाम विशेष सरोवर. ११ सुग्रीव १२ निवारी. ++ देव स्त्रीच्या [illegible] याला अप्सा.

प्रभु वर-सख्य जसेंचि गांग वारी १७
कपि जलधि उडोनि जाय शोधी
प्रभुदयितेप्रति होय हा यशोधी
पवन-तनय दे सतीस मुद्रा
परपुर जाळुनिहि प्रमोद रुद्रा १८
निरखुनि दयिता-शिरोमणीतें
अति विरहाऽसुख जें न तो गणी तें
पवनतनुज वाटला प्रभूतें
असुदचि गोरविला स्तवें प्रभूतें १९
जलनिधिस अपार कीश-सैन्य
प्रभुवर ने बहु-नाद-दत्त-दैन्य
करि विटुनि अपा त्यजूनि शंका
प्रणति बिभीषण दे तयासि लंका २०
प्रभु करवि पयोनिधींत सेतु
प्रबळ-निशाचर-राज्य-धूमकेतु
निवधि उतरतांचि शंक लंका
तुडवि तिच्या कपिराज तो कलंका २१
कपिपति-सुत दूत राम धाडी
अतिपटु तो परगर्व सर्व झाडी
नच परि करि साम हा कदापी
द्विप जरि दे प्रभुसिंह हाक दापी २२
प्रथमचि वधिला प्रहस्त सेना

---

१ गंगेसंबंधी. २ उदक. ३ मुद्रिका-आंगठी. ४ [illegible] ५ पुष्कळानें. ६ नमस्कार. ७ अति बळकट जें राक्षसराज्य त्याच्याना-शाविषयीं उत्पात ग्रहविशेष. ८ वानरांचा स्वामी जो सुग्रीव त्याचा-सुत अंगद तो. ९ हानि. * शत्रूचा गर्व. + वानरांचें सैन्य.

पति स्फुरसैन्य जथा पुढें बसेना
घनरव करि नागपाश बांधी
प्रभुयुग हो हरिची म्हणे न कां धी २३
कथि जनकसुतेसि यांस धोका
तिळहि नसे त्रिजटा निवारि शोका
पळवि पन्नगपाळ[2] सर्व सर्प
प्रथम विनाशुनि तद्विषाग्रदर्प[3] २४
पुनरपि कटक-क्षयासि पाहे
दशवदन स्वपराभवा नसाहे
उठउनि घटकर्ण-काळ[4] धाडी
अजित तयाहि रणांगणांत पाडी २५
घनरव हरिलाहि दे ससैन्य[5]
प्रभुवर सानुजही रिघूनि दैन्य
उठवि बळसमेत राघवातें
पवनज[6] औषधि-शैल-शृंग-घातें २६
जनक-नृप-सुता विनाश दावी
प्रभुसहि हाय म्हणावयासि लावी
कळवि कपट तत्पितृव्य[7] वारी
श्रम मग लक्ष्मण त्या रवकासि मारी २७
स्व-तनय घटकर्ण पुत्र मेले
सचिव सरवे सकळ क्षयासि गेले
दशमुख असि[8] घे यथार्थ सीता

---

१ हाय. २ गरुड. ३ तत्-विष-उग्र-दर्प-त्यांच्या विषाचा उग्र दर्प. ४ कुंभकर्णरूप काळ. ५ सैन्यासह वर्तमान. ६ वायुपुत्र (मारुती) ७ तत्-पितृव्य-त्या इंद्रजिताचा चुलता (बिभीषण) तो ८ खड्ग, तरवार.

निरखुनि त्या अद्यासि होय भीता २८
सचिव-पवन या दवास वारी
अनय-पयोनिधि-याद वासवारी
प्रभुवधचि मनीं धरूनि रागें
त्यजुनि अशोकवनासि जाय मागें २९
प्रभु बळ वधि शत्रु पाठवीतें
स्वमन याचि रणासि आठवीतें
जलधिसि वदले न कोण वर्णा
रुधिर-नदी-शत-संग-शोण-वर्णा ३०
मग पर बळ घे प्रभावि रामा
वधिन म्हणे स्व-बळ-प्रभा-विरामा
पिवुनि कपिबळीं समरिं घाला
प्रभुवरि घालि मदें समरिं घाला ३१
स्व- तनय-भिदुरीं अशेष हाणी
क्षत करि शक्ति न भाहरी शहाणी
पुनरपि कपि आणि औषधीतें
रघुपतिच्या बहु अर्पि तोष धीतें ३२
अमरपति-रथीं बसोनि काम
स्थित-मतिच्या पुरवावयासि राम
अनलस दिनरात्रि सन युद्ध-
क्रतु करितां करि शत्रु-सैन्य शुद्ध ३३
अजित शत शिरें रणांत तोडी
तरि असुर न क्षणदाचरेंद्र मोडी

---

१ वणव्यास २ अन्यायसमुद्रांतील जलचर. ३ वासव-अरि-इंद्राचा शत्रु (इंद्रजित) ४ शोकरूपनदीच्या संगतीनें लाल वर्ण ज्याचा अशा. ५ शत्रु. ६ मनाची. ७ मद्य.

रधि-हृदय कथीं अगस्त्य जोडी
रविवर त्या स्वबळें रिपूर फोडी ३४
वधि कमळ-भवास्त्र उद्धतातें
स्वनिधन दे मलिनाहि सद्धता तें
दशमुख-पतनींच पुष्पवृष्टी
प्रभुवरि होय निवे समस्त सृष्टी ३५
स्तव जयजयकार फार झाले
प्रभुयश गाउनि सर्व साधु धाले
प्रभुसि निरखितां न पक्ष्म हाले
विधि शिव त्या परमोत्सवांत आले ३६
प्रकटि सकळ उद्रवास वाद्य
स्तुति परिसे विधि-रुद्र-वासवाद्य
प्रभुवर करि उर्वशीलवेना-
परि गुरु या कुसि उर्वशी लवेना ३७
प्रकटलि रतिर्ची सुगी ननाभा
करितिहि गाति कृती सुगीत नाना
अहि-नर-सुर-कन्यका यशातें
जपति परें जन धन्य काय गीतें ३८
अरिमहि निळ-ताय-देववी तो
रघुपति जो द्रुहिणादि देव वीतो
वसवि सुधिधिनें पदीं नतातें
करि अवलोकिल या न दीनतातें ३९
क्षणभरि करि दूर जानकीला

---

१ रिपु-उर-शत्रूचें वक्षस्थल. २ ब्रह्मास्त्र. ३ तृप्त झाले.
४ पापणी. ५ उत्-रव-मोठ्या शब्दास. ६ उरु-अश्लील-वेन-
असंतदुःखभाय जो वेन राजा त्याप्रमाणें. ७ मोठा. ८ उत्तम वाणी.
९ कुशल. १० सुखानें. ११ ब्रह्मदेवादि. १२ प्रसवतो.

जिरवुं शकें प्रभु तोहि ज्या न कीला[1]
उदधि करुनि दिव्य ती तया तें
यश निववी अजितामहाद[2]याते ४०
उदधि रपामृत पुंवंग ऋक्ष[3]
प्रभु करि लज्जित सर्व देववृक्ष[4]
प्रिय-सख युत पुष्पकीं सचेता
बसुनि पुरप्रति राम होय येता ४१
परम-कुतुक-हेतु मतु पाहे
जनक-सुता परमोत्सवासि लाहे
मग निववुनि ती रयावतारा
स्वपतिस वैसवि पुष्पकांत तारा ४२
परिसुनि शबरी-कबंध-पंपा
चरित वशी सख्य राम-मंघ-शंपा
तदनु वदलि ते नमोस्तु गोदा-
भव वर्धित हे न संश्रित-प्रमोदा ४३
प्रभु कळवि जटायुच्या कियेतें
गहिवरवी बहु आपणा प्रियेतें
मग घटज-कथाहि राम लावी
स्मरवुनि अत्रिस चित्रकूट दावी ४४
नमि रविजेनिला[6] सुरापगेला[7]
भजुनि जिला त्रिदिवा[8] सुरप गेला
कळवुनि गुण लाख विप्र या गा
म्हणति असें कथि दाखवि प्रयागा ४५.

---

१ ज्वाला. २ वानर. ३ आस्वल. ४ कल्पवृक्ष. ५ रामरूपमेघाची वीज (सीता) ती. ६ यमुनेला. ७ सुर-आपगा-भागीरथीला. ८ स्वर्गा. ९ मदर्पा.

स्वरत भरत भक्त आठवीला
अनिलज तेथुनि शीघ्र पाठवीला
पितृसख मुनि फार हर्षवीला
नमुनि शिरीं तुहिनाश्रु वर्षवीला. ४६

नम्हणुनि रघुवंशनायकोन
प्रभु भरतेनर वृत्त नायकोन
म्हणुनि बहुफलार्थ दे वरा या
बहु श्रुचि दे यश जेधिं देवराया ४७

कमुनि रजेनि आश्रमीं निघाला
भरतमनीं मग नातमा निघाला
कवळुनि निववी सख्या गुहास
प्रभु धनदा विभवा जसा सुहास ४८

मग भरत-चकोर वीतेतंद्रे
हरुनि वियोगज ताप रामचंद्रें
बहुत निववीला न चातकाचा
घन करि घात वरी न शीत काचा ४९

सफळ करुनि यत्न सानुजातें
द्रवुनि म्हणे गुरु रत्नसानु ज्यातें
प्रभुवर सुख दे न माय लेकीं
तसि सयश त्रिजगीं न मायले कीं ५०

सख्यवि गुरु-जनन्यःमात्यपौर
प्रभु करि सयश शक्र-हास गौर
तदुपरि अभिषेक होय गर्मीं

---

१ मारुति. २ थंडनेचोदक. ३ गात्र. ४ उत्तममहात्म्य. ५ गली तंद्रा (आलस्य) ज्याचें असा निरालसपणानें असा भाव. ६ मुख्य. ७ कच्चा. ८ मोटा. ९ मेरु. १० वसिष्ट आई प्रधान व पुरवासी लोक. + रघु-वंश-नायक-ऊन-रघुवंशाचे जे स्वामी त्याहून उणा.

करिन म्हणे गति हाचि सोयरा मीं ५१
निरखिति अशुभा दशा न नारी
प्रियविरहा निरमी दशाननारी
नकरि यमवश स्वनाम यांतें
रुचवि दयालु यश स्वनाम यां तें ५२
स्तविति सुकवि फार रामराज्या
लवहि नसे बहुमान पामरा ज्या
प्रभु वरद तयाहि नातमाच
प्रकटि करूनि दया हिना नमाच ५३
करवि सतत रामराज गाया
निज यश लावुनि सामरा जगा या
कलियुगिंहि मयूर हात नाना-
परि करि जोडुनि नित्य हा ननाना ५४

समाप्त.

## मयायारामायण.

## बालकांड.

श्रीपतितें वधि रावण-पीडित विश्वसुखार्थ म्हणे नरसा हो
वृद्ध अपुत्र न आधि सदा दशरथ यथाभिध भूवर साहो
कश्यप तेंवि पितृव्य तुझें रवि-वंशज हा शुचि सुव्रत लाहो
या परमाश्वमखें यजितां तुज यावरि दुःख न लेशहि राहो १
विष्णु अवश्य म्हणे अनलार्पित पायस जें करि कारण याला

१ उत्तम अश्वमखं. २ अग्नीनें अर्पण केलेलें * दशरथ. + ब्रह्मा
** हिताकर निश्चयप्रकटी.

प्राशिति त्या नृपदार यथाविधि तद्दिमळाउदराप्रति आला
राम दुजा भरताभिध लक्ष्मण पुत्र अरिघ्न चतुर्वपु झाला
पाहुनि चार कुमार गुणाकर तो अजनंदन फारचि धाला २
ते गुरुनें करुनि प्रथम द्विज सद्गुण-मंडित पंडित केले
गाधिसुतें मग लक्ष्मण राघव याग समाप्तिस मागुनि नेले
पावुनि अस्त्र-रहस्य पथीं हत-ताटक हर्षित होउनि गेले
तद्विशिखप्रकरें मख-पीडक दारुण दुर्मद राक्षस मेले ३
त्यावरि तो मिथिलेसि महामुनि जाय पथीं प्रभु गौतमजाया
उद्धरि पाद-सरोज-रजें बहु जी भ्रमवी मन ती हरिमाया
त्र्यंबक-कार्मुक-भंग करी क्षितिजा-जनकाधिलयाप्रति जाया
कांडहि केवळ होय थिटें अतुळ प्रभुचें भुज-सद्यश गाया ४
श्रीजनक क्षितिपाळक सत्वर आणवि पंक्तिरथा अतिधन्या
तत्तनुजां चव घांसिहि तो अनुजासह दे चवघी निजकन्या
ग्रामि-गजा अवलोकुनि ये बहु कोप जसा पर दुःसह वन्या
क्रोध करी भृगुराम तसा नच तो वकता प्रभुवांचुनि अन्या ५
भार्गवराम पराभविल्यावरि पंक्तिरथ स्वपुराप्रति पावे
पौर असें वदले न सुरद्रुम राम-भुजाऽधिक हे गुरु गावे
मातुळ ने स्वपुरा भरताप्रति दे अनुमोदन भूपति पावे
हे प्रभुचे परमाद्भुत सद्गुण सोडुनि अन्य न मंत्र जपावे ६

## अयोध्याकांड.

भूप म्हणे नय-धर्म-विशारद राम उद्यां युवराज करावा
मंथरिका मति-भेद करी गणि केकयजा प्रभुनेंहि परावा

१ तत्-विशिख-प्रकर-त्याशमाच्याबाणसमूहें. २ ब्रम्हांडहि. ३ अपुरतें, अवकाशरहित. ४ मावश्याम. ५ दशरथा. ६ गांवातील हत्तीला. ७ अरण्यातील हत्तीला. ८ परकी.

देय वरद्वय मागुन घे वनवास चतुर्दशवर्ष वराया
ज्येष्ठ-सुतें भरतें अभिषेकुन याविषयीं हट लेश धराया ७
तीस म्हणे नृप राज्य दिलें नव पुत्र करी क्षितिच्या अवनातें
माग दुजा वर देवि दया कर पाठिव राम हटें न वनातें
काकुलती करि फार परंतु न लेश वळे पतिला भवनातें
सोडुनि आजिच जावु असें विषसें वदली नगणी लव नातें ८
जाणुनियां जननी-प्रिय सत्य चळोंचि न दे तिळही जनकाचें
नेसुनि वल्कल बंधु-वधूसह सोडुनि धाम महा-कनकाचें
तीस सदार पित्यासि नमूनि पुसोनि निघे न करी मन काचें
पाथिंच जाय रथीं बसलें मग तात वचें धन तें सनकाचें ९
हाय म्हणे रघुराय रडे बहु शीघ्र भंजे महिषीनिलयातें
राजवरें निघणें वरिलें लघु जेवि करें भुजगी बिलयातें
चित्रपदोत्तर कूटनगा प्रभु जाय नरोत्तमही बिलयातें
त्या भरत द्रुत ये जल दे पद घे न कसें सुख दाविल यातें १०
सर्व-गुरु-प्रमुख-स्वजनासह राम-पदाप्रति वंदुनि भावें
साश्रु कथी पितृ-मृत्यु म्हणे प्रभु हाय जया यतिनीं बहु गावें
पिंड तिलोदक दे पितृ-तर्पण तो करि सादर घेउनि नावें
पाय धरी विनवी भरत स्वपुरास तुवां वन सोडुनि यावें ११
राम म्हणे त्यज आग्रह येइन वर्ष वनीं सरतां चवदावें
देववनें वसतींत जसी तमिदारवि जेल मला चव दावें
या स्वगुरूक्त यथास्कर केवळ वेद नदून कदा न वदावें
प्रेम तुझें वरवें दृट हें मज गाथिस होय सदा नव दावें १२
सत्य महाव्रत-तसर जाणुनि तो नमुनि भरतें धृत-पादुक वंदी
होमिन देह म्हणे ज्वलनीं टळतां अवधि क्षण होउनि बंदी

---

१ स्थान, गृह. २ चित्रकूटपर्वता. ३ तनु-ऊन-त्या वेळा-हूनउणें. * दशरथ. + सेविता झाला.

केकयजा-सुत साधु निघे यश साधुनि घें परते मग नंदी-
ग्रामिं वसे अतिखिन्न जसा शिव-पाद-सरोज-वियोजित नंदी॥
केवळ सन्निध तो गिरि यास्तव आश्रम त्यासि करूनि न राहे
राक्षस-पीडित भूसुर-रक्षण हें हि मनीं जगदीश्वर पाहे
साऽनुज सांऽगन तेथुनि जाउनि राघव अत्रि-पदीं शिर वाहे
भूमिसुता मुनि-दार-कृताद्भुत-देह-सुखप्रद सत्कृति लाहे॥१४

## अरण्यकांड.

शाप-विमुक्त करी प्रभु मारुनि दंडक-नाम-वनस्थ-विराधा
तो सकळाहि म्हणे क्षण अर्पुनि या सुयशांत मन स्थविरा धो
हर्षवि ते शरभंग-सुतीक्ष्ण-घटोद्भव वारुनि संसृति बाधा
दे परमाऽभय कीं स्थिर होउनि जोडुनि सत्तप सद्गति साधा१५
गृध्रवरा निज-तात-सखा प्रभु भेटुनि पंचवटींत विशाला
सांगुनियां अनुजा मनुजाधिप तो करवी बरवी दळशाला
शूर्पणखा-श्रुति-नासिक कापवि तापवि त्याहि खरास शशाला
सिंह तसा वधि सैनिक एक न वांचवि सांचवि भव्य-यशाला
पाहुनि ती भगिनी कुदशा खळ रावण दुर्मद फारचि कोपे
पाठवि हेम-कुरंग निशाचर पाहुनि त्या महिजामति लोपे
[illegible] धरूनि म्हणे प्रभु पाठिस लागुनि संहरि कीं न च थोपे
[illegible] मरतां प्रभुसाम्य करि ध्वनि-ज्यास असे छळ केवळ सोपे १७
आर्त रवें कुशलेतर मानुनि देवर दुर्वच बोलुनि सीता

१ स्त्रीसह. २ वृद्धा. ३ तृप्त व्हा. ४ मोठी. ५ लक्ष्मणा. ६ पर्णशाला. ७ सीतेचीबुद्धी. ८ कुशल-इतर-अशुभ. ९ दीर (लक्ष्मण.)

ती द्रवडी उठजांतुनि कोपुनि होउनि पत्यंऽसु-संकट-भीता
तों यतिरूप दशानन ये हरि कांपलि सांपडली अति सीता
हा वदली कदली वनवन्हिस कीं गुरु-वेद-पथाऽरिस गीता १८
त्यास जटायु करी विरथ क्षण सोडवि सून र्गा पण रक्षी
श्रीस पुन्हा हरि रावण पक्षेंनि तोडुनि पाडुनि मूर्छित पक्षी
ती नग टाकि तयांतचि जें गिरिच्या शिखरीं कपि-पंचक लक्षी
ठेवि अशोकवनीं स्वपुरीं निस ती फळ कीं जळ लेंग न भक्षी
त्या हरिणासि वधूनि फिरे प्रभु तों करि वंदन लक्ष्मण वाटे
ऐकुनि वृत्त शिवादि रव क्षेंनि जाहलि हें प्रभु- बुद्धिम वाटे
धावुनि ये तव शून्य दिसे गृह हाय म्हणे विरहें उर फाटे
राम-विलाप-भरें वन- दैवत-पक्षि मृगोरग- कंठहि दाटे २०
शोध वनीं करितां अवलोकुनि केवळ मूर्छित तात सखातें
हाय म्हणे हरि तन्नैम सानुज शीतजळें निज-वल्कल-वातें
त्या क्षत-हेतु पुसे कथि रावण- कृत्य वधू-हरणादिक यातें
प्राण मग त्यजि राम वदे मरणें ट्रय हें समबुद्धिम ख्यातें २१
राम तदुत्तरकार्य करी मृग-मांस खगां प्रति वाटुनि हातें
धुंडित जाय वनीं दयिता हरिणा करि माऽश्रु म्हणे बहु हा तें
योजन- बाहु कबंध धरी प्रभु हर्षवि फारचि तन्मन घातें
तो कथि कार्य मर्कट करील्चि ये सुविमान तया अनघातें २२
फार बरी शबरी- मति जाणुनि तीवरि दैव करी अनुकंपा
होमुनि देह विमान-वरी बहु शोभलि वेंष्टनि ती जसि शंपा
तेथुनि जावुनियां अनुजासह त्या प्रभुनें अवलोकिलि पंपा
श्री अतुळा निधि राम-धृति-स्मृति-शक्ति तयांसि म्हणे क्षपसंपा २३

---

१ नवऱ्याच्या प्राणाला जें संकट त्यास भ्याली असी. २ पिसांचीं कुडें ३ मार्गी. ४ आमे ५ बीज. + नाग. * तनू-तम-त्याचें भेज्ञान. ** दशरथव जटायु यांचे मरण. ++ दया.

## किष्किंधाकांड.

श्री-विरहाग्निस लक्ष्मण वारिद होय तयावरि मारुति रामा,
भेटुनि भेटवि त्या सुगळा नग दाखवि जे त्यजि तन्मति रामा
हाय म्हणे रघुराय सखा पुसि अश्रु करूनि परोपरि सामा
कोशप वैर-निदान पुसे अज तो कथि ये प्रथम प्रभु-कामा १
त्या सुगळा कपि-राज्यपदीं प्रभु बैसवि ततक्षण मारुनि वाळी
मेळवि तो बहुकोटि महाकपि ऋक्ष स्फ.रांश पण प्रतिपाळी
त्यांसि कथी हुडका महिजा कपि पाठवि अंशु जसा कर-माळी
अंगद मारुति दक्षिण शोधुनि ओपिनि दिग्वदना बहु गाळी२
स्वामि-कृतावधि-मास विलंघुनि अक्षम दंड भवास तराया
सिंधु-तटस्थ महेंद्रनगीं कपि बैसति शोक-निमग्न मराया
गृध्रजटायु तदग्रज तो कथि शोधन संशय यांत धराया
सांगुनि दाह-निशाकर सन्मुनि-वाक्य उडे हरि हृष्ट कराया ३

---

## सुंदरकांड.

ऋक्ष-पति-स्तुत मारुति पक्षिप तेंवि उडे हिमवत्सुत पाडी
लाजवि त्या सुरसेसहि सावलि जी धरि तीसहि तो पटु नाडी
गोष्पदसा शतयोजन सागर लंघुनि शत्रु-पुरी मद झाडी
शोधुनि सर्व गृहें विरमे मग त्यासि अशोकवनीं मति धाडी ४
रात्रि तरूपरि बैसुनि तो अवलोकि धरातनया श्रुति शूद्रा
त्या कुमतोपगताहि सती-कृत-दुर्मति-धिक्कृति मानलि रुद्रा
दिग्वदनाधगमावरि वर्णुनि राजसुता गुण-रत्नसमुद्रा

---

१ स्त्री (सीता) २ सूर्य. ३ तत्-अग्रज- त्या जटायूचा वडील बंधु (संपाति) तो. ४ गरुड- ५ हिमवत्-सुत हिमाचलाचा पुत्र (मैनाक) तो. ६ कु-मत-उपगत-दुर्बुद्धिप्राप्त ज्याला अशा लाही. ७ दिग्वदन-अपगम-रावण गेल्यानंतर. + रावणा.

संशय क्लेश मनीं नुरवी प्रणति-स्तुति-पूर्वक हे तिस मुद्रा ५
वृत्त अशेषहि सांगुनि ऐकुनि खूण शिरोमणि घेउनि तोषें
दिव्य अशोक-वन-द्रुम मोडुनि सर्व दिगंतर तो भरि घोषें
कोट्यधिक क्षणदाचर रावण-नंदन अक्षहि मारुनि रोषें
होय बळें घननाद-महास्त्र-निबद्ध रणीं नच मारुति दोषें ६
तो दशकंठ-सभेप्रति बांधुनि नेउनि बोलिला बहु वक्ता
स्पष्ट तया कळवी सकल-क्षय हें फळ केवळ उत्पथसक्ता
पेटवि तैल-पटावृत पुच्छ न शक्त असें खळ मानुनि शक्ता
त्या फिरवी स्वपुरांत म्हणे अपमान करूनि महा-प्रभु-भक्ता ७
चालविला कपिवीर जिहीं गुरु-पुच्छ करूनि तयां बहु घोळी
जी अति भव्य पुरी मणि-कांचन-भासुर-दीप्ति तिची करि होळी
रावण मेघरव क्षणदाचर सर्वहि हाय म्हणे कर चोळी
हा वदल्या खचरी जन कां गृह त्यागुनि ही नगरी कच चोळी ८
पुच्छ समुद्र-जळीं विझवी महिजा-चरणाब्ज नमूनि उडाला
वेष्टिति वृंद-रसार्थ तया कपिवीर पिपीलिक जेंवि गुडाला
ते लुटिती मधु पूर्ववनीं मधु मोडिति त्या दधिवक्त्र-कुडाला
ऐकुनि शासन लंघन जाणुनि सिद्धि सुकंठ मुखांत बुडाला ९
जांबवदंगद-नीळ-नळाऽनिळ-नंदन गर्जत हर्षित आले
कीशप लक्ष्मण दाशरथी प्रभु यांसि महामति ते नत झाले
वात-सुतार्पित दिव्य-शिरोमणि पाहुनि राघव-पक्ष्म न हाले
दे परिरंभ मरुत्तनया विभु तें वदनीं यश जीभ न चाले १०
राम म्हणे रघुराज-कुळोपरि वा रचिला उपकार महा या
प्राण दिले करिसील असें बहु यावरि तूं जरि साधु-सहाया
प्रत्युपकृत्यसमर्थचि मी नव नित्य ऋणी न पदार्थ वहाया

---

१ सकल. २ सीतेचें दर्शन इत्यादिक जी झालेली गोष्ट तोच रस त्याकरितां. ३ मधुवनीं. ४ रामाचे नेत्रपातें. ५ प्रत्युपकृति- असमर्थ- प्रत्युपकाराविषयीं असमर्थचि. + आलिंगन. * आड मार्गे जाणाऱ्यास.

योग्य दिसे मज इच्छितसें स्वमनीं अधमर्ण असेंचि रहाया ११

## युद्धकांड.

राम निघे दशकंठ-वधार्थ विलोकुनियां विजयप्रद लग्न
स्यंदन मारुतिनें करि लक्ष्मण वालिसुता द्रुहिणा मद-मग्न
ऋक्ष कपीश्वर गर्जति कल्प-महाघनसे करिती नग भग्न
प्रेक्षिति कौतुक तेंहि महामुनि जे तनु-भान-विवर्जित नग्न १
सिंधु-तटीं उतरे प्रभु तों शरणागत साधु बिभीषण शंका
सोडुनि जोडुनि हस्त म्हणे नमितों अभयप्रद हो मज रंका
बंधु-करें करवी अभिषेक नमस्कृतिचें फळ देउनि लंका
जे भव-तम नयां निवटी असि सूनृत कीर्ति करी अकलंका २
प्रेरुनि सिंधु-मनें नळ वानर राघव सेतु रची शतगावें
होउनि हृष्ट मनांत म्हणे यश हें चिरकाळ शची शतगावें
श्रीश-चरित्र चि दत्त-हृताशनिजारि-वधू-कुच-कुंकुम गावें
पाउनि मानस-शुद्ध सुखें निज तत्व जडींहि तसें उमगावें ३
सेतु-पथें उतरोनि पयोधिस रुष्ट सुकंठ पडे दशतुंडीं
राम सनीं धरूनि प्रतिबंधक मन्मणि जेविं करी शिखि कुंडीं
छत्र किरीटहि पाडुनि ताडुनि केशहि तो तुरवी मद पुंडीं
त्यासि म्हणे तुज निर्भय आश्रय रामचि अन्य नसे जग धुंडीं ४
पाठविला प्रभुनें मग अंगद तो पर-भंगद राक्षस-पाळा
धर्म-नयज्ञ महाजन-संमत बोध करी सुर-गो-द्विज-काळा
त्या नरुचें विगतायुस औषध तेंवि वदे धरवी परि टाळा
देवुनि जाय म्हणे प्रभु हूं खळ सर्व वधाचि न एकहि गाळा ५

---

१ ऋणदेणारा. २ ब्रम्हदेवा. ३ उत्सवामध्येंमग्न. ४ सु-उन्नत-अतिउंचअसी. ५ शतकोश ६ इंद्र. ७ दिलें आहे हरण केलें रावणस्त्रियांचें स्तनसंबंधीकुंकुम ज्याणें असें.

ओषधि-पर्वत-शृंग पुन्हा पवनात्मज नें स्वपदाप्रति पीवी
शक्ति जसी अतुळा प्रभुची नसि मारुतिचीहि यथामति गावी
होय विशल्य समैन्य सहानुज जो त्रिजगा प्रभुसत्तम यावी
तो बहु पावुनि हर्ष म्हणे न जरा तुझिया सुयशा तुज यावी१२
कोपुनि वानरराज म्हणे भटहो अग्निचें उरलें पुर जाळा
पेटविलें गमलें सुखुभुक्षुपुटें दुन ओगरिला गुरु थाळा
आरडती रडती खचरी बहु आकुळ होउनि नादिति भाळा
तो शतयोजन जाय महाध्वनि होय मृगानचि निर्जर-पाळा१३
भयें पडले बहु बाहिर त्या कपिनीं वधिले अरि सारे
सि म्हणे हरिराज असाल खळाश्रित जे नर ते परिसा रे
सर्व असेचि मराल अधार्मिक निर्दय दुर्जन भीति न वारे
पक्षि-महीपतिपासुनि साजुनि वाचांनिलक्षण काय विचारे१४
कुंभ निकुंभ घटश्रुतिचे सुत पाठविले समरा बळशाली
काळमुखीं पहिल्यास कपीश्वर मारुति त्या दुसऱ्या मग घाली
जो मकराक्ष खरात्मज त्या प्रभु पाडुनि अंत्य दशा वरि आली
ब्राम्हमहास्त्र पुन्हा प्रकटी परि रावणि-धीस विटे धृति-आली १५
स्वस्थमनें विषयांनचि हर्षित होउनि राक्षस देव रमाया
सर्वबळासह कौशवरा प्रभुच्या अनुजाहि रणीं वरमाया
होमज-दिव्य-रथामिस इच्छुनि हे स्वजयार्थ करी पर माया
भूमिसुता वधि रावणि जो विभु हा म्हणवी रडवी परमा या१६
यापरि मोहुनि-जेथ निकुंभिल-दैवत तें स्थळ रावणि पावे
होम करीत वसे रथयुक्त जयांतुनि दिव्य तुरंगम यावे
भक्त बिभीषण तें कळवी पर-कृत्रिम-योग नयासचि ठावे
नेउनि लक्ष्मण मारवि त्या सुख शक्रमनीं न जगीं यश मावे१७

---

१ प्रसवे. २ सर्प. ३ धैर्यसखि. ४ खिन्न होाव-याम. + पांचवी.

नंदन-शोक-समाकुल रावण घेउनि खड्ग महीजनि-घाता
जाय अशोकवनीं अवलोकुनि आटवि राम मनीं क्षिति-माता
साधु सुपार्श्व करी हितबोध वळे फिरवी जलद-ध्वनि ताता
दाशरथि क्षय-काम पुन्हा बळ पुष्कळ पाठवि संगर-पाता १८
तें बहुकोटि निशाचर-सैन्य मुहूर्तयुगें करि भस्म न भागे
राम म्हणे मदिषूंनचि कीं त्रिपुरारि-शरांनचि हें बळ जागे
पाहुनियां परमाद्भुत तेज विभु-स्तवनाम अशेषहि लागे
स्वर्गणिका म्हणती सखि हा अति दुर्लभ-वीर-समागम यागे १९
शोकहि कोपहि चित्त हरी मग तो दशकंधर घे बळ भारी
राक्षस वीर सुकंट वधी बहु रावण मर्दुनि वानर मारी
व्याकुळ मेघरवाऽरिमही करि तद्धिशिखासि रघूत्तम वारी
युद्ध नवें करिती प्रभु रावण वीर महाशर-कार्मुक-धारी २०
लक्ष्मण दिग्वदन-ध्वज-कार्मुक-सारथि-मस्तक खंडुनि पाडी
तत्तुरगांसि गदीश बिभीषण धाउनि जेविं मृगा हरि ताडी
बंधुवधा दशकंधर शक्तिस कोपविली उरगी तसि धाडी
तोडुनि तीस महाबळ लक्ष्मण त्या अरिच्या मद मानहि झाडी २१
रावण शक्ति धरी दुसरी प्रभु-बंधु-मरव्याप्रति घालुनि मागें
होय पुढें तदुरीं अशनी तसि ती अरिनें लघु पाडिलि रागें
ओढुनि काढुनि शक्तिस भंगुनि कोपुनियां प्रभु त्या परमागें
भग्न करी पळवी धरिली धृति काय जि पक्षिण पाहुनि नागें २२
बंधुसि मूर्छित पाहुनि राघव साश्रु वदे जरि लक्ष्मण मेला
याविण वांचुनि काय मला सुख दीप टिकेचि नसांडुनि तेला
औषधि आण सुषेण म्हणे प्रभुनें नमुनि द्रुत मारुति गेला
शृंगचि घेउनि ये कुशळें रघुवीर यथास्थित सावध केला २३
युद्ध पुन्हां करिती रघु-राक्षस-वीर-रथ स्थ नदा पवि-पाणी

---

१ परम-आग- अतिअपराधें. २ गरुड. ३ नगुनि.

पाठवि सत्वर तो रणचत्वर शोभवि मातलि सारथि आणी
त्यावरि मानद राम चढे बहुमानुनि अग्रज-वासव-वाणी
हे रथ संगर पाहुनि होय शिवप्रभुची क्षण चित्रचि राणी २४
पाहुनि मूर्छित रावण तद्रथ काढियला समरांतुनि सूतें
सावध होउनि नेवधिला प्रभुसन्निध तो पळमुक्‌-पुरुहूतें
कुंभज मंत्र कथी रविदेवर तैं म्हणती जय सर्वहि भूतें
होय नरेंद्र-कृताऽरि-शिरःशत-खंडन मंडन कंपद भूतें २५
जें उडवी शर हाणुनि तें रघुनाथ तसेंचि नवें शिर पाहे
शस्त्र-महास्त्र-विपर्यय मानुनि भानुनिभ प्रभु काळजि वाहे
मातलि सूचवि जो विधि-निर्मित कुंभजदत्त महासुग आहे
तो सतदस्त्र परोर विदारिल न क्षण भानुपुढें तम राहे २६
श्रीरघुवीर चतुर्मुख-निर्मित वैष्णव-चाप-गुणीं शर जोडी
ब्राम्हजपें अभिमंत्रुनि ओढुनि त्यासि निजश्रवणाऽवधि सोडी
तो पविमाचि कठोर शिळातळसें अरिचें हृदही उर फोडी
तेविं पडे उलथोनि जसा तरु ज्याप्रति चंड समीरण झोडी २७
वृत्र तसा पडतां व्यसु रावण राक्षस होउनि भीत गळाले
हाय असें म्हणत भ्रमुनि स्वपुराचिकडे हतशेष पळाले
सांपडले कपि-सैन्य-दवाग्निस ते खळ तैं समस्त जळाले
शक्र चतुर्मुख शंभु म्हणे जय देव रमास्यसहस्रदळाले २८
वृष्टि सुर-द्रुम-पुष्पमयी बहु होय तदा सुर-दुंदुभि वाजे
स्वर्गणिका शत-नृत्य-सुगायक-गीत-सुवाद्यरवें नभ गाजे
मंद सुगंध हिम ससंग सुखवायु सभ-गृह-मंडळ साजे
श्री-रघुराज-यशासि हिमाचळ दुग्धसमुद्र सुधाकर लाजे २९
सांत्वुनि रावण-दार-विचार कथूनि तयांसि करी सुख सस्तें
त्या अरिचेंहि बरें करवि प्रभु उत्तरकार्य बिभीषण-हस्तें

---

१ राक्षसेंद्र. २ अगस्ति. ३ प्राणिमात्र. ४ पर-उर-शत्रूचें वक्षस्थळ. ५ सवंग. + रथ. ★ महादेवाची. ‡ पृथ्वीतें. ‡‡ नक्षत्रांसह गृहमंडळ. ⊕ रमा-आस्य-सहस्र-दळ-अलि-लक्ष्मीचें मुख जें तेंच कमळ तत्संबंधी भ्रमर.

देवर्षि देयविशेष दयार्णव जीं विधिनें कथिलीं बहु-शास्त्रें
त्यावरि सद्विधिनें वरिला अभिषेक तथा शरणागतमस्त्रें ३०
मारुतितें रघुवीर म्हणे पुस यातुपतीस मग प्रिय तीनें
सांग पुसोनि तिचें मजही द्रुत येउनि हें कथिलें मुनिगीतें
जाय नमी कथि तो अमृत श्रवणांत भरी तृषिता शुभधी तें
देय नसे तुज योग्य असें वदली नयनें अवलोकुनि शीतें ३१
कीश म्हणे तव-वागमृतें मन हर्षविलें नलगे धन काहीं
तूं वर दे वर दे खचरीवध हा चिर दृश्य दिलें तुज याही
श्री वदली असुरें विषमाऽकृप-काळकृतें घडणारचि बाहीं
या बटकी पर-वाग्यशगा अघ यांजकडे तिळमात्रहि नाहीं ३२
वर्णुनि शीळ-निशेष पुसे कपि ती कथि सत्वर दर्शन-काम
क्षिप्र पलाश-पतिप्रति मागुनि आणवि भूजनितें प्रभु राम
तीस म्हणे अरि मारुनि सोडविलीस यशोर्थचि तूं परधाम
क्षोणिसुते चिर सेउनि होतिस मान्य बुधा पर भुक्त न होम ३३
ती वदली दहनीं शिरतां जरि हे शुचि मी तरि ही मज रक्षू
जी उषिता गुचिना नमतां असतां परकाम हुताशन भक्षू
निश्चळ भव्य सतीव्रत नित्य अमेल नरि प्रभुचें शुभ चक्षू
प्रेम करूनि वरूनि पुन्हा पहिल्यापरि ताप-निवारक लक्षू ३४
शंभु-विधींद्र-समस्त सती करि दिव्य कर्मा इतर सुर-नीता
बाळपणीं जनकोरुगता नमि जाहलि ती जन्मांत न भीता
वाळलि माळ उटी न तिची ननु होय हिमी शिरतां नमि सीता
तात-निदेश शिरीं धरुनि प्रभु अंकपदावरि बेसवि माता ३५
जे मृत वानर ऋक्ष तयां उठवीं सुर-नाथ-कृतामृत-वृष्टी
पुष्पकयान वरूनि तिचें निवर्वी प्रभु चंद्र तमा जन-दृष्टी

१ शत्रुगृह. २ माळा. ३ कसोटीस. ४ जनक-ऊरु-गता-जनकाच्या मांडीवर बसलेली. ५ थंड. + पावयाची काहीं वस्तूही ‡‡ सशास्त्रें. ‡ बिभीषणास. * उत्तम बुद्धीची असी सीता. ⊕ अग्नि. ‡ थंडे (नयनें या शब्दाचें विशेषण.) ⊅ शरणागतांचा मुकुटमणी अशा बिभीषणें

दाखवि सेतु सतीस कथी विरहार्ति-विलाप सुखें भरि सृष्टी
हर्षवि फार गुहा भरता जसि भेटुनि वत्स सुखी करि गृष्टी ३६
वृद्ध अमात्य सुधी भरतादिक बंधु सखे कपि राक्षस राजे
त्यांसह घेउनि वेष मनोहर रामपुरीं शिरता बहु साजे
निर्जर-गायक-गानरवें सुर-वाद्यरवेंहि दिगंतरें गाजे
चंद्र चकोर पयोधर चातक ते प्रभु या करिते जन आजे ३७
राज्यपदीं अभिषिक्त जगत्पति राम बसे परमोत्सव तो कीं
प्रेम करी प्रभु तेंवि जनीं बहु जेंवि पिता चरमीं लघु-तोकीं
त्या युवराज करी भरता विभु दुर्लभ जें विधि वासव लोकीं
तें सुख नित्य म्हणे सकळा निज-राष्ट्र-पुरस्थजना अवलोकीं ३८
सच्चरित प्रभुचेंचि सदा भरलें म्हणती नप तापस रीतें[3]
यासचि भी भवताप करी नच ज्या गुरुच्या दवताप सगीतें
चातक-पक्षि-कुळ व्रत घेउनि अन्य उपेक्षुनि आप सरीतें
तेंवि इतेंचि महा-कवि-वृंद दुजें यश सोडुनि आ पयशीतें ३९

---

# उत्तरकांड.

दाशरथिप्रति दर्शन देउनि पूजन घेउनि उत्तम हर्षी
होउनि वर्णिति शक्र-सुदुर्जय-रावण-मेघरवांत महर्षी
त्यांसि म्हणे प्रभु जें घडलें तुमचेंचि तपोबळ सन्मुनि हो तें
युष्मदनुग्रह-कल्पनगीं यश-पुष्प जगत्प्रिय जन्मुनि होतें १
दुर्जय राक्षसराज सुदुर्जय रावणि तद्वध दुष्कर भूतें
ज्यां सभयें अवलोकुनि जीं रचिलीं हरि-नाभिज-पुष्कर-भूतें

---

१ एकवेळ व्यालेली गाय २ देव गायक जे त्यांच्या गाण्याच्या शब्दानें. ३ बरोबरीतें. ४ कांहीं काळ लागून जावा असा जो पर्जन्याचा झपाटा त्यातें. ५ भययुक्तें. ६ विष्णूच्या नाभिकमलोत्पन्न जो ब्रम्हा त्यानें.

ऐकुनि तज्ञ-जनोक्त असें प्रभु तत्सभवादि पुसे घटजा तें
तो कथि सर्व सविस्तर त्या मृदु शोज सहस्र-महाफट ज्यातें॥२
ब्रम्ह-तनूज पुलस्त्य-महामुनि तत्तनयाव्हय विश्रसवा हें
तत्सुत वैश्रवणाख्य सुधी स्वमनासि म्हणे विषयांत न बाहें
स्त्री दुसरी खचरी तिस दिङ्मुख पुत्र दुजा घटकर्णहि रामा
शूर्पणखा तिसरी तनया चवथा सुत साधु बिभीषण रामा॥३
विष्णु-पराजित पूर्वनिशाचर सोडिति जीप्रति ती अकलंका
वैश्रवणा दिधली जनकें चतुरानन-संमत पावुनि लंका
तींत वसे स्वपुरींत जसा सुरनायक तातपदांसि नमाया
ये सुसभाग्य धृतेर्ष्य दशानन होय विलोकुनि शक्रसमा या॥४
फार तपोनि गिरें नय होमुनि तो मुनिभू वर दुर्लभ साधी
वर्जुनियां नर वानर होय अवध्य करी सुर सर्वहि साधी
स्वाप वरी घटकर्ण तसें वदवी भ्रमवी त्रिदश-स्तुत वाणी
ब्राम्ह अशिक्षित धर्मरती वरि साधु बिभीषण जोडुनि पाणी॥५
त्यास विधि द्रवला वदला दिधलें स्वदभीष्ट चिरायुहि हो हें
अग्रज-कांचन-दुर्गहरी वर-दुर्मद तो दशकंधर मोहें
वैश्रवणास करी चतुरानन उत्तर-दिक्पति पुष्पकगामी
तो अलकाख्य पुरी रचि शंभु म्हणे चिरकाळ सखा तव हा मी॥६
धर्म नय त्यजुनि क्षणदाचर-राज जगास करी बहु पीडा
अग्रज दूत-मुखें कळवी हित त्या खचरा मद-पायस-नीडा
वा अनिषिद्ध-सुरेंचि भयप्रद होउनि साधुजना न परा धा
मी तरलों मिळना न कधीं मज शंभु सखा करितां अपराधा॥७
कोपुनि मारुनि यानुजना फळ ते विदशानन खावधि दूता

१ स्त्री. २ धृत-ईर्ष्य- धरिली ईर्षा ज्याणें असा. ३ स-आधि- मनोव्यथायुक्त. ४. गर्वरूप पक्ष्याचें रहाण्याचें स्थान भरा. ५. राक्षसजना.

जाउनियां अलकेप्रति तो करि भग्न रणीं वदिला अतिपूता
पुष्पकनाम विमान हरी प्रभुकेलिवनाप्रति लंघुनि जातां
कुंठित होय म्हणे खळ काय उपाय किजे गतिकारक आतां८
तों प्रकटे कपिवक्र महेश्वर-भक्त तसाचि महाबळ नंदी
तो वदला प्रभु-केलि-वन प्रभुसेंचि अलंघ्य न या जडवंदी
मत्त करी उपहास तया कुजना शिवसेवक कोपुनि शापी
कीं कपि होतिल काळ तसे तुज हा म्हणसीलचि तूं अतिपापी९
बाहु-गिरींशा गिरीशा-नळीं दशकंधर घालि वळें उखळाया
भीं गिरिजा प्रभुराजपदांगुलि-नाथ-भरें रडवी सुखळा या
एकसहस्रसमा श्रमला मग मुक्त करी शिव या स्तवनाहीं
रावणनाम सुखड्गहि दे न म्हणेचि महाप्रभु वास्तव नाहीं१०
तों तुहिनाद्रिवरी अवलोकुनि वेदवती रुचिरा तिस झोंबे
दाटुनि कूप-मुखीं चरण-द्वय बांधुनि जीर्णगुणें जड लोंबे
त्या अरिपासुनि ती सुटली स्वतपें मजला दुसरें जनु हो मी१
मारिन तूज वदोनि असें अतिरोषभरें ज्वलनीं तनु होमी११
रावण विघ्न मखास करी धरि चाप मरुत्त तया गुरु वारी
खाय महाध्वर वाट-गत द्विज हाय जगा म्हणवी अविचारी
कण्वसुता-पति ऐल तथा गय गाधि कृती म्हणती जित झालों
ते वधिले नृप जे वदले क्षणमात्र असद्वचनांत न चालों १२
त्या अनरण्य म्हणे नउतें मद घातक हा हृदयांत नयोध्या
मारुनियां तुज मत्कुल-संभव राम यशें निववील अयोध्या
दुष्ट दशास्य तयासि वधी मग नारद यासि यमावरि धाडी
योग्य म्हणे न तुला मृत-मारण तो नरक-स्थळ ओसचि पाडी१३

---

१ महादेवाच्याक्रीडावनाप्रति. २ महादेव. ३ वर्षे. ४ हिमाचलावरि. ५ कुशध्वज जो बृहस्पतीचापुत्र त्याचीकन्या. ६ जुने रज्जूनें ७ जन्म. ८ होउ. ९ राजा. १० संवर्त. ∴ चरणसंबंधी अंगुष्ठाच्याभारानें.

राक्षस-राज-कृत-स्व-बल-क्षय पाहुनि काळ करीं धरि दंड
दत्त-वर-प्रतिपालन-तत्पर त्या धिनवूनि करी विधि थंड
वासुकिचें पुर जिंकुनि दैत्यपुराप्रति जाय तयासह भांडे
धूळि निवारुनि तो प्रभु-सख्य बळें करवी भरवी दुधभांडें १४
अश्मपुरीं असुरांसह संगर पंक्तिमुखें बहु दारुण केला
शाल-करस्थ-कृपाणवरें हतमस्तक शूर्पणखा-पति मेला
वा परमाऽद्भुत-सत्कवि-गीत पयोधि जिच्या बहु पावनदुग्धें
त्या सुरभिप्रति वंदुनियां वरुणात्मज ही जिणिले अतिमुग्धें १५
जाय पुरासि हरूनि नरेश्वर-विप्रसुराऽसुर-पन्नग-कन्या
मृत्यु बळात्कृतिनें तुज तत्क्षण येइल यापरि शापिति धन्या
शुक्र-मुखें घननादसुसिद्धिस ऐकुनि त्या स्वगृहीं खळ आर्ता
रोधि बिभीषण त्यासि कथी मधुनें भगिनी हरिली असि वार्ता १६
घेउनियां बहु सैन्य निघे दशकंधर त्या मधुनाम-वनातें
जाय तया भगिनी विनवी करि तों हि निच्या धृतिच्या अवनातें
सख्य घडे मधुसीं मग शक्रपराभव वांच्छुनि भोगुनि रंभा
घे नळकूबरशाप दिसे परिणाम न ज्यास जसा धृतदंभा १७
कार्य विचार पुसे अजितासि अवध्य-दशास्य-भयाकुल जिष्णु
युद्ध करीच म्हणे समयीं सुरशत्रुसि मी करिन व्यसु विष्णु
सर्व-दिगीश-बळांसह वा करितां अति दारुण संगर तानें
मोहुनि मेघरव स्वबळें धरि गौतम-दार-कुसंग-रतातें १८
भेटुनि मेघरवासि म्हणे विधि मागुनि घेउनि इष्टवरातें
सोड हरीस वरू शमे कश्यप देचि तया सुत शिष्टवरानें
तो वर हा वरि होम-समुद्भव-दिव्य-रथीं समरांत वसावें
त्यासमयीं पर-दुःसह होउनि म्या सकळांसि अवध्य असावें १९
त्यासि तथास्तु म्हणे चतुरानन, मेघनिनाद हरिप्रति सोडी

---

१ बळात्कारानें. २ इंद्रास. + नामविशेष (नगर) त्यांत.

तो मुनि-दार-वर-व्रत-खंडन-तत्फल हें कथितां करजोडी
वैष्णवयज्ञ गुरूदित साधुनि तेज पुन्हा पदही निज पावे
अर्जुन-वाळि-कृत क्षणदाचर-राज-पराभव यावरि गावे २०
स्त्रीजनयुक्त सुखें करितां जल-केलि रणा हटकी नरदेवा
हैहय-राज-सहस्त्र-महाभुज-रुद्ध गती मुरडी रय रेवा
वाहवि पूजन-वस्तु दशानन कोपुनियां झगडे अभिमानी
तो करि भंगुनि बद्ध तया मग सोडि पुलस्त्य मुनिप्रति मानी २१
दक्षिण-सिंधु-तटीं करितां जप रावण मागुनि जाय धराया
तों धरि यासि पराङ्मुखही कपिराज सलील मदासि हराया
काख भरी करि सर्व-समुद्र-निमज्जन ये स्वगृहेप्रति सोडी
होउनि दीन दशास्य म्हणे चिर सख्य अकृत्रिम दे करजोडी २२
मारुतिचें हि चरित्र पुसे प्रभु कुंभज तेंहि कथी शिशुभावें
हा गगनांत उडे रवितें निरखूनि म्हणे पिकलें फल खावें
राहु म्हणे मम भक्ष्य कसें इतरांसि दिलें कपि जिष्णुस दावी
त्याहि तमा फलधी पकवी मग शक्र-करेणुसही फळ भावी २३
तो हरिवाहन वारण भव्य-पयोनिधि-फेन-निभा धवळा या
पाहुनि वाहुनि हर्ष मनीं मुख वासुनि वेग करी कवळाया
शक्र करेण्ववनार्थ तदा कवळी पवितें अतिसत्वर हातें
ताडुनि पाडि नगीं शिशु मूर्छित हें नव्हतां नच सत्व रहातें २४
भूमिधरीं पडतां गगनातुनि त्यासि भुची हनु भंगलि वाम
हाय म्हणे पवन त्रिजगन्मळ-मूत्र-निरोध करी रघुराम
वाचविलें विधिनें पवनप्रिय तोक करें कुरवाळुनि वर्षें
जेविं घनें मृत सस्य निवे जग देति तयावर निर्जर हर्षें २५
इंद्र म्हणे भय लेश नसो पविपासुनि नाम असो हनुमान् या

---

१ इंद्रास. २ राहुला. ३ पर्वतीं. ४ बालक. ५ उदकवृष्टीनें. ६ धान्य. ७ देव. + करेणु-अवन-अर्थ-ऐरावताच्या रक्षणाकरितां. ‡ सहस्त्रार्जुनवाळियांनीं केलेला. ‖ वेग.

दे निज-तेज तदीय शतांश स-शास्त्र-रहस्य दिवाकर मान्या
काळ वदे पवना तव नंदन नित्य अवध्य असो मम दंडा
श्रीद म्हणे न वधील गदा अशनिप्रतिमा जरि हे अति चंडा२६
पाश जलाऽभय दे वरुण त्रिदशाऽद्भुत-शिल्प-निधी वर दे हा
मद्रचिताऽखिल-शस्त्र शिवेल न याप्रत जसा झष[+] धीवर देहा
शंभु म्हणे भय मारुतितें नच देइल शस्त्रहि अस्त्रहि मोजें
हें बहु पावकभास्करतेज तसें फिरितें हरि वस्त्र हिमा जें २७
पंकजयोनि म्हणे सकलाऽहित-मित्र-भयाऽभय-दायक हा हो
कामगतीहि चिरायु अजेय रणेशसहाय महायश या हो
रूप धरील यथेष्ट विषाद नसेल असेल अनामय माया
या न पुरेल मदंड[2] न मोहिल या कविराज-मना मय-माया २८
पुष्कळ सद्वर देवुनि साऽमर देव चतुर्मुख हर्षुनि गेला
मारुति हा पवनें जनकें मग केसरि-दार-[#] गृहाप्रति नेला
बाळपणीं करि फारउपद्रव हाचि पितृप्रिय याप्रम हर्षी
शापिति शक्ति कळो स्तवनें समर्थांच अशापरि यास महर्षी २९
कुंभज यापरि सर्व सविस्तर सांगुनि वृत्त पुसे मग आज्ञा
त्यासि म्हणे प्रभु राज-ऋषीसह द्या वर अश्वमखाप्रति यां[3] या
मान्य करी मुनि जाय बहु प्रभुपासुनि जें जनका धन ये तें
दे मणि-कांचन-वस्त्र-गजाश्व-रथादिक आपुलिया तनयेतें ३०
जाय पुसोनि नृप स्वपुरा मग वानर राक्षस नत्पति रामें
तत्सचिवांसह पूजुनि फारचि हर्षविले प्रिय-सद्गुण-धामें
जे भरतें स्व-सहाय नराधिप आणविले स्वपुराप्रति होते
पूजुनि बोळविता वदले नव-संस्मरणीं निरता मति होते ३१
तात तसा प्रभु पुत्र नसे प्रिय अंगद मारुति घेउनि अंकीं

१ माझें. २ मत्-अंड-म्यां निर्मिलेलें ब्रह्मांड. ३ याव-या. + मत्स्य. ॐ केसरिसंज्ञकस्त्रीच्या गृहाप्रति.

दे सदलंकृति वर्णुनि तत्कृत लाजवि जो गुण चंदन-पंकीं
जे गगनोपळ-काळ तदा कवि जाणति यांचि असाधु तियांस
मानिति उग्र वियोगचि सागर-वार्जनुचा न असा श्रुति घांस ३२
भक्ति निरंतर पुण्य-यशा-श्रवणादर हा वर मारुति मागे
गद्गदकंठ कृतांजलि साश्रु पदीं प्रभुच्या बहु लागुनि लागे
भक्त सुकंठ बिभीषण मारुति अंगद जांबवदादिक भावें
वंदुनियां पुसती शिर चाळुनि त्यांसि नसेंचि म्हणे विभु यावें ३३
पुष्पक ये अलकेहुनि नीगुनि यापरि तो विनवी नरदेवा
दे स्व-पदाश्रय योग्यचि तूं धनदें मज सांगितली नव सेवा
त्यासि म्हणे प्रभु संप्रति जा करितां स्मृति भेट सुखें मज आर्या
मेळविलें भरतास्व वनें यश ते वि अणीक हि येसिल कार्या ३४
सत्य कथी भरत प्रभुतें जन सर्व सुखाढ्य तुझ्या नवराज्यें
तृप्ति जसी अमृतें प्रभुजी सकळास हि होय तसी न परोज्यें
राम विहार अशोक वनीं करि नित्य विलास-सुखें बहु धाली
भूमिकृतें नवसें चिर न्हाउनि गर्भवती धरणीजनि झाली ३५
तीस पुसे रघुनायक दोर्हद मोहद-वांबुद घेउनि अंकीं
काम तपोवन-दर्शन हा कथि यत्स्मृति दे न बुडो मन पंकीं
राम म्हणे बहु उत्तम जासिल देवि उद्यांचि मुनींस पहाया
जे मुनिदार तयांसि धनें वसनें मणिराशि यथेष्ट वहाया ३६
भद्रचरासि पुसे प्रभुसत्तम काय मला म्हणती जन दूता
तो विनवी वदतात शुभाऽशुभ लोक विशृंखळ बा अतिपूता
कीश-वशीकरणांऽबुधि-बंधन-रावण-मर्दन सद्यश गाती
बोलति हें हि कसी सदनाप्रति आणिलि शत्रुसि जी वशगा ती ३७
हेंचि सुहृद्वदनें हि निघे मग राम म्हणे अनुजांसि न वारा

---

१ समुद्रोदकामधें झालेल्या वडवाग्नीचा २ कान. ३ पाठिमागून
४ डोहळा. ५ मोहवण्याचा मेघ. ६ नामविशेष (दूत) त्याला.
+ चांगल्या तुपानें.

शासन हा उपहास नसो यश तेथिं न बंधु न देह न दारा
वा घननाद-रिपो त्यज पावुनि तात सखाश्रम रक्षिल जागा
धर्म असे तुज दोहद-पूरक मानिल तापस रक्षिल जागा ७८
लक्ष्मण तीस निशा सरतांचि म्हणे प्रभु पाठविनो तुज माते
चाल तपोवन साधु पहा धन घे बहु वाटुनि लाजिव दाते
वंदुनि वंद्यजनांघ्रि निघे निज-कांत-रथावरि बैसुनि हर्षे
स्वर्धुनिपार कविंद्रपदीं त्यजि सांगुनि तो जळ शोकज वर्षे ७९
भूतनया वदली जन निंदिति या करितां त्यजिलें जरि सोधा
युक्त असे प्रभुला यश निर्मळ आत्मकुळोचित यावरि सोधा
रोदन योग्य नसे तुज हें मज टाकुनि जा वद मन्मनातें
ध्यान रुचो प्रभुचेंचि जसें रुचतें शिशुच्या पय अन्न ननातें ८०
साश्रु नमूनि सतीस फिरे प्रभुनें भरतानुज रक्षिति मागे
राम उदश्रु म्हणे जननें दयिता असतां शुचि निंदिलि कां गे
आदिकवि द्रुत येउनि पूजुनि वृत्त तिच्या वदनें परिसून
प्रार्थुनि सांत्वुनि ने उटजीं दुहिता जशि लाडकि कीं वरि स्नून ८१
राम कथी नृग-भूप-निमि-क्षितिपाळ-वसिष्ठकथा अनुज्याला
तीहि ययाति-कथा गुरुशाप घडे सुर ही वदले ननु ज्याला
न्याय करूनि तया सुखवी प्रभु जो स्वमनां गद शायक विश्वा
हृष्ट उलूक-खगाहि करी सुयशें निववी रघुनायक विश्वा ८२
श्री-यमुना-तट-वासि महामुनि सांगति दुःख तयां सह भावा
पाठवि लक्ष्मण रावण कीं द्विज-ताप तया अतिमत्सर जावा
जाय अरिघ्न सदाश्रम पावुनि आदिकविव्रति वंदुनि राहे
राघव कुमार-युग प्रसवे महिजा निश तो रचि नांव कि पाहे ८३
सूर्य-तनूद्भव-सिंधुतटीं सकळाश्रित-तापस-मंगल-गामी

---

१ वाल्मीकिच्यास्थानीं. २ हे माधो. ३ संपाशें. ४ हे जन समूहा. ५ आपल्याचित्तसंबंधीनें. ६ कुशा. + जटाभूतां आश्रम. ‡ उन- अश्रु- रुदन.

मीं पहिला मग धा मग ता तिन वर्ण असे गुरु ज्या नृप-नावीं
त्यासि वधी लवणासुर हा हर-निर्मित-शूलधर ज्यवनातें
पूर्वकथा कथिली असि ऐकिलि राम-पदाब्ज-सम स्तवनातें ४४
शूळ करीं नसतां हरिणादिक मारुनि जों गहनोतुनि आला
तों अरूस मुनि गांठविती रण त्या प्रबळासह दारुण झाला
अग्रज-दत्त-शरें उर भेदुनि वीर अरिघ्न वधी लवणातें
रावण-मर्दन तेविं खळार्दन न त्रिदशा गमलें कवणा तें ४५
त्या मधुपूर्ववनीं मधुरा रचिली भरले तंव वत्सर बारा
ये परतोनि अरिघ्न कवींद्र-कृतादर तो परिसे कृति सारा
भूतनया-सुत साधु कुशाख्य लवाख्य सुधी मधुर-स्वर-गाते
सेविति जे मुनि रामयशा न मनें स्मरती अमृता स्वरगा ते ४६
तो प्रभु-पाद नमूनि निघे हृद सेवुनि जेविं महातपतप्त
श्रीश-निदेश नलंघि निघे मथुरेसि वसोनि पुरीं दिन सप्त
हार धरी मृत-बाळक विप्र उपाय पुसे प्रभु नारद बोधी
पुष्पक ये स्मरतांचि वसे रघुराज अधर्मकराप्रति शोधी ४७
आढळतांचि वनांत तपोरत शूद्र तया प्रभु तत्क्षणिं मारी
स्वर्गसुखासि करी उचित द्विज-बाळ उठे मह दे बहु भारी
श्वेत-कथा घटजें कथिली परिसोनि तदर्पित-सद्वळयातें
घेउनि ये स्वपुराप्रति लाजवि ताप-हरत्व-गुणें मलयातें ४८
राजपदोत्तर-सूय असें अभिधान जयास तयास कराया
राम पुसे विनवी भरत क्षितिप-क्षय हा तुज योग्य न राया
लक्ष्मण जोडुनि हस्त वदे हयमेध बरा प्रभु ऐकुनि डोले
सत्य असा मख अन्य नसे तरले इल वासव यापरि बोले ४९
राम वसिष्ठ-मतें करवी स्थळ नैमिष-नाम-वनीं भरतातें

१ मांधाता. २ अरण्यातून. ३ आनंद. ४ राजसूय
५ नामविशेष (राजा) + महा-आतप-तप्त- मोठ्याउष्णानें तापलेला.

कार्य कथी तुरगाऽयन मेघेश्वरवासिस यत्नयवों जग धाने
प्रेषुनि दूत अरिघ्न सुकंठ बिभीषण मैथिल मातुळ राजे
आणवि सर्व-महर्षि-महाकवितेंहि महासव तो बहु साजे ६०
आदिकवि प्रभु-सत्कृत शिष्यसमेत वसे शुचि-गोमति-तीरीं
तोचि कुशा सलवा कृति गाववि होई उते श्रवणें रघुवीरीं
कोण तुम्हीं रचिलें कवणें सुमनोहर काव्य असें अवसानीं
राम पुसे कथिती गुरु तत्कृत ज्यांस जेनु क्षितिच्या नवसानीं ६१
हर्षुनि कांचन पुष्कळ देववि देव विरक्त न ते लव घेती
जाणुनि पुत्र तदीय सुरीति न रामचि वर्णिति हो अवघे ती
प्रत्यय देउ जनास पुन्हा करु दिव्य सती परि तो कविराया
जोडुनि हस्त असें विनवी प्रभु देविस पावुनि शोक विराया ६२
मान्य करी कविराज मग प्रभुच्या निकट क्षितिजेप्रति आणी
दाशरथे शुचि हे नसतां मम सत्तप मोघ वदे असि वाणी
श्रीहि म्हणे जरि मद्व्रत शुद्ध असेल फळेल तुला महि माते
दे उदरीं स्थळ जे जन निंदिति गावुत लाजुनियां महिमा ते ६३
तोंचि उलें धरणीतळ त्यांतुनि भासुर-मूर्ति निघे महिदेवी
ती स्वसुतेप्रति भेटुनि जें परमासन त्यावरि सादर ठेवी
वर्षति देव तदा कुसुमें यश गाउनि वाजविती वर वाद्यें
होय पळांतचि गुप्त सती धरिलें बहु दुःख सरोजभवाद्यें ६४
कोप करी बहु भूमिवरी प्रभु सांत्वुनि तत्व तया कथि धाता
पद्मभवा दयिता तव तूं हरि मानवमा खळ-रावण-घाता
सांप्रत येथुनि जाउनि राहिलि पूजन घेत रमा फणिलोकीं
देइल भेटि निजालयगा तुज वा निज भाव मनीं अवलोकीं ६५
आदिकवींद्र-कृताऽमलकाव्य सुरांसह आयकिलें मन धालें

१ हुकूतप्रेम. २ जन्म. ३ कमळोद्भवा (लक्ष्मी) ४ स्थानीं जाणाऱ्या तुला. + लक्ष्मणास. ✱ म्हणवि.

तूंहि समय करीं श्रवण प्रिय हेंचि सुधीस सुधाधिक झालें
प्रार्थुनि यापरि जाय विधि प्रभु सोडुनि शोक पुन्हा सुत-गीता
त्या स्वयशा परिसे हृदयांतुनि दूर नहोय पळार्धहि सीता ५६
यज्ञ समाप्तिस नेउनि गौरवि राघव वर्ण मखागत सर्व
प्राज्य अचिंतित दे प्रियवस्तु हरी अखिल-त्रिदश-द्रुम-गर्व
ये स्वपुरा मग तो अयुताब्द सुवर्णमयी दयिता हयमेधा
माजि तसीच वरूनि करी मख कोटि बहु स्तवि साऽमर वेधा ५७
सोडुनि हा नरलोक सुखें मग कोसलराज-सुतादिक माता
दिव्य विमान वरूनि पतिप्रति भेटति धन्य करी प्रभु ताता
त्यावरि मातुळ आत्मपुरोहित वित्तहि पुष्कळ पाठवि रामा
तो फळवि द्विज मत्त नराऽमर-गायक-मर्दन या नृप-कामा ५८
पाठविला भरत प्रभुनें दिन सप्त निरंतर भांडुनि मोठी
ख्याति रणीं करि योजुनियां प्रळयास्त्र वधी अरि तीनहि कोटी
त्या विषयांत पुरद्वय निर्मुनि बैसवि राज्यपदीं सुत दोघे
स्वामि-पदाऽब्ज-रजेंचि शिरीं बहु जाणुनि राज्यपदाहुनि तो घे ५९
कारुपथाभिध देश सुशोभन त्यांत पुरद्वय निर्मुनि केले
लक्ष्मण-नंदन भूपति जे भरतात्मजसे अभिषेचुनि नेले
काळ धरासुर-रूप वदे प्रभुतें तुजसीच रहस्य वदावें
त्यासमयीं तिसरा जन येइल जो स्वसमीप तयासि वधावें ६०
द्वारप लक्ष्मण राजवरें वध हा पण आपण सांगुनि केला
ब्राम्हण हस्त धरूनि रहस्य-गृहांत समर्चुनि सादर नेला
सांजलि तो विनवी नत होउनि पाठविलें विधिनें मज काला
कृत्य नसे उरलें स्वपदाप्रति ये रुचल्यास जगत्त्रय-पाळा ६१
त्यासि अवश्य म्हणे जगदीश्वर तोंचि महामुनि अत्रिज आला
दाशरथिःक्क असें पुसतां विनवी कर जोडुनि लक्ष्मण त्याला

---

१ दुर्वासा. २ दाशरथिः क्क रामकोठें. + देशांत. ‡ ब्रम्हा.

आसन हें क्षण बैस मुने प्रभु येउनि पूजिल सांप्रत कार्यी
गुंतुनि बासदनांत असे तव दर्शन घेइल सत्वर आर्या ६२
चंड वदे पितृ-पूर्वज-सन्मति सोडिलि होउनि मत्त पहा रे
हें कुळ भस्म पळें करितां प्रलयाग्निपुढेंहि न मत्तप हारे
तो स्वविनाश बरा न कुलक्षय हें मनिं आणुनि सत्वर तातें
शापुनये विनवूनि असें कथि अत्रि-सुता मग सत्वर तातें ६३
काळ पुसोनि निघे मग येउनि अत्रिसुतासि नमी प्रभु राम
प्रांजलि होउनि कार्य पुसे कथि तो क्षुधित द्विज भोजन-काम
अन्न चतुर्विध अर्पुनि तर्पुनि अर्थि-सुरद्रुम घेउनि आशी
देउनि त्यासि निरोप वसे हृदयांत धरूनि महासुख राशी ६४
बंधु वदे सुधभास्कर मद्वध होचि नसा विनथा तव संधीं
त्याग वधासम हे स्वगुरूक्ति तृपा नसि यद्दि पर्यी जसि अधा
जा त्यजिलासि म्हणे अनुजा प्रभु जो हरिना स्मरतां भवबंधा
लक्ष्मण वंदुनि पाय निघे त्यजि शील न ज्यापरि चंदनगंधा ६५
जाय घरीं सरयू-तट लक्ष्मण तें पुर सर्वहि दुःखित झालें
तोंचि विमान रविप्रभ आणुनि निर्जर-वृंद नभांतुनि आलें
यानवरीं मग बाहुनि त्याहुनि संमद गाजत वाजत नेला
तें अवलोकुनि सर्वजनें सुगुण-स्तव-युक्त जयध्वनि केला ६६
राम म्हणे भरतास नको पद जाइन लक्ष्मण जेथि तथा मी
राज्य करीत पुरींत रहा सचिवांसह हर्षित या पितृ-धामीं
तो प्रभु-भक्त म्हणे तुजवांचुनि द्वाइल हें पद तापद काया
त्वत्पद पद्मचि भूषण सोडिल हा न असें वदता पदका या ६७
धाडुनि दूत अरिघ्न सुकंठ बिभीषण हे प्रिय भक्त बहावे
जे प्रभुजी स्मरतां तुज संतत दास तिहीं तव पाय पहावे
पाठविले जवन स्पश गे कुनि शंननशंत सुन द्रुय नोंही

1 प्रतिज्ञा. २ वेगवान. ३ दूत. ४ हात जोडून

स्थापुनि ये भरतानुज सोडुनि राज्य न साधुजना धन मोही६८
अंगद बैसउनि स्वपदीं अतिसत्वर भक्त सुकंठहि आला
मारुति जांबवदादिहि तोहि बिभीषण रामपदीं नत झाला
ऋक्षवर क्षणदाचर-राज मरुत्सुत यांप्रति दे वर इष्ट
श्रीपति पौरजन प्लवगादिक हर्षवि जे गमनोत्सुक शिष्ट६९
ते जन सर्व दयानिधिनें त्यजुनि स्वपुरी सरयूप्रति नेले
मज्जन तीर्थवरीं करवूनि सुराधिक दिव्य खरादिहि केले
दिव्य-विमान-सहस्र-शत-स्थित गाजत वाजत साजत गेले
पावुनि उत्तम लोक सदा प्रभु-दर्शन-हर्षित-मानस ठेले७०
श्रीरघुनाथ-चरित्र जना बहु भव्य नव्य रस देउनि तारी
जोडुनि पातक या सुयशासचि रक्ष लक्ष म्हणती नरनारी
ये सहजांतहि जींत कसेंतरि रामनाम बरवें हितकारी
तीं सकळांसहि भेटविती शुचि उक्ति मुक्ति करिती हित भारी७१
अक्षमनोहर दीन-जनाऽवन-दक्ष सुमर्थद साधुसभाधन
लक्ष-कपि-स्तुत दारुण-पातक-कक्ष-दवानळ सत्करुणाघन
तक्षक-कोटयऽधिकोथ दशानन-रक्ष-उपद्रुत-विश्वभयापह
रक्ष रघूत्तम मामबलं वृतपक्षमनाथ-महर्षि महा-मह ७२
पसरूनि तुला पदर प्रणती करितों शत वा भगवच्चरिता
तव चिंतन नित्य घडो सदया क्षण एकहि जाउ कधीं न रिता
वर हा मज दे नरलाजन कोण न कास भयांत तुझी धरिता
सकळांसहि तर्पिसि अर्पिसि तूं शुचि गांग तसें हरता हरिता७३
परमाद्भुत तूं प्रभु-नाम जनीं न रमापतिहूनि उणें नमिता
वर मागिनला वरिनो म्हणसी चरमात्मज देसि सुखा अमिता
सरमा-धवसा तुज सर्व गमे शर मारुनि राम वधी अरितें
परि मारे मुखादि अजेय सुखें पर मारिसि लाजविसी अरितें७४

---

१ नेत्र आणि मन यांतें हरणारा. २ मां-अबलं-बलरहित जो मी त्यातें. ३ वनातें. ४ शत्रु. ५ कामप्रमुख. + वृतपक्षं-वेरला आहे पक्ष ज्याणें असा ( मां या शब्दाचें विशेषण. ) अनाथ-महर्षि-महा मह- अनाथ जे महर्षि त्यांचा मोठा आनंद किंवा उत्साह. अशा हे रामा ( रघूत्तम या शब्दाचें विशेषण. )

मालदृगर्चित काळमुखाखिलपाळ गमे नत बाळक ज्याला
सव्यथ ज्या कळि नव्य सदा निज-भव्य-यशें अज अव्यय धाम
स्कार-गुण-श्रुति-सार-कळाजित-मार रमा-मणि-हार नमावा
श्याममनोहर नाम-हृताख्यघ राम मनांत निकाम रमावा ७५
छंद मनोहर हें सवया म्हणती बुध यास सहाय मला
मंदमतीसहि होउनि सिद्धिस पावविला अभिलाष मला
ग्रंथ रघूत्तम-पाद-युगाऽर्पित हा तुलसीदलसा गमला
भक्त मयूर म्हणे रसिक प्रभु-भक्तचि या सुयशीं रमला ७६


समाप्त.

# अनुष्टुप्*रामायण.

श्रीश ब्रम्हादि-देवांहीं करुनि स्तुति-वंदन
प्रार्थितां रावण-वधा होय दिग्रथ-नंदन १
कौसल्या प्रसवे रामा कैकेयी भरता सती
जी सुमित्रा लक्ष्मणाख्या-शत्रुघ्नाख्या सुतास ती २
राम लक्ष्मण मागोनि ने ज्या गाधिजनाम हा
ज्यांच्या नामें न संसारीं बाधे आधि जना महा ३
अस्त्रें दे शत ज्या त्या नाटका पर मारवी
स्व-वंशज-प्रभु-जयें धरि भा परमा रवी ४
विघ्नकर्ते प्रभुपुढें टिकले न खर क्षण
श्रीलक्ष्मणाग्रजें केलें लीलेनें मख-रक्षण ५
रामें लावुनि पायाच्या रजाच्या पवना शिला
अहल्या तारिली श्रोत्यां शात्यांचा भव नाशिला ६

---

* अनुष्टुप छंदानें केलेलें रामायण.

भंगी भर्ग-धनुष्यातें मनुष्यातें न पाहवे
वाहवे न सुरदैत्यां गुणाध्वनि नसाहवे ७
ज्या माता भूमिनें कन्या-रत्न देवूनि सादरें
जामात जनकें केला त्यजिलीच रसा दरें ८
सीता देउनि रामा दे लक्ष्मणा मग ऊर्मिळा
दिल्या भरत-शत्रुघ्नां बंधुच्या दोन दुर्मिळा ९
भजोनि परधर्मा जी उज्या भार्गवराम नी
श्रीरामाच्या पुण्यतेजें लावी मार्गवश मती १०
म्हणोनि कंटक हे दोष सारसा केनका पुरी
त्या न तें स्वयशें हांसे सार साकेत कापुरी ११
यौवराज्याभिषेक स्व- ज्येष्ठ-पुत्रीं करावया
राजा योजी गुरु म्हणे हा विचार बरा वया १२
मागे स्ववर कैकेयी मंथरा-भिन्नधी रतो
मनुवर्षे वनीं राम जाहला खिन्न धीर तो १३
पुत्र-राज्यार्थ करितां प्रियेनें अंतराय हा
सत्य-पुत्र-प्रेम-पाशीं म्हणे तो संतराय हा १४
श्री सत्य धर्म रक्षाया सोडिली सत्वर क्षिती
कीं साधु-पुत्र तातांचें सर्वस्वें सत्व रक्षिती १५
सीता-लक्ष्मण-संयुक्त श्रीराम प्रभु सदसें
गुरुतें वंदुनि निघे वन मानुनि भद्रसें १६
वदले वल्कलधरा रामा पाहोनि हा यती
म्हणे अयोध्या निश्रीका शोका वाहोनि हाय ती १७
राजाज्ञेनें सुमंत्रें तो रथीं प्रार्थूनि वाहिला
शृंगबेरीं प्रियसखें गुहकें साश्रु पाहिला १८

---

१ महादेवाच्या धनुष्यातें २ पृथ्वी. ३ भयें. ४ उत्तममार्गा. ५ चवदावर्षे. ६ विघ्न. ७ हाय. ८ शोभारहिता.+ अयोध्येला.

जटा रचुनि दे आज्ञा सुमंत्रा परतें असी[1]
त्यास होय प्रिय हित अभक्त पर तें असी[2] १९
म्हणे सख्यासि गंगेच्या पार सुतरि लागु हें
भवार्णवीं उतरिता सुखें उतरिला गुहें २०
निववी श्रीभरद्वाजा ज्या नसे अन्य कामना
तरोनि तोष प्रभु दे सूर्याच्या कन्यका-मना २१
चित्रकूटीं मग वसे राघव आयता तया
ते थील जो सत्समाज भेट दे काय तात या २२
स्त्रीच्या बोलें दशरथें वरदेशा परा[3]स्तता
धाडुनि वरिली जाया परदेशा परास्तता २३
गुरुनें मातुळ-कुळ-स्थित सोनुज सत्वर
आणवीला भरत जो गुणौघ-नट-चत्वर[4] २४
ऐके वृत्त म्हणे ज्ञाता तो जो सज्जननी तिचा
आचारही त्यांत नाहीं गंध सज्जन-नीतिचा २५
सन्मतीं त्याग तोषाचा भरता हेतु लाजसी
ताता शंका नसे कोणा भरता हे तुला जसी २६
भरतें त्यजिली माता लोभान्ध-मति दुष्टता
कौसल्येला कळविली पुत्राही आत्म-शुद्धता २७
तत्करें गुरु ताताची करवी वरचि क्रिया
त्या राज्या ज्ञानादरें तो धरवी वर विक्रिया २८
त्यजी पुरी प्रभुकडे जाय तो सास तापली
तो गुहाची मति तिला कळवी शुद्धि आपुली २९
जाणवी श्रीभरद्वाजा स्व-भक्ति-भर तापहा

---

१ खड्ग. २ रामास. ३ मेलेपणा. ४ गुणसमुदाय रूप जो नट त्याचें अंगण असा.

तो म्हणे चित्रकूटीं जा श्रीरामा भरता पहा ३०
गृष्टिरीति प्रभु त्याना तोहि तर्णक-रीति घे
तात-वृत्त-विषें बंधु तप्त-कर्ण करी तिघे ३१
साश्रु श्रीराम ताताला प्रेमें दे पिंडु-तोय ती
कथा गातां जो स्वर्यांगीं नपाहे खिंड तो यती ३२
देवू गुरुवचें वर्षें चवदा विरहास हा
हे स्वधेची पित्या हर्षे चव दावि रहा सहा ३३
भरतें वरिल्या राज्या रक्षाया पादुका नतें
नंदिग्रामीं घातलें जें नाशी तापा दुकान तें ३४
प्रभूच्या दर्शनें पावे स्वाश्रमीं सुख अत्रि तें
वर्णिलें सर्व शर्वादि-देवें केवळ न त्रितें ३५
अनुसूया अळंकारी श्रीलाही अंगरागदा
ती मोडाया श्रमा स्वाशी दे जेंसी संगरा गदा ३६
विराधाच्या सुखविलें तपस्वी शाप-वारणें
वदले साधु नित्रवा सद्वेश तापवा रणें ३७
तापसांच्या तमी चित्तें त्या सदा रामहर्षितें
जो प्राशी सिंधुतें वंदी त्या सदारा महर्षितें ३८
जटायु गृध्रेंद्र सखा ताताचा बहुमानिला
प्रभूनें हा प्रभु-प्रेमा प्रेमें कोणी न वानिला ३९
गोदेनें प्रभु सेवी जी सर्वदा सांवरी नत्या
प्रेमें मुक्ति म्हणे जीच्या सर्वदासां वरीन या ४०
त्याचें चित्त न वैकुंठा साकेता आठवी रते
रमा रम्योटजीं वेद करिती पाठ वीर ते ४१

---

१ एकवेळा व्यालेल्या गाईचीरीति. २ वासराचीरीति. ३ खेंड. ४ स्व- आशी- चांगला आशीर्वाद. ५ युद्ध. + नामविशेष (ऋषि) त्याणें. ++ उटी देणारी. ‡ हर्षानें.

त्या श्रीपंचवटीमध्यें वसतां रावण-स्वसा
स्वसामर्थ्यें हरूं पाहे जो दुर्जर शिवस्वसा ४२
दंडितां तीस तभ्राता नधरी परवा खर
प्रभुतेज तुरे वज्रें तेजस्वी पर वाखर ४३
मागे शूर्पणखा काम-क्रोध-लोभाऽग्नि वाढवी.
दुर्बुद्धि आवडे मूढा गाढवा जेविं गाढवी ४४
मायामृग मन श्रीचें तो कार्तस्वरसा बळें
मोही करूनि प्रभूच्या शोकार्त स्वर भावळें ४५
प्रसाद-रत्न योग्याधिक कवडी देवरा मनीं
सन्तापें ताप भोगाया दवडी देवरास ती ४६
रावणें एकली सीता पर्णशालेंत राहिली
पाहिली व्योमग-रथीं सर्व-नाशार्थ वाहिली ४७
जटायु सोडवी सून रोकतां हाक दापित्या
भंगी धर्मरणीं वांचों नदेतां हा कदापि त्या ४८
क्षतार्त विरथ क्रुद्ध गृध्र-पक्षांनि तोडुनी
सोडुनि न्याय साध्वीतें ने कुधी हानि जोडुनी ४९
त्रिलोकीं कीर्तिनें जीच्या गंगेनें तेविं शोधिली
ती अशोकवनीं लंका-वनीं नेउनि रोधिली ५०
दयिता-विरहीं शोकें प्रभूच्या काय कोंदिला
विलाप सर्व न जना करुणें आयकों दिला ५१
वनीं विलाप प्रभूच्या ज्याचिया श्रवणीं पडे
रडे खग मृग व्याघ्र द्रुम वल्ली असें घडे ५२
गृध्रेंद्र शोधितां सीता क्षत मूर्छित देखिला

---

१ निरवाच्यासकरीणअसा. २ नामविशेष (शस्त्र) ३ सुवर्ण सा. ४ जटायु. ५ रावणास. + शिवाला समपरा केले त्या पदार्थासारिखा ++ भोळें.

सानुजें श्रीवरें साक्षात् तात-घातचि लेखिला ५३
सांगे दशाननें सीता नेली केली दशा असी,[1]
असीमोयें हाणिला वा हाणि व्हाया यशा अर्सी ५४
मरणीं सगुण ब्रम्ह प्रेमें दे त्यासि मांडिला
धन्यधन्यें तन्मुखश्री प्राशितां काय सांडिला ५५
दाहादि तत्क्रिया केली खगाला मोक्ष वाटिलें
प्रभुनें या यशें भक्त-स्वांतींचें शल्य काढिलें ५६
प्राप्त झालें कबंधाला जैसें चंद्रार्क राहुला
समुद्गिरिति मारूनि ते त्या योजन-बाहुला ५७
उपाय कार्य-सिद्धीचा सांगे तो कृतवंदन
सखा करावा सुग्रीव प्लवंग रविनंदन ५८
मतंगमुनिची शिष्या ज्या न नाश वरीस ती
गति घे पूजुनि सरो–जानना शबरी सती ५९
रघ्वादि पाहुनि ध्यानीं पंपास्थ-विरहा-कुळा
वदले पावुनि स्वर्गीं कंपा स्थविर[2] हा कुळा ६०
ध्याना उत्साह दे बोधें मानसा वढिलापरी[3]
रामें शोकें विरवळिला मान सांवडिला परी[4] ६१
हनुमान् प्रभुला भेटे ज्या लग्नीं फार चारु तें
पुत्र-सुस्वामि-प्रियत्वें धरिला हर्ष मारुतें ६२
सखा सुकंठ प्रभुला रुचला परिसाम्य हा
लोह-गोळक दृष्टांत सुचला परिसा सहा ६३
सखा न बहुमानावा अग्निच्या वात कां कणां
बाणें गुण द्विट-दारांत पिटाया हात कांकणां ६४
श्रीत्यक्त नग सुग्रीवें सख्या प्रभुसि दाविले

---

१ खड्ग. २ वृद्ध. ३ जमाकेला. ४ परंतु. ५ शत्रुच्छि-
यांत.

लाविले हृदयीं रामें दुखी स्वसम भाविले ६५
हरि स्त्री श्री जपे बंधु प्राणाच्या हरणास जो
प्रभूत्तम न कां तैसा मत्ताच्या मरणा सजो ६६
प्रभु एकीकडे राहे सुग्रीवातें पुढें करी
वाळी न[1] गर्जना साहे ये तो मत्त जसा करी ६७
एकेंचि रोपें कोपें तो उरीं दुर्मद ताडिला
पाडिला शिखरीं वज्रें तसा कार्येंचि नाडिला ६८
म्हणे सौमित्रि घे आर्ये श्री ताराहि दिली पहा[2]
स्वर्गाति त्यजितां स्वर्गा- हि म्हणेल दिलीप हो[3] ६९
देवांचे भेटले कोटि कोटि कीशर्क्ष-अंश या
सुग्रीवाच्या वाणिति ते राक्षस-क्षय-संशया ७०
आले श्री तपहातांजे वीर अन्यत्र धाडिले
मासें सरोन चिंतित यमाशागत[4] पाडिले ७१
सांगे जटायुचा भ्राता संपाती गीध सन्मती
उत्साह-शक्ति-स्तवनें वायुजा होय जन्मती ७२
करी चकित मैनाका ठकवी सुरसामुखा
वधी छायाग्राहिणी ते देव-दृष्टिस दे सुखा ७३
लंघूनि दे गोष्पदवत् सिंधुतें धन्य तो कपी
तच्चरित्र स्वर्गिवृंद तें रमे स्तन्य तोकपी ७४
पाहे वनीं राक्षसींच्या वेढिली जानकी शतें
सुख दुःखहि पावे तो उपमा ज्या न कोश तें ७५
कामांध रावण प्रार्थी निशीथीं[5] श्री समुत्तर[6]
जें दे तें एकुनि म्हणें आपणा हो समुत्[7] तर ७६

१ हस्ति. २ बाणें. ३ हाय. ४ यम-आशा-गत-दक्षिणदिशेप्रत गेलेले. ५ मध्यरात्रीच्याठाई. ६ सं-उत्तर-चांगलें उत्तर. ७ आनंदयुक्त.

दशास्य गेल्यावरि दे मुद्रा मुद्राशि[1] होय ती
चित्तीं कपि म्हणे हर्षी सनकादिक हो यती ७७
वन भंगी बळ वर्धी चुरी युद्धांत अक्ष तें
कर्म अत्यद्भुत करी शरीरें कपि अक्षतें ७८
सांपडे मेघनादाच्या ब्रम्हास्त्री घें[2]हि बांधुनी[3]
या सत्कीर्तिप्रति म्हणो सखी दिव्या न कां धुनी ७९
रावणाला करी बोध तो धर्म-न्याय जाणता
पुच्छ पेटवितां वीर स्वीकारी रुद्र-बाणता ८०
जाळी लंका नमी श्रीतें लंघी मारुति अर्णवा
म्हणे शक सुरांतें या आर्या वर्णुनि वर्णवा ८१
आधीं वातात्मजें सेना मग कार्या जपोनि धी
श्रीरामाची निवविळी शांति कीर्ति तपोनिधी ८२
श्रीचूडामणि संदेश[4] समाचार निवेदिला
तेव्हां शिव म्हणे मोठा मला हर्ष शिवे[5] दिला ८३
आलिंगिला सुप्रसन्नें श्रीरामें वायुनंदन
करिती यत्पद-रजा ब्रम्हादि सुर वंदन ८४
दिलें या उपकारा स्व- प्राण होइन मी ऋणी
करिसील पुढें त्याचा ऐसें बोले महाघृणी ८५
पुसोनि मार्ग दुर्गारि-विचार-बळ आपण
करी क्रिया सांडवीन द्वेषी मारुनि हा पण ८६
सुमुहूर्ती निघे सेना- सिंधु घेउनि साऽनुज[6]
सागराच्या तटा पावे प्रभक्षर्य स-भानुज ८७
कथितां हित धिक्कारी त्या मना बंधुस त्यजी

१ मुत्- राशि- आनंदाचा राशि. २ देवांची. ३ नदी (गंगा)
४ निरोप. ५ हे पार्वति. ६ सूर्यपुत्रा सुग्रीवासहित.

बिभीषण म्हणे पापी हे तुम्हीं अंधु सत्य जी ८८
महासखी-महोदारा रामा शरण ये रते
असें न दातें वंदूनि घेती-चरण येर ते ८९
जों चंद्र सूर्य स्वकथा तों लंकाराज्य ओपिलें
रामनाता जी जगें हीं पोषी देवूनि ओं पिलें ९०
सागरीं रचिला सेतु न सेनाचि नरावया
संसारीं शकट्चिा हेतु जीव-मोह हरावया ९१
म्हणवी श्रीस दावूनि प्रभुचें शिर-चाप हो
पापहा सरमा सांगे सखि मत्य न या पहा ९२
सुवेळ-शृंगीं चढुनि प्रेक्षितां दुर्ग देखिला
उडोन सगळें केला भग्न दुर्ग न लेखिला ९३
प्रभु बोधी अंगदास्यें कीं नहो तामसा वध
क्षीणायु रावण नव्हे करितां साम सावध ९४
दूतातेंहि वधूं पाहे काय सत्संग रासभा
साधूंची परि निःसीमा वर्णी तत्संगरा सभा ९५
महामायें मेघनादें सानुज-प्रभु-विग्रह
बांधिला नागपाशाहीं केला दारुण विग्रह ९६
त्यांतें पाहूनि रडुली धर्मची तत्परा सता
सुरर्षि-धीमही वाटे ती सत्या तत्परासता ९७
त्रिजटा धैर्य दे राहे स्वस्था मग पतिव्रता
पळवी व्याळ-मोहांची वारी स्वगप तीव्रता ९८
कुंभकर्णासि उठवी प्रयासें अयत्नक्षण
काळसाचि प्रभुपुढें दावी तो नवल क्षण ९९

१ विहीरी. २ अजी. ३ हाय. ४ वधसहवत्समानजोरनसा चादेह. ५ युद्ध. ६ तत्-परासुता-यारामलक्ष्मयाचें मृतत्व.

करी धरूनि स्रुग्ग्रीवा देवांचें मन घाबरें
तत्कर्ण-नासा-हरणें तेज ये अनघा बरें १००
खवळे सर्वसेनेच्या सगळे कवळी लया
तेव्हां राक्षसही झाले अत्युग्रा जवळील या १०१
तद्बाहु-पाद-शीर्षांचें करी श्रीराम कर्तन
नभीं मुनीचें शोकाचें रावणीं होय नर्तन १०२
ससैन्य सानुज रणीं शरांहीं बहु ताडिला
अंतर्हितें मेघनादें प्रभु पीडुनि पाडिला १०३
आंजनेयें उठविले ते आणुनि सदोषधी
माया-सीता-वधें मोही तो त्यावरि सदोषधी १०४
लक्ष्मणें वधिला युद्धं झालें दिवस तीन तें
प्रार्थिली तज्जया तेव्हां शक्रें शिवमती नतें १०५
पुत्र-शोकार्त दिक्कंठ घे सीता-मारणा असी
अंतकाळीं स्मरे ती त्या प्रभुतें वारणा असी १०६
प्रार्थी ज्या सती-हिंसा- कामा सचिव धारणीं
खड्गाच्या सदृश असा रामासचि वधा रणीं १०७
परते पर तेथुनि क्रोध-शोक-समाकुळ
पावोनि भस्म झालें ज्या दावानळसमा कुळ १०८
बळाब्धि धाडी दिक्कंठ प्रभु कुंभज आटवी
वाट वीरासि नाकाची दावी प्रलय वाटवी १०९
मग क्रोधें मरावें कीं मारावा राम हा पण
करी निघे राक्षसांच्या कोटि घेउनि आपण ११०
सिंधुला कपिरक्ताच्या नद्यांचें शत भेटवी

---

१ खंडन. २ इंद्रजित. ३ गुप्तें. ४ सत्- ओषधि- उत्तम औषधी. ५ दोषयुक्त आहे मति ज्याची असा तो रावण. ६ खड्ग. ७ गजेंद्रासारिखी. ८ स्वर्गाची.

लक्ष्मणोरीं शक्ति हाणी प्रभु-क्रोधाग्नि पेटवी १११
तो म्हणे संकट स्वामि+ त्यांतासि नगमो हरी
आणी पुन्हा औषधीचें शृंगज्या नग मोहरी ११२
जी धर्मांच्या सन्नयाच्या विलंघी पथ मोतली
सेना सेना मारयाया ती आणी रथ मातली ११३
संक्रंदन-स्यंदनीं तो बैसला रघुनंदन
मंद- नक्तंचरेशांता शांतार्यारब्धवंदन ११४
श्रीराम-रावणाचें जें हाय द्वैरथ युद्ध तें
अत्यद्भुत बकें मेलीं अमिनें ज्यांत उद्धतें ११५
सप्ताहोरात्र समर श्रम रक्षोधिपा तया
न देव दे प्रभु-मनीं होतो कैसा निपात या ११६
श्रुती अजित ऐसें ज्या परमायास वानिती
मानिती देव देवी त्या परमा या सवा निती ११७
लीलानर स्थेंही तो शान छेदूनियां शिरें
म्हणे नपडतां वैरी चिंतेंन हृद्या शिरें ११८
सांगे आदित्यहृदय श्रीकुंभज नपोनिधी
मंडळीं लाविली रामें दृष्टिमाच जपोनि धी ११९
वधिर्साल दशास्यातें ऐसा श्रीरवि दे वर
उद्धरी शल्य तें आम्हें शार्चाचा कवि देवर १२०
वृष्टि स्रवन-पुष्पांची झाली प्रभुवरावरी
ह्यासुखाची करी जीची सुधेची न बराबरी १२१
दुंदुभिप्रमुखें दिव्यें वाद्यें पुष्कळ वाजलीं

१ वानर ( मारुती ). २ मातली. ३ स- इना- धन्यासहित अशी. ४ नामविशेष ( इंद्रसारथी ) ५ मस्तकें. ६ प्रवेशकरी ७ इंद्राणीचा. ८ दीर. * इंद्ररथीं. + धन्याच्यामनाम. ‖ शांत-आर्य-आरब्ध- वंदन- शांत आणि श्रेष्ट याहीं आरंभिलें वंदन ज्याचें असा.

दिव्यें प्रभुपुढें गानें दिव्यें नृत्येंहि साजलीं २२
मंदोदरी मयसुता पावे शोक विलाप ती
करी जो सर्वशोकाचा भासे तो कविला पती २३
तच्छोक शमवी पावे न सीतावर विक्रिया
बिभीषणासि सांगोनि करवी वरवी क्रिया २४
प्रभूनें लक्ष्मण स्थापी भक्ता भद्रासनावरी
भक्तवत्सल हस्तातें देतां भद्रास नावरी २५
लोकापवाद वाराया करी दिव्य महासती
महास तीर्थपादा दे प्रकटूनि महास ती २६
ब्रम्हादि-सर्व देवर्षि- स्तुता शीता कळे वेरा
निवाल्या स्पर्शतां ज्वाळा जीच्या शीता कलेवरा २७
भेटे दशरथ स्नेहें विजयें फार हर्षला
हुंगितां शिर पुत्राचें श्रीचें प्रेमाश्रु वर्षला २८
मृतें उठविलीं सैन्यें शक्रें पीयूष-वृष्टिनें
दृष्टिनें प्रभुच्या लीला-कृत-संहृत-सृष्टिनें २९
पूजा घ्यावी असें प्रार्थी बिभीषण तया कर
स्तकेठार्चीच ती माझी ऐसें सांगे दयाकर ३०
भेटीव भरता क्षिप्र प्रिय हें बहु वाट ती
दुस्तरा अवधि स्वल्प स्वांताला रघुनि वाटती ३१
लंकानाथ म्हणे देतों पुष्पक प्रिय साधितां
जों आहे अवधि स्वामी नसावें चित्त साधि तों ३२
सवळा सुगळा पूजी दे विमान बसावया
म्हणे तो जाण हें मी श्री देवि मानव साव या ३३

१ शोकाचास्वामीगमे. २ विकार. ३ सिंहासनावरी. ४ उत्सवास. ५ तेजास. ६ श्रेष्ठा. ७

झालें जें भरत-प्रेम तें पुष्पक-विमानसें
मानिलें पारिजाताचें कीं पुष्प कवि-मानसें ३४
ससैन्य लंका-किष्किंधा- नाथ बैसविले शतें
मुखांच्या शकते वर्णू न प्रेम कवि लेश तें ३५
बसे विमानीं सीतेला अंकीं घे राम सादर
निघे तेथूनि देवूनि रावणा तामसा दर ३६
रण-क्षोणीस सेतूस श्री पाहे सादर क्षण
सर्वा श्रितांचे करिते प्रभूचे पाद रक्षण ३७
संगराच्या वियोगाच्या प्राशी प्रभुमुखें कथा
व्यथा सुखप्रदा मानी देवी पूर्णमनोरथा ३८
वाहे विमानीं तारेतें जें पंपा मन घाबरें
करी जें प्रेम शबरी तें ऐके अनघा वरें ३९
कबंधोद्धार ऐकोनि वंदी गोदावरीस ती
जटायूत्तरकार्यानें बहु मोदा वरी सती ४०
अगस्त्य-शरभंगात्रि- सुतीक्ष्णाद्याश्रमा नमी
वदे झाल्यें भवत्पुण्यें पात्र शोका श्रमा न मी ४१
चित्रकूटाद्रियमुना- गंगांच्या पुण्यसंगमा
भरद्वाजा नमी तो जो उद्धरी स्थिरजंगमा ४२
भरद्वाजाश्रमीं राहे भरता प्रभु आठवी
अंजनेयासि आलों हें कळवायासि पाठवी ४३
गुहातें भरतातें तो महाकुशळ भेटला
बेट लागे समुद्रीं कीं विझवी ताप पेटला ४४
प्रयागीं अब्द चवदा श्री-रामें सांग मोजिले
तारिलें भक्तबंधूतें तद्वियोगाधि वारिले ४५

---

१ भय. २ मारुतीस.

भरताचा निश्चय तो पर्णीया कार्य हो महा
चुकतां अवधि स्पष्ट करिता कार्यहोम हा १४६
आचार्य- विप्र जननी- सखे- सचिव- पौरवा
वंदूनि भेटोनि करी त्यांच्या उचित- गौरवा १४७
मोठो उत्साव भेटीचा प्रवेशाचा तयाहुनी
भारी राज्याभिषेकाचा ऐसे वाखाणिती मुनी १४८
पाहे रामाभिषेकातें हर्षे गाय दिलीप या
भू प्रजेष्ट करी जाणों वर्षे गाय दिली पथा १४९
सर्वांहूनि मरुत्सुत्र कवि सार सभाजन
पावे करी सप्रसादा रवि सोरस भाजन १५०
रामराज्यांत म्हणती पारिजाता अगा रहा
कीं ताप पावोनि म्हणे न कोणीही अगार हा १५१
ज्या श्रीरामें निज- यशः पीयूषें विश्व तर्पिलें
रामात्मजें मयूरें हें त्या तच्चरित अर्पिलें १५२
सत्कीर्ति स्रग्धरा कन्या हे रामायणसत्कथा
मयूरें अर्पिली रामा वरा जाया मनोव्यथा १५३

समाप्त.

## दामरामायणआर्या.

श्रीपति झाला दशरथ- सुत राम दशाननासि माराया
मो राया जनकाची होय सुता त्रिजगदाधि साराया १
सारा या प्रभुची हे लीला गाती सदैवही सत्कवी

१ शरीरहोम. २ कमळ. ३ विष्णु. ४ रावणास ५ लक्ष्मी. ६ त्रिजगाचें दुःख. ७ नाशाया. ८ उत्तमा. ९ उत्तमकवी. ‡ माळेंतपुष्पेंगुंफल्याप्रमाणेंयांत प्रासबांधले आहेत. म्हणूनयाचेंनांवदामरामायण- दाम (माळ)
+ हें रामायण पहिल्या पुस्तकाच्या आठव्या अंकांत आहे, परंतु सर्वरामायणांचें एकच पुस्तक होणार म्हणून पुनः घेतलें आहे.

सुकवी भव[1]-जलनिधिनें निरुपम सुख रसिकजन मनीं पिकवी १
पिके[2] वीतबोध[3] कवि या चरितांम्रवनांत[4] कूजिती सुरस[5]
सुरसंधींचा[7] लाजे यश हें[8] श्रीशिव म्हणे शिवे परिस[9] २
परिस सुवर्ण करितसे- लोहा जीवासि शिवचि हा महिमा
महिमान्या[10] स्वर्गीही सकुळ म्हणे धन्य यत्प्रभा[11] अहिमो[12] ४
अहिमोन्य[13] होय लक्ष्मण जो श्रीपति-राम-भक्ति-लाभ-रत
भरत दरवर[14] सुदर्शन[15] शत्रुघ्न स्व-जन-शत्रु-नाश-रत ५
शर[15] तरणिकुलमणीचे[16] यश करुनू असें म्हणोनि ये नगेश[17]
नगेशजसाचि[18] कौशिक मागे सावरेज[19] राम राजवश ६
[20]जंव रामाच्या दानीं न करी तो नृप वसिष्ठ समजावी
जावीं चिंता द्यावे पुत्र त्वद्विजय[21] मज दिसे भावी ७
[22]भावी हित मग नृप दे ने मुनि[23] गुरुसाच[24] बहु करी राया
मायापतिला[25] विद्या[26] सांगे क्षुत्तृट्श्रमासि[27] वाराया ८
[28]वोरा यातूंच्या[29] प्रभु[30] मर्द[31] म्हणे विप्रे[32] जेविं कौमारी[33]
मारी प्रथम पथीं जी पीडी साधूंसि नाटिका भारी ९
[34]भों रीति बहु प्रभूची मिरवी अस्त्रें द्रवोनि शांत दे हीं
देहा कवच कृपेचें करि कौशिक हर्षवी रमागेहा[35] १०

---

१ संसारसमुद्रातें. २ कोकिला. ३ निर्बोध. ४ येथें चरितरूप, आम्रवनांत असें घालण्याचें कारण पिक पक्षी आम्रवनांत कूजितात म्हणून अशी उपमा घेतली. ५ शब्दरीती. ६ मधुर, रसयुक्त. ७ स्वर्गीचा. ८ हेपार्वति. ९ स्पर्शमणि. १० पृथ्वी. ११ यत्-प्रभा-ज्याचें तेज. १२ उष्ण. १३ सर्पश्रेष्ठ शेष. १४ शंख. १५ बाण. १६ सूर्यकुलोत्पन्न रामलक्ष्मणाचे. १७ अयोध्येस. १८ मेरुपर्वततुल्यचि. १९ स-अवरज-कनिष्ठबंधूसहित. २० त्वरा. २१ होणारा. २२ मानी. २३ विश्वामित्र. २४ यापसा. २५ रामाला. २६ बला अतिबला नावाच्या. २७ क्षुधा-तृषा-यांच्या श्रमासि. २८ समुदाया. २९ राक्षसांच्या. ३० हे रामा. ३१ मर्दनकर. ३२ कौशिक ३३ मदनरिपु रुद्र. ३४ तेज. ३५ रामास.

मागे हानि करया षडरींची[1] ज्यासि शक्ति येति[2] सौरा[3]
सौराया[4] मखविघ्ना तो वधि सिद्धाश्रमांत अरिवीरा[5] ११
वीरा[6] करी पदांबुज-रेणु अहल्येचिया अघाभ्रा[7] त्या
भ्रांत्या[8] भरताच्या ती[9] पूजी अत्यादरें महांधात्या[10] १२
धीं[11] त्या गासि न करितां गौतममुनितें म्हणे येशो[12] या गा
योगा[13] जाय जनकनर-पतिच्या जो आत्मचिंतनीं जागा[14] १३
जागा दे त्या स्पर्धी वैदेही[15] तत्कृता रमा नवरी
न वरी जी हरकार्मुक[16] भञ्ज न करितां करी न मान वरी १४
मानवशनिधर[17] प्रभु[18] शिवधनु मोडी तिचा[19] धरी पाणी
पाणी[20] सोडी जनक प्रेमाश्रुहि तत्करवा नसे वाणी १५
वाणी[21] चार विवाह[22] प्रेमभरें गाय नारदा-महित[25]
दासहित[23]-प्रभु[24] भार्गव रामा करि तेज हरुनिही महित १६
महि[26] तनयार्थ[27] हरि[28] म्हणे स्त्री[29] वनवासासि रत्नहारा[30] जा
हा[31] राजा[32] वरला श्री लोभें कांहींच न द्रवे भाजा[33] १७
भाजा शोकांत म्हणे राम निघे त्यजि न सानुजा सीता
सीतातपवृष्टीनीं[34] झाली नाहींच भिवविता भीता[35] १८
भी तापा[36] विरहाच्या[37] शाप[38] म्हणे त्यजुनियां शरीरा जा
राजा मरे भरत ये मातेसि म्हणे विनाश हा माजा १९
माजा या शोक-पुरीं आवडलें कर्म हें कसें हाय

---

१ षड्रिपुंची. २ योगी. ३ उत्तमा. ४ नाशाया. ५ शत्रुसमूहा. ६ वायुरूप. ७ पापमेघास. ८ भावास. ९ अहिल्या. १० जगज्जनका ११ नृपस्नेहा. १२ कीर्तीला. १३ यज्ञा. १४ जागृत. १५ जनकाला. १६ त्र्यंबकधनु १७ मनुष्यवेषधरणारा. १८ राम. १९ सीतेचा. २० करताई. २१ सरस्वति. २२ रामलक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, यांचे विवाह. २३ दासहितकर्ता. २४ परशरामा. २५ पूज्य. २६ पृथ्वी. २७ भरतासाठीं. २८ घेई. २९ कैकेयी. ३० रत्नहारतुल्यासमा. ३१ हायहाय. ३२ दशरथ. ३३ स्त्रीकैकेयी. ३४ थंडीउष्णपाऊसयांनीं. ३५ भयभीत. ३६ दुःखा. ३७ रामवियोगाच्या. ३८ श्रावणाचे पित्याचाशाप + जनक = माझा.

हा यत्न पतिकृताच्या नाशीं फेला विंडंबिला काय२०
काय पित्याचा विधिनें संस्कारुनि अग्रजाकडे आला
आलापी गुण विनर्था प्रभु यांनें फार सांत्विना जाला२१
जा लाभ यशाचा हो तुज मजही अंद्ध मागितां चवदा
चवद्दास्यांत पित्याच्या अमृता गेरी नसेचि हा न वदा२२
नवदाम स्करतरूचें तेंसें प्रभुवाक्य घे शिरीं भरत
भरतस न व्हायाला मणिकांचनपादुकाहि पादरत २३
दर तहिरहाच्याही आज्ञाही लंघितां नये परतें
परतेथेंचि मन वसे विषयीं स्वर्गींहि धीर तो न रते२४
नरतेनें स्वीकारुनि भेटे अत्रिस वधा विराधाला
धाला दंडकयासी मुनिजन पाहोनियां अलभ्याला२५
भ्याला त्यावरि कोणी- हि ननस्थानें स्थिता न विप्र खरा
प्रखरासि चापधर दे अभय प्रभु हा पित्यासमान खरा२६
नखरांनी कनकंकशिपु वधितां दावी जटायुनें सुनता
सुनता कीर्ति करि जिता देवांची ही प्रसादचंचुलता २७
चुलता सांग गादा- नारीं सुरकार्य आठवी राहे
रांग हेतिधरा या रावण-भगिनी गतत्रपा पाहे २८
पांपा हे शूर्पनखा कामांधा प्रभुचिया गळांचि पडे
चिपडे डोकें मुरडी कपटें शोभवुनि तो अनुजनिकडे२९
निकडे येतां धाडी नकर्णघ्राण वीर तो हरि तें

१ दूषिला. २ देह. ३ शरीर. ४ रामाकडे. ५ गाई. ६ राम. ७ भरतातें ८ नगरासजा. ९ वर्षे. १० रुचि. ११ नूतनपुष्पमाळा १२ भागनें दुःखित. १३ रत्नखचितसुवर्णपादुका. १४ रामपदभक्त. १५ भय. १६ मनुष्यपणानें १७ विराधनामकराक्षस विरोधाला. १८ तृप्तझाला १९ दुर्लभरामाला २० नाशिकयेथेंराहणारा. २१ खरदैत्यास. २२ तीक्ष्णज्याचारवड्ग २३ धनुर्धर २४ नखांनीं. २५ हिरण्यकशिपुचावधकरणारा २६ पुत्रभाव. २७ विनम्रतेना. २८ जिंकी. २९ प्रसादकरण्याविषयींकुशलजीकल्पवल्लीवी३० पितृव्यजटायु. ३१ खड्गधरा. ३२ शूर्पनखा. ३३ निर्लज्जा. ३४ भ्यात्यालक्ष्मणाकडे. ३५ धाडस. ३६ तिचेकाननाक. ३७ लक्ष्मण. झाला.

हरितें कर्म करि सुरवी मग सवळा मधु वधी खरा अरितें ।
अरि तें वर्णी प्रभकार- यश मग कां वर्णना न करिल पवी
लपवी न मुख कुधी तीं दशकंठ कधुनि जानकी हरवी ३१
हर विश्वत्वष्टा ज्या गातां रक्षी पळांत करिपानें
करि पोतें शोकें वपु विकळ रडवि सर्व जें वदे हा तें ३२
देहानें गृध्राच्या संस्कारी उद्धरी कबंधाला
बंधाला शबरीच्या हरि करवधी पवनजा तपनजाला ३३
ज्याला रावण जोडी कर जो भक्ता निजानुजा वाळी
वाळी मारुनि कपिपति करि सैंगल प्रभक पवननता पाळी
पाळी घाया सीता शोधायाची मनीं धरी आशा
आशाचक्री धाडी कीश न भीते रणांत कीनाशा ३५
नाशाया रामाधि- प्रति लंघी सिंधुतें पवनभू तें
भूतें वर्णिति यश जें गातां होती सुखें मनें पूतें ३६
पूतें दशकंठाच्या पावुनि रात्रीं प्रवेशुनि यशोधी
शोधी श्रीस अशोकीं पाहे तों तोहि ये सुरविरोधी ३७
रोधी अनयें महिषी हो म्हणतां त्यास्वळा गुणोदारा
दारा श्रीरामाची धिक्कारी बहु करूं न दे चोरा ३८
चोरा निशाचरी हो सीतेचें नवळेना मला मास
मासद्वय अवधि दिला ऐसें बोलोनि जाय धामास ३९

---

१ रामातें. २ नामविशेष (राक्षस) त्यातें ३ रुदननि. ४ वज्र. ५ शूर्पनखा. ६ रावणा. ७ शिव. ८ ब्रह्मा. ९ गजेंद्रानें. १० पतनानें. ११ जटायूच्या. १२ मस्तकहीन व क्रियायुक्त शरीर अशा राक्षसाला. १३ नाशी. १४ मारुतिला. १५ तपन-ज सूर्यपुत्र सुग्रीवाला. १६ सूर्याया. १७ त्वजी. १८ सुग्रीव. १९ पदीं जे नम्र त्यास. २० खेप. २१ दिक्मंडळीं. २२ वानर २३ न भिणारे. २४ यमाला. २५ रामाची मनोव्यथा. २६ मारुति. २७ पवित्रें. २८ मुलाखें. २९ शीतेस. ३० देवद्वेषी. ३१ अटकावी. ३२ स्त्री. ३३ गुणाढ्या. ३४ चेष्टा. ३५ खावया. ३६ अनुकूल न होतां. ३७ गृहास. + वानरराजा.

धा[1]मा सतीश्वरीच्या[2] वर्णी कपि[3] रामगुण वदोंन तिला
नें[4]ति लास्[5]य करुनि मुद्रा[6] दे कुशल कथी स्तवी तिच्या पतिला[7]
चाप तिलापद[8] अरिला प्रभुचा होतो असें कळवि भावी[9]
भा[10] वीरवंशाची[11] स्तवि चूडामणि[12] घे पदासि शिर लावी ४१
शिरला वीर मथुनि वन अक्ष[13] घनरवासि[14] सांपडुनि नगरीं
न गरीं[15] जें तें दावी क्रौर्यें[16] दशमुखा म्हणे न हानि करीं ४२
हा[17] निकरीं[18] म्हणविल रघु- राजशरांच्या भ्रमोनि रे देवी[19]
देवीतें[20] भय रहा रे खेचर-[21] अहि गुरु[22] रामबाण भासे वी ४३
सेवीना बोधसुधा[23] मारूं-लागे प्रमत्त देवारी[24]
वारी त्यासि बिभीषण तरि पुच्छ करी प्रदीप्त अविचारी ४४
चौ[25]रि पुरुषार्थ भजति यद्भक्ता विघ्न जोडिती हान
हा तद्दूत[26] व्यसनीं पावेल स्मृति असोनि कां पान[27] ४५
कांपा तयां खळांतें पवनसुत म्हणे उडे पुरीं[28] जाळी
जाळी[29] जेविं दवानळ साधुबिभीषणगृहासि तो गाळी[30] ४६
गाळी[31] दशकंठातें देती लंकेंत राक्षसी कुपितो[32]
कुपिता[33] घननादाचा मानी तुच्छा मनुष्यता[34] कपिता[35] ४७
नाकंपिना[36] जेंवि पयां[37] कुमनरुचि[38] तमा अनादरी स्वमता[39]
स्वम[40] तापद[41] निर्दैया सुरनरुचें तेंवि साम[42] या अहिता ४८

---

१ तेजा. २ सीतेच्या. ३ मारुति. ४ नमन. ५ नृत्य. ६ आंगठी. ७ रामाला. ८ तिल-अपद-तिलोदक देणारा. ९ भविष्यकाळ. १० तेज. ११ रामाची. १२ शिरोभूषण. १३ अन्वया. १४ मेघनादासि. १५ विषांत. १६ क्रूरपणा. १७ हायहाय. १८ समूहांत. १९ सीता. २० निर्भय. २१ खरासुरसर्प. २२ गरुडपक्षी. २३ उपदेशामृत. २४ देवशत्रु. २५ धर्म, अर्थ, काम, मोक्ष, हे. २६ तद्-दूत-मारुति. २७ पतन. २८ लंका. २९ लतागृह. ३० वर्जी. ३१ शिव्या. ३२ गगावस्या. ३३ दुष्टपितारावण. ३४ मनुष्यपण. ३५ वानरपणा. ३६ नाकंपिणारा. ३७ दुग्धा. ३८ वाईटमनांची आवडी ज्यास तो. ३९ स्वजनममता. ४० पुष्प. ४१ दुःखदायक. ४२ प्रियभाषण.

अहि[1] तोडुनि गरुड जसा जाय कपि नमी स्वभक्तमंदारा[2]
मंदा राक्षसराज्या[3] छळिलें तें वृत्त कथि नराकारा[4] ४९
राकाराज-नुतयशा[5] मारुति कथि सर्व जें वदे रमणी[6]
रमणीय[7]मणिद-कपिची पुरवी प्रभु भेटुनि स्तवून धणी[8] ५०
न धणी[9] असा पवनजें हरि[10] तो मारावया ससे नेला
सेनेला घे मारुति सकलमतें अजित[11] सागरा गेला ५१
रागेला हित कथितां रावण आला बिभीषण नमाया
मायाविसंग[12] सोडी खळसंसर्गोत्थ[13]-पातक शमाया ५२
माया करि दे लंका- राज्य करुनि सेतु सिंधुला तरला
तरला[14] सेना घेउनि गर्जत विभु शत्रुजनपदीं[15] भरला[16] ५३
भर[17] लावी कांपाया क्षितिस सवेळीं वदे अजित पुरतें
पुरतें पाहे सगळें मथिला अरि निरखितां विजयसुरतें ५४
स्मर तें नियुद्ध[18] पाहुनि झालें संतुष्ट म्हणति अरिसमर
समर प्रारंभीं खळ होय न विभुच्या[19] पदांबुजीं[20] भ्रमर ५५
भ्रमर हित ऋक्ष[21] कपिवर दाशरथि शरक्षपाचरास[22] रणीं
सरणीं[23] निजा म्हणति न व्यसनसमुद्रीं तया मिळे तरणी[24] ५६
तरणिकुळमणि[25] घनरवें[26] केले अहिपाशबद्ध मानवसे
न वसे श्रीहृदयीं[27] लव धैर्य त्रिजटासुरवें कुशल परिसे ५७
परिसेवा समयोचित साधी तो मुक्त करि तयां विवर

---

१ सर्प. २ स्वभक्तांचा कल्पतरु राम त्यास. ३ रावणास. ४ नररूपी रामास. ५ चंद्रानें स्तविलें यश ज्याचें असा. ६ स्त्री सीता. ७ रमणीय चूडामणी देणारा कपि त्याची. ८ आज्ञा. ९ स्वामी. १० सिंह. ११ रामचंद्र. १२ कपट्याची संगत. १३ दुष्टाच्या संसर्गापासून. १४ चंचला. १५ शत्रूच्या देशांत. १६ शिरला. १७ सेनाभार. १८ द्वंद्वयुद्ध. १९ रामाच्या. २० पादकमलीं. २१ अस्वल. २२ रात्रिंचर राक्षसास. २३ प्रेतशय्येवर. २४ नौका. २५ रामलक्ष्मण. २६ इंद्रजितानें. २७ सीताहृदयीं. * येथें जो अलंकार केला आहे त्यास ( पर्युस्तकापन्हुति ) म्हणतात. म्हणजे एका पदार्थावर दुसऱ्याची उपमा घेणें.

विवर व्योळ वरिति ते पक्षध्वनि ऐकतां स्वहानिकर ५८
हो निकर राक्षसांचा बोले पावोनि भंग हा तनय
हा तनय राक्षसांचा वरमे स्वाधिक म्हणे जयास मय ५९
समय कठिण जाणुनि घट- कर्णा उठवी दशास्य तो खरचा
तोखे रवी सुगळ धरी हरि मारुतिच्या प्रभा मुखावरची ६०
वरचील काय यूथप तत्कर्णघ्राण सगूळ तोडि खळ
तो डिखळ तेविं रगडी त्या मारी स्वजनवज्रकवच पळ ६१
चपळत्व गांठि पडतां न करूं दे जेविं हरिस शरभ वनीं
शर भवनीं अरिच्या हा प्रभुचे म्हणविति निवे जयें अवनी ६२
अवनीं स्वबळाच्या पण करुनि घनरवें हि पाडिले शवसे
लेश वसे न कपिबळीं धृति केले प्रभुहि विकळ मानवसे ६३
नव सेवक मारुति करि यश आणी स्वौषधीधरा शिखरा
राशि खरा तेजाचा उठवी प्रभुसहित विकळ-कपिनिकरा ६४
निकरा करिती राक्षस लक्ष मथिति दाशरथि तदा परमा
पर माया करि सीता वध दावि वदोनि हा म्हणे वरमा ६५
वर मागे विधिपाशीं तेणें करि अमरतार्थ हा मास
हा मास कपिनरांचें राक्षसपुष्टिद म्हणे करी कास ६६
कासर-मत्त तसा हा अरि वधिला लक्ष्मणें महामानीं
मानी शक्र बिभीषण जयविभुही त्यासि भेट दे वानी ६७

---

१ बिळ. २ सर्प. ३ पारवांचा शब्द. ४ खेदोद्गार. ५ समुदाय. ६ त्यक्तनय. ७ मनांत खोंचे. ८ मायावी मयासुर. ९ कुंभकर्णास. १० दशमुख. ११ गाढवच. १२ संतोष. १३ सुग्रीव. १४ नाशी. १५ वरकड. १६ सेनापति. १७ कुंभकर्णाचे कान नाक. १८ मातीचा गोळा. १९ आपल्या जनाचें रक्षण करण्याविषयीं जो सुदृढ कवचरूपी. २० सिंहास. २१ पक्षिविशेष सिंहशत्रु. २२ गृहीं. २३ धरणी. २४ रक्षणाविषयीं. २५ स्वसैन्याच्या. २६ धैर्य. २७ सु-औषधीधरा- उत्तम औषधी धरणाऱ्या. २८ टेंकडीला. २९ समुदाय. ३० रामलक्ष्मण. ३१ नाशपावा. ३२ त्यापरानें. ३३ रेडा. ३४ इंद्राचा शत्रु इंद्रजीत म्हणून इंद्रजयमानी. ३५ वर्णी.

देवांनीं स्तविला बहु [3]मग दशमुख आननें करी [1]अेसितें
[2]अेसितें घे[6] मारया श्रीतें सोशील [4]आंग ती कसि तें ६८
केसितें[8] मुक्तेहि करितें ज्याचें ई[7]क्षण जडा तया अजितें
अजि तें हृदय फिरविलें[10] न वधी गेला [11]वधावयासु[12] जितें ६९
[9]सजि तेधि उग्र बळ खेल सिंधु जसें कालकूट आजिस ये
आजि सये जय म्हणतां श्री सरमेतें म्हणे बरें सदयं ७०
[13]सदये न वंशतिलके वधिले ते वळ न शेष कांहिं वसे
कां हिंवसे होतील न सुर अधरा[14] तो पलाशराज डसे ७१
जेंडे सेना सजुनि निघे दे कपिकटकास भय न धृतिउरवी
उर वीरलक्ष्मणाचें [17]भेदी प्रभूलाहि शोकविष भरवी ७२
भर [16]वीशसा पवनसुत मोहाचा उडवि उठवि [18]लवलाहें
[19]लवला हें कर्म करुनि त्यासि विभु म्हणे तुझा ऋणी आहें
[20]आहेंतुनि रामप्रभु शोकाग्नीच्या निघोनि बाहेर[22]
बाहे रजनिचरेशा[21] त्यासि म्हणे फळ कुलाधमा हेर ७४
माहेर[25] म्हणे ज्यातें[23] कीर्तिसकळ साधुराजि[24] मानवली
मानवलील रण करी परि भारें भूमि [26]तरिसेमा लववी ७५
मालवली दीपाची वातें अरिची तसी प्रभा अहितां[27]
[28]अहिता दे [29]विपता घे निज चापलता जगीं करी महितां[30] ७६

---

१ काळीं. २ खड्गातें. ३ सीतेतें. ४ अपराध. ५ बाधितें. ६ सोडी. ७ पाहणें. ८ रावणाचेंमन. ९ सिद्धकरी. १० रावण. ११ विषविशेष. १२ सुद्धास. १३ सत्-अय-चांगल्यादैवाचे. १४ पराजयपाहून रावणानें आपले ओंठचावले म्हणूनसुरवरथंड झाले असा भावार्थ. १५ मूर्खरावण. १६ वि-ईश-गरुडसा ( विशेषत्वरेनेंउडवी. ) १७ मारुति. १८ त्वकर. १९ नम्रझाला. २० ज्वालेंतुनि. २१ रावणा. २२ पहा. २३ रामातें. २४ साधुसमूह. २५ राम. २६ नोकेसम. २७ रावणा. २८ सर्पता. २९ गरुडता. ३० पूज्या.

महितापहरी बैसुनि शक्ररथीं विजय विभु रणीं साधी
साधि त्रिदश मुनि निववि शिवविधिनुत राम विश्वभय बाधी
बाधीर-वीर-वरद-प्रवर विजयी रणीं असाचि रहा
चिर हानि कवि खळाची गातिल मुनि म्हणति शक्र गाय महा
गाय महा पंकांतुनि दुःखांतुनि सृष्टि उद्धरी परम
पर मग सत्कारवि यश तें कथि विश्वास मदिनरीं न रम ७९
नरमणि बिभीषणा दे विधिनें पद दिव्य करि अनादि सती
दिसती झाली दहनीं डोहीं नलिनी तसी सुरततिस ती ८०
तिस तीर्थपाद घे सुर-मुनिदशरथवचन करि अगाधबळ
धवळ करी त्रिजग यशें उठवुनि मृत सर्व कीशराजबळ ८१
जवळ बिभीषण बसवी सत्पूजित सबळ सुगळ अनुजनितें
जनितें दुद्युति पुष्पक-वरुनि निघे सुखवि त्या सुगुणखनितें ८२
खनितें इशल्य तारा घेउनि ये विरहवृत्त कथिन तितें
ततिनें पुरनेचांच्या निववि विसरतीच पौर तापति तें ८३
पतिनें स्मरुनि तरावें ज्या तो दे देव भेट भरतातें
भरतातें दिधला घे दावी सुख नित्य जें अज नतातें ८४
जनता तेहि निवविली अमृतधनें जेविं तीस मानवती
मानवती देवांच्या जी मुक्ति स्मरति ते न मानव ती ८५
मानव-तीर्थ पदार्पित मुक्तामणिहार दे पवनजाला
जाला जे मोक्ष भजन विभु ओपी सुचिर या सुखें जाला
जालामाजि भवाच्या पशुपक्षीही नराहवी नारी

---

१ पृथ्वीचाताप. २ स-आधि-दुःखित. ३ शिवब्रम्ह्यानें स्तविलेला. ४ राम. ५सत्य,शपथ. ६ सीता. ७ कमलिनी. ८ देवमंडळीस. १० रामचंद्र. ११ बळसागर. १२ शुभ्र. १३ वानरसैन्य. १४ ससैन्य. १५ सुग्रीव. १६ चंद्रवत् प्रकाशमान. १७ विमान. १८ राम. १९ सीतेतें. २० पतीतें. २१ पाप्यानें. २२ जनसमूह. २३ स्त्रिया.

शीतारिषट्कबाध स्वजन करी प्रभु दयार्णव विचारी८७
चारी पुरुषार्थ नतां दे भक्तमयूरमंदिर साधून
साधून प्राकृतहि न सर्वांसि म्हणे भवाधि बाधून८८
बाधून म्हणति बाळ स्नेहें परि तो धुतो जसा जीव
साजीव न म्हणतांही साजवि तो भक्तमधुपराजीव८९
रीजी वनेजांची रवि दृष्टि स्फरवि निज-सुरद्रुमाराम
मारा महेशासा हा नुरवि स्मरतां भवभ्रमा राम ९०
श्लोक दामरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ९१

समाप्त.

∴

# निरोष्ठरामायण.

श्रीहरि दशरथ-नंदन झाला दशकंठ-संक्षय कराया
दर शेषचक्रहीं जनि घेती जगदखिलसंकट हराया १
अंगज चार तिघींचे संस्कृत साक्षर नरेंद्र कीर्तिकर.
निरखी नितांत हर्ष हाचि न तैसाचि नागरिक-निकर २
गाधिज यज्ञ-त्राणा याची ने ज्येष्ठसह कनिष्ठ तया
दे ताटकाक्षयकरा असें करि तातसा ऋषींद्र दया ३
रक्षी सयाग करी रक्षक्षय राजतनय हा ज्येष्ठ
सत्कृति करिते झाले सकल धरात्रिदश जे अतिश्रेष्ठ४

१ गेली आहे कामादिषड्रिपूंची बाधा ज्याची असा. २ मेघ. ३ नीच. .
४ संसारीनर. ५ शोभीव. ६ कमळांची. ७ शंख. ८ जन्म.
९ जगत्- अखिल- संकट- जगाचें सर्वसंकट. १० नगरवासी लोकांचासमूह. ∴ या रामायणांत ओष्ठ लागण्याजोगे जे प.फ. इत्यादि ५ वर्ण त्यांची योजना पंतांनीं यांत केली नाहीं सबब याचें निरोष्ठरामायण असें नाव ठेविलें आहे. + पुत्र. ++ पंक्ति.

यानंतर चरण-रजें जीतें तारी क्षणें सद्य-राज
ती दे सती अहल्या आशी ऐसाचि सद्यशें साज ५
हर-सायकासनातें नाशी क्षितिकन्यका-करासि धरी
जनकांगजनि तिघीज्या त्याहि द्यानिधि कनिष्ठदार करी६
येतां नगरा अयनीं क्षत्रांतक गिरिशा-शिष्य तेज हरी
जननी-जनक-हितार्थे त्यजी गृह निघे अरण्य सदन करी७
सकनिष्ठ सदार निघे चरणगति तयासि तात रथ धाडी
सारथि गंगा तरतां त्यजि अजि न निषाद खेदही झाडी८
करि चित्रशृंगशैलीं ऋषि हर्षित दशरथ त्यजी देहा
आजाच्या नगरींचा कैकेयी तनय आणिला गेहा ९
तेथें जननी-निंदा तदनंतर दशरथ-क्रिया केली
अग्रज-चरण-निकट निज-जननी जनता अनन्यगति नेली१०
जनकासि अजित तिळजळ तदनंतर धैर्य दे कनिष्ठाला
धाडी धरणी त्राणा त्या त्रिजगन्नाथ एकनिष्ठाला ११
साकेत निकट राहे धरि सतत जटादि आननीं हाय
खाय सदा ऋष्यन्नचि तेंहि अनासक्त कृश करी काय१२
अत्र्यादिकांसि इच्छित आनंद श्रीश दंडकीं दे हा
घटज्या अर्ची गृध्रा तातसखा धन्य करि धृत-स्नेहा१३
गंगा-तीरीं राहे तृण-सदनीं अजित या जिवा दादा
राक्षसराजा तीथे रति याची हृद्दरा धरी नादा १४
तत्कर्णघ्राणानें खड्गें दाशरथि धाकटा खंडी
अजित-शर-निहत सकटक खर ते कथि रडत अग्रजा चंडी
लंकेश कनक-हरिण श्री-दृगतिथि करि अजी धरा यास

---

१ मार्गीं. २ गुहक. ३ जनसमूह. ४ हृत-हरा-हृदयाला हरण करणाऱ्या.

ऐसें ती सांगे तैं जाय अजित ही तथा धरायास १६
कळला खळ अज हाणी शर हरिसा तरिहि आर्तनाद करी
हा सीते हा सखया ऐसा अरि तत्क्षणींच धैर्य हरी १७
ने त्रास धरी न निघे अग्रज-संरक्षणासि निज-वीर
याकरितां रागें जे सीता गांजी तथा त्यजी धीर १८
अति-तीक्ष्ण-गी-शर-क्षत जाय रडत दाशरथि तदांत शिरे
दिक्कंठ अजित-सदनीं श्रीस हरी शस्त्र गिळि जरी न जिरे १९
गृध्रेंद्र करि खळातें रथरहित क्षत-शरीर निर्बल
छेदी तया अशस्त्रा खड्गें लंकेसि ने सती-रत्न २०
ज्येष्ठा कनिष्ठ गहनीं चरण धरी गर-सखाधि ते सांगे
अजितास्येंहि निघे हें त्वां आस्यें आणिलें असें कां गे २१
ये अजित शीघ्र निरखी निज-दयिता-रहित अन्यसें गेह
हाय असें आस्यातें आणी जगदीश नच धरी देह २२
अंगीकृत[1] गहनाटन दाशरथी त्यक्तधैर्य हा करिती
तरिहि तसेच हटकिती गृध्र निरखितां क्षतांर्त हाक रिती २३
गृध्र-कथित आकर्णी रक्षःकृत-दार-हरण-शल्य-धर
त्याची क्रिया करि अजित तनयतसा गाय या दयेसि हर २४
अत्यायत[2] कर ज्याचे राक्षस गहनांत[3] यांसि धरि खाया
सद्गति तया दयानिधि दे सकळहि संतराय हरिखाया[4] २५
करि आतिथ्य निषादी शिष्या ऋषिची तिलाहि गति दे हा
घे आंजनेय कीश स्कंधीं त्यासाठिं तेज अति देहा २६
अर्काच्या तनयातें सदय हृषीकेश करि सखा तारी
शक्रांगजा-निधन दे सखया तत्कीश राज्य हितकारी २७

---

१ अंगीकृत-गहन-अटन-अंगिकारिलें अरण्यामधें फिरणें ज्याणें असे. २ अति-आयत-मोठे लांब. ३ अरण्यांत ४ हर्षाया. ** "क्षणांत" असाहि पाठ आहे.

त्रिदशांश कीश ऋक्षहि अगणित एकत्र करि तरणि-तनय
धाडी सकळाशांतें निरखाया श्रीस अरिस ते सनय २८
हैत-गृध्र-ज्येष्ठ कथी लंघी जलनिधिसि आंजनेय हरी
शीत नगांगज जननी नागाची नगणि सिंहिकेसि हरी २९
लंकेंत जाय रात्रीं निरखी यत्नें अराति-गृह-गहनीं
श्रीस खळाही निकटचि अत्यागें ज्यासि लय चिता-दहनीं ३०
एकांतीं अजिताच्या अंगुलिचा श्रीस दे अलंकार
घे तीच्याहि शिखेचा सांगे संदेश यास मी सार ३१
शाखी शात तदनंतर अक्षादिक रात्रिचर-कटक नाशी
राखी हताऽहितांचे करि घे त्रिदशर्षि-लक्ष-दत्ताशी ३२
दशकंठ-ज्येष्ठांगज धरि धात्रस्त्रें रणीं जनक निकट
ने कशि त्याला हाणी न्यायें अस्त्यासि गदित हा तिरघट ३३
रागें खड्ग धरी शिर- छेदा दिक्कंठ तत्कनिष्ठ दया
करि रक्षाया यांही त्यांहि कथी दे चरांत हानि दया ३४
तद्दीर्घांगातें खळ झांकी तैलाक्तनेकसिचयांही
दे अग्नि कीश चिंती गांजिलिसे सृष्टि हे असिच यांही ३५
निसटे गगनांत शिरे गर्जे जाळी क्षणांत लंकेतें
न धरी चित्तीं कांहीं त्या अग्निच्या आंजनेय शंकेतें ३६
नगरी दाह करि निघे लंघी जलनिधिसि ये अजितनिकट
सांगे निजशीर्षातें श्रीचरणासींच आदरें चिकट ३७
श्री-दत्त-शिखालंकृति दे कथि संदेश यासि हृष्ट करी
आलिंगी तत्कृतितें गाय जगज्जनक अतिकृतज्ञ हरी ३८

---

१ देवांश. २ सकळदिशांतें. ३ मेलेल्या जटायूचा बंधु (संपाती) ४ वानर. ५ मैनाकपर्वत. ६ दिक्कंठास. ७ मारुतीस. ८ चर-अंत- दूताचानाश. ९ तैल- अक्त- नेक- सिचय- ते लानें भिजलेल्या अनेकवस्त्रांहीं. + निरोप. ॥ अति-आगें-अति अपराधेंकरून. ॥ वृक्ष. + ब्रम्हास्त्रेंकरून. ‡ मारण्यासयोग्य असा असि.

तरणितनय कीशा- कटक-सहित निघे जाय धरि जलधि-तीर
शरणागतीं करी दश-कंठकनिष्टीं दया त्रिदश-हीर ३९
दे लंका-राज्य नता अरिसह ज्या सागरांत आलि रची
ने दक्षिणतीरा निज- सैन्य अजित धरि सहर्ष आधिशांची
किष्किंधेशें दिसतां दिक्कंधर गांजिलाब्धि लाख रची
जी शक्ति अगा निर्जर जिगजिग करि हा रणीं तिला खरची
शीर्ष शरासन रचि त- द्दर्शन दे नाथ-कदन कथि खळ तें
सत्य श्रीहृदय गणी ओग असें करि कसें निधन टळतें ४२
अंगद अति हित सांगे नैके तत्कदन अज्ञ हा इच्छी
आणी आस्या याची या आचारें सखेद आइच्छी ४३
कलह करि अभ्रंखळ खळ काळ गिळी सैन्य जय नयेचि रणीं
कीं अंधकार देइल काय कधिंतरी अशक्तता किरणीं ४४
घननाद दाशरथि ते अहिनीं रचितर्क्ष-कीशनाशा कसी
निरखी तशी दशा जी सीता रडली धरील धैर्य कसी ४५
तें संकट तार्क्ष्य हरी श्रीरंग-दयाश्रयेंचि यश साधी
अजित तृणचि घटकर्णा करि झाला तें दशास्य अति साधी ४६
निरखी श्रीरंग रणी श्रीचा घननाद-कृत शिरच्छेद
करि हाय हाय सत्य स्त्रैणतसा सैन्यसह धरी खेद ४७
दशकंठ-कनिष्ठ हरी खेद कथी तद्रहस्य दे धीर
त्या संस्थित घननादा शेष करी गाति या जया धीरे ४८
खळ दयित-तनय-निधनें झाला अत्यार्त जनकजा-घाता
घे असि निघे तया दे दासास्यें तद्दिननाशधी धाता ४९

---

१ सेतु. २ अपराध. ३ बांधी. ४ स-आधि-मनोव्यथा युक्त. ५ मृत. ६ धीरपुरुष. ७ तत्-इन-नाश-धी-त्या सीतेचा स्वामी जो राम त्याच्या नाशाची बुद्धि. + संपादी. ∴ इंद्रा णी. ＃ देव.

ते सहज तनय हितकर जें अगणित कटक तें रणीं सरलें
त्यजि दशकंठ तरि न हठ खळ-चित्त कधीं न आग्रहा तरलें ५०
केला रणीं दशास्यें दाशरथि कनिष्ठ शक्तिनें हतसा [१]
त्यासि रडे अज गातां ज्या झाले अहित ही जडानन सा
अगदाऽचळ-शिखरातें आणी तत्काळ अंजनी-तनय
जागें करि दाशरथिस अजित नसाहे अरातिचा अनय ५२
शक्राच्या रथ रत्नीं अजित चढे आजियज्ञ [२] करि अरिनें
संतत सातदिन झटे दे अर्का अहित-निधन-यश हरि तें ५३
दशकंठाच्या निधनें अति हर्ष जगांत सारखा झाला
त्याची क्रिया कराया सांगे अज गिरिश या यशें धाला ५४
दशकंठ-सहज राजा लंकेचा खचर-रक्षणा केला
अग्नि-स्नानानंतर खेद श्रीचा लया अजें नेला ५५
दशरथहि गगन-यानें तृषित-हृदय नंदनाकडे आला
जगदीश चरण धरि दे हर्ष कधीं नच सरे असा त्याला ५६
जागा केली रण-हत सैन्यें शक्रें निजें रसें सेशें [३]
श्री अर्चिली अशेषें लंकेशें चरणनत-हितोद्देशें ५७
श्रीद-गगन-यानांत श्रीश चढे कटक घे निघे सरसा
सीतेसि कथा सांगे दयिता-संगांत सक्तधी [*] नरसा ५८
लंका-किष्किंधाचे केले कृतकृत्य नाथ तत्कृतितें
कथि गानकलादिक जें त्याच्या करि तद्यशासि सत्कृति तें ५९
दृष्टें सदृषि-स्थानें [#] तीर्थें सांगत सतीस हाकेतें
दे हाक ये तराया आधिपदीं नायकांत [+] साकेतें ६०
आधीं निषादराजा दर्शन दे जलद चातकासि तसा
तदनंतर कैकेयी-तनया ज्या नत अराति खळ जित सा ६१

---

१ सहा ( कामादि ) २ युद्धयज्ञ. ३ स-ईश-धन्या सहितअसीं. + रावणाचा कनिष्टबंधु बिभीषण तो. * आसक्त आहे बुद्धी ज्याची असा. ++ नायक-अंत-दशरथाचा नाश. # सत्-ऋषि-स्थान- उत्तमऋषींचीस्थानें.

स्नेहें गाढालिंगन अजित अरिघ्ना तदग्रजा दे हा
आनंद न त्यजी त्या आतळला हर्ष-जलधि ज्या देहा ६२
धाला आचार्य सकळ जननी नागरिक अखिल देहातें
गेहातें नेणति हें देणें हा एक अजित दे हातें ६३
क्षिति-दास-हिता राजा झाला चिरकाळ भज करी राज्य
यद्दर्शनार्थ करिती साधन दहनाज्य यति शरीराज्य ६४
जग नष्ट कष्ट संतत अतिदक्षिण यज्ञ सांग सकळ करी
गति दे अखिलें चरितें कृत रंजन कंजनयन चित्त हरी ६५
निरोष्ठरामायण प्रमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें

समाप्त.

# श्रीप्रियरामायण.

## वैतालिकछंद.

कमळा-पति राम दिग्रंथा पितृना दे करि पावनी कथा
उघडी प्रभु मुक्तिच्या पथा उडवी सर्व-निजाश्रित व्यथा१
वधिली पहिलीच ताटका दिधलें सद्यश विश्वनाटका
प्रभुनें गुरुसाचि लक्षिला विनयें गाधिज-यज्ञ रक्षिला २
खळ राक्षस फार मारिले मग ते गौतम-दार तारिले
त्रिपुरारि-धनुष्य तोडिलें यश कन्यावररत्न जोडिलें ३
भुज-विक्रम-लेश दाविला निजकर्मा भृगुराम लाविला
स्व-समृद्धहि राज्य सोडिलें पितृ-सत्यव्रत तें न तोडिलें ४
प्रभु वल्क-जटा सुखें धरी मनुवर्षें वनवास आदरी

१ चौदावर्षें. ++ दशरथाला. + शरीर-आज्य-शरसूप आज्य.

गुह होय जटादिकें श्रमी नभरद्वाजचि तखधी शमी ६
स्वसुखीं न दिसेचि तूट यो वदला विध्वनि चित्रकूट या
स्मरतां सुत तापस त्यजी असु राजा करि शाप सत्य जी ६
भरता गुरु शीघ्र आणवी जननी त्या कृत-कार्य जाणवी
बहु निंदुनि साधु तो तिस त्यजि बोले भुजगीच होतिस ७
करि साधु यथोचित क्रिया विधिनें लक्ष्मनियां पितृप्रिया
मग बंधुकडेचि सोडुनि क्षिति गेला द्रुत हस्त जोडुनि ८
प्रभु त्या भरतासि युक्तिनें हित-सत्य-प्रिय-रूप-सूक्तिनें
निववी करि तुच्छ कापुरा फिरवी देउनि पादुका पुरा ९
करि अत्रिस राम वंदन स्वपित्या जेविं सुशीळ नंदन
बहु भूमिसुतेसि गौरवी अनसूया यश चंद्र-गौर वी १०
परमोग्र विराध मारिला प्रभुनें तुंबरु भक्त तारिला
शरभंग-सुतीक्ष्ण-कुंभज-प्रिय केलें बहु रक्षिले द्विज ११
पितृ-मित्र जटायु पूजिला प्रसवे पुण्य करूनि भूजिला
करि मान्य तिचें सुरक्षण स्तविती गृध्रवरा सुर क्षण १२
यश पंचवटीस दे वसे ऋषि ज्याचे विजयेच्छु देव से
वदली हृदयांत गौतमी प्रभु-पादाब्जरजें सुधौत मी १३
धरि शूर्पणखा कुकामना प्रभुच्या तो नरुचे चुका मना
द्रुत कापवि नाक कान या न सुखें गाइल नाक कां नया १४
खर बंधु तिचा तया खळा प्रभु मारी निवटी रणीं बळा
भगिनी-वदन स्मशान न प्रिय पाहोनि खिजे दशानन १५
कपटें कनकाभ तो अरी मृग मारीच-निशाचरा करी
खळ तो हरि जानकी-मती दवडी तद्ग्रहणार्थ ती पती १६
विशिखें हृदयांत ताडितां प्रभुनें तो कपटेण पाडितां
प्रभुसाच वदे दयारसें खळ हा लक्ष्मण हा प्रिये असें १७

---

१ रामा. २ स्वर्ण. ३ कपटहरिण. ‡ कनक-आभ-सुवर्णासारखी कांतीज्याची असा. ‡ चूक (अपराध)

अरू-संकट सत्य वाटलें हृदयीं शोकतमिस्त्र दाटलें
वदली द्रुत धांव देवरा प्रिय-संरक्षण याचि दे वरा १८
प्रभुतें शिव नित्य सेवितें मन जें कल्पि नसेचि देवि तें
तिस तो विनवी निशाचरें छळ केला सति जाण हें खरें १९
वदली हृदयांत नांदतो तव माझा अभिलाष चांद तो
प्रभु मत्प्रिय होय आज वा न उद्यां तूं रुचसील काजवा २०
क्षितिजा असि फार कोपली निजदासीं शुचि बुद्धि लोपली
स्वविवेक-सुदीप मालवी उटजांतूनि बळेंचि घालवी २१
कटु ऐकुनि तो असें रडे-हुनि जाय प्रभुसत्तमाकडे
तंव ये दशकंठ तो यती गमला सादर-बुद्धि होय ती २२
हरि कामसहाय हा यती वदली शापुनि हाय हाय ती
अजि राघव वीररायजी करुणा ती त्यजिलीच काय जी २३
त्यजिली कसि कीर्ति याच कीं तुमच्या दैन्य उरे न याचकीं
अजि लक्ष्मणजि खरा करा यश द्या स्वाहितजिखरा करा २४
अवलोकुनि गृध्रपा वरीं यश द्याया अतिभव्य शेवरीं
वदली निखळा दयारसें अजि मामाजि पहा उठा असें २५
करि तो अरि-तोष-हानितें समरा त्या सुर-वृंद वानितें
रथ भंगुनि सूत सोडवी परि त्याचे विधि पक्ष तोडवी २६
अमृताऽधिक-गोड-वीक्षण- द्विज पावे स्तन सोडवी क्षण
परि तोडुनि गृध्र-पक्ष ती हरि अन्याय-रणैक-दक्ष ती २७
कपि-पंचक ऋष्यमूकग क्षितिकन्या अवलोकि ती मग
त्यजि त्यांतचि आपले नग स्वपुरा ने तिस कांपवी जग २८
कथि लक्ष्मण वृत्त हा वदे प्रभु त्या शोक मनुष्य-भाव दे
करि फार तदा विलाप हो वदला तापन देखिला पहा २९

---

१ लष्कर. २ स्व-अहित-जिखर-खरा चू जिंकणारा. ३ हाता. ४ अमृतापेक्षां अधिक गोड पहाणें ज्याचें असा. ५ पक्षि (जटायु) तो. ६ मनुष्यभाव रामास अथवा रामजगास वदला. + अथवा.

उटज[1] द्रुत शून्य देखिलें प्रभुनें विश्वहि शून्य लेखिलें
बहु शोधिलि विश्वजीवनें तदिली नेलि गजा गजी वनें ३०
रणरंग-महानटाग्रुतें[+] स्तुत जें कर्म करी जटायु तें
प्रभुनेंहि असेंच मानिलें दिधलें तोय यथोक्त वानिलें ३१
परमोय कबंध मारिला प्रभुनें दारुण शाप वारिला
शबरीस बरी दिली गती स्वपदाब्जिं भ्रमरी जिची मती ३२
यश हें स्वजनांत ठेविलें मग पंपा-तट साधु सेविलें
पवनात्मज भक्त लक्षिला रविचा पुत्र सकंठ रक्षिला ३३
नगभित्कृत[2] बंधुस च्छली खल वाली वधिला महाबली
सगळा कपिराज्य ओपिता गमला राम दयालु तो पिता ३४
स्वकपींस म्हणे सती पहा द्रुत धाया रघुसत्तमा महा
शत-योजन-सिंधु तें करी सहसा गोष्पद वातभू[4] हरी[5] ३५
हुडकूनि पुरींत तो धरी बहु चिंताज्वर कीशकेसरी
सदशोक-वनांत पाहिली नियमें स्वाऽरि-लयार्थ राहिली ३६
कपि बैसुनि शिंशपा-नगीं निरखी जीस तुला नसे जगीं
तंव ये विनवी कुधी तया झिडकारी नधरी सती भया ३७
परते पर तेज हारवी नय सोडूनि म्हणेल हा रवी
यश वर्णुनि तो करी नती प्रभु-मुद्रा तिस दे महामती ३८
प्रिय-वृत्त पुसे दया सती करि चूडामणि दे तयास ती
वन भंगुनि मर्दि अक्ष[*] तें पुर देहें करि भस्म अक्षतें[7] ३९
क्षितिजोदित[6] वायु-तोकपी परते ये द्रुत हृष्ट तो कपी
विनयें धरि पाय दे खुण प्रभु आलिंगुनि फार घे गुण ४०
अरिची करु हानि रोप[8] हा म्हणवूं सेवि महा-निरोप हा
प्रभु जाय पयोधिच्या तटा करिती नृत्य सुरर्षिच्या जटा ४१

---

१ पर्णशाला. २ इंद्रसुत वाली. ३ उत्सवा. आनंदा. ४ वायुपुत्र मारुती. ५ वानर. ६ क्षितिजा-उदित- सीतेचें भाषण ७ बाण. ८ हाय. * रावणपुत्र. + रण-रंग-महा- नटायु- रणरूप सभामंडपामधें उत्कृष्ट नटासारखा होणारा जो त्यातें.

कपि-सैन्य-समुद्र-गर्जन प्रलयींचें करि तेविं तर्जन
प्रभुनें पद भाक् बिभीषण स्कृत केलाचि नलाबितां क्षण ४३
मग सागर भेटला भयें दिधली त्यास अभी महाशयें
दृढ सेतु विनिर्मिला नळें तरलीं सिंधु स्करें महाबळें ४४
स्कगळें दशकंठ पाहिला न महा-कोपज वेग साहिला
द्रुत त्यावरि घातली उडी दिधली जी उचिता दशा कुडी ४५
प्रभु-मस्तक-चाप दाखवी सतिला शोक-विषाग्नि चाखवी
सरमा परमाप्तता धरी कळवी छद्म तदश्रुतें हरी ४६
भगवान् नय-धर्म आठवी स्कृती अंगद दूत पाठवी
कथितों गुणपाश नाश मीं हितवाक् श्रीकुणपाशनाशमीं ४६
शमवील कळीस साम रे हरि-नादेंहि बळी ससा मरे
अनळासहि कंप दे सती त्यज संरक्षिल संपदेस ती ४७
कटु मत्त महातपें वदे चिरधी भीसि न हात पेंव दे
धरवी परवीर-भंगदा अहि वीशीं खळ तेविं अंगदा ४८
खवळे नवळेचि दांडगा हरिसीं जेविं मदांध लांडगा
प्रभुसीं करि युद्ध मारवी बळ राम प्रभु त्या तमा रवी ४९
स्व-पर-क्षय-हेतु युद्ध तें कटु केलें चिरकाळ उद्धतें
बहु ज्यांत शिरोब्ज-कर्तन त्रिदशाऽगण्य-कबंध-नर्तन ५०
पति रिक्त करूनि राहिल्या शतशः शोणित-सिंधु वाहिल्या
क्षितिनें भयदा न साहिल्या अमरींनींहि न नीट पाहिल्या ५१
घननाद करूनियां पण प्रभु जे दुर्जय राम लक्ष्मण
अहिपाश-निबद्ध ते करी स्कगळ-श्री-धृति-बुद्धिही हरी ५२
वदवे न तसीहि शोचितें त्रिजटा त्या घन होय शोचितें

१ मोठ्या हाताने. २ रजोगुणाचा जो पाश तोच नाश करणारा.
३ कलहास. ४ ज्वाळेनें. ⁑ भीत नाहीस. + महा-तपें- मोठ्या तपश्चर्येनें. ++ गरुडास. ≠ शोककरी.

करि पत्रिप[1] मुक्त बोधसा कथि शाखूंत स्फुर्कीर्ति हो धसा ५३
मग जागविला महाबळें घटकर्ण स्वजया महारवळें
कटका गट काळसा करी सुगळा मोहुनि संगरीं धरी ५४
परतोनि पुरींत जों शिरे म्हणती त्या स्फुर-काळ होसि रे
तंव सावध होय तो हेरी[2] हरि तच्छ्री-विजयासि मोहरी ५५
फिरला शिरला बळांत कोपें गमलें केवळ तें नयासि सोपें
भुज पाद शिर प्रभु स्वरोपें[4] हेरि[3] शोभे अरि धूमकेतु[6]-लोपें ५६
करि शोक दशास्य सोदेर[5]- क्षय होतां धरि फार तो दरे
मग कुंभ-निकुंभ कोपले बहु तन्नंदन तेहि लोपले ५७
त्रिशिरा अतिकायही खिजे दशकंठात्मज संगरीं निजे
स्फुत देव-नरांतकादि जे बहु त्यांच्या रुधिरें धरा भिजे ५८
तपले खपले न राहिले प्रिय मोठे भट-भंग पाहिले
घननाद कृती तथापि त्या स्वजयाचीच कथी कथा पित्या
प्रभु लक्ष्मण सैन्यही खिळी अतिमूर्छा सकळांसही गिळी
स्थळ ऋक्षप दूर जाणवी अति-दिव्यौषधि शीघ्र आणवी ६०
मरुदात्मज तो उडे जवें यश अत्यद्भुत दाखवी नवें
वदले स्फुर साधु मर्त्य गा हरि कैलास[7]-समीपवर्त्यगा ६१
द्रुत ओषधि-शृंग आणिलें व्यसन क्षिप्र समूळ खाणिलें
परतूनि तसेंचि पाविलें बळ सेश स्वनुतीस लाविलें ६२
विधि शर्व सदार मानवे स्तव नी गाय सदा रमा नवे
उपकार-भरार्त-तो लवे प्रभु कीं हा गिरिसीं न तोलवे ६३
प्रभुची धरि मुग्धभाव धी खळ माया-जनकात्मजा वधी
करि लक्ष्मण नलुया रणीं सुरवी वासव-हृद्दि-पारणीं ६४

---

१ गरुड. २ वानर (सुग्रीव) ३ हरणकरी ४ स्व-रोपें-आपल्या बाणानें. ५ बंधूचा नाश. ६ भय. ७ कैलासाच्यासमीप असणाऱ्या द्रोणागिरीला.

सुत-शोक-दवांत भाजला क्षिति-कन्या-हनना न लाजला
सदमात्य सुपार्श्व वारित्या सुर-गो-ब्राम्हण-साधु मारित्या ६५
चतुरंग-बळाब्धि ला भरी बुडवाया रघुनायका अरी
प्रभु-मार्गण-कुंभजा पुरे न जसे कक्ष दवापुढें तुरे ६६
भट घे जड वासवास जे समरा सेवुनि आसवा सजे
म्हणवी बहु हाय कांपवी कपि भी यत्त्वर-सायका पवी ६७
प्रियसून्वरिचें[1] स्वशक्तिनें दशकंटें प्रेम-हान-भक्तिनें[2]
समरीं मग वत्स[3] भेदिलें भय भारी भगवत्सभे दिलें ६८
नग-शृंग पुन्हाहि तो दया-कर आणी प्रभुच्या हितोदया
प्रभुतें भजनें करी रिणी गणि त्यां भक्ति निजा शरीरिणी ६९
कलहा बळ-हानि-कारणा करि वाटे खळ हा निकारणा
निरया चिरं[6]या नजावया यश दे आत्म-पदा भजावया ७०
भगवान् हरिच्या रथीं चढे बहु कोपें अरि मानसीं कढे
वचकें हरिला न वारण त्रिदश प्रेक्षिति हा नवा रण ७१
दिन सप्तक जाय संततें समरें अद्भुत गाति संत तें
तुटलीं फुटलीं पुन्हा शिरें प्रभु चिंतेंत म्हणे मना शिरें ७२
प्रभुनें समरांत सोडिल्या विशिखांच्या अरि तापला शतें
धरि रूप मधूंत होय जें कुसुमाहीं धरितां पलाश तें ७३
रविचें हृदय स्वयें कथी घटजन्मा प्रभु तो तया जपे
रवि-दत्त-वरें परा मथी द्रुहिणास्त्रें उर भेदितां खपे ७४
अरि होय पससु वासवा हे शुभ वेळा निवती रमा रणातें
स्तवि कीर्ति बरा सुवास वाहे मन दे या शिव वीर-मारुणातें ७५
परमोत्सव होय देवलोकीं नरलोकीं भुजगांचियाहि ओकीं
त्रिजगद्रिपु मारिलाचि तो कीं प्रभुची दृष्टि जगीं जसीच तोकीं

---

१ प्रिय-सूनु-अरि-प्रियपुत्राचा शत्रु लक्ष्मण त्याचें. २ प्रेमानें टाकिली भक्ति ज्यानें असा. ३ वक्षस्थळ. ४ मारुतीस. ५ व्यर्थ. ६ इंद्राच्या. ७ घरीं.

स्रर-दुंदुभि तोचि मेघ गाजे बहु वीणा-मुरजादि वाद्य वाजे
अजितीं वर पुष्पवृष्टि साजे मुनि गातां गणिकागणीं न लाजे ७७
मधुरस्वर नैकरागजाती क्षम गंधर्व रघूत्तमासि गाती
हिम मंद स्रगंध वायु वाहे स्तवितां न द्विज-देव वृंद राहे ७८
जय राघव राम रावणारे म्हणती तूंहि सुधन्य रावणारे
प्रभुजी भव-दून-पावना रे खचरा हो गतिपूज्य पावना रे ७९
करवी बरवी क्रिया तशाची बहु चाड प्रभुला सदा यशाची
नरुचे स्वरूभा कथा पिशाला प्रभु दे सद्गतिची तथापि शाळा ८०
प्रभुच्या वचनें दशास्य-भार्या समजावी कळवूनि तत्व आर्या
शुचि बुद्धि विभीषण स्वतापा शमवी गाउनि राघव-प्रतापा ८१
मग राम पुन्हा करी दया त्वरित प्रेरुनि लक्ष्मणा तया
विधिनें विनयालयाश या बसवी राज्यपदीं कृताभया ८२
शिबि-दिव्य नता पतिव्रता करि पाहेच नताप तिव्रता
स्तविती स्रर सर्व दास ती मिरवी श्री यश सर्वदा सती ८३
सुर-राज-मतें परास्र-तातें दिधली भेटि अजा परा सुतातें
चिर राज्य करून तें जगातें वर दे जें नव बाहुनेज गातें ८४
भरतीं भरत-प्रसूवरी प्रभुची नित्य असो दया बरी
विनवी रघुवीर यापरी प्रिय तें मान्य करूनि तो करी ८५
मित ज्याहुनि सिंधु-सैकत प्रभुचे ते गुण गात ऐकत
स्वपदा नृपजाय तो महें सुविमानें यशगाय सोम हें ८६
वदला जगदीश देवराया मृत कीशर्क्ष उठोत दे वरा या
भजनार्थ पुन्हा सजीव सारे म्हणती ते भजनीं सजीव सारे ८७
पलभुक्-पति-आग्रहें प्रभूतें विनवी पूजन घ्यावया प्रभूतें
कथि त्या सुगळास पूज्य पूजा मम हे जे दिधली सुकीर्ति भूजा

---

१ संसारानें तापले त्यांस पवित्र करणाऱ्या. २ समुद्राचें वाळवंट. ३ बिभीषण. ४ रामातें. ॐ पुष्कळें. + येथ प्रासाकरितां पा घेतला आहे.

भरता भर तापवी महीचा गमला भोगंचि[1] भोग त्या अहीचा
द्रुत भेटवि तोचि बंधु आधीं बहु मत्पूजन हेंचि हेंचि साधीं ८९
सबळा सुगळा पुजूनि भावें वदला स्वामिस पुष्पकीं बसावें
प्रकट त्यासि म्हणे तव-प्रभावें जय हा मत्सह वा तुवां असावें ९०
ससुकंठ ससाधु-निष्कलंका-पति अंकीं बसवूनि निष्कलंका
प्रभु पुष्पक शोभवी शतातें सुगतींच्या धरि दाविं वीशता[**] तें ९१
शतयोजन भव्य सेतु पाहे क्षिति-कन्या क्षण चित्रसीच राहे
प्रभु साधु-समागम-स्थळातें कळवी जेंवि तृषार्ति-हृज्जळातें[2] ९२
म्हणती यति ज्या दयाघनाशें विझवा दुःसह-कर्म-दाव तारा
मुदिता बहुत्या भयाऽघनाशें[††] नमि तारा नत-शर्मदाऽवतारा ९३
मज हा विरहांत दत्त-कंपा सति आतां सुख-हेतु तीच पंपा
कळवी शबरी मतंगशिष्या प्रभु ज्याचें यश दे प्रकंप तिष्या[3]
कळवूनि कबंध-वृत्त मोदा प्रभु दे त्याहुनि दाखवूनि गोदा
वदला सति हे पहाविशाळा रुचिरा पंचवटी महाविशाळा ९५
भरिलीं नयनें जटायु-तातें मजला पाहुनि ज्या जटा-च्युतातें
त्यजिले असुहि त्वदर्थ जेणें महिचें तद्दट हा विलोक लेणें ९६
घटजादि-महीसुराश्रमातें प्रभु दावी कळवी पराक्रमातें
मग दाखवि चित्रकूट अंगा करि रोमांचित दाखवूनि गंगा ९७
दयितेसह वंदि रावणारी निस जी सर्वजगास पावणारी
भरताप्रति मारुतीस धाडी मुनि पादाब्जरजें नमूनि झाडी ९८
निववी घनसा सख्या गुहास प्रभु आणी बहु तन्मुखीं सुहास
भरता बहु तापल्यास मोर द्रुत येतां करि आपल्या समोर ९९
सुखवी गुरुमातृ-मंत्रि-पौर प्रकटी सद्यश शंभु-हास-गौर
अभिषेक करूनि घे रवीतें यश दे जें जग सर्व घे रवी तें १००

---

१ देहचि. २ तृषा-आर्ति-हृत्-जळ- तृषेची पीडा दूर करणाऱ्या उदकातें. ३ कलियुगा. ४ यशें करून व्यापी. ** वि-ईशता-गरुडपणा. †† भय-अघ-नाशें- भयरूप पाप नाशें करून.

पहिल्याचि भजे नृपासना तें वरि कीर्त्यर्थ महाकृपासनातें
धरि भोग गुणा नवा नरांचा प्रभुराज्यांत उणा न वानरांचा १०३
बहु देत कर्धांच जें मिळालें त्रिजगीं तें सुख वासवा सवांस
प्रभुराज्य म्हणे यशास माझ्या चिर मोक्षा सुख वासवास वासे
बहु पुत्रवती तयांत पुत्र त्रिजगीं एकचि अंजना भला वी
निगम-स्तुत ही स्तवाज याच्या निजजिव्हेप्रति कंजनाभ लावी
कथि हा गुण भव्य साद देती स्मर सादास सदा निका महर्षी
करि पाजुनि रामकीर्तिमूल्य सुरसा दास सदा निकाम हर्षी १०५
सरमा-धव जो नमी पदें त्या परमा राम दया प्रभाव दावी
न रमापतिसा दयालु कोणी परमा या प्रभुची प्रभा वदावी
शमवी दमवी कुवासनेला रमवी धी गमवी स्वभक्ति भारी
धरवी बरवीच रीति नाम स्मरवी हा करवी प्रणाम तारी १०६
सकळांसि स्व-लोक-वास तुल्य-प्रिय-कर्ता प्रभु रामदेव दे हा
बहु मोह तयांचिया विरागा रुचिरा पाहुनि कामदेव दे या १०७
प्रभुच्या चरणीं मयूर भावें प्रिय रामायण हें नमूनि वाहे
यश हेंचि स्वरें सदैव गावें स्थिरता याचि रसीं मनास आहे १०८
प्रभु-कीर्तन या करी कवीचें मद्यागायम ला विना शयाला
म्हणतें यश हें नसे सदा जो सदया गाय मला विनाश याला

समाप्त.

## मत्तमयूररामायण.

श्रीचा भर्ता दिग्रथभूपात्मज झाला

---

१ सूर्यास. २ उघडा. ३ प्रसवे. ४ वाल्मीकि. ५ बिभीषण. ६ दिक-रथ-भूप-आत्मज- दशरथ राजाचा पुत्र.

केौसल्येच्या तो उदराला प्रभु आला
त्याला ज्ञाता तात जगत्तारक नाम
स्थापी प्रेमें राम असें सत्-सख-धाम १
कैकेयीचा नंदन झाला प्रभु अंशें
केला भूषा तो भरत श्रीरघिवंशें
दोघे भव्या पात्र सुमित्रा-सुत ज्या
नाहीं सीमा लक्ष्मण शत्रुघ्नहि तेजा २
वेदीं शास्त्रीं सर्व वसिष्ठें पटवीलें
तेजें माथां साधु-सभेच्या चढवीलें
विश्वामित्रें साऽनुज राम प्रभु नेला
सर्वास्त्रज्ञ स्वाध्वर-रक्षा-क्षम केला ३
यज्ञ-ध्वंसीं जे रत ते राक्षस मारी
पाद-स्पर्शें राम अहल्येप्रति तारी
लीलेनेंचि त्र्यंबक-चाप प्रभु मोडी
सीता कन्या जी जनकाची तिस जोडी ४
चौघांचेही भव्य विवाहोत्सव झाले
आलें तेथें जे जन ते सर्वहि धाले
भ्याले ते जे राक्षस जे घालिति घाले
व्यालेशादि प्राज्य यशःसद्रस प्याले ५
क्षत्राऽराति त्र्यंबकशिष्य स्मय सोडी
श्रीरामातें जाणुनि तस्वें कर जोडी
दावी लोकीं शुद्ध-यशीं फारचि गोडी
कैकेयीचें चिन्तन भू घेउनि मोडी ६
जें ताताचें सत्य तयातें प्रभु रक्षी

---

१ अलंकार. २ व्याल-ईशादि-शेषादि. ३ पुष्कळ. ४ क्षत्रियांचाशत्रु. ५ महादेवाचाशिष्य (परशुराम) ६ गर्व.

राज्य त्यागी वल्कल घे वन्येंहि भक्षी
सीता भ्राता घेउनि गेला वनवासा
राहे शैलीं पर्णगृहीं तो न नवासा ७
शोकें मेला तात कळे हें परतो न
भ्रात्याच्याहि प्रेमगुणें ये परतोन
कैकेयीचा पुत्रहि देहादि न पाहे
नंदिग्रामीं वल्क-जटा वाहुनि राहे ८
अत्र्यादि श्री-कुंभज-पर्यंत महर्षी
वंदी झाले ते मुनि ज्या तात महर्षी
ताताचा जो गृध्र सखा त्या स्फरवद हा
सेवी प्रेमें पंचवटी तच्छदगेहा ९
आर्याज्ञेनें लक्ष्मण नासा श्रुति दंडी
दुःशीलत्वें शूर्पणखेतें प्रभु दंडी
रक्षःसेना मारवि ती दुर्मति चंडी
वार्ता झाली वैरिजनीं केवळ थंडी १०
रक्षोराज स्वर्ण-कुरंग द्रुत धाडी
त्या नाथासीं भूजनिसीं अंतर पाडी
ने सीतेतें तो खळ गृध्रासहि मारी
दे शोकघ्ना शोक स्फरेंद्राऽहित भारी ११
शून्या पाहे स्वच्छंद-शाला बहु शोधी
हा हा बोले लक्ष्मण नानापरि बोधी
शोकीं शोक प्राप्त दुजा दारुण होय
प्रेमें धैर्यें दे परि गृध्रा प्रभु तोय १२
अत्यंतोया राम कबंधा मग मारी

१ अरण्योत्पन्न फलादिकहि. २, राम. ३ भरताच्याहि. ४ तत्-छद-गेह- पंचवटींतील पर्णकुटिकेला ५ सीतेसीं.

वारी शापा जेविं विराधा प्रभु तारी
भेटे श्रीचा नाथ तपश्री-कबरीतें
पूजा घे दे सद्गति भक्ता शबरीतें १३
पावे पूर्वीं साऽनुज लोकेश्वर पंपा
तीच्या तीरीं आठवुनि श्री मग कंपा
भेटे आधीं मारुति सुज्ञ प्रिय-वक्ता
तो सुग्रीवा भेटवि रामा हित-भक्ता १४
एकें उथें भेदुनि बाणें उर वाळी
मारी राम श्रीश सुकंठ कुरवाळी
दे कीशांचें राज्य तया तो कपि योध
प्रेषी श्रीचा शीघ्र करायास्तव शोध १५
संपाती दे सांगुनि लंघी जलधीतें
शोधी लंका मारुति मोही खळधीतें
श्री धिःक्कारी दिग्वदनातें कपि पाहे
रोमांचातें तो निजदेहीं कवि वाहे १६
श्रीतें भेटे देवुनि मुद्रा हरि शोका
ती वाताच्या दे निज चूडामणि तोका
वृक्षध्वंसी रावण पुत्रा वधि अक्षा
मेघध्वानीना सांपडला संगर-दक्षा १७
राजापासीं बांधुनि नेला कपि हांसे
सर्वांगींचे केवळ मानी तृण फांसे
संकोचातें सोडुनियां जे कळ भावी
दुष्कर्माचे बोलुनि तो स्पष्ट चि दावी १८

---

१ सुग्रीवांस. २ वानरांचें. ३ बालका (मारुतिला) ४ इंद्रजिता. + परस्परांचें वैमनस्य होण्यास प्रथमतः जो कळी उत्पन्न होतो ती.

कोपें बोले रावण तो या अतितुच्छा
दंडा[1] याच्या दीस करा सत्वर पुच्छा
लांगूळातें पेटवितां क्षिप्र उडाला
भंगी रक्षो- वीर- बळा जेविं कुडाला १९
लंकेची तो कीडा मुहूर्तें करि होळी
हा हा बोले रावण कोपें कर चोळी
श्रीरामातें भेटुनि चूडामणि दे हा
भेटे राम श्रेयचि याच्या गणि देहा २०
शत्रूच्छेदा राम निघाला अतितेजा
उत्साहातें देति कपींचे पति ते ज्या
पोथोधीच्या[2] उत्तर- तीरा अज पावे
ज्याचे पाय त्यागुनि सर्वस्व जपावे २१
ज्याची धर्मी धी अनुजन्मा हित-वक्ता
जो त्या त्यागी रावण धिक्कारुनि भक्ता
दाव- ग्रस्ता सोडुनियां जेविं अरण्या
यावें तैसा ये नमि तो विश्व-शरण्या २२
त्या दे लंका-राज्य नमस्कार- परा हा
लावी दात्या राम म्हणायास परा हो[3]
भेटे सिंधु प्रार्थुनि तो बांधवि सेतु
प्राज्या घाला मोह नराया पर हेतु २३
पावे सेना-सिंधु तया सिंधु- तटाला
लेशी वाजी तो न परा सैन्य[4]-नटाला
प्रारंभींच प्रेक्षुनि दुष्टाप्रति नाडी
राजा रवाली तन्मुकुटा त्यासहि पाडी २४
श्रीरामाचें मस्तक- चाप भ्रमवाया

---

१ पुच्छातें. २ समुद्राच्या. ३ हाय. ४ सैन्यरूपजें लहान पोडें त्याला.

दावी श्रीतें घालुनि शोकीं श्रमवाया
तीतें सांगे भेटुनि भक्ता सरमा[1] या
मह्राक्ष्यातें जाण खरें हे परे-माया २५
राम प्रेषी वालिज जो अंगद दूत
क्षोभे मंत्रें त्या मळधी रावण-भूत
प्रासादातें भंगुनि मारी धरित्यांतें
हा घोकाया लावि जयें जे अरि त्यातें २६
झालीं भारी राक्षस-कीशांसह युद्धें
क्रुद्धें सैन्यें राम करी मारुनि शुद्धें
मेघध्वान व्याळमयोग्राद्भुत[3] पाश
क्रोधें घाली वांछुनि सीता-पति-नाश २७
सीता पाहे हाय वदे तों सखि धोका
नाहीं सांगे हें त्रिजटा त्या हरि शोका
तार्क्ष्यें[4] केलें पाश-विमुक्त प्रभु दोघे
पूर्ण प्रेमें श्रीपतिच्या सद्यश तो घे २८
सीता-भर्ता स्वाश्रित-सर्वाऽसुख-हर्ता
न्यायें वर्ता जो म्हणता पद्मज कर्ता
मारी मत्ता त्या घटकर्णा कपि-काळा[5]
व्याळा जैसा तार्क्ष्य जया दे यम टाळा २९
ब्रम्हास्त्रातें योजुनि सर्वांसहि ताडी
मेघध्वान व्याकुळ रामासहि पाडी
तेव्हां आणी मारुति ओषध्यऽग-शृंगा
त्या स्वामी दे श्री निज-पदांऽबुज-भृंगा ३०.
माया-श्रीतें मारि खल क्षिप्र फळाया

१ नामविशेष (बिभीषणस्त्री) २ शत्रूचें कपट. ३ व्याल-मय-उग्र-अद्भुत-पाश-सर्पमयभयंकर अद्भुतपाश. ४ गरुडें. ५ प्राप्त झालेल्या संकटाचा संबंध बाधों न देतां जें रहाणें तो.

तत्वें मेघध्यान नळक्षि प्रफळा या
सांगे भेद स्वस्थ करी सर्वहि खेदी
छेदी त्याचा लक्ष्मण मूर्धा त्तवि भेदी ३१
सीता-घाता जाय धरूनि प्रखरासी
क्रुद्धा वारी त्याहि सपार्श्व प्रखरासी
धाडी सेना पुष्कळ रामास वधाया
धी केंवी या कीं वरि कामासव धाया ३२
मारी सारी राम मुहूर्ते अरि-सेना
मोटा खोटा साम-कथाही परिसेना
युद्ध क्रुद्ध-स्वांत करी आपण ज्याला
नाहीं कांहीं भी नवळे हा पण ज्याला ३३
सौमित्रीच्या शक्ति उरीं रावण हाणी
तेव्हांही तें मारुति शृंग द्रुत आणी
शक्र प्रेषी स्यंदन हा त्यावर वेघे
आशीर्वाद श्रीश मुनींचे वरवे घे ३४
तो सप्ताऽहोरात्र-मितें संतत काळें
केला प्रेत क्रव्यभुगीश क्षितिपाळें
तेव्हां देव ब्राम्हण आनंदित झाले
आले होते जे यश ते सेवुनि धाले ३५
वाद्यें नृत्यें सुस्तवनें सुस्वर-गानें
श्रीरामानें सूचविली स्वर्स्वरे गानें
जो लीलेनें सर्व-जगा देव विनो या
तो दिक्कुंदा बंधुकरें देवदि नोया ३६

---

१ मस्तक. २ काम-आसव-कामरूपमद्य. ३ क्रोधयुक्त अंतःकरण ज्याचें असा. ४ ब्रम्हदेवाला. ५ क्रव्य-भुक-ईश-मांसभक्षक जे राक्षस त्यांचा स्वामी रावण तो. ६ स्व-स्वः अग-स्वकीयांचा कल्पवृक्ष असा. ++ सात दिवस रात्रि प्रमाण ज्याला असा ८ काळशब्दाचें विशेषण)
+ तीक्ष्णखड्ग. ✳ राम.

लंका त्याच्या बंधुसि दे आणवि सीता
तीशुद्धाही दिव्य करी लौकिक-भीता
भेटे राजा दशरथ त्यातें प्रभु वंदी
ज्याचे देव ब्रम्ह-शिवेंद्रादिक बंदी ३७
युद्धीं मेले जें उठवी तें कपि-चक्र
श्रीशें केला भव्य-यशो-भाजन शक्र
स्थापी राज्ये सानुज आधीं मग राम
श्रीमान् बैसे पुष्पकयानीं सुख-धाम ३८
श्रीतें दावी युद्धमही, सेतु-पथा या
वर्णी लागे सर्व वियोगार्ति[1] कथाया
किष्किंधेतें पाहुनि मागे वर राणी
रामाज्ञेनें कीशप तारेप्रति आणी ३९
पंपा दावी त्यावरि लोकेश वरीची
वर्णी रीति प्रेमळता त्या शबरीची
दावी गोदा पंचवटी गृध्रवटातें
पावे हर्षे देव-नदी-भव्य-तटातें ४०
राम प्रेषी वायुसुतातें कळवाया
त्याच्या शोका स्वागम-तोषें पळवाया
मोही विध्व-प्राण-सुताला[2] भरताची
रीति श्रेष्ठा राम-कथा-लाभ-रताची ४१
वंदी प्रेमें राम भरद्वाजमुनीतें,
यत्कीर्तीसीं सख्य रुचे देव-धुनीतें[3]
कौसल्येचा वासर[4] तेथें सुत राहे
संधी[5] केली त्याचि म्हणे बा सुतरा हे ४२

---

१ वियोगरूपपीडा. २ मारुतीला. ३ गंगेतें. ४ एकदिवस. ५ प्रतिज्ञा.

भेटे विश्लेषाऽति-विपद्धीन-गुहातें
वाटे स्पर्शे तो स्वखगा शीतगु हातें
कैकेयीचा पुत्र खरा चातकसा हो
राम श्रीमान् मेघ म्हणों घात कसा हो ४३
स्वामी आपण पावक-कुंडीं भरतातें
भेटे उक्त-स्थाऽवधि काळीं भरता तें
त्याच्या माथां देवविला जो भर तातें
तो घे दे जें इष्ट यशो-लाभरतातें ४४
जो साकेतीं जीव खरा तो सुरवासी
याच्या भाग्या ब्रम्हसभेचा सुख वांसी
भक्ति-ज्ञानें राज्यधि सद्या पिकवी तें
गाता देतें सयश अद्यापि कवीतें ४५
श्रीरामाच्या सत्कीर्तीतें जो गातो
होतो मुक्ति-प्राज्य-प्रेमाजोगा तो
भक्ति-ज्ञानें वाताऽपत्या दे वाहे
अंकीं ठावी रीति श्रेष्ठा देवा हे ४६
श्रीरामाच्या पाद-सरोजावरि भावें
केलें दासें अर्पित रामायण-नावें
हें सच्चित्ता मत्तमयूर द्रुत यावें
वाटावें कां न प्रभुतें लक्षनि गावें ४७

**समाप्त.**

१ वियोगरूप अतिविपत्तीला भ्यालेल्या गुहातें. २ चंद्र. ३ सांगितली आहे आपली मर्यादा ज्यानें असा. ४ पसरी. ५ नामविशेष (रामायणाचें नाव).

# श्रीरमणीयरामायण.

श्रीॐ कराया यशें धन्य विश्वास ज्यास श्रुति ब्राम्हणाचाचि विश्वास
केला अजाचा सुत क्ष्मोप तो तात कीं सर्व दिक्कंठ-संत्रस्त होताल१
श्री-कोसलेशात्मजा-पुत्र तो राम ये केकयाच्या तनूजोदरा धाम
त्या तात ठेवी स्व-सच्चित्त-विश्राम आधीं भ मध्यें र अंतीं न हें नाम२
जी दिग्रथ-स्त्री सुमित्रा तिला होय तो लक्ष्मण स्वाग्रजाची धरी सोय
शत्रुघ्न तैसाचि राहों न दे खेद चारी जगत्पूज्य झाले जसे वेद ३
केले वसिष्ठें द्विज ज्ञान वेदांत तें तोंचि ये जों न आले नवे दांत
जाणे महानंद तो देवपुत्रास ज्याचें षडूर्मीसही दे वपु त्रास ४
जों भूप चित्तांत चिंती विवाहास तों गाधिचा पुत्र मागे विवाहास
यज्ञाऽवना ने पथीं दे तया अस्त्र शीतातपार्तास द्यावें जसें वस्त्र५
जी ताटका मार्ग रोधी तिच्या बाण वेगें उरीं राम हाणी हरि प्राण
सिद्धाश्रमीं जाय रक्षो-बळा हाय हें बोलवी त्या जया सत्सभा गाय६
नाशी अहल्यासतीचा महाशाप बोटूनि मोडी उमाजानिचा चाप
सीता-मनींचा निवारी क्षणें ताप दे भार्गवा शांति जी संहरी पाप७
सोडूनि राज्यास जावें अरण्यास माता म्हणे आवडे तें शरण्यास
वेल्हीं निघे लक्ष्मणा त्या हि सीतेस घेऊनियां राम विश्लेष-भीतेस८
झाले श्रमी लोक यां नावरे शोक संपन्न जें ओक तें भासलें ओक
भेटे गुहाला रडे तो जसा मुग्ध मागे वळाया जटा जे धवा दुग्ध ९
रामें भरद्वाज केला सुखी फार तो चित्रकूटाद्रिही तापसाधार
शोकेंचि सोडी धरेचा धणी काय निंदी प्रसूतें स्वयें सत्सभा राय१०
संस्कारुनि क्षोणिच्या पाळका तोय दे राम-पादांबुजीं भृंग तो होय

---

१ नामविशेष ( राजा ) त्याचा. २ वि-वाह-गरुडावर बसून जाणाऱ्यास. ३ महादेयाचा. ४ वल्कले धारण करणारा. ५ वियोगाला भ्याले लीस. ६ गृह. ७ शांति. ८ दशरथ. ९ देह. १० मातेलें (कैकेईते) ११ भरत. + पृथ्वीपति ( दशरथ ) तो. ≠ तेज ( भरतरूप ) ⁂ काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यांसहि.

घे पादुका आग्रहें तो फिरे भक्त झाला न त्या दुर्लभीं ही पदीं सक्त११
अत्रीस भेटे प्रभु ज्ञानि-गीतेस दे तत्प्रिया अंगरागादि सीतेस
स्वर्गास धाडी विराधा रहायास कीं देखवेना निराधार ही यांस१२
श्रीदंडकारण्य जें या पवित्रास होते निषेवूनि निष्पाप वित्रास
ते बाणभंगादि भेटूनियां सर्व केले तयां स्वर्गही भासला खर्व१३
ज्याचा तपश्री-प्रियेसीं सदा रास तो कुंभभू साधु पूजी सदारास
दे विष्णु तो हा दशास्यादि भंगास जो मोह नाशार्थ दे आत्म-संगास
भेटे पित्याचा सखा गृध्र जो त्यास तत्प्रेम-हर्म्याचिया भव्य-जोत्यास
त्याच्या विचारेंचि गोदावरी तीर पाहूनि तेथें वसे तो महावीर १५
राहू वसायास अन्यत्र आस्था न पाहे वरें पंचवट्याख्य हा स्थान
सौमित्रिनें पर्णशाळा बरी थोर केली वसे तींत विश्वास हिचा दोर
पावे कुधी रावणाची स्वसा दंड मेला खर क्रूरकर्मा महाचंड
ऐकूनि झाले तपस्वी मनीं थंड शोधी जनस्थान मोडूनि तें बंड१७
ती दुर्दशा स्व-स्वसेची महामाय पाहे जळे फार कोपे म्हणे हाय
मायामृगें तो कुडें तीन तत्काळ आधीं करी तो हरी श्रीस सत्काळ
भासे शिखी प्राशितो या तुपा सून ती सोडवी गृध्र तो यातुपासून
तत्पक्ष खड्गें दशग्रीव तोडून ने विश्वमानेसि दुष्कीर्ति जोडून१९
सीता प्लवंगांत टाकी अलंकार हा राम हा नाथ ऐसें म्हणे फार
ठेवी अशोकीं वनीं तीस लंकेंत नष्टायु दिक्कंट तो धी न शंकेंत२०
सौमित्रि सीतोक्त सांगे म्हणे हाय शोकें रघूंचा स्फुतेजाहि तो राय
धांवूनि ये स्वोटजा पाच सा कोस मोहीं बुडे राम पाहूनि तें ओस
पाहे प्रियेचा करीतां वनीं शोध मूर्छाकुळा तात-मित्रा महाबोध
.पाजी तया तोय तैशाहि शोकांत तो का तगेना सुवाद त्रिलोकांत

१ विराध. २ रामास. ३ सेवून. ४ शरभंगादि ५ हस्व, ठेंगणा. ६ त्याच्या प्रेमरूप गृहाच्या. ७ मोठ्याचोथऱ्यास. ८ विश्वसर्पिचा. ९ भगिनी, (शूर्पणखा). १० राक्षसापासून. + चंदनाची उटीइत्यादि. ✱ तपश्रीरूपस्त्रीसी. ++ क्रीडा.

सीतेसि शोधीत जातां धरी घोर केली कबंधीं कृपा श्रीवरें थोर
धन्या मतंगर्षि-शिष्या वनीं होय सेवूनियां क्षाळुनि श्रीपदें तोय २३
पंपा-तटीं हो वटु आठवी रत्न सौमित्रि सांखीं करावा म्हणे यत्न
सूर्यात्मजासीं हनूमान् करी भेट तत्सख्य तें जेविं सिंधूदरीं बेट २४
दावी अलंकार सुग्रीव दे हर्ष तद्दर्शना राम मानी सुधा-वर्ष
वाळीस एकेंचि बाणें वधी प्राज्य दे त्या सुकंठासि तारादि तद्राज्य २५
प्रेषी पहायासि सीतेसि तो कीश व्हाया सखा हृष्ट राम त्रिलोकीश
सांगीतला गृध्रराजाग्रजें शोध लंघी समुद्रा हनूमान् महाबोध २६
मारूनियां सिंहिकेनें तटा जाय लंकाधिदेवीस तो बोलवी हाय
शोधूनि लंका अशोकीं वनीं कीश पाहे सतीतें सुधेतें जसा वीश २७
केला तिणें रावणाचा मनोभंग तेणें निवे वायुच्या सूनुचें अंग
दिक्कंट जातांचि मुद्रा तिला धीर अर्पी कथी वृत्त तो वाढवी धीर २८
आनंद त्या वायुजाचा निवेदीन तत्काळ अत्यंत जेंमा निवे दीन
पाहूनियां वांछिना संनिधानास त्याच्याहि भाग्योदयें सन्निधानास २९
चूडामणी दे कथी भव्य संदेश या न्या मला शीघ्र मारूनि मंदेश
वंदी निघे साधु पावे प्रभा वायु-सा तो हरी वृक्ष भव्य-प्रभावायु ३०
मारी रणीं मांसभक्कोटि केकीश सर्पांत जैसा तसा तो टिके कीश
गांठी दशास्यात्मजन्मा महादक्ष तो मारिला वायुच्या नंदनें अक्ष ३१
कीशाऽग्नि त्या सैन्य-कक्षासि चाटून तो सांपडे मेघनादासि दाटून
हर्षूनि नेला सभेमाजि बांधून ते बोलती दुष्ट खावा न रांधून ३२
हाणूनि वाग्बाण दिक्कंट-मर्मांत बोले तदज्ञान जें नीति-धर्मांत
दूषी तदभ्यास जो पापकर्मांत देवर्षि-धी तो करी मग्न शर्मांत ३३
पाहे वधा त्या तया तो जसा भूत तद्बंधु बोले नव्हे वध्य कीं दूत.
दिक्कंट याचें म्हणे पेटवा पुच्छ लंकेंत ताडीत हा हिंडवा तुच्छ ३४

---

१ शबरी. २ हाय. ३ गरुड. ४ निरोप. ५ केकि-ईश-मोर. ६ सैन्यरूपगवतास. + धैर्ययुक्त (मारुती) ≠ धैर्य भरवसा.

तेसेंच आरंभितां त्या खळांही न झाला महा कौतुकी तो कळाहीन
पोळी पळामाजि घोळी अरि-व्रात होळी पुरी होय चोळी कुधी हात
एवं दशास्योय-गर्वाद्रि भंगून वेगें करी तो मना हीन पंगू न
लंघूनियां दुस्तराब्धीस येवून देवास दे हर्ष तो खूण देवून ३६
सप्रेम आलिंगिला श्रीवरें दूत केला महा धन्य झाला महापूत
मानी तया सूपकारा महाभार वानी महोदार ऐसें वदे सार ३७
संगें असंख्यात घेऊनियां वीर पाहे प्रभू त्तंस पाथोधिचें तीर
तों या शरण्यास वंदी निवेदून तापा दशास्याऽनुजन्मा निवे दून ३८
त्या राज्य तत्काळ दे राक्षसांचें न अल्पी म्हणे श्री नदीतेंचि सांचेन
सेना समुद्रीं तराया करी सेतु पाषाणवी ही प्रजा-शुद्धिचा हेतु ३९
त्यानें दशास्यानुजन्मा धरी पार जाऊनि सोडी चरांतें दया धार
ते वर्णिती सैन्य-संख्या महा-योध- नामादि दिक्कंठ ऐके करी क्रोध
सीतेसि दिक्कंठ दावी शिरश्चाप माया न जाणूनि पावे सती ताप
होता जरी गोपुराग्रीं कुधी दूर मोडी सुवेळाग्र कांपे उडे शूर ४१
ताडी तया सौरि काळाहि ला वीनें तेसा म्हणे धाक काळाहि लावीन
सामार्थ राजा करी अंगदा दूत तो त्या म्हणे रे मदानें न तूं ऊत
दे जानकी सर्व जातें सुधा राहु रे दुर्दशा-पात्र पीतां सुधा राहु
इत्यादि ऐकूनि मारा म्हणे पुंड कीळा वमे तुंड त्याचें जसें कुंड ४३
जे झोंबले मूढ ते अंगदानाच मेले जयें वांलिले अंगदानाच
युद्धीं प्रहस्तादि गेले लया योध मत्ता-गजांहीं हरींचा नव्हे रोध ४४
धांवे करी जो लयें नागपाशांत भारी तया काय हो नागपाशांत
कुंभश्रवाही मधुघ्नापुढें काय ज्याचा म्हणे पवनाते कुढें काय ४५
दुर्वासना- शल्य ज्याचें हरी नाम तो प्राकृतें काय शल्यें श्रमी राम
या मेघनादासही दे प्रभु ख्याति यांच्या प्रसादेंचि वातात्मजा गाति

१ जाळी. २ सू-उपकारा-उत्तमउपकारा. ३ संतत. ४ दूतांतें. ५ सूर्यपुत्र ( सुग्रीव ) ६ गरुड. ७ ज्वाला. ८ गजेंद्रा. ९ कुंभकर्णहि. १० देह. + शत्रुसमुदाय. ++ बिभीषण. ‡‡ व्यर्थ.
* मधु दैत्याला मारणारा जो विष्णु त्यापुढें.

औषध्यगाचें महाशृंग रघाणून तत्काळ अत्यंत दूरूनि आणून
केले विशल्य प्रभू ते चमूयुक्त वातात्मजाच्या यशा वर्णिती सुक्त४७
होतांहि बंधु-प्रधानात्मज प्रेत सामाकडे तो न दिक्कंठ दे चेत
घाली सती-कंठ-नाळीं रणीं घाय दे शक्रजित सर्व-सेना-सुर्खी हाय
माया असें जाणवी हर्ष न स्तोक दे कुंभकर्णानुजन्मा हरी शोक ४८
श्रीलक्ष्मणें मारिला तो महानाय आनंद लोकत्रयींही न हा माय४९
ज्येष्ठात्मजाच्या विनाशें म्हणे हाय दिक्कंठ सीतेसि मारावया जाय
त्या शापिती आठ वीर मरायास लोकेश ती आठवी रामरायास ५०
केला सुपार्श्वे प्रधानें वग बोध तो वारिला पुत्र-शोकार्त सक्रोध
धाडी पुन्हा मूढ राम-क्षया सैन्य तेंही मरे सर्व पावे पुरी दैन्य५१
घे सर्व सेना स्वयें होउनि क्रुद्ध दिक्कंधर क्रूर-कर्मा करी युद्ध
पाडी रणीं लक्ष्मणा शक्तिनें वक्ष वेगें विदारूनि तो कापवी लक्ष५२
भंगी खळा शक्ति काढी म्हणे हंत राम प्रभूतेंस गाती असे संत
त्या काळजी होय काळाऽहिचा दंत वाटे महाप्रेमळा होतसे अंत५३
तें औषधी-क्ष्माधराचें पुन्हा शृंग आणी जमा तारमाच्या रमा भृंग
देतांचि दिव्यौषधींच्या रसें नस्य तेणें उठे क्षिप्र वर्षे जसें सस्य ५४
श्रीराम-दिक्कंठ यांसीं महायुद्ध वानाऽर्क-भा होय बाण-व्रजें रुद्ध
ते व्याघ्र-हस्ती-हरी श्येनसे क्रुद्ध यांचें यश क्षीर-राशीदुसें शुद्ध५५
वृत्रारिच्या स्यंदनीं बैसला राम संपूर्ण त्याचा कराया रणीं काम
तो यापुढें कुंभ पक्वापुढें आम तैसा गमे वर्णवेनाचि तें धाम५६
दोघांसही जाहलें शोणितस्नान झालें भयें निर्जरांचें मुख म्लान
देखावया शंभु ये सोडुनि ध्यान सज्ञानही तज्जया निश्चय स्थान
लोटे अहोरात्र तत्सप्तक स्पष्ट दोघेंहि युद्धीं न ते पावले कष्ट .

---

१ अल्प. २ सामावे. ३ कमलाच्या. ४ नाकामध्यें घालणें व ओढणें इत्यादि उपयोगी औषधें तें. ५ उदकवृष्टीनें. ६ धान्य. ७ बाणाच्या समूहें. ८ रावण. ९ रामापुढें. १० तेज. ++ बिभीषण. + खेदार्थी अव्यय. * चित्त.

सामर्थ्य झालें शरांचें गमे नष्ट रामास लोकेशाही धाकले[1] अष्ट ५८
एकेक मूर्धा दहादां असे राम तोडी शत क्षिप्रकारी घनश्याम
झाले यथापूर्व तेव्हां करी राग खंडूनि हृत्सद्म पाडी शरीरोऽग[2] ५९
तें दे यश स्वर्द्विषद्भेक-कालाहि राम द्विजेंद्रा दिवानायकालाहि
जो जिष्णुचा सूत या मातलीलाहि काळाननीं द्विड्भू[3] घातलीलाहि ६०
जें पीडितें यक्षनाथादि-सल्लक्ष तें मारितां वक्ष भेदूनियां रक्ष[4]
जो आत्मभूऋक्षदावाग्निदृक्-दक्ष शास्ता स्वसपक्ष तो हर्षला-यक्ष ६१
नानाविधोच्चस्वनें हर्ष दे वाद्य गमीं करी पुष्प-सद्वर्ष देवाद्य
गंधर्वराजेंहि तें गाइलें कृत्य देवांगनानींहि केलें सुखें नृत्य ६२
होतां द्विषद्ध्वांत कोंदे जगीं शोन वाहे गुणी वात धाके खेळ-व्रात
झाले महोदार-राम-स्तव स्फार वृन्दारिचे दार या सज्जयें गार ६३
त्या कुंभकर्णानुजातें म्हणे राम मंदोदरीतें मिळो त्वन्मुखें साम
जैसा तुझा तेविं माझाहि हा होय या शेवटींचें करीं कृत्य दे तोय ६४
संस्कारिला ज्येष्ठ त्या साधुनें नीट चित्तीं न राहूं दिला लेशही वीट
लंकापदीं स्थापवी राम सभ्यास धर्मीं नयीं सद्गुणीं ज्यास अभ्यास
होऊं नये स्थान लोकापवादास नाणूत नेत्रांत शोकाप वा दास
या कारणें दिव्य देवीजशी काय हैमी जिचा दीप्ति दे वीजसी कांय
अग्नींत सोडी गमे माणिका भी न देवा त्यजी तें न कां आणिका भान
डोहीं करी काय धन्या सती रंस नेती भवाब्धींत अन्यास तीरास ६७
स्वीकारिली श्रीहुताशेश्वरा युक्ति मानूनि रामें जसी तज्जनें मुक्ति
ते ऊठवी स्वामिच्या सेवना कीश पीयूष वर्षूनि तो देव नाकीश ६८
दूरूनि पाहों शके ज्या न कीनाश पाहे तया शत्रुचा जानकीनाश
बैसूनियां पुष्पकीं सेतु पाहून वर्णी प्रतापासि रोमांच वाहून ६९
भेटे दशास्यानुजन्मा सखा वीर जेथें स्वयें राम तें दाखवी तीर

---

१ भ्याले. २ शरीरवृक्ष. ३ शत्रुसैन्य. ४ राक्षस (रावण)
५ सख. ६ पुष्कळ. ७ देह. ८ वानर. ९ इंद्र १० यम. + मस्तक. ∴ नाना विध-उच्च-स्वन- नानाप्रकारचा उंच स्वरानें
∴ दुर्जनसमुदाय. ⊕ शोकाश्रु. ✱ पार्वती. ⁑ कांति. ≠ क्रीडा.

दावी स्फकंटाचिया भेटिचा गोत्र बाळी-क्षयस्थान तो सत्कृत-स्तोत्र ७०
वातात्मज-प्राप्तिचेंही तदा स्थान दावी स्वकांतेसि मोडी तदास्थान
पंपा शबर्याश्रम श्रीस दावून पीयूष पाडी स्ववृत्तें सदा केन ७१
नामेंचि जो वारितो शोक-बंधास सांगे स्वयें तारिल्या तो कबंधास
गोदावरी-पंचवट्याश्रम-स्थान दावी कथी गृध्रपा जें दिलें दान ७२
जीं कुंभजादिस्थळें दाखवी तीस आश्चर्य दे कौतुकें लाख वीतीस
तें अत्रिचें स्थान पाहे रसें माय मानूनि लोकीं न माहेरसें माय ७३
तो चित्रकूटाद्रितें दाखवी श्रीस सद्दृष्टि ज्या मक्षिका जेविं मिश्रीस
अत्युत्सवें त्या नदावी प्रयागा न ते ऐकवीती तदा विप्र या गान ७४
धाडूनियां दूत तोयस्वभावास जीवप्रद श्रीस होय स्वभावास
संदेश हा त्या क्षुधार्तास सुग्रास कीं त्या मिळे चातका वारिमुग्रास ७५
वंदी भरद्वाज-पादांस मी राम ऐसें कथी स्वाननें आपलें नाम
ठेवी स्वयें ठेववी देवरा शीस पायीं रमा त्यासि तो दे वराशीस ७६
त्या ऐकवी भव्यभा साधुवादास तेजें म्हणे नव्य भासा ध्रुवा दास
लंकेश कीशेंद्र झाला भला गार सोडूनये त्यांस वाटे दला गार ७७
घेऊनि आज्ञा वर श्रीश हर्षेनि वेगें निघे प्रेम-पीयूष वर्षेनि
भक्तीं गुहीं भेट शुद्ध-स्वभावास दे होउनि स्नेहरुद्ध स्वभावास ७८
आयुष्य वाटे वियोगीं सरे ज्यांस भेटे तयां भानु जैसा सरोजांस
कीं मेघ तो त्या मयूरास कीं सोम तो त्या चकोरांस दीनांस कीं सोम ७९
श्रीराम-राज्याभिषेकोत्सवीं लोक झाले सुखी सर्व गेला लया शोक
अर्कोदय स्पष्ट तो देव ते लोक कीं राम तात स्वयें विश्व तें तोक ८०

समाप्त.

---

१ पर्वत. २ उणें. ३ सामावे. ४ वारिमुक्-रास-मेघसमुदाय. ५ मस्तक. ६ चंद्र. ७ महादेव. ८ बालक. + शबरीचा आश्रम. * शिफारीस. ++ खडेसाखरेस. ∴ लक्ष्मणा. ⁚ भरद्वाज. ÷ गुहासभरतास. ✱ आई. ∴ आपल्याबंधूस.

## तोटकछंद

दशपूर्वरथ क्षितिपाळ भला जगदीश म्हणे मम तात मला
मग होय तदीय-कुमारमणी स्तवि सद्गुरुची हि उमा रमणी १
निज-मूर्ति-चतुष्टय रम्य करी प्रभु राम असें शुभ नाम धरी
मधुचा भरताभिध होय अरी मग लक्ष्मण आणि अरिघ्न हरी २
गुरुवर्य वसिष्ठमुनीस करी प्रभु गाधिसुताऽध्वर-विघ्न हरी
मुनिची दयिता उपळत्व वरी विभु-पाद-रजें-परि होय वरी ३
प्रबळा तिळ जें न चळे अजितें प्रभुचें धनु मोडियलें अजितें
जनक-क्षितिपाळ-सुता वरिली शरदिंदु-रुची स्वयशें हरिली ४
प्रभुच्या अनुजांसि सुता जनकें दिधल्या बहु शोभविल्या कनकें
जन केविं न धन्य म्हणे सनकें स्तविलें असकृद्यश तज्जनकें ५
धरवी प्रभु मार्गवरा मळित-व्रत दे करि भार्गवराम हित
परमाभ्युदयें सुरवी पुर तें निजभाग्य म्हणे त्रिजगीं पुरतें
नृप कोसल-राज-सुता तनया युवराज करीन म्हणे सनया
परि केकयजा अडवी रमणी बहु होय तदा जड वीरमणी ७
वदली दिधले वर हेच वदा वन आदरु राम समा चवदा
युवराज करा द्रुत मत्तनया वचना बुधरक्षिति मन्नन या ८
मरणा स्व-वियोग-कथा पितया मळ लाशु न देचि तथापि तया
प्रभु होय पदस्थितिस त्यजिता द्रुत कीं गति कीर्तिहि सत्य-जिता
धरि वल्क सबंधु सदार मुनि-व्रत होय पुरींहि सदा रमुनि
वनवास सुरेचि रमाधव घे परि लोक पुरीं रडले अवघे १०
अजिनीं वरि टाकुनि राजपटा रचि राम वटांऽग-पयें सुजटा
सुसखा गुह सांखुनि तातसखा- नमि दे बळ ताप सन्वृंद-मखा ११

१ मधुनामक दैत्याचा अरि भरत. २ पाषाणत्व. ३ गमानें. ४ कन्या. ५ असकृत्-यश- वारंवार यश. ६ तत्-जन [illegible]-त्या सनकाचा बाप जो ब्रम्हा त्यानें ७ दशरथ. ८ कौसल्यापुत्र राम त्यास. ९ कुंठितमति. १० दशरथ. ११ वर्षे. १२ तमगति. १३ सत्यसंभाळणारा. १४ कृष्णमृगचर्मी १५ वटवृक्षांच्या दुग्धें. १६ भरद्वाजास. + मोठ्याउत्सवानें.

प्रभु चित्रपदोत्तर-कूटनगा करि आश्रय आश्रय जो त्रिजगा
व्यस्क होय नृपाळ सुत स्मरता गुरु आणवि मातुळगा भरता१२
जननीप्रति निंदुनि नात-हिता करि सोडुनि राज्यपदा महिता
नमि अर्यभवा महिजा-सहिता कळवी क्षिति त्या क्षितिभृद्दहिता
पितृकार्य करी प्रभु त्या परता प्रभुजी म्हणतां रडतां भरता
समजावुनि राम तया फिरवी मिरवी यश ज्याप्रति सेविरवी १४
वरि अत्रि-मुनीश्वर पर्णकुटी अहितांहि यदस्त्र-सुपर्ण कुटी
क्षितिजेसि सती असि लावि उटी सुगुणासि जिच्या न कदापि तुटी
करि शाप-विमुक्त विराध वनीं शरभंग महामुनि तुष्ट मनी
प्रभु दंडककानन तें निववी रजनीचर कोटि यशें भिववी १६
कळशोद्भव दे धनु बाण असी करि सत्कृति शत्रुवधार्थ असी
पितृ-मित्र-जटायुस तो सुखवी प्रभु दंडुनि शूर्पणखा दुखवी१७
दिधली खर मारुनि सैन्यसह प्रभुनें क्षितिदेव-शतासि मह
मृग पाठवि रावण हेममय क्षितिजा-मन तो हरि हा तनय१८
महिजा वदली रघुवंशवरा कुतुकार्थ सुरंग कुरंग धरा
दयिता-प्रिय लक्षुनि शस्त्रधर प्रभु होय वनीं हरिणाऽनुचर१९
पळतां तदुरीं शर शीघ्र भरी खळ आर्त रव प्रभु तेविं करी
व्यसनाकुळ राम असें गमवी क्षितिजा-हृदयासि परि भ्रमवी
तिस तो अनुकूळ न दीर वदे भय त्या हुंसि जेविं नदीरव दे
कटु बोलुनि ती सुगुणा दवडी त्यजि मौक्तिक मानुनियां कवडी
दशकंधर तोंचि सतीस हरी क्षण भग्न जटायु तयासि करी
अरि पक्षीति तोडुनि गृध्रवरा करि मूर्छित कंपित होय धरा२०
स्वपुरीं तिस ठेवि अशोकवनीं प्रभु दुःशकुनें धरि आधि मनीं
तंव लक्ष्मण भेटुनि वृत्त कथी करि ताप सखा निज दाशरथी
द्रुत धांवुनि ये असुखा वश ती करि धी उटजीं दिसतां न सती

१ रामास २ शत्रुसर्प ३ ज्याचा अस्त्ररूपगरुड ४ अगस्ति ५ खड्ग ६ ब्राम्हणांस ७ उत्साह ८ टाकिली नीतिज्याणें असा ९ शत्रु मारीच १० वृक्षास ११ पिसांची मुळें + नम्र हिता ∴ चित्रकूटपर्वतास ॥ दशरथ

प्रभु शोधि करीत विलाप वनें बहु ताप हिमेंहि दिला पवनें२४
क्षत मूर्छित पाहुनि तातसखा प्रभु हाय म्हणे करि अंत्यमखा
धरि योजन-बाहु कबंध तया गति दे रघुवीर करूनि दया२५
फळ पुष्प पदांबर दे शबरी करि कीर्ति तिची वरदेश वरी
पद दे अरि मारुनियां सुगळा यश हें म्हणतें अमृता उगळा
करि सिंधुसि गोष्पद वातजनी खुण दे निववी क्षितिजेसि मनीं
तरु राक्षस भंगुनि सर्व पुरी सुखवी कपि जाळुनि शत्रु-पुरी २७
म्हणतात जया शिव विप्र भुला पवनांश तया निववी प्रभुला
कपिदत्त शिरोमणि राम तिचा करि आश्रय भव्य वरा मतिचा२८
सबळ प्रभु जाय समुद्र-तटा करि रंगनटीच सुरर्षि-जटा
कथि जो बुध संमत साम हित त्यजिला कुजनें गुरुसा महित२९
अभयार्थ बिभीषण पाय धरी प्रभु राक्षस-राज तयासि करी
उदधींतहि वाट तदा वरवी नळ-कीश-करें भगवान् करवी३०
कपिसैन्य अनंत सुखें उतरे अहितासि म्हणे न मदें उतरे
दिसतां खळ कीशवरें कुटिला वदलें सुर पाहुनि हा कुटिला
प्रभुनें हृदयीं नय आठविला पर-भंगद अंगद पाठविला
कटु ही हित हें न तया समजे अहिता धरितीहि तयासमजे
पर मर्दि सुखेंचि न मूढ वळी कथि योग्य तयाप्रति मूढबळी
वरि साम न दंड करा महित स्तवि तो खळ दंडक राम हित३१
कमळें नरि शत्रु शिरें खुडवी दशकंठ बळें प्रभु तो बुडवी
प्रभु-मारुत शत्रु तृणें उडवी खळ सस्यचि राम-करी तुडवी
करवे वश न प्रभु तो कपटें धरवे न नभो-भव तो कि-पटें
अति युद्ध न जायचि नें कथिलें प्रभु वन्हि दशास्य-बळें कथिलें
घटकर्ण महाबळ लोळविला प्रभुनें घननादहि चोळविला

---

१ अंत्येष्टीला. उत्तरकार्या. २ मारुती. ३ सीतेचा. ४ नर्तकी. ५ नारदाचीजटा. ६ धान्यची. ७ वायु. ८ सांगितलें. + तेंचला, मारला. ✻ रामभंगदासस्तवी. ⊕ अस्य.

दशकंठ मनीं बहु पोळविला हरि[1]च्या हृदयीं जय घोळविला३६
दिधलें यश वातसुता कपिला हरि[2]ची बहु लाजविली कपि[3]ला
वर देउनियां पर मारविला असि कीर्तिहि दे परमा रविला३७
खळ शक्ति शमे बहु मातलितें- यश दे हरि-सारथि-मातलितें
कथिकीं न कुधी असुखाउतटा मज गानपितां असुखाउतटा३८
न सुवाद्य सुगीत सुनृत्य शमे प्रभुच्या विजयीं शिव-चित्त रमे
सकळाहि जगा सुख फार गमे सह्जारिसमूह कुशीळ वमे३९
प्रभुचा अरिही वरि कीर्ति गती चिर होय बिभीषण यातुपती
करि दिव्य सती तिस देव रहा पहिली तसि यापरि दे वर हा४०
करि भेटुनि तात सुखी तनया येन यादे म्हणे मिळण्या जन या
उठवी समर-व्यसु सैन्य हरी हरिला यश देउनि दैन्य हरी४१
करि पुष्पक यानवरीं बसका व्यवहार सतीस कथी असका
अवलोकुनि सेतु करी नमनें स्तवि ती बहु जेविं करीन मनें४२
अनुभूत सुखाऽसुख आपकवी स्थळ दाखवि तें रघुराय कथी
भरता प्रभु भेटि मना समया न विलंघुनि ओपि घनासम या
अभिषेक-महोत्सव होय दया-निधिचा म्हणती कवि तोयद या
अमरादिक जीव मयूर मही सरसी सुख तें जळ ताप अही४४
परवाद नसे वसुची परवा- नर वा सुर ये थिरसा न रवा
बरवा प्रभु तो स्वगुणा वरवा भरे वारुनि शर्म म्हणे भरवा४५
शिशुच्या न रुचे श्रमनास मना जन शिक्षि न तूं वदना वदना
वचके न निराशमना शमना वनवृत्ति भजे भवनाभ वना ४६
प्रभुचें यश सेव्य सुधा-सरसें भुलवी अबुधास बुधास रसें
पशु पी रघुपाळ-कथा न रसा वरि सोडुनि बाळक थान रसा .
अरि हा हरि हृद्गत जो सुरसा हरि सेवधि आत्मरसा सुरसा
करि विश्वहितास्तव सासु रसा वरि अर्पिलि त्या कृति हे सुरसा४८

समाप्त.

---

१ इंद्राच्या. २ इंद्राची. ३ कामधेनु. ४ उदक. ५ मासा. ६ इंद्र. ७ सर्व. ८ गजेंद्र. ९ सरोवर. १० शांतिनाश ( दांडगाई. ) + इंद्रसारथि. ‡ बहुकाळ

## शार्दूलविक्रीडित.

श्रीकंठादि-सुरर्षि-संस्तुत धरादेवाऽमरांच्या हिता
जन्मे येक्ष-वराऽनुज-प्रमथना सूर्यान्वयीं रक्षिता
धर्माचा मनुज स्वयें यश जगीं व्हाया भय ध्वंसिता
झाला राघव दिग्रथात्मज महातेजा विधीचा पिता १
कौसल्योदर-संभव प्रभु तया श्रीराम सन्नाम हें
झाला तो अजपुत्र सद्विजयगुणाधारासि देवी महें
कैकेयीज यशोनिधी भरत तेजस्वी सुमित्रा यमें
पावे लक्ष्मण जो वरा पट्ट दुजा शत्रुघ्न सद्विक्रम २
ने श्रीगाधिज अध्वरार्ति-शमना अस्त्रें कथी ताटका
संहारी जगदीश यज्ञ मुनिचा राखे महानेटका
विप्र-स्त्री-रज तत्क्षय प्रभु करी मोटें जगीं दे यश
भंगी रुद्र-शरासना वरि महीजा राम केला वश ३
श्री त्यागी प्रभुराज धर्म सरयीं रक्षी प्रसूचें प्रिय
तो सीताऽनुजयुक्त सत्प्रिय वसे रानीं महर्षिक्रिय
शोकानें जगतीवरा लय घडे झालें जनाला भय
दे धीरा भरता न माय न मही तोष त्यजी आलय ४
निःश्रीका स्वपुरा त्यजी सुमति दे आधीं पित्या पिंड हा
भेटे साप्तजन प्रयत्न नगरा आणूं करी जो महा
त्या अर्पी निज-पादुका यति तसा निर्व्याज शुद्धाशय

---

१ कुबेराचा कनिष्ठबंधु जो रावण त्याच्या नाशाकरितां. २ कौसल्या-उदर-संभव- कौसल्येच्या उदरापासून उत्पन्न झालेला. ३ उत्सवें. ४ दोघे. ५ सत्- विक्रम- उत्तमपराक्रमी. ६ जृंभकसंज्ञक अस्त्रें. ७ सीता. ८ महर्षिसारिखी क्रिया (कर्म) ज्याचें असा. ९ गृह., १० आणावया स. + मातेचें ॥ दशरथा.

नंदिग्राम वरा म्हणे प्रभु मनीं चिंती तपोनिश्चय ५
श्रीयुक्त प्रभु अभि- चित्त निववी तारी विराधा मग
आजन्मेभ्रयत स्मरा ऽविषय जे विद्योमचारी खग
त्यां दे हर्ष जटायुला तनयसा वंदी जपे मायसा
राहे पंचवटींत सेवि मधुरा गोदावरीच्या रसा ६
श्रीसी शूर्पणखा वरा मज म्हणे दंडी तिला जो खर
जन्यों ये करि तत्क्षय प्रभु रुचे दिक्कंधरा मत्सर
चोरी ते जनकात्मजेसि नय न प्रेक्षी जटायु व्यय
क्रूरात्मा समजे स्वइष्ट न धरी कांहीं अधर्मे भय ७
श्रीच्या लुब्धनरा वियोग परम क्लेशी करी त्यापरी
तो मायामनुज प्रभू सदय हो रानीं म्हणे मध्वरी
स्नेहें होय जटायु- तोयद जगन्नाथ स्वकार्य- प्रिया
साधी राहुं नदेचि दैन्य तम त्याऐसी न कोठें दया ८
श्रीशें राहुतसा कबंध धरि जो क्रूर तया मर्दुनी
केली कीर्ति जगीं यशस्वि- निकरा मध्यें जसी स्वर्धुनी
जन्मेडया शबरी वियन्मणिजही वाळीहि कीं सायकें
शूरार्यातिमना दिली गति रघूत्तंसें जगन्नायकें ९
श्रीचा शोध पराक्रम श्वसनजें केला तया गौरवी
दे राजत्व नतासि अक्षय परा दावी ममत्वा कवी
बांधी सेतु जळांत यक्षपतिचा मत्तानुजन्मा नय
त्यागी राज्यवरातिमत्त मनुजें होतां बळाऽब्धि- क्षय १०
शक्र- श्रीघ्न पराक्रम व्यसु करूं बद्ध प्रभूतें करी

---

१ आजन्मशुद्ध. २ बुद्धा. ३ हाय. ४ मधु- अरि- मधुदैत्याचानाश कर्ता. ५ यशस्व्यांच्यासमूहामध्यें. ६ गंगा. ७ जन्म- ईडया- जन्मेंकरूनस्तुत्याअसी. ८ सूर्यपुत्रहि. ९ शूर- आर्य- अतिमना- शूर, श्रेष्ठ, यांलाअतिमान्याअसी. १० वायुपुत्रें (मारुतीनें) ११ कुबेराचा. १२ रावण. १३ इंद्रजित.

सीताश्रु त्रिजटा पुसी भय न राहूंदे मनीं ती बरी
नागातें भुजगाऽरिचा रय पिटी साजे जगीं तो यशीं
राजीवाक्ष महा धरी रवळबळें झालीं प्र-चिंता-वशीं ११
श्रीदाच्या अनुजें पराक्रम-पटु भ्राता वधा धाडिला
तोही त्या जगदीश्वरें लयकरामर्षी रणीं पाडिला
मेघध्वान करी पराजय जया तें सैन्य मानी यम
आणी ओषधि-शृंग नंदन समीराचा महाविक्रम १२
श्रीशा स्वस्थ विशल्य होय सबळ क्रूराऽरि मर्दी तया
दे मायाजनकात्मजा-क्षय-करा रुती महोया भया
सीतेशानुज तो नदंत्यय करी जन्यांत यत्नें अरी
माराया महिजेसि शोक-वश-धी-क्रोधी असी तें धरी १३
मंत्री श्रीवध राहवी मग अरी सैन्यें प्रभूच्या वधा
प्रेषी तों अज पी यथेष्ट रुधिरा मद्या म्हणे भूस धा
जन्या आपण ये यमाभ जगती झाली भयव्याकुळा
धीरा मूर्छित लक्ष्मणा करि मदें देऊनि काळाकुळा १४
श्री वीरा मरुदात्मजें दिलि पुन्हा दिव्यौषधीच्या बळें
आरंभी अज-पौत्र संयति सुराबर्थे मराया रवळें
शक्राच्या बसतां रथीं जयजय ध्वाना मुनीच्या मुखें
ऐके रावण-काम-राम-हर तो ब्रम्हांड कोंदी सुखें १५
लंका श्रीसि करी प्रभूत्तम वरामत्र स्व-पादानता
दिव्यामाजि धनंजय स्तवि वरा सीता-मनःरूढता

१ वेग. २ तेजा. ३ अतिचिंतेच्यास्वाधीनअसीं. ४ शल्यरहित. ५ युद्धांत. ६ रवड्गानें. ७ यमासारिरवा. ८ वंशा. ९ युद्ध. १० वर-अमत्र-श्रेष्ठपात्र. ११ अग्नि. ∴ नत्-अत्यय-त्याचानाश. + नाशकर्णाराअसताक्रोधी.

आलिंगी अजपुत्र त्या यति-जन-श्रेयस्करा तो मग
यानीं बैसुनि राजराज महितीं हर्षे निघे सानुग १६
श्रीला राघव दावती समरभू सेतु स्वकीया कथा
सांगे आक्रमितां जगत्प्रिय परात्मा व्योमयानें पथा
तारा घे जनकात्मजा यमि-जन-ध्येय प्रभू गोतमी
दावी त्या विरहज्वरा कथि धरी जो अर्यमत्वा तमीं १७
श्री-कुंभोद्भव-सद्वराश्रम तिला दावी जगाचा धणी
तीही जन्हुसुता पय स्मरहरा जीचें सुचूडामणी
तेजस्वीश महा-यशोनिधि भरद्वाजर्षि यज्ञाकृती
तो भाग्यें करि शर्मराशि विभुची प्रेमस्तवें सत्कृती १८
श्रीभर्ता चतुरा मरुत्तनुभवा धाडी पुढें सत्तम
भेटे तो जयन प्रभु प्रिय-गुहा वारावया तक्लम
हर्षे सानुज निर्मळाशय निज-श्रेयस्करा योगमें
प्रेमें त्या नमि वानरा भरत तो नाचे महासंभ्रमें १९
श्रीमत्पुष्पक दे पुरा मह जसा बर्हिव्रजाला घन
भेटे सानुज हृत्प्रिया सदय तो राज्यांत घाली मन
गातां सर्व अजस्वधर्म-नयज-प्राज्या यशातें असें
राजा राम करी कवीस निवती निर्दोष-लीला-रसें २०
श्रीद-व्रीडद-भाग्य लोक नगरामध्यें न कोठें भय
नाहीं मृत्यु-जरा-यम-स्मृति नरा मत्यंतिं भेद स्मय
सौजन्यें यश जोडिलें जगद्दिनें रामें यथार्थाभिधें
केली सच्चरितें हरादिमहितें मोक्षार्थ नानाविधें २१
त्रिःसप्त-मंत्रमय हें रामायण निवेदिलें
येथें मन मयूरें श्री-रामचंद्रा निवेदिलें २२

समाप्त.

---

१ वेगवान्. २ मेघसमुदायाला. ३ मति-अंतिं-बुद्धीच्या अंतीं. ४ सूर्याला.

विधिसह सुर विप्र प्रार्थिती विश्व-पाळा
अवतरुनि वधाया रावणा लोक-काळा
दशरथ-सुत झाला तो घनश्याम राम
श्रुति-बहुमत ऐसें ठेविलें त्यासि नाम १
सुत भरत दुजा हा मध्यमेचा तदंशा
त्रिभुवन-नुत जेणें जाहला सूर्य-वंशा
गुण-निधि तिसरा तो लक्ष्मण प्राज्य-धामा
कवि-मत चवथाही साधु शत्रुघ्न-नामा २
दशरथ सुत होतां वृद्धभावांत हर्षे
बहु धन घन जैसा तोय तैसेंचि वर्षे
करि उपनयनें तो योग्यकाळीं जगातें
सुखवि दुखवि दानें पारिजाता नगातें ३
स्व-मख-समवनार्थी गाधिजन्मा महर्षी
नृपतिस सुत मागे होय राजा न हर्षी
कुळ-गुरु-वचनें दे तत्करीं पुत्र दोघे
परम मुदित आशीराशि अर्पूनि तो घे ४
मुनिवर वात अस्त्रें रामभद्रासि दे हा
प्रथम शिकवि विद्या क्लेश व्हाया न देहा
वधुनि गुरु-निदेशें राघवें ताटकेला
परम सुगम विघ्न-ध्वंसनें वाट केला ५
अनुजसह मुनीच्या आश्रमीं राम पावे
त्यजुनि भय महर्षि स्वस्थचित्तें तपावे
कुशिक-सुत म्हणे ते दुष्ट यावे खपावे
तव भुज रघुवीरा आज यज्ञा जपावे ६

---

१ वृक्षातें. २ आशिर्वादांच्या राशी. ३ यज्ञस्थान.

कटकसह सुबाहु क्रव्यभुक्[1] प्रेत केला
उडवुनि शर-वातें दूर मारीच नेला
अति विकळ पडे तो सागरीं सासु[2] राहे
स्व-हित श्रमचि पाहे त्रास चित्तांत वाहे ७
रघुपतिवरि[3] विश्वामित्र वर्षे वराशी
मुदिरहि उदकाच्या तेविं गोत्रीं[4] न राशी
जनक निजमखातें तो पहायास बाहे
विमळ यश अहल्या रूपही भव्य लाहे ८
दृढहि धनु शिवाचें वोढितां राम मोडी
पण पुरवुनि सीता-रूप सद्रत्न जोडी
भरतमुख तिघे जे त्यां तिघी आत्म-कन्या
जनक नृप समर्पी पावल्या तोष धन्या ९
पळभरि भलता जो देव देवा जपे या
स्व-सुकृत-फळ वर्णी[5] दे वदे वाजपेया
जनक अजित हा हें व्यक्त जाणे सुतत्व[6]
प्रकट दशरथाच्या धीस बाणे सुतत्व[7] १०
मग दशरथ राजा मैथिला अत्युदारा
पुसुनि तनय घे ज्या जोडिल्या नक्तदारा
फिरुनि निजपुरा येतां पथीं राम भेटे
यमसम बहु कोपें मोडितां चाप पेटे ११
दशरथ गुरु तोहि त्रासला क्षत्र-काळा
प्रभुसि परि जयश्री दे तया शांति माळा
प्रमुदित नगरीतें पावला लोक सारे

---

१ मांसभक्षक. २ सप्राण. ३ मेघहि. ४ पर्वतीं.
५ स्वनाममंत्राच्या प्रतिवर्णी स्वसुकृतफळ दे वाजपेया असें म्हणणारा.
६ उत्तमतत्व. ७ पुत्रत्व.

म्हणति निजमनीं बा भंगिला तो कसा रे १२
अनुजसह पुराला मातुळें साधु नेला
भरतहि गुरु- वाक्यें तत्प्रियार्थेंचि गेला
धरि मति युवराज ज्येष्ठपुत्रा कराया
परि हिन दयिताही तें करूं दे न राया. १३
ऋषिसम मनुवर्षें राम रानीं वसावा
भरत निजपुरीं या राजभावें असावा
स्मर वर कर साचे हेचि तूं देव दोन
श्रम पति-हृदया ती स्त्री असें दे वदोन १४
सुर-हृत- मति सोडी आग्रहा बायको न
प्रभु वर जननीचें इष्ट तें आयकोन
अनुज- जनक- कन्या घे निघे अंहं राया
तिळभरि नसिचाया रावणा संहराया १५
अनुज- सहित नेसे वल्कलें मातृ- दत्तें
नमुनि गुरुसि सोडी राज्य जें स्वर्गवत्तें
दशरथ कथि सूता शीघ्र ने स्यंदनातें
बसिव अनुजयुक्ता स्त्रीयुता नंदनातें १६
निरुपमतम-शोकीं होय साकेत मग्न
क्षितिपति बहु लाजे त्या जना जेविं नग्न
करुनि सुरहितार्थ स्वाश्रितें छेसि भग्न
त्वरित विभु निघे तो जेविं साधूनि लग्न १७
न विपुळ-हृदयींही दुःख मावे उते तें
त्यजुनि नृपति गेला कैकयाच्या सुतेतें
सुथिकळ महिषीच्या शोवटीं जाय गेहा

१ औदार्यें. २ पातक. ३ स्वर्गवत्- तें.

रडत तिस म्हणे न प्राणहा काय गे हा १८
प्रभु गुहक-निषादा भेटला शृंगबेरीं[1]
कथि गुरु सचिवातें जा रघुनाथासि हेरीं[2]
तरुनि सुरधुनीतें शीघ्र पावे प्रयागा
नतिस नुतिस झाला श्रीभरद्वाज जागा १९
प्रभुवर करि हर्षें चित्रकूटीं निवास
प्रमुदित भजती त्या साधु जैसे शिवास
गुह चरे[3] कळवी तें सूत सांगे पुरांत
क्षितिपतिस[4] नयाच्या वज्र झालें उरांत २०
प्रभुवर-जननीतें शाप सांगोनि भूप
त्यजि वपु सुत-शोकें होय देवार्च्यरूप[5]
पति-निधन जनौघीं तें जसें वज्र शैलीं
सचिव भरत ये तों स्थापिती प्रेत तैलीं २१
नकथुनि भरतातें दूत घेऊनि आले
पुरिंत समजतां ते बंधु शोकार्त झाले
सुत-रचित-निजांऽबा-धिक्कृतें[6] साधु धाले
किमपि नच तिचें तें त्यापुढें कृत्य चाले २२
करि सकळ पित्याचा अंत्य संस्कार साहे
अपयश न म्हणे या काय दासा रसा[7] हे
निघुनि शरण गेला सास तो साधु आर्या
नमुनि परतवाया ने चमू तात-भार्या २३
गुह बळ करि सिद्ध क्रुद्ध होऊनि घाट

---

१ नामविशेष (नगर) त्यांत. २ पहा. ३ दूत. ४ अज सुतास. (दशरथास) ५ देव-अर्च्य-रूप-देवांनी पूजाकरण्यास योग्य असा. ६ पुत्रानें केलेला जो आपल्या आईचा धिक्कार त्याणें ७ पृथ्वी.

त्रिदश-सुत नदीचा तो धरी[1] दे न वाट
विषम समजला कीं जातसे अत्ययानें
उतरि भजक ऐसें जाणतां सत्य यातें २४
करुनि बरि परीक्षा श्रीभरद्वाज आधीं
मग सुखवुनि आज्ञा दे म्हणे कीर्ति माधीं
प्रभु-चरण नती जे लोकपांहीं नमावे
यदमलयश[2] अंडामाजि कांहीं नमावे[3] २५
स्वजनक मरणातें पावला आत्म-शोकें
श्रवण करुनि रामें प्राकृतें जेवि तोकें[4]
भरुनि नयन-पद्में पिंड बोलोनि हंतें[5]
स्मरुनि गुण दिले हें वर्णिती सर्व संत २६
भरत परतवाया स्वाग्रजा हात जोडी
बहु बहु समजावी न प्रभु प्रेम मोडी
चरण-कमळ-पूता पादुका दे वदे हा
अवधि टळलिया मी या न वाहेन देहा २७
फिरुनि वसवि नंदिग्राम तो साधु वन्या
प्रभुपरि वरि वृत्ति श्रीशचिंता न अन्या
वसवि वरपदीं ज्या पादुका त्या विधन्या[+]
कवि[6]-ततिच न वर्णी तद्यशा जन्हुकन्या २८
अतुल सुख-यशाच्या अखिल देव राशी
स्तवुनि नमुनि अर्पी तो हि या दे वराशी
शुचिमति अनुसूया शोभवी जानकीला
रचि वर-तनु-रागा क्षोभवी ज्या न कीला[7] २९

---

१ नाशातें. २ यत्-अमल-यश-ज्याचें स्वच्छयश. ३ असमावे. ४ बालकें. ५ हाय. ६ कविपरंपराच. ७ ज्वाला. + विशेषें करून धन्या.

हरि[1] महितनया जो त्या विराधासि मारी
हरुनि सकलतापा उग्र शापाच वारी
निववि विभु तपस्वी दंडकारण्य-वासी
गति सतत उपासी ज्यांसि होऊनि दासी ३०
वरगति शरभंगा दे अरूपाहि पेटी
मणि भरुनि तसी घे मूर्ति नेऊनि भेटी
स्व-पितृ-सख-जटायु ख्यात गृध्रेंद्र जो त्या
सुखवि भुवन-हर्म्या या तया तोहि जोत्या ३१
निववि मुनि-हिता जी सिंधु गोदावरी ती
करुनि वसति तीरीं प्राज्य मोदा वरीती
दशरथ-सुत लीला-मानुष स्वर्ग ज्यांचें
स्तवि यश गुरु-चंद्र-क्षीरधि स्वर्गजांचें ३२
दशमुख-भगिनी ये हारवी नाक कान
स्तविल निवुनि तेजें ईश्वरा नाके[2] कां न
स-खर-मनु[3]-सहस्र-प्राण घे देव धाया
यश करि विभु आज्ञा स्वाशुगां[4] दे वधाया ३३
दशमुख भगिनीची दुर्दशा ती न सोसी
गमलि विधिस त्याची त्यावरि श्री नसोसी[5]
अवनिजनि हराया हा करी ज्या सहाय
प्रबळ बळ वदे तो त्रस्त मारीच हाय ३४
कनक-हरिण झाला पंचवट्याश्रमाला
चकित-हृदय आला श्री विलोकी तयाला
विनवि मृग धराया तत्प्रियातें कराया
प्रभुहि खळ मराया जाय विघ्ना तराया ३५

---

१ हरणकरी. २ स्वर्ग. ३ खरासह वर्तमान जे चौदा हजार राक्षस त्यांचे प्राण. ४ स्व-आशुग-आपल्या बाणांस. ५ न असो असी.

कपट-हरिण तो ने त्या नृसिंहासि दूर
क्षणभरि मग नाडी त्यासि लोकैकशूर
प्रभुपरि महिजेला लक्ष्मणा हाक फोडी
मग निज वपु सोडी तन्मनीं आधि जोडी ३६
परिसुनि बहु देवी व्याकुळत्वासि दावी
उचित शुचि तरी त्या देवरा[1] दुष्ट भावी
वदुनि कटु पिटूनि स्वोटजांतूनि[2] लावी
तंव दशमुख ये ने तीस जी माय गावी ३७
श्रवण करि सुनेच्या तो महामन्द हाका
दशरथ-तनुजांचा गृध्रभूपाळ काका
विरथ करि अरीतें दे महाहर्ष नाका
भिरवि विशदता तत्कीर्ति तैसी न राका ३८
असिकरुनि अधर्मे दुष्ट तत्पक्ष तोडी
पळवि जिस मुहूर्ते त्रस्त होऊनि सोडी.
गिरिवरि कपि पाहे पांच ती त्यांत पाडी
नग पटसह जाणो त्यांकडे दूत धाडी ३९
खळ जलधिस लंघी ने स्वलंकेंत देवी
भय नगणि अशोकीं काननी गुप्त ठेवी
प्रतिदिन शतयज्ञप्रेषिताऽन्नात्मसेवी
सतत पति-पदाऽब्ज-ध्यान-पीयूष सेवी ४०
नमुनि अनुज सांगे साश्रु तें वृत्त रामा
त्वरित म्हणत हा ये आपुल्या पर्णधामा
उटजचि न तदा तो विश्व निश्रीक पाहे

१ दिरा (लक्ष्मणा) २ स्व-उटजांतूनि- आपल्या पर्णशालेंतून.
३ पूर्णचंद्रयुक्तरात्र.

कपट-मनुजरूप स्त्रैणसा शोक वाहे ४१
विरह-विकळला तो श्रीस सर्वत्र शोधी
प्रभुसि बहु सुमित्रा-पुत्र दे धैर्य बोधी
विनवुनि बहुयत्नें शोक-वेगासि रोधी
नयन पुसुनि सांगे बा न मोहीं शिरो धी ४२
विपिन हुडकितां तो देखिला गृध्र तात
त्यजुनि धृति म्हणे हा दे स्वयें वारि वात
विकळहि कथि केला रावणें हा स्वघात
व्यसु मग खग होय श्रीमुखातें पहात ४३
स-करुण-वर लावी त्याचिया हात दाहा
स्मरुनि नवेदला स्वप्रेयसी ही तदा हा
सुतसमचि यथोक्त श्रीश दे पिंड-तोया
विसरुनि जन पुत्रीही भयीं हिंडतो या ४४
तदुपरि धरि जाया-सानुजा तो कबंध
क्षपवुनि जगदीशें तत्क्षणीं शोकबंध
सुर-वर-सम केला सिंधुतें याद येतें
कथिमन विभुतेजें ऐकतें या दयेतें ४५
प्रभुसि हित कथी तो पाय वंदूनि भावें
निघवुनि शबरीतें ऋष्यमूकासि जावें
तरणि-तनुज आहे कीश सुग्रीवनामा
करिल सुखवितां हें त्वन्महाकार्य रामा ४६
वर गति शबरीतें दे मतंगाश्रमांत
प्रकटि निजकुळा जो त्या पतंगा श्रमांत

---

१ दहनाला. २ नबोलिला. ३ आपली स्त्री (सीता) ती. ४ हाय. ५ सूर्या. + राम.

सुखवुनि सुगळातें हर्षवी राम हातें
धरि करि अमृताचें वर्ष वीरा महा तें ४७
पवन- तनुज सीताजानिचा होय दास
प्रथम मग यशस्वी राघवा तोयदास
विकळ सुगळ वेर्ही भेटवी हा सखा या
सुहित पवन दावा जेविं कक्षास खाया ४८
रविसुत नग दावी पाहतां अश्रु गाळी
प्रभु सुगळ-सदुक्तें शोक मोहासि टाळी
परिसुनि अपराध क्रूरता मत्त वाळी
व्यसु करुनि पदीं त्या स्थापुनि श्रीश पाळी ४९
कपि बहु शतकोटि क्रूर देवांश गोळा
करि सुगळ म्हणाया राक्षसां हात चोळा
पटु कपि हुडकाया पाठवी त्यांत आर्या
निरखि पवनजन्मा ये कृती तोचि कार्या ५०
जळधि उडुनि लंघी नावरे अंतराया
शतमखमुख गाती देव या संतराया
उसळवि निजवेगें सिंधुचें तोय शोधी
पर-पुर विभु-मुद्रा श्रीस दे. तो यशोधी ५१
पुसुनि कुशळ सांगे तो धनुर्बाण तूण
स्तवुनि नमुनियां घे सुज्ञ मागोनि खूण
उपवन-तरु मोडी शत्रु-पुत्राक्ष मर्दी
निशिचर पशुसे हा त्यांत भासे कपर्दी ५२

---

१ वृष्टि. २ मोर. ३ वणव्या. ४ गवतास. ५ अलंकार. ६ विघ्न. ७ भाता. ८ महादेव.

मग घननरव योजी ब्राम्ह दे त्यास मान
श्वसन[1]-सुत[2] सुतेजें भानुसा भासमान
अजित अजितसा जो सांपडे तो खपावे
पर म्हणुनि न जाणे हे कुधी तोरव पावे ५३
दशवदन-सभेला हानिच्या कामनेला
धरुनि नसमजोनि प्राज्य तें धाम नेला
कथि कवि वदवीतां भावि जें सत्य[4] यातें
ख-चर-पति तयाच्या खड्ग घे अत्ययातें ५४
तदनुजनि विभी हे ज्याचिया वर्ण नामीं
मग पण न कराया सुज्ञ तद्वर्णना मी
विनवुनि वदला तो वाक्य अत्यंत पूत
प्रभुसम तुज नव्हे बा सर्वथा वध्य दूत ५५
त्यजुनि नय पटानीं वेष्टिलें पुच्छ तैलें
भिजवुनि उजळीलें रावणें पाप-शैलें
ख-चरैं नतिस केला त्या पुरीं[6] हा[5] निदेश
उसळुनि पुर जाळी काळसा हानिदेश ५६
द्विषदनुज-गृहातें मात्र तो सुज्ञ पाळी
वरकड दशकंठाचीं आलयें सर्व जाळी
सिकवुनि ससुता त्या हा वदाया खळाला
उडुनि जलधि-नीरीं ये महेंद्राचळाला ५७
नियवुनि विजयानें सांगदा कीश-चक्रा
मधुवन लुटवी भी वानरांच्या न शक्रा
मुदित करि तया जो दे गजा मुक्ति नक्रा

---

१ नजिंकिलेला. २ विष्णुसम. ३. तेज. ४ नाशातें. ५ आज्ञा. ६ हानिद-ईश-हानिदेणाऱ्यांचास्वामी. + इंद्रजित. ∴ राक्षससमूहास.

वधुनि नुरवि काळीं तेज यद्दृष्टि वक्रा ५८
निरखुनि दयितेच्या भव्य- चूडामणीतें
प्रमुदित-मति भेटे त्या कपि[1]ग्रामणीतें
स्तवि बहु उपकारा आठवी जानकीश
प्रियकर शिव साक्षात् तो गमे ज्यानकीश ५९
निवटुनि खळ रक्षा मानविता मजाच
त्यजिन तनुसि मासे या न चित्तास[2] जाच
पटुहि नकरिती कां शत्रुची हानि रोप
श्रवण करि सतीचा सन्मुखें हा निरोप ६०
रघुपति घटिकेच्या ही विलंबा नसाहे
अनुजसह निघे त्या वायुचा पुत्र वाहे
रथपणा युव+राजें लक्ष्मणाचेंहि केलें
कपि- बल सुगळें तें सिंधुतीरासि नेलें ६१
कथिति वर-मदांधा रावणा मेघनाद
प्रमुख खळ नद्यावी जानकी ने कुवाद
परिसुनि नयधर्मी जो सदा एकनिष्ठ
स्वमत कथुनि बंधु क्रोध दे त्या कनिष्ठ ६२
प्रबळ युवति माध्वी द्या जयाची तया हो
स्वकुळ न बुडवा त्या ईश्वराची दया हो
अपटु सकळ एका वानरा आवराया
बुडवितिल कुधी हे मंगरीं नाव राया ६३
नमन करुनि आर्या आर्यवर्यासि अर्पा
हरधनु चुरि जो त्या दावितां काय दर्पा
गरुड न कवणाही जिंकिला जाय सर्पा

---

१ वानरश्रेष्ठातें. २ बाण. + अंगदें.

न कुळ पलल-रक्तें गृध्र-काकाशि तर्पा ६४
करुनि दुरभिमानी बंधु-धिक्कार यातें
त्यजि कवि विटला त्या जेविं हिंक्कारयातें
विहग अमरवृक्षा प्राप्त-दावा अरण्या
त्यजुनि शरण आला तेविं रामा शरण्या ६५
अनुज दशमुखाचा मानिती सर्व खोटा
पवनसुत म्हणे हा या जगीं साधु मोटा
प्रभु-मत-रघुवंशा ज्या महावज्र-कोटा
भजति सभय यावा तद्यशाला न तोटा ६६
द्विषदनुज नमी त्या विश्व जो देव वीतो
कथुनि अवरजातें राज्य तें देववी तो
रघु-तिलक-निदेशें सेतु केला नळानें
दळसम धरिला तो सागराच्या जळानें ६७
धनु शिरहि विभूचें दाखवीलें छळानें
घडिभरि महिकन्या साश्रु केली खळानें
प्रभुसह कपिसेना सेतुनें जाय पारा
द्विगुणित उतराया लागले याम बारा ६८
सुगळसह सुवेळीं राम वेघोनि राहे
कनक-रचित लंकादुर्ग दूरूनि पाहे
अरिस निरखि धांवे क्रुद्ध सुग्रीव पाडी
मुकुट गरुड जैसा पन्नगा तेविं ताडी ६९
फिरुनि सुगळ येतां त्या म्हणे राम राहें
स्थिर असुसह रक्ष स्वर्गपा सामरा हें
श्रित बुडविति मोहीं सेविती साहसा जे

१ मांसरक्तें. २ उचकीच्यावेगानें. ३ पानासम. ४ स्वजनातें.

दहन पवन संगीं घे करीं दाह साजे ७०
कपि-कटक-समुद्रें राम लंकेसि रोधी
मग दशवदनाची क्षिप्र सामीं शिरोधी
म्हणुनि सजुनि धाडी वालिजा अंगदातें
हित कथि परि माने त्या न सद्गंगदा तें ७१
धरवि वध करावा अंगदातें विरोधी
रघुपति-विशिखांहीं खंडवाया शिरोधी
वधि निशिचर वेगें बाहु झाडूनि चार
प्रभुसि रण करावा हाचि माने विचार ७२
समर सम-रयांहीं[1] मांडिला फार भारी
तपति खपति पापें शत्रुचे कारभारी
परम परमदानें अंध काहीं वळेना
सुचिर रुचि रणाची घात होतां कळेना ७३
क्षितिवरि रुधिराची वाहिली जी नदी न
द्विपहि तरति चिंतामीच ते जीन दीन
नटति बहु कबंध स्वर्ग आला पहाया
मुनि हरिण म्हणे त्यां काय आलाप हा या ७४
नरतनु करि दोघे बद्ध तें कीं भ्रमावे
खर-विष-धर-पाशीं बंधु फार श्रमावे
सकृदपि भवमोहा जावया जे नमावे
खळ घनरव कर्मे या त्रिलोकीं नमावे[2] ७५
सुधृति जनकजेला दे त्रिपूर्वा-जटा[3] हो
स्थिर विभु विपि[4] ये जों तों म्हणे संकटा हो

1 समानवेगांहीं. 2 नमामावे. 3 त्रिजटा. 4 गरुड. + नमस्कारावे.

करि अहि-गुण-बद्धा शक्तिदा त्यासि मुक्त
प्रभुसि सुयश द्यावें सेवकां हेंचि युक्त ७६
प्रभु पुनरपि मारी संगरीं सैन्य कोटी
उठवि अनुज होतां आपली हानि मोटी
कपि-बळ पळवी तो काळसा कुंभकर्ण
प्रबळ-पवन-वेगें वाळलें जेविं पर्ण ७७
विकळ करि धरी ने तो मुकुंदासि मागें
हरि हरिवर नासाकर्ण तत्काळ रागें
गिळि कपि सगळेचि क्रुद्ध होऊनि आगें
प्रभुशर म्हणती घे नीज वीरा न भागें ७८
विखरि गगन वर्ती शस्त्र-जाळादि सेना
घनरव खिळि सारी विश्वपाळा दिसेना
द्विपदनुज हनूमान् मोहिले हे न दोघे
म्हणुनि दशमुखास्यें धन्य तत्पुत्र तो घे ७९
कपिवर बळ-शाली सर्व-सन्मौलि-रत्न
श्वसन-सुत हनूमान् जांबवत्प्रोक्त यत्न
करि झडकरि ओषध्यद्रिचें शृंग आणी
उडवि सकळ शल्यें मोह तद्गंध खाणी ८०
व्रण-कणहि पहाया एक देवा न राहे
विपुलतर सुधेचा मेक दे वानरा हे
जगदसुसुतलीला जिष्णुची गाय कांहीं
नउणि वरिलि जैसी विष्णुची गायकांहीं ८१
स्मर-हर-गिरि-पार्श्वीं शृंग पावूनि आला

१ हरणकरी. २ वानरश्रेष्ठ (सुग्रीव) ३ जगत्-असु-सुत-लीला-जगत्प्राणजो वायू त्याच्या पुत्राची (मारुतीची) लीला ✱ त्या रावणाचा पुत्र. + इंद्रजित.

स्वधनु धरुनि युद्धा सिद्ध जों नाथ झाला
प्रभुवर-विशिखांच्या त्या नसाहे समूहा
त्यजुनि धृति म्हणे ती राक्षसांची चमू हा ८२
वध जनकसुतेचा दाखवी दुष्ट मोही
सुर मुनि वदले हा देव निर्माय तोंही.
कथि पति सरमेचा सिद्धि पाहों मयाचा
न कपट-पटु नातू राहवा होम याचा ८३
निवटवि चुळता त्या लक्ष्मणाच्या करानें
स्तवुनि निववीला तो बंधु सीतावरानें
प्रिय-सुत-वध लावी त्या वदायास हाय
स्वजन न उरला हो एकही या सहाय ८४
दशमुख सुत-शोकें क्षोभला कौर्य[1] मानी
वध जनकसुतेचा जीस्तव स्वाऽसु-हानी
सचिव विनवि कैसा मारिशी बा असीतें
पतिवरिच इच्छ्या या योज उग्रा ऐसी[2]तें ८५
बहु बळ चतुरंग प्रेषिलें पंक्तितुंडें
कथुनि अरि वधा स्वा जा असें स्पष्ट पुंडें
विखरुनि शर भारी निर्जर-ध्वंस-कारी
प्रभु पुरहरसा तें दों मुहूर्तांत मारी ८६
परिसुनि बहुकोटि स्त्रीजनाचे विलाप
त्यजुनि पुर निघे तो राक्षसांचा इ[3]लाप
प्रभुवरि निज-सेना-सिंधु नेवूनि लोटी
प्रलय-पवनसा तो दाखवी शक्ति मोटी ८७

---

१ क्रराचयासयोग्यः २ खड्गानें ३ पृथ्वीपति (रावण)

भगवदनुजवक्षीं[1] शक्तिनें शत्रु ताडी
विकळ करुनि ती त्या सर्पिणीसीच पाडी
प्रभुहि दशमुखातें सैन्य मारूनि मोडी
श्रम उडवुनि शृंगें मारुती हात जोडी ८८

शतमख-वचनें ये मातलि क्षिप्र देवा
विनवि बहु असें या स्यंदनीं पाय ठेवा
प्रभुजि मज घडावी दुर्लभा आजि सेवा
इजसम हितकर्ती ती न गंगा न रेवा ८९

प्रभुसह खळ भांडे तो अहोरात्र सप्त
त्रिदश मुनिहि झाले युद्ध पाहोनि तप्त
उडवि शत शिरें जों तोंचि आलीं नवीनें
बहु नवल कथावें काय हो तें कवीनें ९०

प्रभु करि बहु चिंता जो श्रित-स्वांत शोधी
रविहृदय जपाया तो अगस्त्यर्षि बोधी
दिनकर वर दे या ईश्वरातें घडाया
विजय अरि पडाया कीर्ति विश्वीं जडाया ९१

कुलकर-मिहिराशी[2] घे असी मारणातें
करुनि सुख सुरांतें दे असीमा रणातें
रघुपति वर बाण ब्राम्ह योजूनि सोडी
कठिनतर अरीचें वक्ष तत्काळ फोडी ९२

समर करुनि होतां प्रेत देवर्षभारी[3]
सुरतरु-कुसुमाचें तोष दे वर्ष[4] भारी
नभ भरिति सुरर्षि स्फार[5]-सर्वस्वनाहीं
म्हणति बहु तुला बा भक्त सर्वस्व नाहीं ९३

---

१ भगवत्-अनुज-वक्ष-रामाचा कनिष्ट बंधु जो लक्ष्मण त्याच्या वक्षस्थळीं. २ कुळ श्रेष्ट जो सूर्य त्याचे आशीर्वाद. ३ देव-ऋषभ-अरि-देवश्रेष्टांचे शत्रु. ४ वृष्टि. ५ अति उच्च शब्दांहीं.

तव चरणचि रामा सर्वदा ते जपावे
प्रणत अखिल याहीं सर्वदा तेज पावे
म्हण अहित सुरांचे संहरा मानवांचे
हटहि तव पदांहीं अंह रामा न वांचे १४
सुरवर करिति वाद्यें देव संगीत नाना
करिति बहु असंगी अंघि संगी तनाना
श्रित-हित विभु ऐसें गाय नाकर्षि नातें
प्रभु-यश कवणाचें चित्त आकर्षिना तें १५
प्रभु न दशमुखानें रोष कांहीं क्रियेनें
करवि नधरि शौर्यें सोषला विक्रियेतें
मग अनुजकरानें छेदवी निष्क लंका
धरि रुचि जसि नाग पावता निष्कलंका १६
वरि करुनि महीजा दिव्य देव स्तुतीतें
श्रुति-बहुमत जें तें संग दे वस्तु तीतें
दशरथ नृप भाग्यें भेटला नंदना तें
प्रमुदित-मति वंद्याच्याहि घे वंदनातें १७
असुर-वर म्हणे त्यां मोडिली मद्यशाला
रचिलि अमृत-शाला श्री दिली मद्यशाला[1]
प्रिय वर वरदांच्या नायका माग सांगों
गुरु-गुण न म्हणोंदे भव्य-कामागसा जो १८
रघुरमण म्हणे या वत्सला देवराया
मृत सुभट उठावे सर्वही दे वराया
उठवि अमित कोटि आज्य-पीयूष-वर्षे
प्रभुसि नमिनि गाती कीर्ति ते कीश हर्षें १९

---

१ मत्- यश- माझ्याकीर्तीला- * शब्दयुक्त- † अग्निप्रवेश-
+ पाप.

नमुनि विनवि लंकानाथ भूजा-वरा या
स्वपद-नत कराया धन्य पूजा वराया
प्रभु कथि कपि पूजीं यांत सत्तोष पूर्ण
त्यजुनि भरत आलों त्यासि भेटीव तूर्ण १००

सबळ सुगळ पूजी भक्त आज्ञेंत राहे
नमुनि सकटकांतें पुष्पकामाजि वाहे
परम-मुदित-चित्ता जानकी सेतु पाहे
सुख बहुतचि तारा भेटतां श्रीस लाहे १०१

स्तवुनि नमिलि गोदा जींस गाय त्रिलोकी
परिचित पहिले त्या आश्रमांतें विलोकी
अघन नमुनि भास्वज्जन्हुकन्यास वांचे
कथिं गुण धरिती या सर्व धन्या सवांचे १०२

नमुनि मुदित-चित्त श्रीभरद्वाज केला
पवन-सुत विभूक्तें तूर्ण तेथूनि गेला
गुह-भरत-मनींचा ताप अंतासि नेला
सुयश हिमकराच्या हें मिळालें न मेला १०३

प्रभु सुखवि गुहा त्या अर्क तो वारिजातें
अधन निववि‍ला कीं वत्सलें पारिजातें
प्रिय घन भरता या चातका भेट दे हा
निरवधि म्हणणारा पावकीं पेट देहा १०४

स्व-गुरु-सचिव-माता आप्त-शत्रुघ्न-पोर
प्रमुदित करि गाती तद्यश क्षीर-गोर
स्तवन नटन वाद्य-ध्यान सत्पुष्पवृष्टी
त्रिदश करिति कोंदे उत्सवें सर्व सृष्टी

---

१ कांतीला. ⁂ यमुना इत्यादि. + भास्वत्-जन्हु-कन्या-सूर्यआणि जन्हुराजा यांच्या कन्या ( यमुना, भागीरथी ) त्यांस.

करवुनि अभिषेक श्रीश घे होय राजा
प्रिय करुनि म्हणे त्या स्वप्रजातें विराजा
प्रभु निज-विभवानें वालि-दिक्कंट-[1] बंधु
स्वसम करि करावे सागरें जेविं अंधु १०६
प्रभु निज यश जों तों वांच या दे वश ज्या.
पवनतनय झाला पूज्य तो देवराजा
त्रिभुवनजननीही श्री करी हा रया तें
स्मरुनि भजन अर्पी आपुला हार यातें १०७
घटज-मुनि-मुखानें आयकें जन्मकर्म
प्रभु दशवदनाचें अश्वमेधादि कर्म
श्रुतिमत करि होय स्व-प्रजा-वज्र-वर्म.
स्तुति-नति-निरतां दे निस्तुळ प्राज्य शर्म १०८
हें रामायण-पीयूष मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणीं भावें वाहिलें कृतवंदनें १०९.

समाप्त.

## सद्वृत्तरामायण.

ब्रम्ह-स्तुत श्रीपति दिव्मुखातें मारूनि घाया त्रिजगा सुखातें
दिक्स्यंदनाच्या सदनासि आला प्रेमें चतुर्मूर्ति यशोर्थ झाला१
ठेवी पिता ज्येष्ठ-सुतासि नाम श्रीराम हें होउनि पूर्णकाम
पुत्रा द्वितीया भरताभिधान स्थापी तिजा लक्ष्मण सन्निधान२
चतुर्थ शत्रुघ्न कुमार तेज्या न,साम्य त्या दाखविति स्वतेजा

---

1 विहिरी. 2 वेगा.

न्यावा जसा चंदन-वास वातें मागोनियां त्या नर-वासवातें ३
ने गाधिजन्मा हित वीट केला रामें स्पर्धी मारुनि ताटकेला
रक्षःक्षयें क्रतुवनें महर्षी झाला फळी पाहुनि नेम हर्षी ४
म्हणे पति क्षुब्धमना शिला हो श्रीशें सतीचा श्रम नाशिला हो
नाशूनिशां गौतम-विप्र-तापा अन्या उणा तो गमवि प्रतापा ५
जाणें प्रभूचें मिथिलापुरीतें भाग्यें करी त्या तिथिला पुरी तें
खंडी नृपांच्या स्मरचापला जो त्याही म्हणे हा हरचाप लाजो ६
होतां पित्याचा पण पूर्ण धन्या श्रीशा स्वकांता वरि भूमि-कन्या
तिघांस ही तीन सुता विदेहा-धिनाथ भूजा जसि नेविं देहा ७
प्रसाद नाशी अनुगाधि ज्याचा प्रताप वर्णी नृप गाधिज्याचा
भाग्यें मिळे दिग्रथ सोयरा ज्या मोटा तया उत्सव होय राजा ८
क्षत्रघ्न जो भार्गवराम दापी त्याच्या प्रभु क्रूरतरा मदा पी
भंगी करी हृष्ट तथापि त्याला गायासि लावी स्वकथा पित्याला
हर्षें म्हणे ती स्वमना अयोध्या रामा यशा प्राज्य असेंच योध्या
कोणी पुसेना कवि सत्यलोका साकेत वैकुंठचि सत्य लोका १०
मामा युधाजित् पवि भृत्प्रभान्व्या मनें पुरा ने मग त्या स्वभाच्या
राजाहि योजी अतुळ-प्रभावा रामासि द्याया युवराज-भावा ११
तों मंथरा-दूषित-बुद्धि चंडी ती मध्यमा स्त्री पति-चित्त खंडी
मागे दिले जे वर ते वदान क्ष्वेडोग्र शोकीं बुडवून दोन १२
राज्य स्वपुत्रा वनवास रामा मन्वद्ध मागे पतिच्या विरामा
संप्रार्थिनां ती नवळेचि रामा नबोलवे सद्रुत-तत्परा मा १३
सत्य-व्रत भ्रष्ट पिता न हो तें श्रितां सुधावर्षि वितान होतें

---

१ यज्ञस्थान. २ होणें. ३ सीता. ४ प्राशन करणारास. ५ पहा. ६ क्ष्वेड-उग्र-विषासारखें उग्र. ७ स्त्री. ८ नको. ९ आश्रिता. १० छत, चांदवा. + मदनाच्याचपळपणाला.

स्वामी म्हणे न व्रत-हानि-घाला घालूं यशीं वत्सल हा निषाद १४
घे वल्कलें भूषण वस्त्र सोडी पित्यासि मातेसहि हस्त जोडी
निघे प्रभु[1] त्यागुनि राज्य भार्या छाया सुटे लक्ष्मणही न आर्या १५
न पत्तिला भूप शोकें सहाया सांगे सुमंत्रा स्वरथीं वहाया
जातां वना राम पुरी वदे हा पाहे न गेहा जन तो न देहा १६
भेटे सख्या राम गुहा निषादा दे त्यासि निर्मूनि जटा विषादा
सांगे पित्याच्या सचिवास देशा द्यावा तुवां तोष करूनि सेवा १७
नौकेंत बैसोनि सुरापगेला[2] लंघूनि तेथूनि दुराप[3] गेला
प्रेमें भरद्वाज-पदासि वंदी तो देव ज्याचे विधि वेद वंदी १८
निघे प्रयागाहुनि राम पाहे श्रीचित्रकूटीं मुनिवृंद राहे
तें सूत सांगे नगरांत राया त्या पुत्रशोकीं न गरीं तराया १९
सत्पुत्र-शोकें वरि हानि शाप स्वर्भानु[4] वाटे नृप हा निशाप[5]
मंत्री तया साधुसि आणवीतो येतांचि पुत्रा कृत[6] जाणवी ती+ २०
दे शोक तातार्थपदानुगा जो[7] तीतें न संकोच धरूनि गांजी
वार्टी सुधेनें लवडूनि कांजी ज्ञाना निची भीड धरील कां जी २१
ज्येष्ठा-मना जोडुनि हात दे हा संताप संस्कारुनि तात-देहा
गुर्वादि-सर्वांसह तो करी ती मातेपुढें जी प्रिय-लोक-रीती २२
ज्याच्या न राहे प्रखराघ यातें त्या चित्रकूट-स्थित-राघवातें
भेटे कथी मृत्युकथा पित्याची धी नावरी शांत तथापि त्याची २३
ताता महा-वृत्तिद-सार-तोया दे पादुका सांत्वुनि फार तोया
राहे समान-व्रत साधु नंदि-ग्रामीं जसा शंभु-वियुक्त नंदी २४
त्या चित्रकूटा जगदीश सोडी पुण्याश्रमीं अत्रिस हात जोडी
त्याची सती-वर्णित-कीर्ति भार्या दे अंगराग क्षितिजेसि आर्या २५

---

१ पादचारित्व. २ सुर-आपगा-गंगेला ३ दुष्प्राप. ४ राहु. ५ चंद्र. ६ कलंक. ७ प्रियबालकाची रीति. + कैकेई.

करी विराधा शुचि राक्षसा जो यशें न कां तो रुचिराक्ष साजो
तें दंडकारण्य असाध्वसत्वें[1] त्या नंदना[2] पूज्य असाध्वसत्वें[⫶] २६
दे हर्ष सर्वांहि तपोनिधीतें झाला न जो प्राप्त तपोनिधीतें
कीं नाम सांगे करि वंदनातें आशी म्हणे द्या मज नंदनातें २७
केला अगस्त्याख्य महर्षि तातें ब्रम्ह्याचिया हृष्ट न हर्षितातें
देह स्फुरे ब्रम्ह महातपा तें पी हालवीनाच पहात पातें २८
सखा पित्याचा पितृतुल्य रामा झाला वनीं पूज्य जटायुनामा
गोदेसि मातेसि तसेंचि पाहे पर्णालयीं पंचवटींत राहे २९
गळां पडे शूर्पणखा परातें पाहे वराया पण स्वापरातें
तो मद्गुणाचा वरि ना करंडा प्रहृष्ट[++] दंडें करि नाक[3] रंडा ३०
सौमित्रि खड्गें हरि कर्णनासा ज्याच्या करीतो गुणवर्णना सा[4]
पावेल त्या केविं तसी कुशीला[5] पुण्यें नयेनां क्षितिच्या कुशीला
खरा ससैन्या हननार्थ धाडी लीळेकरूनि प्रभु त्यासि ताडी
छेदी शिरें सर्व परोर[6] फाडी सेना जनस्थानहि ओस पाडी ३२
स्वदुर्गुणें पावुनि ताप भावा दशानना ती कथि पाप-भावा
स्त्रीरत्न घे होउनि निःस्व[+] साहो न शोक वैरी मुदिता स्वसा[7] हो ३३
मारीच मायामृग शत्रु दावी श्री त्यासि हेमाकृति सत्य भावी.
मागे धराया दयितासि लावी मनुष्यलीला प्रभुचीच गावी ३४
मर्मीं तयातें शर राम हाणी तों तों खळ श्रीरमणीचि[+] वाणी
हाहा असी नार्तरार्त[8] वाणी बोले भ्रमें श्री न जसी शहाणी
सौमित्रितें भावुनि घात भीता धांवें म्हणे पत्यवनार्थ[9] सीता
तो जाणवी सत्य भला शमाया तत्त्रास हे देवि पलाश-माया[10]

---

१ निर्भयपणानें. २ नंदनवना. ३ स्वर्ग. ४ सहाशास्त्रें. ५ दुश्स्वभावाची. ६ पर-उर- शत्रूचें वक्षस्थळ. ७ बहीण. ८ नार-तर- आर्त- अतिउच्च पीडायुक्त. ९ पति- अवन- अर्थ- पतीच्या रक्षणार्थ. १० राक्षसमाया. + श्रीरामाचि सारिखा. + दरिद्री. ++ आनंदयुक्त. ⫶ असाधु-असत्वें- दुष्टांच्या नसणेपणानें.

कोपें म्हणे ती प्रभुनें मरावें पापा तुझा काम मला हरावें
दायाद कीं तूं न चपापशील कौर्यें अघा भी नच पापशील ३७
सांत्वेंहि तापे न सती निवे कीं कोपोदयीं सख तुरें विवेकीं
निघे वदे साधु सहाय शास्त्री रक्षी न रक्षींहि महायशा स्त्री ३८
प्रजावतीनें बहु खिन्न केला आर्या कथाया निजदुःख गेला
तों एकटी श्री उटजांत पाहे रथीं बळें रावण तीस वाहे ३९
हा राम हा लक्ष्मण या शशातें मारूनि रक्षा हरिहो यशातें
हाका अशा ऐकुनि गृध्र कोपे तें यापुढें रावण-तेज लोपें ४०
केलाचि वैरी विरथ क्षणानें देहाचिया कंपित न क्षणानें
सीतेसि भंगोनि रणांत सोडी खड्गें अधर्में मग पक्ष तोडी ४१
पक्ष-क्षयें गृध्रप-यत्न राहे सतीस आंगें खपथांत वाहे
नेतां नगीं वानर पांच पाहे टाकी अलंकार म्हणोनि हा हे ४२
लंकेंत नेवूनि अशोकनामीं ठेवी वनीं तीस न ने स्वधामीं
बंधूक्त दे धैर्य उरों न रामीं म्हणे म्हणों काय तुलाहि वामी ४३
बोले कुटी पाहुनि ओस हाय जो दे मुमुक्षूंप्रति ओ सहाय
तो दाखवी ताप विलाप रानीं जाणों खरा तापविला परानीं ४४
पाहे तशा तातसखा दशेस्था पुसे असी कां घडली अवस्था
शोची निवेदूनि परा सुनेतें जें धैर्य होऊनि परासु नेतें ४५
अस्वास्थ्य निःसीम तथापि त्याची धरूनि तो साधुपथा पित्याची
तसी क्रिया सांग करी रमेला रक्षूनि चिंतूनि शरीर मेला ४६
बहूग्र काळाहि परीस खाया धरी कृपासिंधु करीसखा यो
म्हणे समर्पून विमान साजें दे ज्ञान मानें कबिमानसा जें ४७

---

१ भिसील. २ विवेकें. ३ अविवेकें. ४ बंधुस्त्रीनें. ५ तापल्यानें. ६ पर्वतीं. ७ कामरावणानीं. ८ हरिता झाला. ९ कबंधा. + अरण्यामध्येंर हाणाऱ्या भशा: ++ अस्वस्थता.

तो शक्रसा भास्वररूप सीता- विश्लेष- दीन- स्मर- बाण- भीता
सांगे पहा जा शबरीस आधीं कीशा सुकंठा मग कार्य साधीं ४८
भेटोनि आधीं शबरीस उक्ति प्राशूनि दे मुक्तिद तीस मुक्ति
श्रीराम सेवूनि मुहूर्त पंपा स्त्रैणत्व दावी शिखूनि कंपा ४९
प्रार्थी तया लक्ष्मण एक आर्या धैर्यें प्रयत्नें करिसील कार्या
विलाप तेजोहर हा रहावा सुग्रीव आधीं प्रभुनें पहावा ५०
हितावह स्वाऽनुज- बोध तो घे त्या ऋष्यमूकाप्रति जाति दोघे
सुग्रीव भी पाहुनि चापपाणी वालीष्ट ऐसें हृदयांत आणी ५१
धाडी पुढें वातसुता स्वयोधा त्याच्या कराया मति- शक्ति- शोधा
भेटे तया तापस- वेष- धारी तरे स्वयें त्या सुगळाहि तारी ५२
सुग्रीव- रामांत हि सख्य होय क्षीर प्रभु स्वच्छ सुकंठ तोय
तो देव्यलंकार सवस्त्र दावी त्यांतें प्रभु क्लेश- निमग्न भावी ५३
पुसे प्रियेचे नग काय बा हे भ्राता म्हणे नूपुर- युग्म बाहे
आर्या- पदाब्ज- द्वय नेंधि आहे साश्रु प्रभु श्रीविरहा नसाहे ५४
सुग्रीव बोले जरि मी वियोगी वाळी बळें मद्दयितेसि भोगी
न हा म्हणे धैर्य धरूनि आहें कधींहि तूं कां त्यजितोसि बा हें
म्हणे नको हा मज पावशील त्याशूं नको बा प्रिय पावशील
भेटेल यत्नें तुज तूर्ण आर्या करीन मी या प्रिय- मित्र- कार्या ५६
पुसे प्रभु स्वाऽग्रजही अराती कां हे कथा तोहि सविस्तरा ती
सांगे बिळीं दैत्य वधार्थ गेला वा हा बिळद्वारप बंधु केला ५७
द्रोनों तया सेवित मी बिळाला वर्षेंहि वाळी न मला मिळाला
शिळा बिळीं देवुनि साश्रु आलों मंत्र्याग्रहानें कपिराज झालों ५८
ये शत्रु मारूनि मला न साहे शिळा- बिळीं द्वेप मनांत वाहे
फोडी मुठीनेंहि महोपळाला म्हणे वधावेंचि तया खलाला ५९

---

१ सीतेच्या विरहानें पेटलेला जो काम त्याला भ्यालेल्यास. २ महा- उपळ- मोठ्या पाषाणाला. + वालि- इष्ट- वाळीचा प्रिय. ≠ देवि- अलंकार- सीतेचे अलंकार.

मातें विलोकीं स्वपदीं नसाहे तत्सांत्वनाला न उपाय राहे
दंडी प्रधानासि मलाहि पाहे मारूं कथा तों इतुकीच बाहे ६०
या ऋष्यमूकींच मतंग-शापें आहें सुखी तत्सुतपःप्रतापें
मरेल तेथें शिरतांचि वाळी म्हणोनि तो या अचळासि वाळी ६१
स्थानीं घडो मृत्यु म्हणे तुला या कीं हा झुगारी असुरां लुलाया[2]
शुद्धाश्रमा दूषिति रक्तबिंदु ज्ञाता नशापू मग कां न निंदु
श्रीराम बोले वधितों खळाला वाळी न वांचेल जरी पळाला
तत्सत्य या दारवधितां बळाला वैरी गमे काळमुखीं गळाला ६३
एकेंचि बाणें हृदयांत ताडी श्रीराम वाळीस पळांत पाडी
दे बंधुचें राज्य कळत्र[3] मित्रा गातात कृत्या कवि या विचित्रा ६४
देवांशा कीशार्क्ष असंख्य आणी म्हणे प्रभूची अतितूर्ण राणी
शोधूनि मासांतचि याचि वाणी विलंघितां हे नचुकेल प्राणी
जो दक्षिणेला युवराज गेला तेणें ससैन्यें बहु शोध केला
न नाथदत्तावधि मास राहे काळा करूं पाहति आसरा हे ६६
जटायुचा अग्रज गृध्र शोध प्रेमें कथी हर्षवि सर्व योध
लंघी मरुन्नंदन सिंधु गावें शत क्षणें तद्यश भव्य गावें[4] ६७
मैनाक ये आश्रय यास देया बा पावला स्पर्शुनि हें वदे या
वंचूनि हर्षी सुरसेसि घाली ती सिंहिकाही गिळितां निमाली
शोधूनि लंकेंत वनीं अशोकीं पाहोनि मी धन्य म्हणे त्रिलोकीं
प्रार्थी कुधी रावि तयासि शापी माध्वी तिची सूक्ति-महासुधा पी
चिंती मनीं दुष्टलयार्थ रुद्रा जातां कुधी दे तिस नाथ-मुद्रा
सांगे शिव श्राव्य[5] चरित्र पूता संदेश[6] चूडामणि दे स्वदूता ७०
वंदूनि सीतेसि पुसोनि भावें मोडी वन द्वेषि बळप्रभावें

---

१ वर्जी. २ रेड्या. ३ स्त्री. ४ वर्णावें. ५ श्रवणकरण्यास योग्य. ६ निरोप. + मला.

परासु होतां सुत अक्ष रुष्टें आज्ञापिला ज्येष्ठ कुमार दुष्टें ७१
ब्रम्हास्त्र योजी घननाद मानी त्या सांपडे अस्त्रवरास मानी
बांधूनि नेला अरिनीं सभेला तो कौतुकी न प्रकटी प्रभेला ७२
म्हणे पचेना प्रभु-रत्न चोरा रे कोपथावें भुजगें न मोरा
सामें जगीं होसिल फार गोरा सद्धार्य मुक्तांत सिरोनि दोरा ७३
तो आटिव त्र्यंबक-चाप लाजे मना निवारीं वश चापला जें
सुधा- घटाच्या नुकरीं बुडाला रे उद्धतत्वें खर कीं बुडाला ७४
ये राक्षसांच्या बहु राग राया पाहे वधाया बळसागरा या
बिभीषण प्रांजळि पूत भावा वारी स्वयें वर्णुनि दूत- भावा ७५
म्हणे कुधी दीस करूनि पुच्छा सोडा पुरींत भ्रमवूनि तुच्छा
तैसीच चेष्टा करिती पलाश क्षोभे उडे जो तपनीं फलाश ७६
बिभीषणाचें गृह मात्र रक्षी पुच्छाग्नि लंकानगरीस भक्षी
नभीं गमे मारुति तार्क्ष्य पक्षी कांपे न या राक्षस सर्प लक्षी ७७
पुच्छाग्नि सिंधूंत करूनि शांत ध्यानांत आणूनि विभूति कांत
करी पुन्हा गोष्पद अर्णवातें संपूजिला तन्मुख-वर्ण वातें ७८
प्रेमें नमी ऋक्षवरासि आधीं तो त्या म्हणे कीर्ति असीच साधीं
मानी तया स्वासुपकार भारी म्हणे फिटेना उपकार भारी ७९
करी सुखी तें बळ संगदानें सत्कारिला वर्णुनि अंगदानें
वंदूनि चूडामणि दे प्रभूतें भेटे महें तो कपिला प्रभूतें ८०
निघे प्रियेच्या प्रभु हा निरोपें करावया दिङ्मुख-हानि रोपें
पयोधि-तीरा रघुराज पावे यत्पाद-पद्म द्रुहिणें जपावे ८१
देऊनि साध्वी व्यसनीं तरावें आर्य स्मराच्या न भरीं भरावें .

---

१ कुद्धें. २ अभिमानी. ३ सन्मानीं. ४ नळाला. ५ दूतपणाला. ६ मांसभक्षक, राक्षस. ७ सूर्याचे ठाई. ८ स्व-असु-उपकार-आपल्या प्राणावर उपकार. ९ अतिशय. १० उत्सवें. ११ राम. १२ पुष्कळें (महें या शब्दाचें विशेषण) १३ बाणें. १४ ब्रम्हदेवें. + सत्- धार्य- साधूनीं धारण करण्यास योग्य असा. ++ फल असी इच्छा धरणारा.

वळें विष प्राशन कां करावें सर्वस्व होतें अनर्थे परावें ८२
एकेंचि केला पुर-दाह दूतें झालींच सैन्यें परि पूर्वभूतें
बा साम जैसें अघ गांग धूतें नमूनि अर्पी प्रभुच्या वधूतें ८३
म्हणे असें सांगुनि जो नमो त्या बोधा नघे अंध जसा न मोला
धिक्कारुनि क्रव्यभुगीश बोले जें तें दिशांसीच सभेंत तोले ८४
बिभीषण प्राज्ञ निघे अरण्या दयावृता त्यागुनि त्या शरण्या
श्रीशा नमी श्री-गळ-निष्क लंका तया समर्पी नति निष्कलंका ८५
महाम्बु-तेजें बहु ताप पेटे श्रीशासि तेव्हां जलराशि भेटे
तत्प्रार्थनें तो जगदिष्ट-हेतु श्रीराम निर्मी वचनेंचि सेतु ८६
श्रीस प्रभूचें धनु शीर्ष दावी हाहा म्हणाया खळ तीस लावी
बिभीषणा-स्त्री सरमा निवारी माया असें सांगुनि खेद भारी
त्या सेतुमार्गे उतरोनि पारा पावे महा-कीश-समूह सारा
चढे सुवेळीं प्रभु दुर्ग पाहे सुग्रीव वैरी दिसतां नसाहे ८८
उडोनि गांठूनि खळासि ताडी त्यातें तयाच्या मुकुटाहि पाडी
सामार्थ राम प्रभु दूत धाडी तो शत्रुतें मान हरूनि नाडी ८९
सभेंत राजा पर-भंगदातें सामान्य हें मानुनि अंगदातें
चौघांसि सांगे धरवी रयज्ञा उडे करी हा पर-वीर-यज्ञा ९०
स्वामी म्हणे त्या जरि काम सामीं नसे नसो मारिन तामसा मी
हो हेत जो यूथप हो मनाचा करा सुखें राक्षस-होम नाचा ९१
आज्ञेसि माथा बहु मानवे ये दुर्गी चमू सिंधुगमान वेघे
आरंभिती ते पर-मारणातें हर्षे करीती परमा रणातें ९२
निघे स्वयें रावण उद्धतत्वें न वर्णवे अद्भुत युद्धतत्वें
रणांगणीं रक्त-नद्या वहाती कबंध-नृत्यें अमरी पहाती ९३
प्रहस्त सेनापति मुख्य मेला रामें लयातें बहु वीर नेला

१ गंगोदक. २ लक्ष्मीच्या गळ्यांतील पदक. ३ वेषज्ञा.

भंगोनि दिङ्कंठ फिरोनि गेला तथापि कांहीं न विचार केला९४
दे मेघनाद त्रिदशांसि दैन्य ध्वंसूनि सारें कपि-वीर-सैन्य
तो नागपाशें प्रभुलाहि बांधी श्रीची न मोहांत बुडेल कां धी९५
दे स्वावनाचें यश पक्षिपातें त्याच्या पळाले अहि अक्षिपातें
होतां हरि स्वस्थ ससेन माया सोडूनि येती न ससे नमाया
तो कुंभकर्णासि करूनि जागा म्हणे वधीं ते नर कीशजागा
भासे कर्णाला निज काळ साचा न त्याग केला जरि आळसाचा
धरी मुकुंदासि बळी नसोडी सुटोनि तन्नाक सकर्ण तोडी
फिरे गिळी तो सगळेचि कीश छेदी तदंगें प्रभु जानकीश
श्रीराम-सौमित्रि ससैन्य यत्नें शल्यार्त केले समरीं सपत्नें
मेघध्वनें योजुनि अस्त्रमाया लोकेश पावोनि भय भ्रमाया ९९
ऋक्षाधिराजें हितबोध केला अक्षघ्न कैलास-समीप गेला
घेऊनि औषध्यग-शृंग आला जीवातु रामप्रमुखांसि झाला१००
सांगे पित्यातें रथ दिव्य होमीं निर्मूनि वैरी वधितों अहो मी
पुन्हाहि तो प्राज्यमद भ्रमाया सारे करी शत्रु अदभ्र माया१०१
मायामयी श्री समरांत दावी मारी म्हणाया वंत हंत लावी
बिभीषणें तो भ्रम दूर केला सौमित्रिनें शत्रु लयासि नेला१०२
पावे सुतानें दशकंठ तापा घे खड्ग चिंतूनि मनांत पापा
सीता-वधा जाय महोग्रकर्मा ती भी स्मरे रामपदा स्वधर्मा१०३
सुज्ञें सुपार्श्वें जरि भंगदायी तो वारिला बोधुनि आततायी
शची म्हणे तद्वृत शुद्ध बाई स्त्री काय या हा खळ खाय गाई
धाडी वधाया बहुकोटि सेना जय स्वनेत्रांसि जरी दिसेना
रामें त्रिनेत्रें तसि लोळवीली काळाकडे सांखुनि बोळवीली१०५

१ देवांसि. २ वांचण्याचें औषध. ३ पुष्कळ. ४ खेदार्थी अव्ययें.

तो हा म्हणे राक्षस-दारदैन्यें स्वयें निघे घेउनि सर्व सैन्यें
कल्पांत तैसें भय देवसेना तयापुढें तीः जसि देव-सेना १०६
तो शक्तिनें लक्ष्मण-वक्ष भेदी त्या राम भंगी जरि होय खेदी
केला पुन्हा सावध ओखदानें त्याचि क्षणें श्रीपति तोखदानें १०७
सारूनि अन्योन्य-बळासि दूर श्रीराम दिक्कंधर रक्त-पूर
युद्धांगणीं वाहविती प्रचूर क्षोणीतळीं भासति दोन सूर १०८
हे ष्ठा रथीं भूवरि नाथ पाहे युद्धांत देवेश्वर तें नसाहे
प्रेर्षी निज स्यंदन सूत तूर्ण स्वामी तयाचा करि काम पूर्ण १०९
ते युद्ध अत्यद्भुत साठ यामं श्रुत्यून वीरेंद्र दशास्य राम
अजस्र-कोपें करिती न शस्त्रें रक्तार्द्रही भग्न कुलीन अस्त्रें ११०
शिरें शत च्छेदुनि राम पाडी मर्मीं शरांहीं जरि फार ताडी
तरी विराजे दश-मस्तकांहीं दिक्कंठ लाजे प्रभुहस्त कांहीं १११
भेटे अगस्त्याख्य महातपा या आदित्य-हृत्स्तोत्र कथी जपाया
दे दर्शन क्षिप्र जपावसानीं बहीस तो हर्ष न पावमानीं ११२
श्री-भास्कर-प्राप्त-महावरानें ब्रम्हास्त्र योजूनि महाशरानें
भेदूनि वक्ष प्रभु त्या अशास्या करि व्यसु क्रूरतमा दशास्या ११३
जय-स्वनें स्वस्तरु-पुष्प-वर्षे दत्ताभया पूजिति देव हर्षे
गंधर्व गानें अमरीहि नृत्यें वर्णूनि देवर्षि उदार कृत्यें ११४
क्रिया तयाची करवूनि रामें बिभीषणाला पद पूर्णकामें
सौमित्रिला सांगुनि देववीलें छत्रादि सल्लक्षण सेववीलें ११५
शुद्ध स्तवा दिव्य करूनि देवी मग प्रभूत्संगपदासि सेवी
भेटे पिता जे समरांत मेले जीवंत शक्रें कपि ऋक्ष केले ११६
लंकेंत सुग्रीव ससैन्य नेला बिभीषणें पूजुनि हृष्ट केला

---

१ सूर्य. २ रथ. ३ सत्वर. ४ प्रहर. ५ श्रुनि-उन-वेदाहूनउणें. ६ मोरास. ७ शासन करण्यास अयोग्य अंशा. ८ अग्निप्रवेश. ९ प्रभु-उत्संग-पद-रामाचें मांडीरूपजेंपद (स्थान) त्यासि.

श्रीपुष्पकें श्रीश पुरासि आला प्रमोद भारी भरतासि झाला११७
न त्या महोला त्रिजगांत जोडा असे समाधींत परंतु थोडा
अन्योन्य योगी म्हणते नसोडा दुराग्रहें हे जनहो न खोडा११८
राज्याभिषेक प्रभुनें विधीनें स्वीकारिला सांग दयानिधीनें
तें फार सिंहासन शोभवीलें यशोमृतें विष्टप लोभवीलें११९
काळा वदे होउनि राम राजा म्हणे जनातें नरवरा मराजा
करी प्रजा भाउनि रंजनातें मानी प्रजा भाउ निरंजनातें१२०
पूजी स्वयें त्या स्वजना कपीना सुधा यशा सोडुनि नाक पीना
मरुत्सुता राघव दे वरा ज्या ये ऐकतां लाघव देवराजा १२१
चोघांस झाले सुत आठ वाहे त्यां राम सुश्रीस्तुत आदवा हे
दे सर्व सेवापर मागती तें राम प्रजा ने परमा गतीतें १२२
सङ्क्षिप्तरामायण हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणीं प्रेमें वाहिलें कृतवंदनें १२३

समाप्त.

## हनुमद्रामायणप्रारंभ.*

श्रीमारुतिची माता कीर्ति जगीं अंजना भली लाहे
सत्पुत्र मुखें मर्वी श्री-रघुपति-कंजनाभ-लीला हे १
चरण-नता आलिंगी हुंगी माथां न ऋफ्फ राहूनीं
युद्धींहि पुत्र हर्षे पाहे मुख रम्य पुष्करांहूनीं २
त्यासि पुसे सांग मला प्राप्त तुला परम हर्ष वत्सा जो
त्वत्-कुशळ-वृत्त मातें निववुनि वा अमृत-वर्षवत् साजो ३

१ उत्सवाच्या. २ जगत. ३ स्वर्ग. ४ कमलाहूनि.
* हनुमंतानें आपल्या आईला सांगीतलें म्हणून याचें नाव हनुमद्रामायण.

मारुति म्हणे रमापति दशमुख-हननार्थ जाहला नरसा
सुरसिक कवि तत्कयशा सेविति इच्छिति सुरांचिया न रसा४
प्रभु रूपें चार धरी दशरथदारोदरीं जननि राम
जेष्ठा कौशल्येच्या पुत्राचें अमृत-गर्व-हर नाम ५
कैकेयी पुत्र भरत तनुज सुमित्रा सुकुक्षि भव दोन
ते लक्ष्मण शत्रुघ्न न निवति सुकवि यद्गुणांसि न वदोन ६
ने राम-लक्ष्मणातें गाधिज व्हाया निजाऽध्वर-त्राण
प्राण हरि ताटकेचे प्रभु एकचि सोडुनि प्रखर बाण ७
शत अस्त्रें मुनि शिकवी रक्षी तन्मख पलाश मारूनी
तारूनि अहल्येतें यश घे तत्ताप शाप वारूनी ८
जनकाचा पण पुरवी त्र्यंबक-कोदंड-दंड मोडूनी
सानुज होय ख्यात प्रभु चवघी तत्क ताहि जोडूनी ९
भूमि-सुता श्रीसीता वरिली रामें रघूत्तमें स्वरतें
शत्रुघ्नें श्रुतकीर्ति प्रेमें सद्बुद्धि मांडवी भरतें १०
लक्ष्मणाहि ऊर्मिलेतें स्वीकारी कवि जसा सुनीतीतें
जी हे चतुर्विवाही गाती देवर्षि-मुख मुनी तीतें ११
प्रभु दे भृगुरामातें शांति म्हणे उग्रता नसे उचिता
तो वदला उचितज्ञा तुज न लवुनि मूढ कां नसेउ चिता
दुर्बुद्धि मंथरेतें शिकवुनि शक्रादि देव आर्य पर
कैकेयीच्या मतितें दूषविति दशास्य-हनन-कार्य-पर १३
ती स्व-वर पतिस मागे राम चतुर्दशसमा वनीं राहो
द्या हो हें मज भरतचि अभिषेका पात्र निश्चयें हा हो१४
पितृ-सत्य-पालना प्रभु कैकेयीचें न चित्त मोडून

---

१ अमृता. २ मांसभक्षक (राक्षस) ३ चार विवाहांचा समुदाय. ४ परंतु. ५ चवदा वर्षें. + चतुर्विवाहीतें. ‡ प्रेत दहन करण्यास काष्ठांची रचना विशेष करिताततीं.

जोडून स्व-गुरु-जना हस्त निघे त्रिपुरासि सोडून १५
सीता-लक्ष्मण-युक्त प्रभु आला चित्रकूट-शिखरीतें
मातें ज्याचें नाम स्मरतावरि अमृत नित्य विखरीतें १६
दशरथ राजा पावे हत्प्रिय-शोकें म्हणोनि हा निधना
केवळ लुब्ध जन जसा घडतां दैवेंकरूनि हानि धना १७
भरत रडे मातेचा तो स्नेहहि पातला पर तवाया
ये शरण चरण नमुनि प्राणप्रिय आपला परतवाया १८
भरत म्हणे म्हणतीलचि कैकेयी-तोक विप्र पापरत
श्रीरामा चालवितां जो धार्मिक तो कवि प्रपा परत १९
त्या प्रभु म्हणे करावें सत्य तुवां म्याहि बा जनक-वचन
म्हणती यापरि रक्षक पवित्रें ही जाणते जन कवच न २०
सत्यवचन येईनचि मी बा सरतांचि वर्ष चवदावें
तों राज्य करीं वत्सा जें यश तें अमृत-वर्षच वदावें २१
वदला भरत नघडतां हें होमिन पावकांत देहातें
जातों राज्य कराया आपुलिया पादुकाचि दे हातें २२
निज पादुका समर्पुनि भरत फिरविला पुरीं न शिरला गे
दंडक-गहनीं प्रभुचें अत्र्यादि-द्विजपदासि शिर लागे २३
श्रीसीतेसि हेरी दे अत्युग्र विराध अंजने त्रास
तो मारुनि उद्धरिला तुंबरु बहु गाय कंजनेत्रास २४
देउनि अस्त्रें त्याचीं स्वयशातें प्रभुवरा घटज गाया
निववी प्रथरा स्वच्छा स्वच्छाया करुनि जो वट जगा या २५
प्रभु-सख गृध्र जटायु प्रभुनें वंदूनि विनविला साचा
केला वर-प्रसादें प्रासादप्रवर शिव-विलासाचा २६

---

१ दवाया. २ दंडकवनीं. ३ हरणकरी. ४ हेमाते. ५ उत्तमा.
:+: मागें फिरवाया. + धर्मपोष.

गोदावरी-तटीं जी पंचवटी तींत रचुनि दल+शाला
वसतां शूर्पणखा ये त्या प्याया* अमृत-पूर्ण-कलशाला २७
प्रभु-संग-पुरोडाशा यांछी ती रावण-स्वसा कुतरी
लक्ष्मण-करवाळ तिच्या कर्ण-घ्राणासि तत्क्षणीं उतरी २८
तीचा भ्राता क्रोधें ओंठ मणगटें खळेश खर चावे
चवदा हजार राक्षस आणी प्रभु-बाण म्हणति खरचावे २९
प्रभुच्या प्रखर-शरांहीं सकटक तत्काळ खर खरचला गे‖
माते दशकंठ-मनीं या भंगें फार खरखरच लागे ३०
कपट-कनक-मृग दावी सीतेच्या मतिस दृष्टिस भ्रमवी
रमवी प्रिय ती प्रभुला धाडूनि धरावया वनीं श्रमवी ३१
त्या मायाहरिणोरीं[1] प्रभु-बाण प्राणहर जसा लागे
हा सीते हा लक्ष्मण ऐसें तो आर्त रामसा गोगे[2] ३२
पति पीडित मानुनि भी श्री प्रार्थी देवरास रक्षाया
तो हांसे कपट म्हणे कीं प्रभुचें तेज विदित दक्षा या ३३
शोकें क्रोधें भक्ता भलतेंचि वदे न वदे अभय दवडी
तोंचि तितें दुष्ट हरी** [3]मुक्ताचि भ्रांत-दृष्टिला कवडी ३४
जरि तो मदांध रावण काय करावें म्हणे जड-गिधानें
रथ भंगुनि सोडविली परिसून जटायुनें बळ-निधानें ३५
खड्गें पक्ष छेदुनि गेला खळ जानकीस वाहून
ती [4]ऋष्यमूक-गोत्रीं नग टाकी पांच[5] कोश पाहून ३६
लंकेंत अशोकवनीं ठेवी मृदु न करि तो पलाश मन
सीता म्हणे प्रसन्नहि खळ अहितचि हितचि कोपला शमन[6]
भेटे वनांत लक्ष्मण वृत्त कथी प्रभुसि हाय तें वदवी

---

१ मया-हरिण-उर- मायामयहरिण्याच्या वक्षस्थळीं. २ ओरडे.
३ मोतींच. ४ नामविशेषपर्वतत्याच्याठाई ५ वानर. ६ यम.
७ वृत्त. + पर्णकुटी. * प्राशनकराया. ** हरणकरी. ‖ अगे.

धावुनि येतां उटजा झाली बहुदूर दुस्तरा पदवी ३८
प्रभु हा वदे नदिसतां उटजीं बाहिरहि ती अनादि-सती
दोघेही दाशरथी हृतधनसे शोधितां घना दिसती ३९
मूर्छित जटायु पाहुनि हा तात म्हणोनि ते गळां पडले
रडले वदले आम्हां शोकद पर-घात सर्वथा घडले ४०
तो कथि पक्ष-च्छेदुनि रक्ष उडविलें दशाननें त्या तें
राहुसि अमृत वरिल कां सहसुसि असी दशा न नेत्यातें ४१
प्रभु उत्तर-कार्य करी सुतसा स्वजना कदापि नविसंबे
[1]स्तंबेरमासि धांवुनि करुणार्णव हाचि दे सुगति अंबे ४२
[2]स्वकेलत्र प्रभु [3]गेहनीं तेविं जसें परम तृषित पय शोधी
जो सफळ करी दावुनि मुक्तिप्रद चरण ऋषि-तप-यशो-धी ४३
योजनबाहु भयंकर खाया या सानुजा धरि कबंध
त्याचा हरितां त्या न [4]श्रमहर बहु होय यां वरिक बंध ४४
ऐकोनि कबंध-मुखें शबरीच्या परम-श्रद्ध-रीतीतें
दर्शन देउनि घेउनि पूजुनि करुणाब्धि उद्धरी तीतें ४५
पंपा-तीरीं मोते प्रभु-हृदयीं विरह-ताप बहु मोते
मुनि जाणति महिमा ते प्रभुचि नच विलाप परमनीं मांते
शस्त्रीं दूरुनि पाहे सुगळ बहु त्रास तन्मनीं दाटे
वाळीनें पाठविले तापस-वेषें वधार्थ हें वाटे ४७
शोधार्थ मला धाडी द्विजवेषें म्या विचारिलें आर्य
वल्क-जटा-धर शस्त्री कोण तुम्हीं काय या वनीं कार्य
आर्य-प्रेरित लक्ष्मण सांगुनि निजवृत्त तो वदे बा हे
आम्हीं सुगळा आलों शरण असें कार्य आमुचें आहे ४९

---

१ गजेंद्रासि. २ आपलीस्त्री. ३ अरण्यांत. ४ रामास. ५ हे आइ. ६ माजे. ७ सामावते. + हेमाते.

सुगळा भेटविले म्या पृष्ठीं वाहोनि ऋष्यमूक-नगीं
प्रभुनें सख्य करुनि तो केला सुग्रीव धन्य धन्य जगीं ५०
दावी नंग सुगळ पुसे प्रभु वत्सा सांग हे तिचे काय
हीं तीचि नूपुरें जों सौमित्रि प्रभुहि तों म्हणे हाय ५१
प्रभु बळ कळवी अनुज- प्रिय-दार-रता वधूनि वाळीतें
तद्राज्य श्री स्त्रीही देउनि जननि स्वमित्र पाळी तें ५२
मेळवि सुगळ कपि बळें सीता-शोधार्थ पाठवी योध
धुंडाळितां दिशात्रय कोणालाही नलागला शोध ५३
अग्रज जटायुचा जो सांगे तो शोध साधु संपाती
लंकेंत अशोकवनीं दिसती म्हणती असूंस संपा ती ५४
दे वृद्ध जांबवान् मज करुनि स्तव कथुनि शक्ति-उत्साहा
त्वद्गुण्यें प्रभुतेजें दुर्घट कर्मीं बरी न कुत्सा हा ५५
म्या उडतां रंजविलें मैनाका त्याहि नागमातेतें
प्रभु-चरणाचि यश देती जे निगमा वंद्य आगमा ते तें ५६
मज सिंहिका समुद्रीं माते छाया धरूनि आकर्षी
उदरीं शिरोनि वधिली तेव्हां होय प्रसन्न नाकर्षी ५७
शिरतां पुरीं प्रदोषीं मजसीं लंकाधिदेवता कलहा
बळ-हानि व्हावया करि हा म्हणवी तीस जरि नव्हे खळ हा ५८
शिरलों पुरींत मग मी प्रकटुनि होतां प्रवृत्त सांज रयो
किति लक्षुनिहि न लक्षिति लघुदेहा म्हणति मूढ मांजर यो
माते पुर तें पुरतें द्विषदंतःपुरहि सर्व धुंडाळी
शत्रूष्णीष स्पर्शा योग्य म्हणुनियांचि हा न गुंडाळी ६०
झालों साधि न देवी आढळतां शोक फार मनि केला

१ अलंकार. २ हे लक्ष्मणा. ३ वडील बंधु (संपाति) तो. ४ मी. ५ वेगा. ६ मला. ७ शत्रु-उष्णीष- शत्रूचें पागोटें.
+ हे अंजने. ‡ सायंकाळीं.

मी शेवटीं पहाया मातें गेलों अशोक- वनिकेला ६१
श्री राक्षसींत भाग्यें देखिलि वृक्षीं हळूच वेधोंन
त्सत्कृत तद्दर्शन तिळ तुळित्यांसि न चातकोन मेघोंन ६२
श्रीहृग्गंगेंत कठिन तो राहे का न नीच कोरा तें
तद्दर्शन मज जेसें शशि-दर्शन काननीं चकोरातें ६३
तों ये दुष्ट कसा तत्- दुर्वाग्व्यापार तुज कथावा गे
सति या त्वदपत्य-मुखीं जी श्रुतिसी तीच शुचि कथा वागे
धर्म-न्याय-मयी ती आर्या तेजें वदे असी वाणी
लागे त्या खळ-हृदया तिळहि धृति धरूं न दे असीवाणी ६५
दासीस कथि अवश्यचि हेहठसोडुनि वदोनमासमज
स्वहितार्थम्हणा घामग मासइच्छेंपरिन दोनमासमज ६६
ऐसें बोले दापी खाया गो- ब्राम्हणांसि जो कापी
जाय क्षोभुनि पापी त्यातें तूं भस्म हो असें शापी ६७
मरनांदेताझालों दशरथमहिपादयामतिसमुद्रा
वर्णुनिमीश्रीराम स्वामीसहिपादयामतिसमुद्रा ६८
झाली बहु प्रसन्ना मजवरि न दुजी असी महा सदया
प्रभुला निरोप सांगे विश्वा व्हाया असीम हासद या ६९
सर्व कुशल वृत्त पुसे दे चूडामणि निरोप परमाशी
मम तनु निघे मति नुठे न सिता त्यजि लब्धवृत्ति परि माशी
उपवन अरि-बळ खळ-सुत अक्ष मथुनि मी बळेंचि सांपडलों
घननाद-ब्रम्हास्त्रा परिसि जननि संकटांत कां पडलों ७१
प्रभु-बळ कळउनि वळउनि हित-बोधें दुष्टधीहि रक्षावा
लक्षावा न कुडें काळें गृध्रादिकीं न भक्षावा ७२

---

१ चातक-ऊन-चातकाहूनउणा. २ सुका. ( नभिजलेला ) ३ खड्गापरि. ४ परम- आशि- उत्कृष्ट आशीर्वाद. ५ शर्करा. ६ ऐक. ७ हेमाते. + सीता. ∴ चढोन. ≠ मेघाहूनउणा. ‡ हास्यदेणारा. ⊕ परंतु.

चांपुनि नेलों गेलों शत्रुजबळ अपयशों न मळलों मीं
तुझिया धन्यें स्तन्यें मातें माझ्या पवीड्य बळ रोमीं ७३
यशलों हित परि नयलें खवळे धवळेतरप्रकृति खळ तो
वळतें असतां आयु प्राणी सरतांचि शलभसा जळतो ७४
मातें मज माराया उपशी दशमुख सभेंत करवाळ,
तदनुज साधु बिभीषण वारी त्या करुनि यत्न अरवाळ ७५
मी शल्याऽस्याऽवध्य त्वत्पुण्यें म्हणुनि ये मला हास्य
आस्य प्रेक्षीं न रिपु क्रोध मनीं लोचनीं करी लास्य ७६
मद्दुर्दशार्थ करवी माझ्या दशकंठ दीप्त पुच्छातें
लंका जाळुनि दिधलें दुष्कृत-फळ त्या अतीव तुच्छातें ७७
माझें श्रीचें रक्षण तटकारुनि पावकास तो करवी
ज्या प्रभु-पद-प्रतापा म्हणतो बा मी त्वदीय तोक रवी ७८
विझवुनि पुच्छ समुद्रीं वंदुनि देवीस जननि शतगावें
जलधि उडुनि मी आलों या कर्मी अन्य तेज न तगावें ७९
ध्याना नामा प्रभुच्या हा न विसरलाचि अंजने त्याला
चूडामणि दे सांगे कुशळसमाचार अंजनेचा त्या ८०
प्रभु करि वर-प्रसादा चरणीं होतांचि नत वतन यातें
आलिंगन वर्णन यरि पाहों दे आइ न तव तनयातें ८१
निवधि मम परिष्वंगें श्रीविरहें करुनि सव्यथोर पण
भक्तीं प्रभुचें अतुळ प्रेम कृतज्ञत्व भव्य थोरपण ८२
प्रभु ऋक्ष-कपि-बळांचे पति सुग्रीवादि वीर बरवे घे
लक्ष्मण वालि-सुतावर मजवर रघुवीर धीरवर वेघे ८३
बहु बळ-समूह पावे जिंकाया सागरासि सागरसा

---

१ पवि-ईड्य-वज्रानें स्तुत. २ केशीं. ३ तलवार. ४ हलका.
५ नृत्य. ६ तुझा. ७ बालक. ८ सुंदरनेत्रा. ९ आलिंगनें.
१० स्व- व्यथ- उर- व्यथायुक्त चित्त ज्याचें असा. + दुग्धें. ++ धवल-
इतर- प्रकृति- शुभ्राहून इतर (काळी, तामस) प्रकृति ज्याची असा.

कन्या-हर-मथना नग धाडी जाणों धरूनि राग रसा ८४
त्यजिलें विभीषणें खळ रघुपति-तेजाचिया मरा लेशें
हें वदुनि प्रभु-पद-युग वरिलें मानस जसें मरालेशें[1] ८५
जें लंका-राज्य प्रभु दे त्या शरणागतासि नमितां तें
हें यश करी नति-स्तुति- रत लज्जित मुदित सतत अमितांतें
भिउनि प्रभु-प्रतापा सागर भेटोनि निवर्वि आगमनीं
गति-हेतु सेतु-युक्ति स्तवुनि कथि प्रभु धरी न ओग[2] मनीं ८७
नळ सेतु रची पांचा दिवसां त्याचीहि अंजने रुंदी
दश-योजन शत-लांबी झाले पाहुनि सुरर्षि ज्या तुंदी[3] ८८
जननि अहोरात्र-त्रय- उतराया त्या पथें बळा लागे
सुगळ सुवेळ-गिरिवरुनि उडुनि नियुद्धीं[4] छळी खळाला गे ८९
वेढुनि लंका प्रभुवर अंगद सामार्थ पाठवी त्यातें
धरवी खळ कपि सुखवी प्रभवादिक[5] पुत्र साठ वीत्यातें[6] ९०
मग युद्ध होय भारी नगणिति कपिवीर आहवायास[7]
राक्षसवीरहि लाथिति रुधिरांचे पूर वाहवायास ९१
मेघरव त्रमश्रु पिळी सबळ प्रभु शरघनें रणांत खिळी
रावितें मोह गिळी पाडी उत्साहशक्ति शत्रु शिळी ९२
जांबव-दुक्तें हर-गिरि-सरव ओषधिनग तदीय-शिखरा या
हस्तें घेउनि आलों प्रभु-यश लोकत्रयांत थिरवराया ९३
त्या दिव्योषधि-वातें उठले पात्या नलागतां पातें
ज्यासि न म्हणवे हा तें प्रभुसह बळ सर्व कोंदलें शातें[8] ९४
प्रभु कप्योरखुव्याळा[9] घटकर्णा वज्रभृच्चमूकाळा

---

१ हंसश्रेष्ठें. २ अपराध. ३ दोंदिल. ४ बाहुयुद्धीं. ५ प्रभव, विभव, इत्यादिक. ६ प्रसवणाऱ्या नारदातें. ७ आहव-आयास-युद्धश्रम. ८ सुखें. ९ कपि- आखु- व्याळ- वानररूप उंदिराच्या सर्पा.

कटकें देतां टाळा वधुनि रडवि सकळ-यातु-भूपाळा ९५
कपिवर गाति त्रात्या ज्या घेत्या नाम नागपा[1] शतशा
लक्ष्मण-सहिता बांधी घनरव घालूनि नागपाश तशा ९६
देवीस दुष्ट दावधि दयितासह देवराहि तदवस्था[2]
त्रिजटोपदेश झाला तद्धृदया घन जसा हित दवस्था ९७
केला सानुज राम प्रभु पन्नग-पाशमुक्त खगपीनें
या सद्यशोमृताच्या झालें परितृप्त सर्व जग पानें ९८
मग तो घनरव माया-सीता-वध दाखवी रणीं मातें
येता जरि न बिभीषण तरि असत्प्राण तत्क्षणीं जाते ९९
आम्हां मोहुनि करितो अमरत्व-प्रद-रथार्थ होम महि+तें
कळतां लक्ष्मण वधि त्या तव नाम म्हणे यथार्थ हो महितें १००
शोकाऽमर्षाकुळ खळ घे सीतेतें वधावया असितें[3]
साधु सुपार्श्व निवारी त्या ज्या कर्मे समें सितें असितें १०१
मग खळ बळ बहु धाडी त्यातें प्रभु खर-शर-व्रजें ताडी
मर्द[4]-गद सर्वहि झाडी दोंचि मुहूर्तांत तें रणीं पाडी १०२
ताप खळाहत-रक्षः स्त्री-कोटींच्या तदा विलापानीं
जेविं दिला मरणाश तेविं विषानीं न दाविला पानीं १०३
स्व-मरण-पर-वध-निश्चय करुनि निघे सर्व-शेष-बळसहित
ज्या विषय बाह्यरंगें वाटे जैसा जडासि पळस हित १०४
कमळ-वन क्रुद्ध करी[5] रगडी बळ तेविं उग्र युद्ध करी
कपि वीर मुक्त शिखरी[6] तें पिष्ट करूनि दिगंतरीं विखरी १०५
श्रीमल्लक्ष्मणजीचें वक्षस्थळ शत्रु शक्तिनें फोडी
सोडी उष्ण श्वास प्रभु दशकंठासि तत्क्षणीं मोडी १०६

१ गजेंद्रा. २ वणव्यामधें रहाणाऱ्यास. ३ खड्गातें. ४ गर्वरोग. ५ हस्ति. ६ पर्वत. + पृथ्वीतें.

न्या आणिलें पुन्हा तें शिखर सदौषधि सुधा-सम-रसाचा
स्तव याचाहि प्रभु करि तो अत्यद्भुत बुधा समर साचा१०७
सप्त अहोरात्र प्रभु शतमन्युरथीं बसोनि समर करी
झाले रघुपति-दशमुख- बाणरवें थिमद सर्व अमर- करी१०८
शिर एकैक दहादां दशहि असीं तोडितां तसींच शिरें
जननि नवल तें म्हणती प्रभु-हृदया आधिच्या रसींच शिरे१०९
मंत्र घटज दे प्रभुला त्यानें जपतांचि विजयवरहि रवी
दावी अंतःपक्षा परि अजित मनुष्यरीति वर हिरवी११०
उर भेदुनि अरि वधिला तो ब्रम्हास्त्राभिमंत्रितें बाणें
प्रभुसि करुनि विजयश्री कीर्तिसितेंचीं दिशांसि दे वाणें१११
माते सेवित होते पुष्कळ पीयूष सुरस परि थार
हाचि निवर्थि .शिव-विधि-मन झाले परितृप्त सुर सपरिवार११२
गीत-ध्वनि स्तुति-ध्वनि- वाद्य-ध्वनि-पुष्प-वृष्टि-लक्षा या
नपुरे ब्रम्हांड प्रभु- रुचिसहि शक्रादि-दृष्टि लक्षाया ११३
अग्रज-शोकें माते साधु बिभीषण करूनि आ रडला
दशवदन-स्त्रीजनही शव हृदयासीं धरूनि आरडला११४
रडती स्मरती शोकें मंदोदर्यादि ज्या प्रिया केली
त्यांतें सांत्वुनि सुजनें प्रभु-वचनें उत्तरक्रिया केली११५
अभिषेचिला बिभीषण विधिनें लंकेंत लक्ष्मणें आगें
मग मज म्हणे प्रभूत्तम जा वत्सा विजय देविला सांगें११६
शतदा आर्याहि पुसे म्याही कथिला तिला विजय शतदा
सच्छ्रुतिस तसें तीसहि वाटे प्यावेंचि तें निज यश तदा११७
वदली देय नसे बा त्वां भरिलें अमृत चांगलें कानीं

---

१ माझाहि. २ इंद्ररथीं. ३ मस्तकें. ४ प्रवेशकरीं. ५ कीर्तिशर्करेचीं. ६ अमाय. ७ क्रीडा. ८ द्यावयासयोग्य.

तुजसारिखें श्रमविलें गुर्वर्थ न हृदय आंग लेंकांनीं ११८
वदलों दुष्टा दासी यांतें म्हण मार देवि वरदे हा
वरदे हाय म्हणुनि तूं वदलिस भूमीस दे विवर देहा१९
या महद्वचनें माते श्री कांपे जेवि मारुतें कदली
अबळा अस्वाधीना वत्सा वध्या न या असें वदली २०
वदलों मी आर्येतें तूं प्रभुची साधुरीति मूर्तिमती
त्वद्वात्सल्यें झाली माझी प्राप्त-प्रमोद-पूर्ति मती १२१
लब्धाऽभया त्रिलोकी झाली हे स्त्री नसो असा मान्या
प्रभुला सांगाया श्री साश्रु कथि निरोप ती असा मान्या
ऐकुनि निरोप सांगे श्रीराम विभीषणा सती सरमा
परमा पूजा करि हरि जाणे खळभीषणास तीस रमा१२३
नेली विभीषणें करि दिव्य श्री म्हणवि अंजने हातें
देवर्षिमुखेंकठिन क्षणभरि त्या विश्वरंजनेहातें १२४
अग्न्यादि-ब्रम्हांत स्तविति प्रभुतें नसेचि देवांतें
दशरथहि महाराज स्व-सुत-यशोमृत यथेष्ट सेवी तें१२५
पुत्र-स्नुषांसि भेटुनि भूप निवे बहु न हा निवे नाकीं
द्विजशाप तापवी या घडली येणेंचि हानि वेना कीं १२६
शक्र-कृताऽमृत-वर्षे मृत उठुनि करिति निकाम कपि लास्य
या प्रभु-यशासि वर्णी सदभिमत वरदहि काम कपिलास्य२७
विनवि विभीषण सानुज सबळ प्रभुचें सभाजन कराया
तसि याहि मानवे बहु जसि साधूंची सभा जनकराया२८
प्रभु कथि पूजावा त्वां सबळ सुगळ मत्समान सत्वरतें
दुत घडिव भरत-दर्शन देखाया वत्स मानस त्वरतें २९
पूजुनि सबळ सुकंठा प्रभुसि बसवि दास पुष्पक-विमानीं.

---

१ अप्राप्तसांत्वना. २ नृत्य. ३ पूजन. + विश्व-रंजन-ईह-विश्व रंजविण्याची इच्छा ज्याला त्यागमास. ‼ कपिल-आस्य- कपिलऋषीचें मुख

मधुप-पति घनश्यामा सुरतरुचें वास पुष्प कपि मानी १३०
सबळ सुकंठ बिभीषण घेउनि भेटोनि अवनि-भर तातें
दिधला उतरि दयाघन विसरे जो पळ हि न वनिं भरतातें
पुर-भरत-प्रभु यांचें माते म्या प्रेम काय सांगावें
हंसा न मानसींच्या श्री-साकेतस्थ-वायसां गावें १३२
विश्वा तसा न होय प्रभुला राज्याभिषेक हर्षद या
श्रीराम-घनाची करि नत-मोराउपरि अमृत-वर्ष दया ३३
श्रीनें निजकंठींचा मुक्ता-हार-प्रसाद हा हातें
देतां जें मज्जाड्य प्रलया पावे म्हणोनि हाहा तें १३४
मातें प्रभु-दत्त-वरें लोकीं झालों असें चिरंजीव
प्रभुजवळि सुवर वरिला सुयशें धालों असेंचि रंजीव १३५
सर्वत्र असे स्नेह प्रभुचा मजवरिच परि परम तो कीं
कार्योऽक्षमींहि माते ताताचा जेविं बहु चरम-तोकीं १३६
जननि प्रभु-प्रसादें झालों मी धन्य धन्य मूर्धन्य
स्तन्य तुझें कौसल्या-स्तन्यसम सुत असें नसे अन्य १३७
प्रभु-चरण पाहिले म्या त्वत्पुण्यें तेधवां महालग्न
भग्न भ्रांत न झालों होतों सेवाऽमृत-ह्रदीं मग्न १३८
श्रीराम-भरत-लक्ष्मण-शत्रुघ्नाचे विलोकिले चरण
स्मरण न झालेंचि तुझें तददर्शन तेंचि वाटलें मरण १३९
प्रभुच्या वरें मजपुढें प्रभु-यश गंधर्व अप्सरा गाती
आधींच आदिकवि-कृति मन हरि भलविल न कां सरोगा ती

रामात्मजें मयूरें हें श्रीराम-प्रिय पाहिलें
तत्पदीं हनुमद्रामा-यण वंदुनि वाहिलें १४१

समाप्त.

---

१ दोवटल्या बाळकीं. २ श्रेष्ठ. ३ दुग्ध. ४ तत्-अदर्शन-त्या राम लक्ष्मणांचें अदर्शन (न दिसणेंपण) ५ प्रीतियुक्ता. + मज्-जाड्य-माझा जडपणा.

# पंचचामररामायणप्रारंभ॰

सरोज-जाऽर्थित प्रभु क्षपाचरेंद्र-मारणा
असंख्य[1] भक्त-दृष्टिची घडावयास पारणा
अजात्मजात्मज द्रवोनि होय विश्व-तारणा
अशेष-जाड्य-जन्य-पाप-शाप-ताप-वारणा १
गुणाऽब्धि कोसलेंद्रजा-तनूज होय राम हा
शिवादि सत्सभा तिचा उदार सोयरा महा
भरादितांत[2] नाम साधु केकयात्मजा-जनी
प्रसिद्ध बोलले कवींद्र आर्य भक्त ज्या जनीं २
सुमित्र-वर्ण-नाम जीस तीस दोन॰ नंदन
श्रिताऽखिलाऽति-ताप-नाश-हेतु दिव्य-चंदन
वडील लक्ष्मण द्वितीय तो अरिघ्न सन्मती
असे कुमार चार सार सारसाऽक्ष[3] जन्मती ३
जन्मला पुरीं त्रिविष्टपीं असीम जो मह[4]
प्रभूत-दीप्ति वाढले कुमार ते तयासह
द्विजत्व पावले श्रुति-स्मृतिज्ञ जाहले शतें
गुणाचिया दिसों नदेति जें शिशुत्व लेशातें ४
मुनींद्र कौशिक स्वयें स्तवूनियां नृपा वदे
मखाऽवनार्थ साऽनुज स्वपुत्र राम पाव दे
वसिष्ठ देववी बळेंचि ने नवाहता रथीं
सदस्त्र दे महर्षि ताटकेसि मारवी पथीं ५
सविघ्न-यज्ञ-सिद्धिचा असे सदैव आधि ज्या

---

१ दशरथाचापुत्र २ भरशब्द आदीं आणि तकार अंतीं ज्याला असें॰
३ कमलपत्राक्ष॰ ४ उत्सव॰ ॰॰ छंदविशेष॰

करी वधूनि राक्षस प्रसन्न राम गाधिजा
जिला शिलात्व ये प्रभु क्षणांत उद्धरी तितें
कवींद्र गाति राम-पाद-पद्म-शुद्ध-रीतितें ६
महेश-चाप मोडितांचि जानकी अजा वरी
पडेचि राम-सिंह-तेज रावणा गजावरी
दिल्या तिघी तिघांजणासि मैथिलें सुता तया
प्रजाहि बोलिल्या न सद्वरार्पणें सुतान या ७
करी महोग्र जो धरूनि मार्ग वासरा महा
हरूनि दे तया सुशांति भार्गवास राम हा
पुरी सुरवास पावली यशें जगीं नमावली
सुरद्रुमीं न सावली सुतर्धि गाय मावली ८
कुमार राम यौवराज्य-योग्य वाटला नृपा
परंतु तत्प्रिया करी अगत्यचीं बरी कृपा
स्व-पुत्र-भक्ति-राज्य कीर्ति पावधि प्रसिद्धितें
तिचाचि होय हेतु तो प्रभाव विघ्न-सिद्धितें ९
सदार साऽनुज प्रभु स्व-तात-सत्य-रक्षण
स्वयें करावया निघे वरूनि वन्य-भक्षण
वळावया जटा वटांऽग-दुग्ध दे निषाद या
यशोर्थ सेवधी वना जसी शिवा विषादया १०
नमी प्रयाग-वासि-तात मित्र-सन्म हर्षितें
गणी मनें जगांत तो कृतार्थ-जन्म हर्षितें
करूनि आश्रय स्व-चित्रकूट-पर्वता पसा
करी मुकुंद तेथिल स्व-भक्त-सर्व-तापसा ११

---

१ कन्या. २ नसामायली. ३ तत्-प्रिया-त्यादशरथाचीस्त्री (कैकेई) ती. ४ अरण्यामधेंउत्पन्नझालेल्या फलादिकांचें भक्षण. ५ वटवृक्षाचाचीक. ६ महादेवास. + सुत-ऋद्धि-पुत्राचीवृद्धि.

वियोग-शोक-पावकीं सुदुःसहीं पिता गळे
जळे असें कळे परंतु बंधुला न तो वळे
तयासि दे स्व-पादुका पुरा फिरोनि पाठवी
अवध्यतिक्रमें जळेन हें तदुक्त आठवी १२
म्हणे यदंघ्रि-रेणु दीन-जन्म-पत्रिके तुतें
मृषा करीन सर्वथा तथाहि पत्रिकेतुतें
नमूनि हस्त जोडितां महर्षि अत्रि गौरवी
यशा क्षमा-सुतार्चनें सतीहि चंद्रगौर वी १३
विराध भूमिजा धरी तिला त्रभूंसिंही हरी
असा महोग्र जो अरी तयासि राम उद्धरी
महर्षि दंडकीं वनीं भयार्त जे सदा मनीं
अभीति दे तयां धनी तपीं स्व-लोक-साधनीं १४
सुतीक्ष्ण बाणभंग कुंभ-संभवादि सन्मुनी
सुखी करी सदैव जे स्व-भक्ति-निष्ठ जन्मुनी
जटायु तात-मित्र त्यासि दे प्रमोद तोखदें
समागमें महा-गदाऽर्दितासि जेविं औखदें १५
स्वबंधुनिर्मितोटजीं रमेश गौतमी-तटीं
वसे प्रकाश आवरी प्रदीप तो जसा घटीं
खळ-स्वसा म्हणे असीस लुब्ध कां मला भजें
कळत्र तेंचि सेव्य रे यथेष्ट काम-लाभ जें १६
समर्पि लक्ष्मणाचिया असीस नाक कांन ती
न त्या करील दंडितां असीस नाक कां नतीं

---

१ अवधि-अतिक्रम-मर्यादेच्या उल्लंघनानें. २ गरुडध्वजातें (विष्णूतें) ३ प्रमये. ४ शारभंग. ५ स्व-बंधु-निर्मित-उटजीं-आपल्याबंधु लक्ष्मणानें निर्मिलेल्यापर्णशालेंत. ६ दुष्टरावणाची भगिनीशूर्पणखा तीं. ७ या मारखेच (सीतेस.) ८ अशाप्रकारचीस (शूर्पणखेस) ९ स्वर्ग. + रामलक्ष्मणामहि.

तिणे स्वबंधु धाडिला खरारव्य तोहि ताडिला
ससैन्य गर्व झाडिला व्यसु[1] क्षणांत पाडिला १७
स्व-दुर्दशा दशाननासि दाखवूनि कोपवी
सुवर्ण-एण[2] पाठवूनि तो विचार लोपवी
करूनि दूर शूर राम- लक्ष्मण प्रभु छळें
बळें हरी सतीस ती म्हणे खळा अघें जळें १८
जटायु सोडवी परंतु युद्ध-धर्म मोडुनी
छळेंचि गृध्र पाडिला रणांत पक्ष तोडुनी
म्हणोनि हाय हाय राम लक्ष्मणासि बाहुनी[3]
क्षमा-सुता रडे मनांत शोक- भार वाहुनी १९
सती कपींत ऋष्यमूक-पर्वतीं नग त्यजी
क्षयार्थ गांजिली नमावि वृद्धिदा अगत्य जी
पुरींत रोधिली अशोक- काननीं महासती
श्रमे परंतु वाटवी सुर- व्रजीं महास[4] ती २०
वदे निजाऽनुजोक्त वृत्त आयकोन राम हो
तयाहि शोक दे जसीच बायको नरा महा[5]
प्रिये प्रिये असाच शब्द विश्व- नायकाऽननीं
करीत दार शोध योधराय जाय काननीं २१
जटायु मूर्छित क्षतार्त देखतां गळां पडे
रडे पुसे कथी + परंतु मृत्यु सांगतां घडे
दडे मुहूर्त पूर्व-शोक ≠ यापुढें[6] मनीं जडे
अडेचि धैर्य तोय दे निघे शुगब्धिच्या कडे २२

१ गतप्राण. २ सुवर्णहरिण. ३ बोलावून. ४ उत्सवास किंवा तेजास. ५ हाय. ६ कफ- अब्धि- शोकसमुद्राच्या. + सीतेचा शोक. ≠ या जटायूच्या शोका पुढें.

पुन्हाहि शोधितां कबंध उद्धरी तयावरी
शबर्युपासनास[1] हृष्ट मुक्ति-दायका करी
यदीय-नाम युग्म-वर्ण[2] पं अणीक पो असे
तिच्या तटीं स्मरे प्रियेसि वर्णवेल तें कसें २३
समीर-पुत्र भेटतां सखा सुकंठ होय ज्या
करी प्रहृष्ट दर्शनेंचि जेविं अर्क तोयजा[3]
सती निजोत्तरीय-बद्ध मुक्त दाखवी नग[4]
धरी तदीक्षणींच तोष ताप लाख वीनग[5] २४
स्व-दुःख-वृत्त तें विष प्रभूसि कीश चाखवी
प्रभु प्लवंग-नायकासि कार्यसिद्धि दाखवी
हरूनि वाल्यसु[6] क्षणांत राज्य दे नतापदा[7]
पिटीच राम-दृष्टि-वृष्टि दे उरीं नतापदा[8] २५
कपि-प्रवीर[9] धाडिले कराव्यासि शोध जे
तयांत सिंधु-लंघनास वात-पोत तो धजे[10]
वधूनि सिंहिकेसि योजनें शत क्षणें उडे
श्रमे सतीस धुंडितां विलोकितां सुखीं बुडे २६
अशांत ये दशास्य ज्या न लाज मत्त पाप हा
वदे सुभोग भोग चाल आज मत्तपा पहा
पतंग तो हितावहा तया न दीपिका सती
गिरी नगासि पोषिनी[11] नता नदी[12] पिकास ती २७
सती करूनि धिक्कृति क्षपाचरासि कोपवी
गमे रवि-प्रभाचि ती तया दिव्यास लोपवी

---

१ शबरी-उपासना-आस-शबरीचीउपासनाजीतोचमिषतो. २ पंपा. ३ कमला. ४ अलंकार. ५ वि-इन-ग-पक्षिश्रेष्ठगरुडेंकरून गमनकरणारा (राम) तो ६ वालि-असु-वालीचेप्राण. ७ पदीनम्रअसणारास. ८ नत-आपदा-नम्राची विपत्ति. ९ वायुपुत्रमारुती. १० पुढेंमरे. ११ पालनकरणारी. १२ नदी.

कथा निशाचरीस सिंधुतें वदो नेई सखा
न हे वळेल लोटतांचि मास दोन ईस खा २८
पलाश[1]-राय[2] जाय हाय जानकी वदे तिला
प्रमोद मुद्रिकार्पणें समीरनंदनें दिला
सतीहि दे शिरोमणी पुसोनि वृत्त यी लयां
खळासि न्यावया म्हणे तुम्ही यशोर्थ यालयां २९
समीरजें अशोक-काननस्थ वृक्ष मोडिले
दशास्य-पुत्र अक्ष लक्ष दक्ष वीर झोडिले
घनध्वनीस+ सांपडोनि शब्द-बाण सोडिले
सभेंत रावणादि-पापबुद्धि-कर्ण फोडिले ३०
खळेंद्र पुच्छ पेटवी म्हणोनि पावका सती[6]
स्तवी गमे पुरी कसी म्हणोनि पाव कास ती
सुटे उडे कपींद्र त्या पुरीस आग दे वदे
तुम्हासि मी न हे फळ स्मरोनि आग देव दे ३१
पुसोनि ईश्वरीस ये उडोनि जे सखेद या
विलोकितांचि दाविती प्रहृष्ट ते सखे दया
शिरोमणीस देखतांचि विष्टपासु खेद दे
तया तुझा ऋणी असेंहि शिष्टपा[10] सुखें वदे ३२
प्रभु प्लवंग-सैन्ययुक्त सिंधुच्या तटास ये
म्हणे तुला द्विषत्पुरी महाहिची फटा[11] सये[12]
अहा महा वियोग-दुःख शत्रुनें कसें दिलें
भवांतरीं अडांत[13] सेव[14] लोटिलें नसे दिलें ३३

---

१ नदी. २ मांसभक्षक जे राक्षस त्यांचा राजा रावण तो. ३ याचें. ४ आज्ञा. ५ यास्थाना. ६ सीता. ७ अग्नि. ८ अपराध. ९ जगत्प्राण राम तो. १० शिष्टांचा रक्षक जो मारुती त्याला. ११ फडा. १२ हे सखे (सीतेचें विशेषण) १३ विहिरींत १४ पाणी. १५ मनानें. + मेघनादास, इंद्रजितास.

नमी बिभीषण त्यजूनि त्या दुराशया दया-
निधि प्रभु स्वयें करी प्रसाद सिंधु याद[1] या
तयास राज्य दे म्हणे समुद्रही नसे तुतें
अशक्य लेश जा तरून वा करून सेतुतें ३४
विशाल सेतु पंचवासरांत निर्मिला नळें
अहर्निश-त्रयें परातटासि पावलीं बळें[2]
असत्य राम-शीर्ष-चाप सत्यसेंचि दाखवी
मुहूर्त जानकीस शोक-काळकूट चाखवी ३५
सुकंठ तार्क्ष्य[3] पन्नगीं[4] तसा दशाननीं पडे
तयासह प्रसिद्ध बाहु-युद्ध देखतां घडे
करावया यशोर्थ साम[5] रामशत्रु-भंगद
स्मरोनि नीति पाठवी सु-पूत दूत अंगद ३६
म्हणे धराधि तो न साम-काम पाप तापला
वधी खळासि अंगद प्रताप दावि आपला
त्यजूनि नीति धर्म-शर्म-कीर्ति-हेतु उद्धतें
हठें क्षयार्थ मांडिलें न वर्णवेचि युद्ध तें ३७
प्रहस्तनाम सैन्यपाळ देव-काळ तो मरे
म्हणे महेंद्र हो असाच शेष शत्रु होम रे
करि प्रभूंसि नाग-पाश-बद्ध मेघनाद या
खळाचिया नसे कधींहि ठावुकी मना दया ३८
सतीस पाठवी रणांत पुष्पकांत वाहुनी
करी विलाप ती तशा दशेंत [illegible]ासि पाहुनी
भली त्रिएक[6]-जटाभिधा निशाचरी परोपरी

---

१ जळचर. २ सैन्यें. ३ गरुड. ४ सर्पी. ५ संधि, सल्ला. ६ त्रि शब्दानें युक्त जी जटा नामक राक्षसी (त्रिजटा) ती.

करूनि बोध तो धरात्मजाऽतिशोक तो हरी ३९
खगेंद्र ये पळांत ते अशेष नाग लोपले
सुधारसापुढें जसे प्रचंड रोग कोपले
म्हणे यदीय अंतकाहि जोड हात दापिता
गमे तया प्रभूसि मुक्ति- हेतु हा तदा पिता ४०
प्रयत्न- कोटि- भग्न-निद्र कुंभकर्ण काळसा
गमे कपींस भक्षितां नसोडितांहि आळसा
हरी हरीश्वर क्षणें सुटोनि नाक कान ती
सुशक्ति दाविता करील त्या न नाक कां नती ४१
जयापुढें फिकें पडे महेंद्र-वज्र- वर्णन
प्रभूत्तमाशुगें उरे तसाहि कुंभकर्ण न
म्हणे दशास्य सोडिला कसा सहाय हा यशें
तसेचि बोलिले स्मरोनि त्यास हाय हाय शें ४२
घनस्वन प्रभूत्तमादि सर्व संगरीं खिळी
न मोह ऋक्षपा मरुत्सुता बिभीषणा गिळी
महौषधि-क्षमाध्र- शृंग आंजनेय आणि ते
विशल्य जाहले ससैन्य वैरि-वृक्ष-खाणिते ४३
मृषा-सती- वधें पुन्हाहि होय सर्व मोहिता
करी कथूनि तत्व तत्पितृव्य साधु तो हिता
झटोनि मारिलाचि लक्ष्मणें अपूर्णहोम हा
म्हणे तयासि शक्र बा तुझ्या समृद्धि हो महा ४४
तनूज-शोक- तप्त दुष्ट जाय ज्या न कीव धा
म्हणे असीस शोणितें करूनि जानकी-वधा

१ रामभक्त. २ हरणकरी. ३ वानरांचास्वामी (सुग्रीव) ४ स्वर्ग. ५ प्रभु- उत्तम- आशुग- प्रभुश्रेष्ठजोरामत्याच्याबाणानें. ६ इंद्रजीत. ७ तेजा.
+ घात, शंभर. ≠ खड्गास.

सुपार्श्वसाधु होय त्या तशासही निवारिता
वदे सुकर्म तेल बा पडें न तूं दिवा रिता ४५
रणांत मृत्यु पावतां प्रधान- बंधु- सोदर
स्वपाप शाप आठवी तथापि घे न तो दर[1]
स्व-सैन्य राम- लक्ष्मण- क्षयार्थ पाठवी रहा.
म्हणे मरोनि तें तरी नदेचि पाठ वीरे[2] हा ४६
निशाचरी-विलाप- खिन्न- चित्त हा निघे रणें
जया क्षयाहि कीं म्हणे तयासि हानि घेरणें
सुरांसि होय दैन्य सैन्य तें न्यहाळितां तड
प्रवीर पावले भवाब्धिची करूनि तांतड ४७
म्हणे स्व-सारथीस शक्र मंत्र ऐक मातले
दशाननादि राक्षस त्रिलोक- शत्रु मोतले[3]
शतांग ने वसीव राम काम बा पुरीव हा
स्व-चातुरी प्रभूसि कीर्ति व्हावया पुरी वहा ४८
अशेष शस्त्र- अस्त्र अर्जुनींच मूट कायशा
कथा नलावितील गर्जुनी चमू टका यशा
तरी रथीं अरातिनाथे पत्ति हें नसोसवे
असाधुची बढाइ सोसणें असी नसो सवे ४९
स-रात्रि- सप्तवासर प्रसिद्ध संगर क्षण
श्रमें नराहिला न पाहिलेंहि अंग- रक्षण
तशांत आठवूनि दे निशाचराघ वासव
द्विजघ्न गोघ्न भंगि हा पिशाच राघवा[4] सव ५०
नटे नभांत जो रमेश[5] पादपद्मबंभर

१ भय. २ राम. ३ माजले. ४ राम. ५ रमा- ईश- पाद- पद्म- भ्रंभर- लक्ष्मीपति जो राम त्याच्या चरणकमलसंबंधीं भ्रमर. + युद्धोपयोगी रथविशेष.

व्यसुख घे न खंडिलीं शिरें जरीहि शंभर
अगस्त्य-मंत्र तज्जपें प्रसन्न सूर्य दे वर
स्वयें शची म्हणे करूं सनाद तूर्य देवर ५१
महेंद्र-सूत-सूचित-स्वयंभवास्त्र-मंत्रितें
शरें रिपूर भेदिलें अजें पराऽनियंत्रितें
पडोनि राहिल्यां म्हणे मला पहा रिधा तमीं
न पावलों अधें मदें प्रजामहारि-घात मी ५२
जयें महेंद्र-दुंदुभि-प्रचंड नाद वाजला
जयाचिया महाध्वनीस मेघ-संघ लाजला
प्रभूत वाद्य नृत्य गीत पुष्प-वृष्टि माजला
स्तव प्रमोद सद्यशें समस्त लोक साजला ५३
प्रभूदितें बिभीषणें स्वयें दशानन-क्रिया
करूनि सांविल्या पुसूनि अश्रु अग्रज-प्रिया
पदीं बसोनि सर्व-दीन-बंधुच्या अनुग्रहें
म्हणोनि घेतलें प्रजार्बतीमुखें अनुग्र हें ५४
बिभीषणासि सांगुनि प्रभु प्रियेसि आणवी
प्रदीप्त वन्हि-कुंड जें नयांत तीस न्हाणवी
तिची विशुद्धि दिव्य तें सुरादिकांसि जाणवी
महाविभूति ती असेंचि सन्मनांत बाणवी ५५
रण-व्यसु-प्लवंग-सैन्य तें उठे सुधाघनें
असें करी भरे सरोजजांड तज्जयस्वने
बसोनि पुष्पकीं सवे महाविभूति-जानि घे
प्रहर्ष द्यावया पुरा समुत्सुका निजा निघे ५६

१ वाजंत्र. २ इंद्रसारथि जो मातली त्याणें सुचविलें स्या ब्रम्हास्त्रानें अभिमंत्रित जो बाण तेणेंकरून. ३ रिपु-उर-रिपूचें वक्षस्थळ. ४ बंधु न्हि यांच्या मुखानें. ५ सरोज-ज-अंड-ब्रम्हांड.

करूनि अंकवर्तिनी + प्रभू महाविभूतितें
कथा कथूनि आजिची[1] म्हणे महावि भू तितें
भवाब्धि अब्धितें सुत प्रबुद्ध मान सेतुनें
मला तसाचि तारि हाचि शुद्धमानसे तुनें ५७
स्वानुभूत ≠ ऐकवीत दाखवीत रंजवी
श्रीस तो चतुर्मुखा यदीय नाभिकंज वी ॥
तत्प्रियार्थ पुष्पकीं सुकंठदार आणवी
त्यांसि ती सती कपीश्वरोपकार जाणवी ५८
हर्षवी शबर्युदार ⁘ भाव वर्णुनि प्रिया
राम ते बिभीषणादि त्याहि वानरस्त्रिया
गौतमी तसाच दाखवी जटायुचा वट
प्रीतिस त्यजी न जेविं चावदीस चावट ५९
कुंभयोनिच्या तसाचि दावि अत्रिच्या पदा
आपदा कधीं शिवे पदाश्रिता न तापदा
पाप-दाव-मेघ चित्रकूट शैल दाखवी
लाख वीत⁘बाध ज्यांत जो सुधेसि चाखवी ६०
दाविल्या दिनेश-विष्णु-पाद-पद्मजा नद्या
सांगती यशा स्वराद्यनित्य[2] सद्म ज्या न द्या
त्या प्रयाग-संसदीं मुनीस हर्ष दे वसे
विप्र तच्छिरीं करीति पुष्पवर्ष देवसे ६१
भक्तवत्सल स्वबंधु-निश्चयासि आठवी
सूचवावया स्ववृत्त मारुतीस पाठवी
हर्षवी गुहास त्याहि केकयात्मजा-सुता

१ सुद्वाची. २ स्वः-आदि- अनित्य- स्वर्ग इत्यादि अनित्य. + मांडीवर नसलेली भूमी. ≠ आपण अनुभविलेलें. ॥ प्रसव. ⁘ शबरी-उदार-भाव- शबरीचा मोठा अभिप्राय. ⁘ निर्दोष.

ज्या वियोगसंज्वरांत फार भार सासुता ६२
बंधु मोर राम मेघनाद होय दास हा
त्या म्हणे श्रमासि देखसील तोयदा सहा
वृत्त घे तुम्हा न ठेवितां उधार साधु तो
शशितोहि आंग पावला सुधारसा धुतो ६३
पूंजुनीहि पूजनास वंदुनीहि वंदना
तो करी धरी नसोडि नाग जेंवि चंदना
घे म्हणे सुरत्न-राशि राज्य कन्यका मना
सांग कां गभीर भाव काय अन्य कामना ६४
तो वदे तुला विलोकितांचि सर्व पोवलें
नाशितील वा तुझी सुरद्रु गर्व पावलें
रामहंसमानसा रघूत्तमाब्जिसारसा
सार साधिलें यशाङ्ग या करी पसा रसा ६५
तृप्त मी तुझ्या भजोनि भक्तिच्या महानसा
सज्जनाचिया स्मरादि साहनी महा नसो
कीर्ति सांगती त्यजूनियां सुशील हा नसा
त्वां न दास मानिला लहानही लहानसा ६६
पातलाचि शीघ्र राम- तोयदासमोर हो
या कपिस्वनें प्रहृष्ट होय दास मोर हो
तो निघेन आवरीं महातपा दुकान तें
वल्कली जटी शिरें वहात पादुका नतें ६७
श्रीवसिष्ठ वामदेव मातृवर्ग नागर
स्वप्रधान-सैन्ययुक्त शत्रुहसत्व-सागर

---

१ मारुती. २ पोंचलें. ३ स्मरादिसहाराचु. ४ नगरवासीलोक. + वियोगरूपउत्तमसंतापांत. ‡ कन्या. ‡‡ रामरूपहंसाला मानससरोवरा. ⁂ रामरूप भ्रमराच्या कमळा. ⁂ वानराच्या शब्दें.

सानुज प्रभूनमासि जाय चिंतितक्षण
प्रेक्षितां दिसे विमान भव्य-पुण्यलक्षण ६८
पावला नलंघितां स्ववाक्य कीं न घातक
श्रीश मेघ लक्ष्मणाग्रजादि मोर चातक
प्रेम तें वदों शके न तो सुरर्षितात +के
स्वल्पबुद्धिचेंहि वर्णितां सरेचि पातक ६९
होय पुष्पक त्यजूनि दास तेविं पत्ति तें
जन्म मृत्युच्या स्वकाळ भासतें विपत्तितें
वाटला विलोकितांस गाय वत्सरु क्षण
श्रीनिवास तोहि साधुराय वत्सलक्षण ७०
लेवणूनि पादुका पदाब्ज-युग्म पाहिलें
साधुनें तयावरि स्व-शीर्ष-राज्य वाहिलें
हुंगितां शिरीं दयासमुद्र अश्रु वर्षला
भेटला सुतासि तात तेविं राम हर्षला ७१
वाटला अरिघ्न तो धरूनि हांव लेंकरूं
त्या चिरां‡गता पित्या प्रणाम धांवलें करूं
वंदिला वसिष्ठ शिष्ट वामदेव सादरें[1]
मातृवर्ग जो वदे सदा सशोक हा दरें ७२
वृद्ध जे गुरु प्रधान ते सुखांत घातले
पातले समस्त पौर दर्शनेंचि मातले
भेटले बिभीषण प्लवंगराज सज्जना
सानुजास पावले सुधासमुद्र मज्जना ७३
वासवादि नंदनो‡त्थ पुष्पवर्ष वर्षले
देव-गायक प्रभूसि गाति फार हर्षले

---

१ भयें. + ब्रम्हदेव. ‡ बहुता काळें करून आलेल्या. ‡ नंदनवनापासून उत्पन्न असा.

नाचल्या वराप्सरा मृदंग वेणु वाजले
दिव्यदुंदुभिध्वनीस मेघनाद लाजले ७४
सप्रधानबंधु जे तयांचिया स्वयें जटा
सोडवी निजाहि पावतां पणाब्धिच्या तटा
वल्कलें करूनि धन्य राजभूषणा पटा
मान दे रमेश झांकिल्या तनु-च्छवि-च्छटा[1] ७५
भूषवी मुकुट सर्व यासमान वानर
स्पष्ट पौर मानिती न त्या समा नवा नर
पाहतां गमे सभाहि रुंदि लांबि भी रवणा
त्याजना गणेश हर्षतुंदिलां बिभीरवणा ७६
काळ भीतितेंहि भेट जी न दे वदे रवणी
मानिती तसी निजा पुरी न देव देखणी
नित्सुकें महोत्सवें महायशेंहि दाटली
आटली जिची न दीप्ति मूर्त मुक्ति वाटली ७७
रामसा विभीषण प्रवेशला नवा सवा
सेवितां गमे न लेशही निजोन[2] वासवा
रम्यरूप मंत्रियुक्त भव्यभूष शोभला
लोभला नयास पौर कीं तसाच तो भला ७८
हर्षले करूनि राममातृपादवंदन
क्रव्यभुक्प्लवंगराज साधु जेविं नंदन
ते सुकंठदार त्याहि कीशयूथपस्त्रिया
पावती जसीच जानकी तसीच सत्क्रिया ७९
तीर्थजीवनें महाभिषेक तो यथाविधि
श्रीवसिष्ठ हस्तकें करूनि घे दयानिधि

१ शरीरकांतीचेसमुदाय. २ निज-ऊन- आपल्याहूनउणा.

राज्य विश्वरंजना करी तयांत आदरी
नादरीति बोलिल्या पडोनि शून्य हा दरी ८०
होय रामराज्य रामराज्यसेंचि तोरवद
व्याधि जो भवाख्य उग्र हें तयासि ओखद
कीं करी प्रकाशुनि स्वसद्ब्रह्म निरंजन
श्रीश बुद्धिचें हरूनि जन्म हानि रंजन ८१
कुंभजादि विप्र जे सभाग्य चित्तपाहुनी[+]
श्रीवरासि जाहले प्रसन्नचित्त पाहुनी
वर्णिति प्रताप गद्य-पद्य-शास्त्रवाद या
मागती सदा करूनि सद्यश-स्तवा दया ८२
कुंभजाननें दशानन-प्रताप जे अरी
तत्कृतानुजादि वानरेंद्र वातभू हरी
तत्कथा प्रधानबंधु-युक्त आयिके धरी
तोष शोषला गमे सुधातिपान तो करी ८३
धर्म-नीति-संश्रितावनें सुकीर्ति जोडिली
निंदितां जडें जनें शुचि प्रियाहि सोडिली
स्वर्ण-जानकी करूनि अश्वमेध साधिला
श्वाहि[1] मानिला नृपेक्षिलें तशाहि साधिला[2] ८४
व्याल दाव बाण[3] या पदत्रयांत अक्षरें
तीन सेवटील तेंचि नाम सेविलें खरें
ज्या द्विजादि शत्रुनें तया अरिघ्न-हस्तकें
मारवूनि डोलवि प्रभु त्रिनेत्र-मस्तकें ८५
केकया लजासुतासि मातुळाचिया मतें
पाठवी तयासह प्रसिद्ध जें स्वधाम तें

---

१ कुत्राहि. २ आधियुक्ताला. ३ लवण. + कुबेराहूनि.

देवगायक त्रिकोटि इद्र मत्त मारवी
राम त्यां करी तम स्व-बंधु-सत्तमा रवी ८६
आठ पुत्र जे तयांसि आठ दे पुरें पदें
स्पर्शिले कुमारही न भूप ते मनोगदें
ऐक्यके चरित्र आपलेंचि आत्मजाननें
ज्या न नेणताहि ना म्हणे कधीं सुरेंं मनें ८७
दिव्य जानकी पुन्हा करी धरोदरीं शिरे
शोक कोपउद्भवोनि राम-मानसीं जिरे
लक्ष्मणासहि त्यजी म्हणे दयालु हा पण
हा पण-क्षयें नव्हे असत्यसंध आपण ८८
प्रेत विप्रबाळ तो पुन्हा उठे असें करी
सद्यशें सुधी जसेचि इक्षुच्या रसें करी
हर्षवी करूनि यज्ञ नाक विप्रसिद्धिला
कामनेंचि दे महामना केवि प्रसिद्धिला ८९
भाविती चकोर आपणास चांद विप्र ज्या
प्रीतिनें भरूनि तातसाचि नांदवि प्रजा
जो मृकंडुनंदनासि भेट दे वसे वटीं
ने पुरी महागतीसि तोचि देव सेवटीं ९०
ज्या प्रभूत्तमें[३] यशें अशेष विश्व तर्पिलें
त्यासि पंचचामराख्य तच्चरित्र अर्पिलें
राम चिंतनार्थ वर्णिलें मयूरसेवकें
मुक्ति सुंदरी वधू वराधि याचि देवकें ९१

समाप्त.

१ हस्ति. २ वाल्मीकी. ३ पंचचामर नामक.

# सत्कीर्तिरामायणप्रारंभ

## स्रग्धराछंद.

श्रीभर्ता, ब्रम्ह-वाक्यें दशरथसुतता घे चतुर्मूर्ति झाला
नामें तो राम विश्वप्रिय भरत रूधी लक्ष्मणाऽरिघ्न आला
ने विश्वामित्र अस्त्रें प्रभुसि पढवि तद्यज्ञ रक्षी शिळेतें
नारी जें दुर्लभ श्री-हर-धनु-दलनें रत्न रामा मिळे तें १
तेजातें भार्गवाच्या हरि जनक-वचो-रक्षणा राज्य सोडी
मातेच्या दिव्यसुरवार्ताऽमर-मुनि-ततिच्याही प्रियानें नमोडी
ताताला तोय दे त्या धृत-पद-भरता पादुका कीर्ति जोडी
अत्र्यादिष्टें विराधा वधि करुनि जटायुद्विजासींहि गोडी २
प्रेमें गोदावरीच्या मुनि-महित-तटीं जानकीयुक्त राहे
दिक्कंठ स्व-स्वसेचे प्रभुवर तुरवी नाक जें तें नसाहे
ने सीतेतें छळानें वधुनि खगवरा स्त्रैणसा तो वदेहा
संस्कारी तातभावें प्रभु खगपतिच्या स्वांऽक-मुक्ता सुदेहा ३
मारी तारी कबंधा वरगति शबरी जी तिला दे सभोरा
घाली हर्षीं करूनि प्रिय अनुगसुता त्यांचिया त्या प्रवीरा
सुग्रीवा सूर्यपुत्रा प्रियसरव करि ने त्याहि वाळीस अंता
सीता शोधूनि ये त्या कवळुनि हृदयीं गौरवी सर्व-संता ४
देवांशर्क्ष-प्लवंगाऽमित-बळ-जळधी सिंधु-तीरासि नेला
भ्राता रक्षोधिपाचा प्रथमचि नमितां पाय लंकेश केला
भीतां अम्यर्चतमांबुनिधि रचविला सेतु अत्यंत भारी
संख्येनें लांब गावें शत दश बरवा रुंद आश्चर्यकारी ५
दिक्कंठातें सुकंठ प्रथम निरखितां दारवी तेज ताडी
तो दूना अंगदातें धरवि धरितयां बाहु झाडूनि पाडी

---

१ आपल्या मांडीवर सोडलेल्या. २ श्रेष्ठ. + रावणानें पीडित जे देव आणि ऋषि त्यांच्या परंपरेला, समूहाला.

युद्ध-प्रारंभ होतां बहु बळ खपवी राम कोदंडधारी
बांधी उयाहिपाशीं घनरव विभुला लक्ष्मणा नाकपारी[1] ६
हा बोले दाखवीतां विकळ महिसुता दे जटाजी त्रिपूर्षा
ती धैर्या स्वास्थ्य पावे करपलिहि सती वृष्टिनें जेविं दूर्वा
पक्षीरा व्याळ-मूर्छा उडवि करि तनू स्पर्शतां अक्षता तें
ऐकोनि प्रेषिला जो यमसम कुलेशश्रोत्र[2] तो अक्ष-तातें ७
युद्धीं मारी प्रचंड प्लवग-बळ धरी मूर्छिता कीशपाळा
तन्नासा-कर्ण वेगें सुटुनि हरि[3] हरी[4] त्याकरिं क्रुद्ध काळा
तो भक्षी कीश कांहीं किति गिळि सगळे जेविं सुग्रास हाय
सेना झाला म्हणे या प्रलयकर महाकाळ उग्रा सहाय ८
ध्वंसी त्या कुंभकर्णा प्रभु दशमुख तो हा वदे वासवारी
माया-सीता-वधें दे क्षण जड-जनता-भाव देवासु[5] वारी
त्यातें सौमित्रि मारी दशवदन रडे श्रीवधा घे असीतें
त्यातें मंत्री म्हणे बा नवधुनि अरितें मारिसी कां असीतें ९
सांगे माराचि रामा कपि-पति-सहिता पाठवी सैन्य भारी
मारी त्या रुद्रसाचि प्रभु उदधिस तो विप्रसा क्षिप्र सारी
सारीं घे शेष सेना दशमुख समरीं लक्ष्मणा शक्ति हाणी
न्हाणी रक्तें तयातें पवनज उठवी तें पुन्हा शृंग आणी १०
प्रेषी वज्री रथातें प्रभुसि बसवि तो मातली त्या सुयानीं
वेधी त्या मार्गणानीं प्रभु नगणि अरी विद्ध जैसा सुयानीं
छेदी श्रीराम मूर्धे शतमित उठले रावणाचे तथापी
कर्णाहीं भक्तिमान जो परम रसिक तो अद्भुना या कथा पी ११
सांगे जें कुंभजन्मा रविहृदय रणीं देवदेवा जपे या
तो यन्नाम स्वभक्ता सुकृत हयमखा दे वदे वाजपेया

---

१ नाक-प-अरि-इंद्रशत्रु (इंद्रजित) २ कुंभकर्ण. ३ वानर. (सुग्रीव)
४ हरणकरी. ५ खड्गातें. ६

भावें मायामनुष्यें स्तवुनि विनवितां त्या असारा मराया
सूर्ये मारीं दशास्याप्रति वर दिधला या असा रामराया १२
शक्राचा[1] युद्ध-यज्ञांतिल सुमति सखा सारथी फारभारी
सांगे जोडावयाला विजय निज-यशोदायका फार भारी
बाण ब्राम्हें कराया परम निपुण जे आदि ते कैठ भारी
मारी दिक्कंधरानें उर चिरुनि महासंगरीं कैठभारी १३
स्वर्वाद्यें[+]-ध्यान झाले स्ुरवर विजयीं वर्षले सुप्रसूनें
सावित्रीनें शचीनें प्रभुनुति वरिली तारकारिप्रसूनें[1]
वैरीही पाववीला करवुनि विधिनें सत्क्रिया धन्यतेला
तों जों भू चंद्र सूर्य स्वयश रघुवरें भक्त लंकेश केला १४
देवीनें दिव्य केलें स्वबळ उठविलें जें रणामाजि मेलें
अंतातें दुःख नेलें प्रभुवर-यश जें नें दिगंतासि गेलें
शोभे या भूमि चेलें स्ुरुचि वरि दिवा बोध या स्वच्छ तेलें
वंदावें यासि वेलें अमरवसतिच्या राघु या दृष्ट वेलें १५
पूजार्थी रावणाचा सदनुज विनवी त्या म्हणे राम वाजें
सुग्रीवाचें कपीचें प्रिय करिसिल तें पूजन श्रेष्ठ मोजें
स्ची तैसा भेटवूनि त्वरित भरतही सद्यशें फार साजें
मी त्यावाचूनि चित्तीं श्रवणहि करितां भोगपूजोक्ति लाजें १६
तो सत्कारी सुकंठा कपि-बल-सहिता पुष्पक प्रह्वभावें
बैसाया दे म्हणे त्या प्रभुवर भरता त्वां पाहायासि यावें
सेना युक्ता कपीशा बसवि मग निघे व्योममार्गे विमानें
देवीतें युद्धभूमि स्व-पर-यश कथी सेतुतें दावि मानें
श्रीनें तारा विमानीं करुनि बहु दया आणवीनांचि आली
झाली हृष्टा पहातां जनक-नृप-सुता ती करी तीस आली

१ पार्वतीनें. २ यज्ञें. ३ माझें. ४ नम्रपणानें. ५ सखि.
+ स्वर्गसंबंधी वाद्यांचे शब्द.

श्रीस श्रीराम सांगे मज तव-विरहीं हे करी आर्त पंपा
कंपा दे या असूंतें सति सुदति म्हणे ताप देऊनि संपा १८
श्रीतें दावी कबंध-स्थळ कथुनि कथा राम गोदावरीतें
जें होतें खिन्न तीचें श्वशुर-सुगतिनें चित्त मोदा वरी तें
पाहे त्यो त्या अगस्त्यप्रमुख-सुमुनिच्या साधु-गीताश्रमातें
सोडी ती चित्रकूटा निरखुनि हृदयांतूनि सीता श्रमातें १९
राहे राम प्रयागीं सुकृतनिधि-भरद्वाज-पादांसि वंदी
वंदीसा वेद ज्यातें स्तवि शतधृतिही तोहि यत्सेत्र नंदी
प्रेषी वाता त्मजा नो फळवि कुशळ ते पावले हर्ष भारी
सारी वर्षे प्रयागीं प्रभु पदनिरतां त्यांसि भेटोनि नारी २०
जें होतां श्रीश राजा शिव कथिल कृती काय तें विप्रजाया
जेविं स्त्योद्धार होतां प्रमुदितहृदया गाय तेविं प्रजा या
हा देवायास जैसा निपटुनि उडवी पामरायास मोर
प्रेमें होऊनि नाचे सकळ-जन घना-रामराया समोर २१
सत्कीर्ति स्त्रग्धरा कन्या हे रामायण-सत्कथा
मयूरें अर्पिली रामा वरा जाया मनोव्यथा २२

समाप्त.

# श्रीमत्करामायण.

## भुजंगप्रयात छंद.

रमाकांत घे ब्रम्हवाक्यें रवीच्या कुळीं जन्म काव्यार्थ आद्या कवीच्या
करी दिग्रथाच्या तिघी धन्य भार्या सुरेंद्रादि-कार्या करायासि आर्या १

१ ब्रम्हदेवहि. २ यत्र-पत्र-ज्याचें वाहन. ३ कल्याण. ४ कुशळ.
५ देव-आयास-देवांचाश्रम. ६ पामर-आयास-पामराचा श्रम.

सुत ज्येष्ठ जो तो घनश्याम राम द्वितीया भरांतीं त हें रम्य नाम
तिजा लक्ष्मण ख्यात शत्रुघ्ननामा चतुर्थ प्रभा देनि हे तात धामा २
गुरु श्रीवसिष्ठ स्वयें वेद दे हा नहोतां मना आनना खेद देहा
पिता योग्य जाणूनि तोकां विवाहा नचिंतील चित्तांत तो कां विवाहा ३
मखाच्या मनीं सिद्धिचा आधि ज्याला पिता दोन दे पुत्र त्या गाधिजाला
श्रात त्यानुगा रामभद्रास अस्त्रें मुनी दे जसीं शर्म-शोभार्थ वस्त्रें ४
पथीं ताटकाख्य द्विज-त्रास वारी वधी सर्व सिद्धाश्रमीं पासवारी
करी सिद्ध हर्षे मुनीशा क्रतूतें वदे राघवा आर्जवू शक्र सूतें ५
न मोहांत दुःखें कणेना शिला जी तिचा तो कृपेच्या कणें नाशिला जी
हरी जो रजाच्याहि उग्राघ वातें स्तवी त्या दयातोयमुग्राघवातें ६
चुरी पार्वतीजानिच्या कार्मुकातें वरी जानकी श्री-दया-शर्मुकातें
तिघीनीं तिघांलाहि दे तीं महातें करी जो स्वरूपीं भिदा-होम हातें ७
दिसेना जयाच्या परा मार्ग वातें रघूत्तंस भंगी तया भार्गवातें
यशें या करी दीन तो कापुराला सुखें दे जसा तात तोका पुराला ८
युधाजित्-स्वगेहासि ने भानुज्याला स्तवी त्या स्वसेच्या सुता सानुजाला
क्षमा नंदना आपला भाव देतों असें वृद्ध राजा सुखें हा वदे तों ९
रुसे मध्यमा स्त्री करी आग्रहातें स्वसौभाग्य नाशावया साग्रहातें
पतीच्याहि ती तापवी विग्रहातें निघे नियहातें करी धिग्रहातें १०
म्हणे जाणसी धर्म तूं देव दोन स्वयें जें दिलें तें न जो दे वदोन
तया दंड हें जाणिजे पामरानीं वसावाचि चौदा समा राम रानीं ११
भजो यौवराज्या पदा वत्स माजा द्वितीयें वरें मान्य हो सत्समाजा
न निष्ठा वरी सत्यधर्मी नराज्या इहामुत्र त्या भाग शर्मीं न राजा १२
जरी प्रार्थिली वायको कामदानें न ती आयके सर्वथा साम-दानें

---

१ विश्वामित्र. २ मोह. ३ दया-तोय-मुक-राघव- दयारूप उदकाला सोडणाऱ्यारामभेघातें. ४ भेदहोम. ५ कैकेयीचाभाऊ. ६ भरता. ७ सर्व. ८ शरीरानें. ९ वैरातें. + भरत. ‡ गरुडवाहना विष्णुला. ∴ महादेवाच्या ‖ जनक.

नसाया चिर[1] क्ष्मापती सा सुनेस स्वयें वल्कलातें म्हणे सोसुने[2]स १३
भिडेनें उरासींच ने सून ती तें वसिष्ठें दिलें वल्क नेसूं न तीनें
नमी राम वल्कांत हो स्थापि त्यातें धरूनि स्वधर्मींचि आस्था पित्यातें १४
निघे राम तो लक्ष्मण-स्त्री-सहाय म्हणायास लावी पुरस्त्रीस हाय[3]
पंथीं भं[4]गि पाहोनियां नंदनानें बसायास धाडी नृप स्यंदनातें १५
रडे राम-मातेचिया जाय गेहा म्हणे घातकर्ता नव्हे काय गे हा[5]
वृथा सेविलें त्वां कृतघ्ना अशाला नवाला हिना जी प्रिये ती अशाला
निजेल्या स्थळीं पौर जोडू[6]नि पाणी त्यजी जाय मीनांस सोडूनि पाणी
सखा राम भेटे गुहाख्या निषादा तयाच्या निवारी विचारें विषादा १७
रचीती वटाच्या पयें ते जटा कीं म्हणे वेष त्यांचा परा तेज टाकीं
तरे स्वर्धुनीतें वरी देव नौका घनीं वाट याला बरी दे वनौ[7]का १८
भरद्वाज जो त्या करी राम हर्षी स्मरेनाचि नेव्हां शरीरा महर्षी
तदुक्तें पथें चित्रकूटासि गेला खळाचें असत्कर्म आलें सिगे[8]ला १९
पुरीं तोंड झांकूनि ये हात जोडी कथी सूत धृत्न प्र[9]भु स्नेह तोडी
वदे शाप देवीस नामींच गोडी धरी चिंतितां राम तो प्राण सोडी २०
वसिष्ठें सु[10]त क्षिप्र तो आणवीला ति[11]णें घातही अर्थसा जाणवीला
म्हणे साधु तो धिक् तिनें आपणातें तिच्या सुज्ञ चाळें नदे हा पणातें २१
स्व-निर्लेपिता ज्येष्ठ-राजप्रियेतें कथी तो करी सांग तात-क्रियेतें
वरीं राज्य हें आर्य[12] नोरवें वदे त्या शिवांदृ नयातें न तो खेंव दे त्या २२
नझालीच मान्या तदाज्ञा तया तें तदौ[13]द्धत्य दे श्री तरा ज्ञा तयातें
निघे पौर घेवूनि आंगे अरण्या अयोध्येसि आणावया त्या शरण्या २
कळे स्पष्ट नद्भक्ति सत्या गुहातें म्हणे जें सुजीवित्व न त्यास हा तें

---

१ बहुकाळ. २ लक्ष्मीजीसूनतीस. ३ हाय. ४ पादन्वारी. ५ शाला नव्हे. ६ हात. ७ वन- ओक- वनामध्यें रहाणारा (गुहक) तो ८ कांठोकांठ भरण्याला. ९ दशरथ. १० सुत भरत. ११ कैकेयीनें. १२ गुरुवसिष्ठ. १३ तत्- औद्धत्य- त्या भरताच्या उद्धतपणा.

तया वाट गंगेंत दे तो ससेना सुभक्ता जगीं विघ्नकर्ता असेना २४
भरद्वाज जाणे न हा मत्त पाहो म्हणे सिद्धि सार्थक्य या मत्तपा हो
नमस्कारि। तो धीर सिंहासनातें पित्याचेंचि दे वीरसिंहास नातें २५
धरी जेविं भेटों नदा याद वाटे भला लक्ष्मणा तो न दायाद वाटे
तया तापल्या स्वस्थ हो राम हातें म्हणे पातला भव्य होता नहातें
तनुत्राण देहें करें चापदास त्यजी तो धरी अग्रजाच्या पदास
पित्याच्या कथी साधु हा वर्तमाना क्षण भ्रांतिदा त्यास आवर्त माना २७
जयाच्या नसे स्थान तापा दुकानीं करी तो सुखी त्या नता पादुकानीं
करी जो यशें धन्य विघ्ना सदा त्या निघे भक्त वंदूनि विश्वास-दात्या २८
नराहे पुरीं त्या न तो खेद सोडी न घे वल्क-धारी न तो खेदसोडी
विकारा भुजंगा दिसे वीन भाजी न ती जाय कंदादि सेवी न भाजी २९
निवाया जसा मानसा हंस-पत्री तया जाय त्या आश्रमा ज्यांत अत्री
शिवे काम कोपाग्निचीज्या न कीला समर्ची तयाची सती जानकीला ३०
वधी दंडकारण्य-विघ्ना विराधा म्हणे तो ऋषींतें न धाकें विराधा
तया ईश्वरा पूजिती विप्र भावें न ज्याची कधींही यशें विप्रभावें ३१
अगस्त्यर्षि तो राघवें वंदिला हो म्हणे नम्र जो जिष्णुच्या मंदिला हो
सुरा॑ऽधीश्वर-स्थापितें विष्णुशस्त्रें दिलीं कुंभजें जेविं पूजार्थ वस्त्रें
प्रभु प्रार्थिला कीं सदा मत्तपानें नजे भस्म केले कुधी मत्त पानें
बधावेचि लीला कराचि प्रभो गा म्हणावें कवींतें हरा विप्रभोगा ३३
पित्याचा सखा जो जटायु प्रभूतें वनीं जाहला वंद्य भाग्यें प्रभूतें
म्हणे त्या तुझी सून सीता वनांत स्वयें रक्ष बा कीर्ति भीतावनांत ३४
करी आश्रय ब्रम्ह गोदावरीतें स्वयें सच्चिदानंद मोदा वरी तें
शुभ स्थान जें पंचवट्याख्य शाला रची त्यांत सौमित्रि रम्या विशाला

---

१ मार्गी. २ वर्तमानास. ३ हंसपक्षी. ४ ज्वाला. ५ तेजरहित असी. ६ इंद्राच्या. ७ पुष्कळें, भाग्यें याशब्दाचें विशेषण. ८ भीताअवन- भीतांचें रक्षणकर्तें (वन याशब्दाचें विशेषण.)

स्वसा रावणाची सजी अंग लीला-मनुष्या म्हणे घे मला चांगलीला
प्रिया जी सुजीवातुसी ताप तीतें कुधी दे करी क्रुद्ध सीता-पतीतें ३६
जयाच्या करीती सदा वर्णना सो तया लंघितां हारवी कर्ण-नासा
तिचें ये वधा सैन्य केवारि तें हो म्हणे त्या प्रभु क्षीण देया रितें हो ३७
कथी लक्ष्मणा ती तुला जी वशा स्त्री करायासि गेल्यें तिचा जीव शल्यी
करी हे दशा प्राण तावी रमाया हरीं रत्न तूं जागता वीर माया ३८
कुधी पाठवी हेमवर्णा कुरंगा म्हणे श्री धरा शीघ्र नेऊं सुरंगा
निघे शूर नें दूर मारीच राया शरें शत्रुच्या राम मारी चरा या ३९
प्रभूसाचि मारी कुधी हाक दापी विवेका नलोपे जरी हा कदापी
क्षण क्षिप्र लोपोनि दे कांप तीतें नमानील अत्यार्त ती कांपतीतें ४०
म्हणे लक्ष्मणा रक्ष बा देवरा जा उपेक्षूं नये संकटीं देव राजा
वदे तो सुधी देवि हे होय माया कथी तेज कीं नम्र तूं हो यमा या ४१
महीजा म्हणे रामभद्रें मरावें हरावें मला आत्म-पत्नी करावें
असें त्वां कसें पाप चित्तीं धरावें सरावें न हें न प्रजेशें तरावें ४२
असी सज्जना जाचिती होय शाला नसेवी म्हणे जाचि ती हो यशाला
न बाळासि दे वीज सीता पहाया महाशोक देवी जसी ताप ह्या या ४३
उडे धैर्य त्याचें जसें पर्ण वातें भजों जाय तो मीन त्या अर्णवातें
जया सर्परूपापुढें भेक-लीला परा ये हरी उग्र तो एकलीला ४४
स्वहंसास मारूनि हाका +वळा हो म्हणे शीघ्र या भग्न हा कावळा हो
जटायु स्वयें सून कां सोडवीना गमे फार तत्कर्म तें गोड वीना ४५
रथातें स्व-चंचु-प्रहारेंचि चूर प्रतापें करी वृद्ध तो फार शूर
कृपाणें तया दुष्ट दिक्कंठ ताडी अधर्में रणीं भग्न होऊन पाडी ४६
क्षतांहीं भयें कश्मळेंही गळाला तरी श्रीस घेऊनि वेगें पळाला

---

१ उत्तम वांचण्याचें औषध शी. २ सहाशाल्यें. ३ अहो. ४ दूता. ५ अति-आर्त- अतिपीडित. ६ लासी, पाजी. ७ वि-हग-जटायूस. + फिरा.

अळंकार-वस्त्र फूवंगांत सोडी नभामाजि हाका रघुनाथासि फोडी४७
समुद्रासि लंघूनि लंकेंत देवी अशोकींवनीं दुष्ट दिक्कंठ ठेवी
कथी मार्ग सौमित्रि तें वृत्त राम प्रभु क्षिप्र ये शून्य पाहे स्वधाम४८
तसा हाहि बोले जसा हाय कामी म्हणों प्रेमळा काय तें आयका मी
वनीं जानकीतें म्हणे हाय शोधी विलोकी तशा गृध्रपा हा यशोधी४९
पुसे राम पक्षी कथी खेद शौर्स्यें वधू नेलि केली दशा हे दशास्यें
प्रभूच्या त्यजी देह तो गृध्र अंकीं बुडो दे जडा नाम ज्याचें न पंकीं
पित्याची तसी तत्क्रिया सांग केली लयातें कबंधार्ति तत्काळ नेली
दिली सद्गती क्षिप्र भिल्लीस कंपा जरी हे तरी होय धन्याचि पंपा५१
जया जन्म देतां वरी अंजना भा हनूमान् वनीं भेटला कंजनाभा
सुकंठासि तो भेटवी जानकीशा अभी ऋष्यमूकाविना ज्या न कीशा
अळंकार दे प्रेमपात्रा सखा तो म्हणे बा मला वाळिचा त्रास खातो
कथा या सख्या हा निवेदी नयज्ञा पहातां समृद्धा निवे दीन यज्ञा५३
वधी वाळिला भानुजा राज्य देहा तयाच्या वरी श्री सुख प्राज्य देहा
म्हणे दुःख कांहीं वहावें न दीनें श्रिता तृप्ति द्याया वहावें नदीनें५४
दिशा तीन शोधूनि मासांत मागें कपि क्षिप्र आले असंस्पृष्ट आगें
न ते दक्षिणाशेसि जे पाठवीले तिहीं स्वापराध स्वयें आठवीले५५
असें बोलिले पावले कीश मोहा स्व-जीवाहिचा आधि केकी शमो हा
जटायू वरी कीर्तिहारा मराया जगीं जन्मलों व्यर्थ हा रामराया५६
महेंद्राचळीं गृध्र संपाति-नामा पुसे स्वानुजा तोय दे गाय रामा
कथी अब्धिऐसीं पुढें वीस गांवें दिसे स्पष्ट लंकेंत ती जीस गावें५७
कथी तो स्वपक्षांचिया अत्ययातें तदुसत्तिनें दे तयां प्रत्ययातें

१ आपलेंगृह. २ शासनकरण्यासयोग्यअसा. ३ कबंध-आर्ति-कबंध दैत्यरूपपीडा. ४ तेज. ५ निर्भयपणा. ६ वानरश्रेष्ठा (सुग्रीवा) ७सुग्रीव. ८ आश्रिता. ९ नदि-इन-समुद्रें. १० नस्पर्शिलेले. ११ अपराधें. १२ दक्षिण-आशा-दक्षिणदिशेस. १३ आधिरूपमोर. १४नाशातें. + गांव.

स्तवें जांबवान् वाढवी मारुतीतें म्हण रक्ष न क्लेश बा मारु तीतें ५८
उडे त्यासि सिंधूंत उत्साह तारी वरी वीर ही पक्षकुत्सा हतारी
म्हणे लंघिनां धन्य मैनाक रीती स्तवातें सुरी जेवि मैनी करीती ५९
करी तोंड जी योजनें पांच वीस गमे जेविला हा तिच्या पांचवीस
मुखीं ना मातेचिया हा रिघाला लवें सूक्ष्म होऊनि वेगें निघाला ६०
गिळी सिंहिका जी धरी सावलीला जळीं त्या सुदुर्बुद्धिच्या मावलीला
वधी धीर तोडूनि तत्काळजाला पुन्हा लंघिता सिंधु तत्काळ जाला
न लंका बळे तीस तो हात दावी करी तोंड हुंकार तें हा तदा वी
पुरी रात्रि शोधी विलोकी अशोकीं म्हणे सर्व नासे अधर्मे यशो कीं ६२
विलोकी सती-धिक्कृता यातुपातें म्हणे राम व्हावा शिखी या तुपातें
दयेच्या स्तवी रामराया समुद्रा कथी दे तिला ती निवायास मुद्रा ६३
स्वचूडामणी श्रीहि दे तोख पावे म्हणे शत्रु माझ्या करें तो खपावे
चुरी वृक्ष मर्दी बळें युद्ध-दक्षा वधी रावणाच्या कुमाराहि अक्षा ६४
रणीं इंद्रजित् संज्ञ जो तो पळानें करी बद्ध जें ब्राम्ह त्याच्या बळानें
नजाये महास्त्रा तया मान दे हें वरावा यशा बंध हा कां न दे हें ६५
धरी वैरि-भा-हानिच्या कामनेला सभेमाजि तो द्यावया धाम नेला
बळें आवरी चित्तसें पुच्छ मानी म्हणे धिक् खळा रावणा तुच्छ मानी ६६
कुधी पेटवी दूत-दंडार्थ पुच्छ प्रदीप्ताग्नि झाला जुना पुष्पगुच्छ
करीत प्रहासासि होती सभाजी सुटोनि प्रतापार्क तो तीरे भाजी ६७
जळे होय लंका अलंका रमा ती निघे सर्व झाला अलंकार माती
तिचा धूम अंडीं तसा हाय कोंदे न नाकींहि तो बोलणें आयकों दे ६८
दिला युक्त त्या पातका दंड कानें नघे सूक्त या पातका दंडकानें
पुरीच्या फळे लेश सत्ताप दाहें गमे लागली काळलज्जा पदा हें ६९

१ वि-ईश-पक्षिश्रेष्ठ संपाती. २ मारुती. ३ देवी. ४ अभिमानी. ५ अत्यंत हास्यासि. ६ सभेस. ७ सत-ताप-उत्तमताप. + लंका नव्हेसी. ⁂ सिंहिकेच्या काळिजाला तोडून तो मारुती तीस वधी. ⁂ झाला.

सहाघासि हा भेद आधीं तराया कथी खूण दे रत्न आधींत राया
फणी चंदना तापतो खेद देतो तसा वायुजा मोप तोरवें यदे तो ७०
अनंतोपकारांचिया जाण दामीं तुझ्या बांधलों सर्वदा प्राणदा मी
करी यापरी रंजना भान राहे न यो सूक्ति ये कंजनाभा नरा हे ७१
निघे राम सौमित्रि-सुग्रीव-युक्त स्वशुद्दें यवां व्हावया मुक्त
नमी पाय जो त्या दशास्यानुजाला सुख प्राज्य दे राज्य न ग्लानि ज्याला
नळाच्या करें सागरीं सेतु बांधी प्रतापें निजें अद्रिसीं अद्रि सांधी
दहा रुंद तो लांबही सेतु गावें शत प्राज्य हें कर्म धीहेतु गावें ७३
सुराराति मूर्धा-धनु श्रीस दावी करी शोक मायेसि ती सत्य भावी
दिलें राज्य ज्या नत्रिया तत्व सांगे छळातें सये मानिसी सत्य कां गे ७४
कपींचें महासैन्य घेऊनि हर्षे समुद्रासि लंघी प्रताप-प्रकर्षे
सुवेळीं चढे राम लंकेसि पाहे द्विषद्दर्शनातें न सुग्रीव साहे ७५
उडे तार्क्ष्यसा त्या भुजंगासि ताडी तळीं तत्किरीटा तयातेंहि पाडी
करी अंगदा दूत सामार्थ धाडी प्रभु क्षिप्र तोही हरी तेज नाडी ७६
रणीं मारितांही प्रहस्तादि सेना म्हणे मर्त्य माराचि भी ज्या दिसेना
स्वयें भंग पावे तरी तो लवेना तया दुर्मदासीं दुजा तोलवेना ७७
रणीं शक्रजित्-सर्प-पाशांत बांधी महाभूतिची भी हरीची न कांधी
गरुत्मान् करी दूर त्या संकटातें सुतेजाचिया लेववी कंकटातें ७८
प्रवीरासुतें दो दिसां जागवीला न वज्र-प्रहारें रणीं भागवीला
यमेंही प्रसंगांत जो आटवीला दिगास्थें महावीर तो पाठवीला ७९
सुकंठा धरी तो हरी नाक कान नखांतें तयाच्या करी नाक कान
रणामाजि कुंभाचिया सर्व तातें कपि मारिले-ही दिली पर्वतातें ८०
नमानीच रामा महाबाहुला जो महाशक्ति दावी म्हणे राहु लाजो

---

१ लक्ष्मीपति (राम) २ मारुतीस. ३ नत्त-प्रिया-त्या बिभीषणाची स्त्री (सरमा) ती. ४ कवचातें. ५ लज्जा. +. बुद्धिहेतु.
✢ गायन करावें. ‡ मोठें ऐश्वर्य ज्याचें असा (हरी या शब्दाचें विशेषण)

यशांचा रणीं त्याहि तो राशि खंडी फणीचा नसाहेचि नोरा शिखंडी८१
करी ज्या सदा गर्व थारा वणातें पवीच्या धरी सर्वथा रावणातें
कळे चापिं त्याचें वच प्रत्ययाला परें ये न जें वाटलें सत्य याला८२
कथा कुंभकर्णाचिया अत्ययाची कथी दूत मानी न धी सत्य याची
म्हणे हा न व्हावा[4] शाता हायनोहीं अकस्मात् कसा जाहला हाय नाहीं८३
रडे जेवि कुंभा तसा हा निकुंभा सुधेच्या म्हणे जाहली हानि कुंभा
त्रिशीर्षादि जे पुत्र त्यां आपल्याला स्मरे हा म्हणे[5] तो महाताप[6] त्याला८४
करी इंद्रजित् काळसा नाश माया-बळें मानि मोपाळ मानो शमाया
प्रतापाग्निनें वीर भाजी वसेना क्रिया न प्रकाशीच भा जीव सेना८५
रणीं राम सौमित्रि सुग्रीव विद्ध क्षणें ते करी मारुती युद्ध-सिद्ध
महौषध्यगाचें सुधी शृंग आणी सुधा[7]-बंधु तद्गंध शल्यार्ति खाणी८६
बुडे शत्रु कां भाविना शाप हा तो म्हणे शापिला भाविनाशा पहातो
तरी देखिना मान सामा रणाला सजे वाढवी मानसा-मारणाला ८७
करी रत्न-हेमें घना दभ्र माया-महीजा वधी मेघनाद भ्रमाया
मथी त्यासि सौमित्रि दे वासवाला सुख प्राज्य सर्वांहि देवा सवाला८८
रडे पुत्र-शोकें सुराऽराति मोहें पडे पाप योजी मनामाजि तों हें[9]
घडे जीमुळें नाश हा ती वधावी जडे या न कंठ कृपाणा[8] बधावी८९
अकस्मात् पुढें देखतां खड्गपाणी भयें राघवाची म्हणे हाय राणी
सुपार्श्व प्रधान स्वयें त्यासि वारी फिरे वायुनें मेघसा वासवाऽरी९०
वधा राम सौमित्रि सुग्रीव भक्षा म्हणे राक्षसांतें निघा राज्य रक्षा
उठा दाव[10] व्हा शत्रुच्या सैन्य[11]-कक्षा भिडा जानकीचें जडो वक्ष[12] पक्षा९१
बळा धाडि हा नीच मूढा लयाला गळे देखि हानी चमू दाळ याला
हर[13]ाऽक्षि स्मरा अग्निचे लोळ[14] वीतें[15] धनु स्वामिचें त्या बळा लोळवी तें९२

---

१ मोर. २ नाशाची. ३ वर्षांहीं. ४ नामविशेष रावणपुत्र त्यानें. ५ लक्ष्मीपति. ६ लहान. ७ अमृताचा बंधु. ८ नळधारीला. ९ वराच्या भार्या. १० वणवा. ११ सेनारूप गवतास. १२ छाति. १३ महादेवाचेंनेत्र. १४ सवेग जे अग्निचे कल्लोळ. १५ प्रसवतें.

न त्या ऐकवे वायकांच्या विलापा नकें पुरीं राक्षसांच्या इलापा
मनाचा रवचे सर्व धारा मराया वधाया निघे सर्वथा रामराया ९३
करी रावणा कव्यभुक् सर्व गोळा म्हणे हूं वधा वीरहो शत्रु घोळा
वदे त्यांसि सुग्रीव धूळींत लोळा रणीं भग्न व्हा दांत रवा हात चोळा
बळा लक्ष्मणाच्या नदे वारि त्याच्या उरीं शक्ति वक्षांत देवारि त्याच्या
बुडाया भ्रमीं देव शास्त्रीश हाणी करी त्यांसि जैसी यश स्त्री शहाणी
जयाची प्रसू अंजना भानुज्यातें कथी ज्ञान तो कंजनाभानुजातें
पुन्हा शृंग आणून दे स्वस्थता तें तयाच्या सुरवीं स्थापिलें स्वस्थ तातें
द्विषद्बुद्धि सोडून जो संगरामीं तयांच्या कथूं त्या कसा संगरा मी
बळें शक्र रामासि दे स्यंदनातें वधाया रणीं कैकसी नंदनातें ९७
चहूनीं उणें लोटले साठ याम शत छेदितांही शिरें तींच राम
विलोकी घिरे कुंभभू मंत्र बोधी म्हणे सूर्य वत्सा जयें स्वस्थ हो धी
कथी मातली कंजजास्त्रप्रयोगा क्षणें संहराया खळा विश्व-रोगा
तया दे यश श्रीश मंत्रूनि सोडी शर क्षिप्र सुक्रूर शत्रूर फोडी ९९
अरीची तनू भूतळीं पुष्प-वृष्टी प्रभूच्या शिरोर्ध्वीं सुरवी सर्व सृष्टी
पडे एकदां वासुरीं जेविं गृष्टी द्रवे कीर्ति भक्ती निवे शक्र-दृष्टी १००
नभीं वाजले निर्जरांचे नगारे विधाता म्हणे नांद हर्षे नगारे
कथी शंभु गा याचि अन्या न गारे वदे कीर्ति चित्तीं नहो म्लान गोरे
यशाचा जगा तारि आलाप हा या सुधा-सिंधु-तमासि आला पहाया
गजास्याचिया गर्वदाना रदातें कथी भूलवी सर्वदा नारदातें १०२
नकेलेंचि रंभोर्वशी मेनकांहीं तसें नृत्य हें सांगतां ये न कांहीं
सुरर्षी यशा भासुरा गात नाना-परीनें करी त्यां सुरागां तनाना १०३

---

१ पृथ्वीपतिजोरावणत्याला. २ मांसभक्षक (राक्षस) ३ कंजनाभ-अनुज-पद्मनाभजोरामत्याच्याकनिष्ठबंधुलक्ष्मणातें. ४ हनुमद्यश. ५ लक्ष्मणाच्या. ६ शत्रुबुद्धि. ७ एकवेळव्यालेली गाई. ८ नग-अरि-हेपर्वतशत्रो (इंद्रा) ९ थंडहोय. १० प्रसिद्ध. + कंज-ज-अस्त्र-प्रयोग-ब्रह्मास्त्राच्याप्रयोगा.

म्हणे जो गुणांतें सुखें मानवा हे जन क्षिप्र सारे असा वान वाहे
विधाता वदे युद्ध पाच स्तवा हो व्यथा हो यशा बुद्धपा ग्रस्त वाहो१०
दिगास्या जळादि स्वयें देववी तो यशें तारितो विश्व जो देव वीतो
तया दे पद श्रीश पादानतातें प्रकाशी सुधा-सत्प्रपा-दान तातें१०
करी दिव्य देवादिची आइ शीता तिला मायसी अग्निची रयाइ शीता
उठे सर्वही प्रेत होता तसाची इये दाखवी रीति तो तात माची १०६
वसे पुष्पकीं तो सदार क्षणांत प्लवंगांसि घाली सदा रक्षणांत
प्रजांच्या श्रमें जो तया दे वदावी नसी भेटि मोटी दया देव दावी१०
तपोधीन योगी शरीरज्य होमी जयाकारणें तो करी राज्य हा मी
वदों काय भव्यास दावि प्रजा तें वरी ख्याति नव्या सदा विप्र ज्यातें१०
श्वधीच्याहि जो सारि रखेदा समाना दया दे सुतासारिखा दास-माना
सुधेचा रुच तों या गमे घांस मार स्वयें होय हो यागमे घांसमार १०९
यथाबुद्धि वंदूनि जी उक्ति दास स्तवाची वदे ती रुचे मुक्तिदास
तसी धी न जीवा नसे वासवास स्वनामेंचि दे मान सेधा सवास ११०
न याहूनि हा अन्य काहींच जाणें दुजा अर्थ चित्तांत याच्या नवाणें
मयूर स्वसेवा वरी यांत पा हे सुरामायण श्रीश-रामासि वाहे १११

समाप्त.

# सद्भक्तसर्वस्वरामायणआरंभः

## वसंततिलकाछंद.

श्रीकांत तो दशरथात्मज होय दास-
चास-क्षयार्थ करुणाऽमृत-तोयदास

---

१ सती इत्यादिकानीं अंत प्रवेश करण्याकरितांजी आंगान्यानी युक्त रचली ती.
२ थंड: ३ कुन-अन्नाबुद्धिचाहि.

यास त्रि-ताप-हर राम असें सुनाम
स्थापी मतें स्वगुरुच्या नृप पूर्णकाम १
भाग्यें तदंश दुसरा सुकुमार झाला
ठेवी पिता भरत हें शुभ नाम त्याला
तैसाचि लक्ष्मण तिजा चवथाहि नावें
शत्रुघ्न तद्यश सदैव सुखार्थ गावें
श्रीराम लक्ष्मण असी बहु रम्य जोडी
यांसीं निरंतर परस्पर फार गोडी
शत्रुघ्नही भरत-चित्त कधीं नमोडी
सद्रीति हे शिशुपणींहि दिसे न थोडी ३
विद्या कळा श्रित-सुखा[1] गुरु दे वसिष्ठ
ज्ञानें गुणें स्तविति जे गुरु देव शिष्ट
वादीं तयां स्वकृती चवघां सभारीं
देती न दे अमृत ती चव घांस[2] भारी ४
पाहे नृपाळ उचिता तनया विवाहा
चिंती मनांत अजनंदन जों विवाहा[3]
तों ये महामुनि तया नमि गाधिजाला
क्रव्याद[4]-विघ्नित-मखें बहु आधि ज्याला ५
पूजूनि सादर पुसे रघुराज[5] आर्या
आलासि योजुनि जया हृदयांत कार्या
तें सांग जाणसिच शक्ति असे नसे वा
वा ध्यात मी जरि मनांत असेन सेवा ६
सांगे नृपासि मुनि पावुनि ताप येना

---

१ आश्रितांच्या सुखा. २ सदन्नाचे कवळ. ३ गरुड वाहन ज्याचें असा.
४ मांसभक्षकांनीं विघ्नयुक्त केलेल्या यज्ञें करून. ५ दशरथ.

तैसें खळा दशमुखा मज शापवेना
दे रक्षणार्थ सह- लक्ष्मण रामराया
यज्ञघ्न-दिङ्मुख- बळा प्रखरा मराया ७
स्नेहें नदे नृप वसिष्ठचि देववी तो
पायींच जाय मग जो जग देव वीतो
विद्या बळा अतिबळा मुनिराज दे हा
क्षुत्तृट्श्रमा हरुनि ज्या सुख देति देहा ८
अस्त्रें शान प्रभुवरा शिकवी नयज्ञा
रक्षावया सुकृतराशि कवीन यज्ञा
रामें गुरूक्ति बहुमानुनि ताटकेला
मारूनि तो परम निर्भय वाट केला ९
सिद्धाश्रमीं जय दिला बरवा सवातें
घ्याया स्वभागहि पुढें बरवा सवातें
फाळा सुबाहु दिधला मग अर्णवातें
मारीच जेविं लघु नीरस पर्ण वातें १०
होय प्रसन्न मुनि कौशिक दे वराशी-
राशी म्हणे उपट शत्रु-फणाधराशी
वाहे मखा जनक ने मुनि सानुजा या
ज्या यौंचि पाद-रज गौतम-धर्मजाया ११
जो दोष तापिव म्हणे स्वजना शिला हो
तो लावुनि स्व- पद- नीरज नाशिला हो
वा द्यावया त्रिभुवनासि सदा मह ल्यो
सत्कीर्ति हें वदलि पूजुनि ती अहल्या १२

---

१ कवि- इन- कविश्रेष्ठ (विश्वामित्र) तो. २ यज्ञस्थान. ३ रसरहित ४ मागे. ५ उत्सव. ६ धारणकरा. * अहो. + क्षुत्-तृट्-श्रम- क्षुधेच्या, तृषेच्या श्रमा.

कां लंघितील भुज नेणति चापला जे
वाटे मनीं कठिनतेस्तव चाप लाजे
जी त्या सुदुर्घटपणें धरि, ताप शीता[1]
तत्काळ होय हिमशैलसुतापशीता १३

तें भंगितांचि धनु ती मिथिलेश-बाळा,
घाली गळां स्वपतिच्या समयींच माळा
रामाचिया मुनि तिघां अनुजांसि कन्या
तो देववी कथुनि त्या जनकासि धन्या १४

तो आणवी सतनया अजनंदनातें
कन्यार्पणें मिळवि सत्सुखकंद नातें
गेला पुसोनि मुनि जोडुनि सद्यशाला
या सत्कथेहुनि परा जमि मद्यशाला १५

क्षत्राप्रति त्यजुनि भार्गवरा मरो धी
ज्याची म्हणे स्वपथ भार्गवराम रोधी
अत्युग्र तो कुगधि गल्ल वदे वदावी
जी शक्ति शांति रुचि तल्लव[2] देव दावी १६

पूर्वापरी सविजयी नव राम हा तें
साकेत सपुर धरी प्रवरा महातें
धन्य क्षितीश महिषीसह सासु नाहीं
धन्या असी निववली सहसा सुनांहीं १७

ने मातुळ स्व-विभवा भरता पहाया
वृद्धास दे स्वमहिचा भर ताप हा या
ज्येष्ठा सुतास युवराज करावयाला
योजी म्हणे गुरु विचार बरा वयाला १८

---

१ हिम- शैल-सुत- अप-शीत- हिमाचलपर्वतोत्पन्न भागीरथीच्याउदकासारिखी थंड. २ तत्- लव-त्याशांतीचालव.

शक्र-प्रियार्थ कथि दुर्मति मंथरा या
दावावयासि परलोक-ग-पंथ राया
मन्वऽब्द राम वन सेवुच एक याची
ऐसा दुजा वर सुता क्षिति केकयीची १९
येथा तिच्या विनवितांहि तसा मनातें
वाटे जसा हठ न तें हित साम-नातें
व्हाया यशा स्व- तिलकाऽलक-हानि-घाया
स्नेही करी प्रणत-पालक हा निघाया २०
चित्तीं म्हणे प्रभु न या गुरुस त्यजावें
धर्में यशें न विलया गुरु सत्य जावें
सीताऽनुजांसह निघे जरि तात दे हा
आज्ञा न कष्टहि वनीं वरि तात-देहा २१
घे वल्क भूषण सुवस्त्र नसेचि पत्ती
ठावी असी पुरजनासि नसे विपत्ती
रायें रडोनि बहु दुर्नय आठवीला
स्नेहें सुमंत्र रथ सत्वर पाठवीला २२
पौरांसि कारुणिक तो फटवी सजाया
केला विलंब न जिहीं अटवीस जाया
भेटे सख्या त्वरित राम निषाद-राजा
तो त्या गमे करि महेश विषादरा ज्या २३
तेथें अरविन्द रचिती प्रभु ते जटा कीं
माता वदे नृपति-वेषज तेज टाकीं
दे त्यांसि पुष्कळचि तापस-वेष शोभा
तो भाव जागवि विरक्त-मनींहि लोभा २४

---

१ पादचारी. २ अरण्यास. ३ केकेया. + सुता-म्हणजे भरतास क्षितीसकट. सुता म्हणजे केकयी केकयाची कन्या. ॥ः आपल्याकडं काची होणारी हानी.

तेथें सुमंत्र रथ सोडुनि दे वनौका[1]
मागे नमूनि गुहनामक देव नौका
पारासि जाय उतरोनि सुरापगेला[2]
प्राभूनि यत्तय गतीस सुरोप[3] गेला २५
जाऊनि कीर्तिविभुदेवरविप्रयागा
शिष्यासख्यामिवदलावरविप्रयागा
श्रीचित्रकूट वरि हा नग मेरुसा हौं[4]
हें नीटसें जरि मना नगमे रुसा हो[5] २६
वृत्रारिचाहि[6] वरि हा निधना सहाय
होतां म्हणे कृपण हानि धनास हाय
वृत्तांत होय सुजना भरता पवी तो
थोडा मुला ज्वर-महाभर तापवीतो[7] २७
तैशा जडेसि भगवज्जन[+] कां न गांजी
त्यागी अभीष्ट-फल-सज्जनकां नगां जी[*]
तात-क्रिया करि पुरी त्यजि तो अरण्या
जाऊनियां विनवि सत्करुणा शरण्या २८
सांगे तया भरत मृत्युकथा पित्याची
मोहे मुहूर्त रुचि बुद्धि तथापि त्याची
ज्याचें सुरर्षि यश वर्णित हिंडतो या
विश्वांत तो गुरुसि दे प्रभु पिंड-तोया २९
ज्यांच्या तुरेचि किमपि प्रखराघ वातें
तीं श्रीपदें भरत वंदुनि राघवानें
प्रार्थी म्हणे निजपुरा परतून ये बा

१ अरण्यामधें रहाणाऱ्याला. २ सुर-अपगा-देवनदी (गंगा) तिला. ३ मद्यपी. ४ होऊ. ५ अहो. ६ वृत्र-अरि-वृत्रासुराचा शत्रु इंद्र त्याचाहि. ७ मोहपावे + भगवत्-जन-भगवंताचा भक्त भरत तो ∴ कैकेई.

बोले प्रभु त्यजुनि हें परतूंनये बा ३०
मी सेवितों वन चतुर्दशमात्र वर्षें
तों तूं करीं गुरुवरास्तव राज्य हर्षें
कीं तात-वाक्य-परिपालन पुत्र धर्म
त्यागी न जो वरि तया श्रुति कीर्ति शर्म ३१
तेथील जे अहित-मारण-काम हर्षी
त्यांचें न ते करिति वारण कां महर्षी
घे पादुका अभयही परतोन वासा
बाहेर आदरि वसे पर तो नवासा ३२
भेटोनि अत्रिस करी प्रभु वंदनातें
तो हर्षवी जनक ज्यापरि नंदनातें
लावी सती प्रभु-सतीस सुचंदनातें
प्रेमें तपें अवनिचें करि मंद नातें ३३
तारी वधूनि विभु उग्रतरा विराधा
विप्रांसि हें कथि यशें न भयें विराधी
देऊनि भेटि शरभंग सुतीक्ष्ण वर्णी
दे यासि खेद विषयीं मुनि मांडकर्णी ३४
भ्राता अगस्त्य-मुनिचा करि आदरातें
नाशी महर्षि-हृदयांतिल हा दरातें
दे वैष्णवें घटज सन्मुनि यासि शस्त्रें
श्रीगाधिनंदन जसीं विजयार्थ अस्त्रें ३५
भेटे जटायु निज-तात-सखा तयातें
दे सौख्य जें हित करूनि महादया तें
गोदावरी वरुनि पंचवटींत राहे

१ तृसव्हा. २ भयातें. ३ अगस्त्य. + शत्रूंच्या मरण्याची इच्छा ज्याला असे. ≠ भरताचें. ‡ नामविशेषऋषि.

श्रोत्यां कथा कथि भवीं अवटीं तरा हे ३६
तेथें दशास्य-भगिनी विधवा रमाया
प्रार्थी जया भजतसे विनयें रमा या
सौमित्रि दंड करि खंडुनि नाक कान
प्रेमें तदीय यश वर्णिल नाक कां न ३७
तीचा खराख्य खल माउसबंधु कोपे
मानी मदांध जड तो प्रभुबाण सोपे
मारी चतुर्दश-सहस्त्र-पलाश-युक्ता
त्या लाजवि प्रभु यशें हिम-दुग्ध-मुक्ता ३८
दावी निजा कुमति शूर्पणखा दशा तें
स्त्रीरत्न वर्णुनि पलाश-वरा शशातें
तत्कोपकाम खवळूनि बळेंचि धाडी
श्रीराम-केसरिवरि व्यसनांत पाडी ३९
श्रीसीं म्हणे खल सुरवें न सदा रमो हा
मारीच हेम-मृग शीघ्र सदार-मोहा
योजी तया निरखितां जनकात्मजा या
वांछी वदे द्रुत धरा नुमजोनि माया ४०
लागे धनुर्धर रघूत्तम रंकुमागें
भागे सुदूरगमनें वधि त्यासि रागें
गागे शरार्तहि नरेश्वरसाचि खोटा
वागे मनीं भय सती गणि घात मोटा ४१
लोभें म्हणे कविहि कां पति-घात लागे
पाठीस हा व्यसनिं कां पति घातला गे
श्री देवरा विनवि वा लघु पाव नातें

१ संसाररूपखळग्यांत. २ स्वर्ग. ३ हरिणामागें. ४ ओरडे.

+ चवदा हजार राक्षसयुक्ता.

चिंतूनि वांचिवचि जा रघुपा वनातें ४२
तीतें म्हणे कधि न हें ऋषि राक्षसाचें
आहे वनीं कुशळ तो रुचिराक्ष साचें
सीता वदे मदभिलाष[1] तुझ्या मनांत
आलासि यास्तवचि तूं कुजना वनांत ४३
जा नीघ नीघ उटजीं कितवा[+] नरा हें
ऐसें कुकर्म न नरा हिन वानरा हें
भार्या कसी उचित जी तुज मायसी[2] ते
ती आपणासहि वदे त्यज कायं[3] सीते ४४
रामाकडे रडत तो धृत-ताप गेला
सोडी तिला खग जसा कलुषापगेला[4]
तों ये दशानन बळें हरि एकलीला
इच्छी गतायु उरगासह भेक[5] लीला ४५
मारी सती निजपतीस दिरास हाका
हा काळसा हरितसे पशु यासि हांका[6]
हा काय हो त्यजिलि ती सहजा दया जी
या जीं[7] श्रितार्तिहर तो हयमेधयाजी ४६
वाहे रथीं गगनमार्ग धरी पळाया
तों गृध्रराज अडवी सहसा खळा या
भंगूनि वाटचि सुरांसि परासु[≠] नेला
स्वश्वास दे श्वशुर हर्ष वरा सुनेला ४७
धर्मे न होय जय तोडुनि[8] पक्षतीतें
खड्गें पके हरुनि कैतव-[9]दक्ष तीतें

---

१ मत्-अभिलाष-माझीइच्छा. २ आईसी. ३ देह. ४ कलुष-आपगा-गढूळनदीला. ५ बेडुक. ६ पिटाळा. ७ अजि. ८ पिसांच्या मुळानें. ९. कपटचतुर. + कपटया. ≠ पर-असु-शत्रूचे प्राण.

श्री ऋष्यमूक-गत- वानर- पंचकातें
पाहे त्यजी स्वनग[1] वंचुनि वंचकातें ४८
पावे विलंघुनि पयोनिधि निष्कलंका-
लंकारमूर्तिस[2] हरूनि दशास्य लंका.
ठेवी अशोकवनिकेंत तिला विरोधी
रोधी म्हणे स्वभजनींच इची शिरोधी ४९
सौमित्रि साश्रु निज खेद वनांत सांगे
स्वामी म्हणे कटु असें वदलीस कां गे
धांवोनि ये उटज केवळ शून्य पाहे
वाहे मनीं परम शोक न ताप साहे ५०
तीतें वनांत बहु सानुज हा[3] यशोधी
सुस्त्रैणसा म्हणत हा बत हाय शोधी
तों गृध्र तातसख मूर्छित देखिला हो
रामें खरा जनक-घातचि लेखिला हो ५१
नेली सती दशमुखें मजला अधर्में
पाडूनि हें कथुनियांचि असत्यकर्में
श्रीशासि तातसम देउनि शोक सोडी
तो प्राण दाखवि यशीं प्रभु फार गोडी ५२
दे पिंड तोय करुणार्णव तो तयातें
देणार हा दखुनि सत्पद तोतयातें
साचें करी हरुनियां गुणपाश नातें
घायासि मुक्ति हुडकी कुणपाशनातें ५३
ग्रासार्थ ने धरुनि यास न ने कबंध

---

१ आपले अलंकार. २ शुद्ध अलंकारमूर्तिरूप सीतेस.
३ खेदार्थी अव्यय. ४ कोणताही पदार्थ नसतां खरेपणानें जी त्याची रचना तो तोतया त्यातें.

स्तोत्रार्चना हरि तदीय अनेक बंध
भिल्लीस दे स्वपद वाढवि मान कोय
स्कत्यहि हा इतर वाढ विमान कोय ५४
पाहे प्रसिद्ध सरसी अतिरम्य पंपा
पावे स्मरोनि दयितेप्रति राम कंपा
गेली म्हणे त्यजुनि जेविं घनासि संपा
माझ्या असूंसि म्हणतो कुसुमेषु संपा ५५
सौमित्रिच्या बहुत दे प्रभु मान बोधा
जातां कबंध-वचनें प्रिय-दार-शोधा
भेटे मरुत्तनय भूसुरवेष कार्या
वृत्ता पुसे सुगळ भेटवि सोधु आर्या ५६
झाला सुकंठसख राघव हृष्ट पूषा
दावी प्रभूसि स्वगळ प्रभु-दार-भूषा
जो त्यासि तत्प्रियतमेसि हरूनि वाळी
तो मारिला प्रभुवरें हरिपुत्र वाळी ५७
दे रामभद्र कपिराज्य तया नतातें
केली तसी प्रियसुतींहि दया न तातें
कीं हा समस्तहि सुरासुर खवळवीतो
याच्या प्रिया अमित वानर मेळवी तो ५८
गेले सुकंठ-वचनें श्रमलेहि योध
श्रीचा कळे निपुण वायुसुतासि शोध
तो धन्य सागर उडे वधि सिंहिकेला

---

१ देह. २ सरोवर. ३ वीज. ४ मदन. ५ कपी. ६ रामास. ७ सूर्य. ८ गाळी, वर्जी. ९ नामविशेष वानर. १० सुग्रीव. * इंद्रपुत्र. + प्रश्नार्थक अव्यय.

जिंकूनि त्याहि सुरसेप्रति पार गेला ५९
लंकेसि जिंकुनि पुरी हुडकूनि रात्री
आहे अशोकवनिकेंत विशुद्ध-गात्री
तों ये दशानन वदे वश हो मला गे
हूं मात्र बोल न सुलभ्य न होम लागे ६०
सीता वदे निशिचरा निरया चपापें
रे ताप शाप कुदशा चिर याच पापें
होसील भस्म सकुळ प्रभु-सायकांहीं
व्याघ्रा दिली गिळिल ओतु न साय कांहीं ६१
पाण्यापरीस करि पातक पामरा या
चिंती मनीं जनकजा मग रामराया
कोपे म्हणे खळ बरें न वदोन मास
देसील जीवितजडे तव दोनमास ६२
जातां दशास्य गुण घे उकलूनि वेणी
उद्बंधनार्थ महिजा खचरी न सेणी
या पेटल्या अदय हा वृक मीहि एणी
व्हावी म्हणे तनु न सासु तयास फेणी ६३
वर्णी मरुत्तनय शक्ति-दया-सुमुद्रा
तो दे नमूनि तिस धृत्युदयास मुद्रा
आनंदवी कुशळ उद्यम-वृत्त सांगे
नेतों म्हणे सति वृथा श्रमतीस कां गे ६४
सीता म्हणे मज अयोग्य पळोनि जाणें
जावें वधूनि खळ हें उचित स्व-जाणें
प्रार्थी तिच्या स्तवुनि मारुत-भू सुतेज्या

---

१ मार्जार. २ मांस. ३ दोरी. ४ धृति-उदय-धैर्याच्याउदयास. ⁘ गळफांसार्थ. + रात्रीस. ‡ नरका. ‖ भयभीतहो. ⁘ उद्योगव घडलेलीगोष्ट.

दे वस्तु पाहुनि निवे प्रभु भूसुते ज्या ६५
चूडामणि क्षितिसुता प्लवगासि अर्पी
आशीःसुधा-सुरस वर्षुनि फार तर्पी
मोडी वरोपवन-वृक्ष अरीस झोडी
थोडी करी परचमू जय भव्य जोडी ६६
क्रोधें करूनि रण दारुण अक्ष[1] मेळा
याच्या सुरर्षि बहु वर्णिति अक्षमेळा
जो प्रेषिला जलदनादहि अक्ष-तातें
ब्राम्हें निबद्ध करि तो अरि अक्षतातें[2] ६७
बांधोनि घे कपि बळें कुतुकेंचि अस्त्रें
बाधों नयेतचि वरें जरि सर्व शस्त्रें
नेला सभेप्रति वरूनि पराभवाला[3]
गेला गमे अजित-दास बरा भवाला ६८
अस्त्रादिकां धरुनि आळस मान दे हा
या जाचिती सुजड काळ-समान-देहा
तूं कोण कां उपवन-द्रुम-भंग राया
कां मर्कटा नभिसि माडुनि संगरा या ६९
बोले मरुत्तनय मी रघुवीर-दास
जैसा मयूर खग चातक नीरदास
तैसा सदा भजतसे मज वातजा तें
तत्कार्य कार्य कवि जोडिति हात ज्यातें ७०
ज्याचा कृती अनुज शूर्पणखेसि दंडी
जो आपण प्रभु रणीं खर-शीर्ष खंडी
एकेंचि जो स्व-विशिखें निपटूनि वाळी

---

१ नसोसण्याला. २ क्षतरहितातें. ३ महादेवाला.

देऊनि राज्य सुगळा स्वसख्यासि पाळी ७१
नेली नदीय दयिता मरणार्थ चोरें
त्यावें भुलोनि उरगीप्रति जेविं पोरें
शोधास पाठवि सुकंठ मलाहि दूतां
ती देखिली तेंव अशोकवनांत पूता ७२
त्वां आणिली कसि सती दशकंधरा हें
श्रीचा अशा न अनयें तिळ गंध राहे
जो भाग्यमत्त जड तो जन अंधमा हें
त्यातें म्हणे व्यसन दुःसह बंध साहे ७३
राम-प्रताप न कसा तुज ठावका गा
हंसापुढें न विजयप्रद ठाव कागा
साध्वीस वंदुनि समर्पुनि रामराया
बांच स्वयें सजसि सान्वय[1] कां मराया ७४
भेटावया तुज समर्थ उपाय नाहीं
वृक्षाऽक्ष-सैन्य-लय यासि उपायनाहीं[2]
आलों पुढेंहि रडसील असा वधानें
त्वां नाशिजेल कुळ राज्य असावधानें ७५
इत्यादि मारुति वदे हित सत्य यातें
वाराबया अपयशासह अत्ययातें[3]
सोसी न भाषण तसें अरवाळ[4] हा तें
घे तद्वधार्थ कुमती करवाळ हातें ७६
ज्ञाता बिभीषण सुधी न अनर्थ साहे
बंधूसि तो विनवि दूत अवध्य आहे
होतेंहि आयु अवशिष्ट म्हणोनि राहे

---

1 स-अन्वय-वंशासहित. 2 नजराण्यांहीं. 3 नाशातें. 4 हलका.

तत्पुच्छ-दाहवि वरा मग दंड पाहे ७७
तैलार्द्र-नैकपट-वेष्टित अग्रपुच्छ
क्रोधें प्रदीप्त करि मानुनि त्यास तुच्छ
सांगे पुरींत फिरवा चिर वानरा जा
हें राक्षसांप्रति धरी परवा न राजा ७८
तो कौतुकी कपि स्फुटे न धरूनि शंका
जाळी न लंघुनि विभीषण- हर्म्य लंका
मानी न त्या दशमुखा नृप जेविं रंका
सिंधूंत पुच्छ विझवी उडवूनि अंका ७९
सीतेसि वंदुनि पुसोनि पुन्हा उडाला
भेटे प्रभुप्रति पिपीलिकसा गुडाला
चूडामणी धरुनियां चिर पाव दे हा
आलिंगनें निववि तो निरपाय देहा ८०
त्यातें म्हणे हरिति मानसखेद वार्ता
झाला[2]सि यो अमृतमेघ सखे द्वार्ता
द्याया नसे उचित अर्थ तुला अगा धा
या सन्मुखें पिउनियां स्वयशा अगाधा[+] ८१
वर्णी असें बहुत राघव सेवकास
ज्याची भयांत धरिती मुनि देव कास
मार्ग स्व-शत्रु- मत सर्व पुसोनि घेतें
हृट्टतेज[॥] घे वळ कुयातु[3] पुसों[4] निघे तैं ८२
पावे वळार्णव नदीपतिच्या तटातें
तो त्रासि कांपवि सदश्व जसा तटातें[5]

---

१ चिन्हा(लांछना. २ मला (रामाला), ३ रावण. ४ तीरातें
५ सामान्य अश्वातें. + गंभीरा. ॥ शत्रुतेज.

धिक्कारिला दशमुखें कथि जो हितातें
त्या वाटला रिपु बिभीषण मोहितातें ८३
आला बिभीषण सुधी शरणा[१] प्रभूतें
वंदी धरूनि विनयें चरणां प्रभूतें
होय प्रसन्न बहु तो शिवनिष्क[२] लंका
संपत्ति दे सुचिर कीर्तिहि निष्कलंका ८४
काळासि कंप निज- नामग- वर्ण- वातें
दे तो न देइल कसा प्रभु अर्णवातें
सिंधून सेतु बरवा करवी रमाचें
श्रीच्या मनोज्ञ पद तें करवीर साचें ८५
श्रीसेतु लांब शत तो दश रुंद गावें
हें दे सुखें गजमुखा[३] यश तुंद गावें
पारासि पावुनि धृताऽहित- दूत[४] सोडी
मोडी न नीति जय यास्तव हात जोडी ८६
श्रीराम- मस्तक- धनुष्य सतीस दावी
सोडावया विपुळ अश्रु दशास्य लावी
शोका बिभीषण- वधू सरमा शमाया
माया असें कळवि मानस न भ्रमाया ८७
येघे सुवेळ- शिखरीं कपिराज- युक्त
श्रीराम ज्या स्मरुनि वारण होय मुक्त
लंका सुवर्णमय अद्भुत दुर्ग पाहे
दूरूनि शत्रुसहि न प्लवगेंद्र साहे ८८
तत्काळ तो गरुडसाचि उडोनि शंका

१ पुष्कळ ( विनंतीच्या शब्दाचें विशेषण ) २ महादेवाच्या गळ्यांतील एक असा राम तो. ३ गायन करावें म्हणून. ४ धरिलेला शत्रु रावणाचा दूत.

सोडूनि गांठुनि पळांतचि मूर्तपंका
त्या रावणा करुनि धिक्कृति फार नाडी
पाडी तळीं मुकुट त्यासहि गर्व झाडी ८९
आला फिरोनि कपिनायक त्यासि राम
प्रार्थी न साहस करीं सदुपाय साम
सामर्थ्य पूर्ण असतांहि कधीं नयाचा
न त्यागिती पथ सुकीर्ति अधीन याच्या ९०
श्रीराम दूतपण दे पर- भंगदातें
सामार्थ पाठवि अरिप्रति अंगदातें
त्या ऐकवी प्रभुवरोक्त- महानिरोपा
ज्याच्या सदैव सुकरा रिपुहानि रोपा ९१
द्यावीं यशें समवनें जनका क्षमेला
त्वां प्रीति सायज मदें कनकाक्ष मेला
दे मत्प्रिया परिसें साम रहा निकाम
त्यागून भूमिसुर सामर हानिकाम ९२
माझी स्त्रवेल शर चापलता पवीतें
द्यायासि लाज खर चापल तापवीतें
मेले चतुर्दशसहस्त्र खरादि वाळी
तोही घडेलचि शिवांसि खरा दिवाळी ९३
दे जानकी शरण ये मज जोडु पाणी
कीं राज्य जीवित- कुळांप्रति सोड पाणी
लोकेश्वरांसि भज तूं अभयार्थ जा गा
जागा मिळेल न जगीं तुज होचि जागा ९४

---

१ बाणा. २ हिरण्याक्ष. ३ माझीस्त्री. ४ ऐक. ५ हात. ६ स्थान. ७ जागृत.

इत्यादि ऐकुनि वदे दशकंठ रागें
मी रक्तभुक् कपि- नरांसि भिऊनि मागें
देनों कसा भिववितो हरि काय् नागें
टाकूनि बोलसि जडा मरसील आगें ९५

आला पदच्युत वना त्यजिलाहि तातें
त्या आत्म- तात- रिपुच्या जपसी हितातें
मातेसि भोगित असे चुलता चपापें
मूढा सभेंत बुध या उलताच पापें ९६

कोपोनि अंगद वदे खळ- दंड- कर्ता
राजेंद्र राम शरणागत- दुःख- हर्ता
तो निंदितोसि जरि नेणुनि तत्व भर्ता
तूं पावसीलचि जडा व्यसनोग्रगर्ता ९७

क्षोभोनि रावण वदे नरवानरानीं
कीजे सकातर भया न खवा न रानीं
खद्योत तूं कृपण मी प्रभु अर्क टाकीं
दुर्वाक्य हें हरिल जीवित मर्कटा कीं ९८

चोरा तुला वधिन मीं प्रभु राम राहो
कां माजलासि बहु मावध पामरा हो
तत्तेज वालिसुत नेत्र- युगें तदा पी
दापी म्हणे गजगसील जडा कदापी ९९

सांगे दशास्य वचका न धराचि राहो
न क्रूर हा न रदनीं अधरा चिरा हो
तें झोंबले खचर दुर्मति चार यातें

1 अपराधें. २ फुटताच. ३ व्यसन- उग्र- गर्त- संकटरूप भयं कर खळग्याला. ४ दांतीं. ५ ओष्ठाला. + फार अधीर.

दावी उडोनि खग- भूपतिच्या रथातें १००
नेऊनि दूर गगनीं कपि बाहु झाडी
ते भूतळीं अहित चारहि तूर्ण पाडी
पक्कें पळें गुरुशिळेवरि तेविं ताडी
काळाकडे प्रथम अक्ष तसेचि धाडी १०१
प्रासाद भंगुनि निशाचर चार भारी
मारी कथि प्रभुसि तो पटु कारभारी
त्याला स्वयें नवरि जो अरि साम यानें
दे दंड वेध रस ज्यापरि सामयानें १०२
आरंभिला समर त्या खळयातुपानें
राम- प्रताप- दहना बळ या तुपानें
दे पाठ वज्रधर सोडुनि संगरा ज्या
त्या प्राप्त होय विभुपासुनि भंग राजा १०३
वीर प्रहस्त समरीं भय दे वसेना
ज्याच्यापुढें नच वरी जय देव-सेना
तो यातु-सैन्य-पति [1]आहव-दक्ष मेला
गेलाचि सोडुनि [2]असत्यगद क्षमेला १०४
रक्तापगा स्वकटकाहि न वाहवाया
संकोचल्या स्तवि सुरर्षि [3]नवाह्वा त्या
वारी भय स्व विभु सायक- बंधनाचें
हा हर्ष सूचविति काय कबंध नाचें १०५
[4]लीलामनुष्य परिपूरितनागपाशा
श्रीनाथ सानुज तयाप्रति नागपाशा

---

१ युद्धदक्ष. २ दुःसहरोग. ३ नव- आहव- नूतनयुद्धा. ४ परिपूरित- नागप- आशा- परिपूर्ण केली गजेंद्राची इच्छा ज्याणें असा. + गरुडाच्या. ≠ वेगानें. ⁑ स- आमय- रोगयुक्तातें.

योजूनि बद्ध करि रावणि काळ जाला+
वाटेचि भूमिजनिच्या व्रण काळजाला १०६
श्री पुष्पकांत बसवी दशकंठ धाडी
दृष्टीस मूर्छित सलक्ष्मण राम पाडी
ती हा वदे निरखितांचि तसी अवस्था[1]
वाळे पळांत बहु जेविं लता दवस्था १०७
दे धैर्य तव कथुनि त्रिजटा कवीतें
वाटे श्रुतींच तम जें निज टाकवी तें[2]
ये तार्क्ष्य नाग पळवी जिववि[3] प्रभूतें
प्रेमें पित्यापरि गमे निववि प्रभूतें १०८
कोपोनि दाशरथि मारिति वीर कोटी
पाहे दशानन रणीं बळ-हानि मोटी
काळाननीं प्रभु घटश्रुतिलाहि लोटी
वार्ता गमे क्षण तया जडधीस खोटी १०९
जे कुंभकर्ण-सुत कुंभ निकुंभ भारी
तत्सुतही सुरनरांतक शस्त्रधारी
तैसाचि उग्र परम त्रिशिराहि मारी
तज्जीवित प्रभु रणीं अतिकाय मारी ११०
ब्रम्हास्त्र योजुनि पुन्हा घननाद ताडी
शस्त्र-व्रजें प्रभुसमेत समस्त पाडी
जें मारुती उठवि ओषधि-शृंग आणी
पावूनि ये नुतिस लावि कवींद्र-वाणी १११
मायामयी जनकजा निवटूनि मोही[4]
जो हीनशक्ति पविपाणि जयासि तोही

१ यणाऱ्यांतरहाणारी. २ रामातें. ३ पुष्कळें (प्रेमें याशब्दाचें विशेषण.)
४ इंद्रजितही. + झाला.

सौमित्रिनें खपविला स्मर जेविं भर्गे
स्वर्गे तसेंचि वरिले सुख साधु- वर्गे ११२
शोकार्त रावण मही- तनया- वधाला
गेला पिऊनि मुनिशोणित जो न धाला
झाली पुढें असिधरा सहसा पहाती
सीता सती वदलि पावुनि ताप हा ती ११३
त्यातें सुपार्श्वसचिवोत्तम साधु वारी
रामात्ययासि बळ पाठवि फार भारी
तें राम सिंधुजळ कुंभज तेविं सारी
कीं त्र्यंबकप्रभु जसें जग सर्व मारी ११४
घोर स्वयें कटक घेउनियां निघाला
घालावया प्रभुवरावरि शत्रु घाला
तों शक्ति लक्ष्मण- वधार्थ उरीं शहाणी
हाणी करी कवि- सभा-महिता- कहाणी ११५
भंगी रघूत्तम अरिघ्नि शक्ति काढी
मूर्छा त्यजी नविभुच्या अनुजासि गाढी
आणी पुन्हा खरित ओषधि- शैल-शृंग
श्रीरामचंद्र- चरणांबुज-मत्त- भृंग ११६
सौमित्रि निर्व्रण उठे घडतांचि नस्य
श्रीयुक्त जेविं मिळतां शर्भवर्ष सस्य
झाले मरोनि गतिभा जग कोटि काया
न प्रेक्षिती म्हणति आयु नको टिकाया ११७
मेलीं असंख्य कपि-राक्षस-वीर- सैन्यें

१ महादेवें. २ राम- अत्यय- रामाच्यानाशासि. ३ नाकामध्यें जें औषध घालितात तें. ४ उत्तमवृष्टि. ५ धान्य.

नस्पर्शिलें पळहि तन्मन लेश दैन्यें
श्रीराम-रावण-कृता अतुळा महाजी[१]
ह्या[२] जीवे[३] काव्य[४] वदले असि दुःसहाजी ११८
निर्जीव देह पडले बहु राक्षसांचे
सांचे[५] सरवे रुधिरकर्दम फार सांचे
केलें महेंद्ररिपुच्या अतियुद्ध तातें
दे त्या जना परिस त्यासहि शक्रता तें ११९
ज्याचा महा-शर-घनें हरि[६] लक्ष मेला
भासे सुरां भसित[७] हा करिल क्षमेला
तो कां सुरांसि दशकंधर कांपवीना
ते घेति देखुनि जसे अहि काय वीना[८] १२०
शक्रप्रियास्तव तदीय-रथीं चढून
क्रोधें दशास्य-महिमार्थ मनीं कढून
गाया सुरांप्रति मृदंग नवे मढून
श्रीराम दावि बळ मेळविलें पढून[९] १२१
तें युद्ध सप्त-दिन-रात्रि जया न जोडा
देवर्षि तों म्हणति या प्रभुजी न सोडा
होईल मस्तक नवें किति तूर्ण तोडा
ब्रम्हास्त्र योजुनि शरें अहितोर[१०] फोडा १२२
लंका म्हणे पति नकों विदरा[११] मला जो
त्या मारितां प्रभु न कोविद[१२] राम लाजो

---

१ महा- आजि- मोठें युद्ध. २ हाय. ३ बृहस्पति. ४ शुक्र. ५ काष्ठादिकांचे. ६ वानर. ७ भस्म. ८ गरुडा. ९ वसिष्ठ गाधिजांपाशीं शिकून. १० अहित- उर- शत्रूचें वक्षस्थळ. ११ विरूप. १२ ज्ञाता.

ऐसें सुरर्षि वदले परिसोनि याचें
पाडी शरीर दिन तें करि सोनियाचें १२३
फार प्रभूत्तम-शरें समरीं गळाले
तच्छेप जे स्वपतिच्या पतनीं पळाले
ते क्रव्यभुक् खपविले कपिसत्तमानीं
हा नीतिला म्हणविते वर-मत्त मानी १२४
झाली प्रभूत्तम-शिरीं सुर-पुष्प-वृष्टी
कोंदे सुखें प्रभु-यशें बहु सर्व सृष्टी
गंधर्व-वृंद करि सुस्वर-गायनातें
कोणी पुसेचि न नई स्वर्[1]गायनातें १२५
भेरी-शत-ध्वनि जय-स्तव-नाद दाटे
भेरा सुरर्षि-कपिसद्गति सत्य वाटे
हेरी सुखार्थ शिव-सद्गुण-मंदिरातें
हे रीति दावि भजता ख[+]र्गचंदिरातें १२६
नाचोनि गाति यश भक्तिपराप्सरा तें
त्या पावल्या सुकृतिनाचि वरा[2]प्सरातें
स्वच्छें जसी सतत भा वदना र[3]दानें
तैसी यशा स[*]रस भाव-द-नारदानें १२७
प्रेरूनि सज्जन बिभीषण रामराजा
संस्कारवी सुकृत लेश न पामरा ज्या
माझाहि रावण जसाचि तुझा वदे हें
सार्थक्य केविं वरिजेल तया न देहें १२८
दे राज्य लक्ष्मण-करें विधिनें नतातें

---

१ स्वः अग- अयन- स्वर्गसंबंधीवृक्षाच्यास्थानातें. २ वर- अप्- सर- श्रेष्ठउदकज्याचेंअशासरोवरातें. ३ दांतानें. + आकाशामधेंरहाणारेजे त्यांमधें चंद्रासारिख्यातें. * सप्रेम भक्तिप्रवर्तक अशा नारदानें.

केला कृतार्थ न असा विधिनें न तातें
सीतेकडे अजित पाठवि मारुतीतें
तो ऐकवी जय-कथाऽमृत चारु तीतें १२९
सीता म्हणे जयकथाचि सुधा-नद्या या
आशीविना उचित वस्तु बुधा न द्याया
प्रार्थी कृती मुदित पाहुनि पावलातें
मी फार हें हृदयिं राहुनि पावला तें १३०
देतोस देवि तरि तूं वर एक दे हा
होईल या अमृत-सद्रस-सेक-देहा
मी राक्षसी वधिन या वद मार जाच[1]
केला असे सति इहीं तुज फार जाच १३१
सीता म्हणे पवनजा नवधींच दीना
या किंकरी परवशा मति-शक्ति-हीना
जो यांसि जाच सिकवी परमाऽपराधी
तो मारिला तव असोचि दयापरा धी १३२
श्री-रीतिनें पवनपुत्र सुधी निवाला
हे सूक्ति यासि जसि विष्णुपदी[2] शिवाला
शीळें तुझ्या प्रकृति देवि विरो पयाची
ऐसें स्तवूनि तिस साधु निरोप याची १३३
देवी वदे प्रभुसि सांग मला उशीर[3]
हो पादरेणु हिम कां गमला उशीर[4]
सोडू अदर्शन-ज सत्वर ताप हा या
दृष्टीस हे तृषित सत्वरता पहाया १३४

---

पीडा. २ भागीरथी. ३ वाळा. ४ वेळ.

ऐके मरुत्कृत-मुरेवें हरि हा निरोपा.
ज्याच्या सदैव सुकरा अरि-हानि रोपा
लंकेश्वरा कथि म्हणे द्रुत आणवा हे
ती प्रत्ययार्थ करि दिव्य न आण वाहे १३५
भक्तांसि घेउनि नति-स्तुति देव राजी
राजीव-नेत्र-दयिता तिस दे वराजी
वर्णी तथाहि पितृ-पुत्र- समागमातें
मोतें म्हणे कविस जो गति माग मातें १३६
देवांशज प्लवग ऋक्ष स्फुराऽरि- जेते
मेले निशाचर वधूनि रणांत जे ते
देवेश्वरें उठविले अमृतांऽबु- वर्षे
या संद्यशा मुनि महाकवि गाति हर्षे १३७
प्राथीं बिभीषणाहि भद्र-समाजनातें
घ्याया तया अजित सद्रसे- भाजनातें
सांगे जया विरह भूभर तावि नातें
ही दे नको म्हणसि जें भरताविना तें १३८
पूजीं सुकंठसह वानर ऋक्ष बा हें
मद्योग्य मी परम पूजित यांत आहें
तो भेटिव त्वरित साधु- सभा-जनांतें
दे हर्ष याचि करिं भव्य- सभाजनांतें १३९
तैसेंचि तो करुनि पुष्पक दे वहाया
प्रेमें अधिष्ठुनि रमायुत देव हा या
त्या कीश-राक्षसपतींसह सत्यसंध

१ बाणा. २ सुरेवेंमत्तहो. ३ जो दशरथराम समागम. ४ मज मन. ५ प्रेमंभक्तिपात्रास.

स्वामी निघे तुरवुनि स्वजनार्ति-गंध १४०
श्रीचें लवीं तिळहि देचि न सेतु पीनें
कीं जें गुरुत्व अमृतासि नसे तुपातें
विद्वत्सभा श्रुतिनसी पर-मारणाची
सेवी कथा प्रभुमुखें परमा रणाची १४१
सीता जरी विरह दुःख कथा तथापी
प्रेमें प्रियें कळविल्या त्यजुनि व्यथा पी
सुग्रीव-सख्य कथि वालि-विनाश-कर्म
श्रीराम दे प्रचुर भूमिसुतेसि शर्म १४२
श्री आणवी विनवुनि प्रवरावतारा
तारावया कुसुमयानवरांत तारा
दावी स्थळ प्रथम मारुति-संगमाचें
जें भाग्य मूर्त सकळ-स्थिर-जंगमाचें १४३
पंपेसि दाखवि म्हणे रघुवीर कांते
म्या या स्थळीं दशन-निर्जित-हीरकांते
केला विलाप नव सन्मति दीर देहा
रक्षी पुसूनि नयनें बहु धीर दे हा १४४
दावी मतंगमुनिच्या परमाश्रमातें
स्वामी उरीं तिळहि दे न रमा-श्रमातें
तारी सुधाहि न गेटी शबरी-कबंध-
भ्रांता हरींचे जगदीश बरीक बंध १४५
श्रीजानकीस जगदीश्वर राम गोदा
तो दाखवूनि बहु दे तिसहि प्रमोदा
दावी निजा बरवि पंचवटींत शाळा

---

१ नेत्रपातें. २ रंगी. ३ निवारीच.

बाळाहि जी म्हणति कीर्ति-गतींस भाळा १४६
दे गृध्र-तात-गति सांगुनि हर्ष तीतें
शोकाश्रु तद्गट विलोकुनि वर्षतीतें
कुंभोद्भवाऽत्रि-शरभंग-सुतीक्ष्ण यांचे
दावी सदाश्रम जयांत न मोह वांचे १४७
श्री-चित्रकूट-नगपा मग पाहवी तो
जो कीर्तिनें दुरित सर्वहि वाहवीतो
भेटे प्रयाग-गत-तात-सखा मुनीतें
त्यातें निवोनि निववी स्वयशें पुनीतें १४८
तेथूनि जो पवनपुत्र महाबळा या
प्रेषी निजागम गुहा भरता कळाया
देतेचि लोभ धरिता तरि संपदा ते
कीं जीविताहि म्हणतातचि संप दाते १४९
झालों प्रसन्न तुज मी वर माग रामा
ऐसें मुनीश्वर वदे परिपूर्ण-कामा
त्याच्या पदासि विनयें वरदेश लागे
कीशप्रियार्थ फळ-पुष्प-समृद्धि मागे १५०
भेटोनियां गुहसखा मग धन्य केला
दे कीर्ति हे प्रियसखी पद-कन्यकेला
हें आई सयश करी उरचि वाचकोरा[1]
मोरा घनीं अणु भवीं रुचि वा चकोरा १५१
सीतावरा भरत चातक तोयदास
प्रेक्षूनि तो परम हर्षित होय दास
शत्रुघ्न सर्वजन सत्सद यास मोर

---

१ वाचक-उर-वाचकाच्यावक्षस्थळाला. २ श्रीरामयशींवाचका बहु.

येतां बकें उतवि वत्स दया समोर १५२
आलिंगिला भरत सानुज जेविं तातें
हुंगी शिरींहि विभु तो करि जें पिता तें
प्रेमें मनीं गुरुसमप्रभ जे नमावे
आनंद सर्वहृदयांसि भजे न मावे १५३
ब्रम्हादि सर्व करिती सुर पुष्पवृष्टी
कोंदे सुरवें विविध- वाद्यरवेंहि सृष्टी
दे सानुजा ससचिवा भरतास वेश
स्वांगासि गाति यश तें विधि वासवेश १५४
केले सुपात्र कपि राक्षस गौरवा हे
पाहोनि मुन्नदशतीं[2] बहु पौर वाहे
सर्वांसि सानुज म्हणे प्रभु वेषधारी·
या रीतिनें करि सुधाकर- कांति- धारी १५५
साकेत जें पुर तया रघुवीर देहा
प्राण प्रवेशुनि तसें महितत्व दे हा
होय प्रजार्थ नृपसा नसतां पदेहा[3]
राज्यांत या न कुतरेंहि कधीं वदे हा १५६
जे दुर्लभ त्रिभुवनींहि तसे वित्यांचे
नप्रेक्षिले कविजनें हित सेवित्यांचे
ते सद्गुण प्रकटुनी निवधि प्रजांतें
गाती सदा वरुनियां शिव विप्र ज्यातें १५७
शत्रुघ्न मारुनि रणीं लवणासुरातें
तो भूमिच्या सुरथ नंदं कवणा सुरातें

---

१ वत्स समोर येतां मातेच्या दयेतें उत आणितो· २ मुत्- नद- शत- आनंद-नदशतीं· ३ पद- ईहा- पदाची इच्छा·

ज्यांच्या भया कुशाळही जन लोटिती न
गंधर्व ते भरत संहरि कोटि तीन १५८
केले बिभीषण मरुत्सुत भक्त धन्य
स्थापूनि जों स्वयश सद्गुण-वृंद-जन्य
जे पौर जानपद जे पशु जीव अन्य
श्रीशें पदीं बसविले मुनि तेविं वन्य १५९
श्रीरामायण वाहिलें प्रभुपदीं सद्भक्तसर्वस्व हें
प्रेमें गातिल साधु नारितिल या दासा मयूरा महें
त्याचा मी उपकार फेडुनि कसा उत्तीर्ण होऊं बरें
श्रीरामें परि दीन हीन हित जे ते धन्य केले बरें १६०

समाप्त.

## काशीरामायणप्रारंभ.

कारुण्यामृत-निधि जो मधु-कैटभ-काळ विश्वपाळ हरी
शीलाढ्य-दशरथातें तो प्रभु होऊनि पुत्र धन्य करी १
करि कार्य गाधिजाचें राक्षस मारूनि यज्ञ पाळूनी
शीघ्र सुख अहल्येतें दे चरण-रजेंचि पाप जाळूनी २
कार्मुक महेश्वराचें सज्य करुनि राम ओढितां मोडी
शीतेतें वरुनि प्रभु कवि-वर-शत-गीत-कीर्तितें जोडी ३
जनक तिघे प्रभुचे जे अनुज तयां कन्यका तिघी ओपी
प्रभु भार्गवा जिणी जो पथ आशी[1] विषतसा धरी कोपी ४
रावण-वध-काम अमर घालिति भरत-प्रसू-मनीं भेद

1 सर्पसा.

धरि सत्यव्रत रघु-कुळ- कुमुद-शशी दशरथ प्रचुर खेद५
अभिषेक अनादरुनि प्रभु रक्षायासि सत्य जनकाचें
जाय वना सीतेसह लक्ष्मणहि वशी[+]श नकरि मनकाचें६
शोकें भूप मरे प्रभु अर्पी भरतासि पादुका जिवशी.
नाशी प्रजाधि धर्में न्यायें साधूंसि साधु तो निवशी ७
दंडककानन-वासी सस्त्रीकें सानुजें पदीं नमुनी
श्रीशें निववुनि केले स्वतपोराशी जगीं अदीन मुनी ८
अत्यंत कामुकी जी मायेनें रूप चांगलें प्रकटी
केली गोदा-तीरीं दुर्बुद्धि निशी[*]थिनी-चरी नकटी ९
हंसावरि काक तसा प्रभुवरि ये खर कुधी तिचा भावू
प्रभुशर म्हणति पलाशी त्या कविजन वायु आपणा भावू[२]१०
लंकापति शूर्पणखा- भगिनी-वैरूप्य जें न तें साहे
दुःशील कनकहरिण प्रेषी त्या स्वाश्रमीं सती पाहे११
रघुपतिस मृग धराया जनकाची नंदिनी वनीं धाडी
विद्ध हरिण आर्तरवें शीतामति शोकसागरीं पाडी १२
काहीं प्रभुसि भय नसे विनवि असें जो यथार्थ सामपटु
क्लेशा करुनि श्री त्या सौमित्रिस घालवी वदोनि कटु१३
कामी क्रोधी लोभी दशमुख पाहूनि एकलीस हरी
होय विरथ कर-गृध्रप- पक्ष छेदूनि कांदिशी[४]क अरी१४
शोकाकुळ होय प्रभु तात-प्रियसख- जटायुच्या पातें
खळ-कृत परिसुनि विधिनें जळ दे नाशी पितृव्यतापातें१५
जेविं विराधा काळा सुगति कबधाहि दे न कां मग ती
शबरी तारिलजीच्या शुचिशीला नित्य मानवे जगतीं१६
वायुसुता सुगळा सुख रोमांचित काय करि[३] दया जळधी

१ वृक्ष. २ भावनाकरू. ३ हरणकरी. ४ भयद्रुत. + योग्यांचास्वामी. * रात्रीच्यावाई फिरणारी राक्षसी.

मग वाळीतें नाशी ज्याची वैरा विटंचिना पळ धी १७
मारुति शोधावी श्री हें स्वामीचें करावया कार्य
लंघी अलंघ्य गृह तरि पांशी विजयी असो म्हणे आर्य
सेनाका चकित करी ठकवी सुरसेसि सिंहिका मारी
लंका जिंकी मेळवि यश सित शीतांशुहूनि जें भारी १९
सीतेसि अशोकवनीं लंका शोधूनि मारुती पाहे
मग ताटंशी खळाची गीतिहि धर्वै उगाचि ही राहे २०
रघुनायकासि वर्णुनि दशमुख जातां सतीस दे मुद्रा
मीनाग्नि जसी दाशी दावी निजशक्ति कपि तया क्षुद्रा २१
वन बळ अक्ष मर्था घन- नादा सांपडुनि पूर्ण-काम करी
दशवदना उपदेशी हित नो तत्पुच्छ करवि दीप्त अरी२२
कांचनमयी पुरी ती काष्ठमयीमीच जाळिली हरिनें
शीतळ नेत्रसहस्त्र प्रेक्षुनि पुरदाह मानिलें हरिनें २३
कपि-दत्त श्रीचूडा- मणि जीवाहुनि निका बुधाधारा
झाला संदेशोक्ति प्राशी प्रेमें जसी सुधा- धारा २४
प्रभुवर परमप्रेमें भेटे त्या साधुसेवका हरिस
मानी हित बहु तद्वपु कर्पूरोशीरचंदनापरिस २५
देवांऽशाऽमित- कीशाः नीकार्णव सुगळसह जलधि- तीरा
ये तों नमी बिभीषण परदेशी दीनसाचि रघुवीरा २६
लंकाराज्य तया दे भी सागर करवि नळकरें सेतु
शीर्षी धरि बहुमानें पुष्पाचा हारसाचि सुख- हेतु २७
मायामय कार्मुक शिर धिभुचें दावी दशास्य सीतेला
सरमा कथि गुर्वाशी स्मर हें सावध करूनि भीतेला२८

१ मारुती. २ वानरामें. ३ इंद्रें नेत्रसहस्त्रशीतल मानिलें. ४ मारुतीस. ५ गुरु- आशी- गुरूचे आशीर्वाद. + धीवरस्त्री. ‡ कापूर, वाळा, व चंदन यांपेक्षां. ⁝ वरुण ⁂ चंद्राहूनि. ⁘ तसी. ⁙ देवांचे अंश जे वानर त्यांचा सेनासमुद्र.

प्रभु उतरे पारीं तो नवळे कापुरुष सुगळ-कृत-मथनें
दशशीर्ष अंगदाच्या जें सन्मत सुहित साम तत्कथनें २९
ओजि प्रवर्तली जी अत्युत्साहेंकरूनि काळाची
ती द्वादशीच वर्चे सेना प्रतिदिन पलाशपाळाची ३०
मायावी शतमखजित् सानुज-रघुनायकामि बद्ध करी
त्रिजटा श्रीला धृति दे आशीविष-पाश पक्षिपाळ हरी ३१
काळोया घटकर्णा प्रभु मारुनि उठवि हर्ष अमरांत
सुगळ शशीसा झाला जो क्षणभरि गहुरूप समरांत ३२
मायावी घनरव करि कातर सुर रिवळुनि सकळ धरि गर्व
शीघ्रानीतमहौष- ध्यगशृंगं उठवि पवनसुत सर्व ३३
मायामयी जनकजा दावी घननाद शिर तिचें कापी
मोह बिभीषण वारी वधिला तो शीघ्र लक्ष्मणें पापी ३४
सुत- शोकाकुळ दशमुख नग्न करी खड्ग उद्यता मिरवी
शीतेसि वधूं धांवे परि सचिव सुपार्श्व कथितया फिरवी
रघुनायका वधाया धाडी चतुरंग सैन्य बहुकोटी
तो दुःशील दशमुख प्रभुवर कल्पानळीं वळें लोटी ३६
असकृत् भंगत आला परि काळ-ग्रस्त-बुद्धि तो क्रुद्ध
क्रूर कुशील दशानन उत्पात नगणुनि ये करी युद्ध ३७
पाकारातिस भिववी सौमित्रिस शक्तिनें रणीं पाडी
पुनरपि शीघ्र प्रभु तें आणाया शृंग वायुजा धाडी ३८
घटिकार्धांतचि आणी तंव्हि शिखर लक्ष्मणा करी सिद्ध
बिद्ध नझाला वाटे शीलें तेजें शिखी जसा इद्ध ३९
सप्त अहोरात्र भिडे श्रित-कामद रथ वरूनियां हरिचा

१ युद्ध. २ नागपाश. ३ इंद्रास. ४ मदीस. ५ इंद्राचा.
+ शीघ्र- आनीत- महौषधि- अग- शृंग-सत्वर आणिलें जें मोठें औषधियुक्त पर्वताचें शिखर तेणेंकरून.

व्हाया मनोरथ-द्रुम अवकेशी[1] त्या सुर-द्विजात्यऽरिचा ४०
आकाशीं मुनि वदले प्रभु-मेघें सद्दनाऽनळा शम रे
ब्रम्हास्त्रें तो वधिला शत शीर्षें छेदितांहि जो न मरे ४१
कैलास-सत्य-नाकाऽ धिप सुर मुनि झांकिती कुसुम-वर्षे
गंधर्व गाति नाचति देवी रंभोर्वशी-प्रभृति हर्षें ४२
ते वर्णिति विभुचें यश कापुर किति शारदेंदु ज्या लाजे
जे राजर्षिवर हरि- श्चंद्रोशीनर-गयप्रमुख राजे ४३
दशकंठोत्तरकार्य प्रभु करवी तदनुजा पदीं बसवी
श्री दिव्य करी पावक होय शशी विभु तिला मनीं हंसवी
ती मूर्तपावकानें पल्यंकीं बसविली धरा-कन्या
विधि शिव वज्री पाशी यम धनप स्तविति दशरथा धन्या
रण-मृत-कपि-कटकातें शक्र प्रभुच्या प्रिया[3] जसें सुत
अमृत-रस-शीकरांहीं[2] उठवी जें प्रभु-दया-धरा-गुप्त ४६
भरतावांचुनि नरुचे मज पूजा प्लवगनायका सबळा
या प्रभुवचा विभीषण शीर्षीं घे जेविं शिशु मुखीं कवळा[+]
सदलंकार सुवस्त्रें त्यां सर्वांलाहि साधु तो अर्पी
दिव्यान्नें शीधुरसें[4] तांबूलें परम आदरें तर्पी ४८
नमुनि विभीषण अलका- पतिचें पुष्पक विमान दे तेणें
प्रभुनें केलें शीघ्र स्वपुरा कपि-यातुनाथसह येणें ४९
सेतु श्रीला दावी ऐकाया विरह-वृत्त विभु लावी
ज्याच्या श्रवणें शीतळ व्हावी ब्रम्हज्ञवृत्तिहि भुलावी ५०
देवी प्रभुला निववुनि आणवि तारेसि पुष्पकामाजी
शीतेला बहु वर्णी स्वगुणें लाजवि सुरादि-रामा जी ५१

---

१ वंध्य. २ अमृतरसाच्या तुषारांहीं. ३ प्रभुदयारूपपृथ्वीच्या गर्ईगुप्त. ४ 'मधरसें. + कवळा.

भेटुनि भरता पुरवी काम प्रभु होय सच्छिया राजा
जेविं चकोरांसि शशी अमृतें नटुनि म्हणे निजा साजा ५२
सबळ सुकंठ बिभीषण परमप्रेमें स्वयें अळंकारी
करि पवनजीं बहु दया श्रीराम सशीत नत-कळंकारी ५३
शत्रुघ्न लवण वधि करि कालिंदी-तट-मुनीष्ट सत्तम हा
भरतहि गंधर्व कुमति कोटित्रय शीधु-मांस-मत्त महा ५४
करि आठ पुत्र राजे ने निजलोका प्रति प्रजा नाम
स्वप्रतिनिधि बसवि जगीं स्वसुरनगाराम सयशी राम ५५
काशीरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ५६


समाप्त.

## गंगारामायणप्रारंभ.

लक्ष्मीदगंबुजार्चित- चरण प्रभु होय दाशरथि राम
गाधिज गौतम यांचा पुरवी मख-दार-रक्षणें काम १
भस्म हगंचळ ज्याचा मदनातें करि तदीय धनु मोडी
सानुज राम सुगात्री- सीतादि जनकसुता सुखें जोडी २
करि हुतभुगंतकोग्रां भृगुरामा शीत कांत भूजेचा
कर्ता होय पित्याच्या आपलिया गाळिताचि भूजेचा ३
गंडूषसेंचि राज्य त्यजुनि निघे राम सानुज सदार

---

१ सीतायुक्त. २ लक्ष्मी- दक्- अंबुज- अर्चित- चरण- लक्ष्मीनें दृष्टि रूप कमळें करून पूजिले चरण ज्याचे असा. ३ हुतभुक्- अंतक- उग्र- अग्नि. मृत्यु यांसारिख्या उग्र. ४ सीतेचा. ५ वर्जिणाराचि. + मद्य, मांसानीं माजलेला. ‡ स्वर्गसंबंधी कल्पवृक्षाची बाग असा.

जाय वना मश गाया करि गतिस जडा असें हित न सौरि ४
शोकें भूप मरे त्या कैकेयीनें म्हणे भरत गंजा
तातक्रिया करि धरी प्रभु-चरण-युगा जसा मधुप कंजा ५
प्रभु पादुका भरत घे चातक नच जळमुगंतरा साहे
नंदिग्रामीं प्रभुगुण गात तपस्वी प्रजाऽवना राहे ६
अत्रिस वंदी प्रभु दे अनुसूया अतुळ- दिव्य- गंधाची
स्वकरें उटी कवच करि आंगा स्त्री निबवि सत्यसंधाची ७
जो पर- मद- हर गंध- द्विपसा राक्षस विराध सीतेतें
धरि त्या नागा हरिसे वधिती प्रभु सांत्विती हि भीतेतें ८
जे दंडक-वन-वासी मुनि शुचिवागंगचित्त तच्चरण
वंदी निजोत्तमांगा लावुनि ज्याचें करी शिव स्मरण ९
पितृसख जटायु गृध्र- क्षितिपति गंभीर तो बरा मानें
तातसा गौरविला गात्यां तारावयासि गमानें १०
प्रभु जी श्रितगति सुखदा गंगी गोदा तिच्या तटीं राहे
त्या भुलवुनि भोगाया शूर्पणखा रावणस्वसा पाहे ११
सौमित्रि शब्द- गंध- ग्रहणेंद्रियगोळकें तिचीं तोडी
प्रभुसीं दशकंठासीं स्वागा झांकूनि वैर ती जोडी १२
आगंतुक सर्वस्व- क्षय नप्रेक्षी सतीस तो दावी
कनकमृगातें दवडवि रक्षक हरि हा म्हणावया लावी १३
धांवे दूरदृगंडज विरथ करि अरिस सतीस खळ सोडी
वृद्ध-जटायु-खगाचे परि खड्गें पक्ष यातुपति तोडी १४
दुर्विधिदृगंतपाता- पास्तज्ञान क्षमासुतेसि हरी

---

१ मद्यगृह. २ कमळा. ३ जळमुक्- अंतरा- मेघाच्याभिन्नपणाला. ४ मदोन्मत्तहत्तीसा. ५ शुचि-वाक्- अंग- चित्त- शुद्धआहे वाचा, अंग, चित्त, ज्यांचें असे. ६ निज- उत्तमांगा- आपल्या मस्तकाला. ७ दूरदृक्- अंडज- दूरदर्शीपक्षिजटायु तो. ≠ हरणकरी. + गमनकरणारी, वाहणारी. ⧧ दुर्विधि- दृगंत-पात- अपास्त- ज्ञान- दुर्दैवाच्यादृष्टीचा अंत ( कोण ) त्याचें पडणें त्यानें हरण केलें ज्ञान ज्याचें असा. ⧧ दरवाजा.

लंकेंत अशोकवनीं शोधी आनंद बहु नगारि धरी १६
क्रीडानर्म+दगंग प्रभु जो तो स्त्रैणसा वदे चिर हा
पितृ-सख-खगाचियाही वत्सल साहों शकेचिना विरहा.
वधुनि कबंधा वसवी सुविमानीं देव गंतुकामा हीं
तो गाय गुण म्हणे बा सुगळा भेटुनि सदार, रामा हो१७
शबरीहि सह्‌ǂहुमता श्रीरामें गंडकीसखी केली
नेली उत्तमलोका गात प्रभु-यश सुखें सुखें गेली१८
पंपातटीं वदे हा मग भेटे गंधवह-सुता सुखवी
सुगळा सखा करि वधी वालिस कीं स्वानुगानुजा दुखवी
कपिपति सुगळ-कपींतें जे गंतव्यप्रदेश ते सारे
कथुनि म्हणे सीतेतें त्याहि अघाच्या नगा पहा जा रे२०
शतयोजन सिंधु उडुनि लंकेला गंधवाह-सुत पावे
मैनाक-लंघनादिक ज्याचे कविनीं प्रताप बहु गावे२१
पवनसुत युगंधरसा[2] वाहे गुरु-कार्य-भार ती लंका
शोधी वेगानें धरि शिरतां रावण-गृहांतहि न शंका२२
साधि अशोकवनीं तो शिरतां दश-शत-दृगंगना-गीता
गाढ विचक्षण मारुति पाहे प्रभुची प्रिया सती सीता२३
तों रावण ये घ्याया कंटाळा पूति‡गंधिसा खोटा
प्रार्थी सुख भोगाया महिषी हो बहु हटीं तुझा[3] तोटा२४
धिक्कारी गंभीरा श्री नकरी भस्म चरित वाढाया
खळ खचरींस म्हणे हित सांगा अथवा वधाचि वाढाया२५
रावण गेल्यावरि दे प्रभुमुद्रा गंधवाह-सुत तीतें
गाउनि कुशळ तिच्या घे आशीच्या तो सभाग्य कृततीतें

---

१ अहो. २ रथादिकांच्या ज्या काष्ठाला घोडे वगैरे बांधितात तो युगंधर (जूं) त्यासारिखा. ३ प्रसिद्ध कांया. + क्रीडेनें मन ज्याचा त्याच्याशीं खेळणारा. ǂ साधूंला बहुमान्य. ‡ दुर्गंधिसा.

चूडामणि दे सांगे गंधवती-नंदिनी निरोपातें
प्रेमें म्हणे सद्गुगा अरि-गिरि तवदृष्टिच्या शिरो पातें २७
देवीतें नमुनि निघे गंधवहात्मज अशोकवन, मोडी
झोडी मग चतुरंगा कटका रावण-सुताऽक्ष-शिर तोडी २८
खल-बल-गंजन + कपि-सुर-रंजन करि मथुनि अहित बहुलक्ष
मग घनरव-वि ॐ ध्वंसत्वा जय दे गाया कवींस रणदक्ष २९
बांधुनि सभेसि नेला गेला गंभीरबुद्धि तो उगला
वदला गुरुसा जागा व्हाया जो कुमति वरमदें फुगला ३०
दैवीं[1] प्रत्यर्पय[2] रे नोचेदंते[3] प्रमत्तगंतासि
तें ऐकुनि रागानें दशमुख घे खड्ग हनुमदंतासि[4] ३१
दूत अवध्य असे कथि दूरदृगंचित[5] बिभीषण कवीन
पेटवि पुच्छ खल म्हणे प्लवगा शासन रुचो तुज नवीन ३२
फिरवा पुरींत म्हणतां उमलुनि जलधिस दिगंबरीं[6] जाय
गाजवि जयत्यतिबळो ≠ राम असें म्हणुनि कांडें कपिराय ३३
लंकापुरी पुरींसी तो मारुति हुतभुगंचळीं ‡ घाली
सुर म्हणति आशुगानें ‡‡ प्रभुच्या पुरगति तसीच हे झाली ३४
दशमुख-गज-मद-[7]गंडीं नख लावी कीशसिंह तो परते
घनरव उगाचि राहे हाय वदति बहु पलाश जे परते ३५
पुच्छ समुद्रीं विझवी श्रीस नमुनि गंधवाह-पुत्र उडे
प्रभु-दूत-विजय-गानीं देवींच्या दाटले करांत चुडे ३६
भुजगभुगंडजसा[8] ये चूडामणि दे निरोप कथि वंदी
त्या प्लवगा आलिंगी वर्णी तच्चरित विभु जसा वंदी ३७

१ देवीला,सीतेला. २ समर्पणकर. ३ नोचेत्-अंतं-प्रमत्त-गंता-असि- नसमर्पण करिसील तर अरे मत्ता नाशातें पावसील. ४ हनुमत्-अंतासि. ५ दूर-दृक्-अंचित-दूरदर्शी जे त्यांणीं पूजित असा. ६ ब्रम्हांड. ७ गजहस्तीच्या मदयुक्त गंडस्थळीं. ८ भुजग-भुक्-अंडज-सर्पभक्षक गरुडसा. ≠ जयति-अतिबलः-रामः उत्कर्ष पावतो अतिबलाढ्य राम. + शत्रुबळाचा नाश. ॐ ब्रम्हास्त्रा. ‡ अग्नीच्या पदरीं. ‡‡ बाणानें.

गंधवह-सुत-रथ प्रभु अंगदरथ लक्ष्मण प्लवंग बळें
घे सुगळ निघं झाली भुजगाधिप-मस्तकेंहि भार-चळें ३८
स्व-जन-भय दिग्गंतातें दवडाया सिंधुच्या तटा पावे
तों ये बिभीषण नमी प्रभुच्या चरणासि जे शिवें गावे ३९
त्या दे राज्य नत-प्रिय मृगमदसा प्रभुसि अन्य गंधकसा
करवि जगाहि तराया सेतु तरि घळे न खळ न अंधकसा
खळ शिर दावुनि रडवी श्री रूप स्पर्श गंध सम पाहे
सरमा म्हणे सुगात्रि छळ हा त्वत्प्राणपति सुखी आहे ४१
जटिल खगंबर प्रभु उतरे पारीं दशानना पाहे
उडुनि सुगळ त्या मर्दी न तदागातें हरींद्र तो साहे ४२
पद्मज परम दिगंबर लब्धवर महासि-मत्त तो न थके
अंगदमुखें प्रभु म्हणे त्यज रागा साम कर तरी खवळे ४३
नळ-नीळ-गंधमादन-मैंद-द्विविदादि यूथपति भारी
प्रेरी सुकंठ राक्षस बहुकोटि करूनि संयुगा मारी ४४
गजगंडक शार्दूल— प्रमुखांचे प्राण जेविं हरि हरितो
तेविं कपींचे दशमुख रागानें रणमहोग्र हरिहरि तो ४५
त्यातेंहि प्रभु भंगी रोधी गंभीरसत्व शर-भवनीं
जैसा मृगाधिपातें तुच्छीकृत-सर्व-सत्व शरभ वनीं ४६
घनरव अहिनीं बांधी वायुभुगंतक न शांत ये कामा
मग कुंभकर्ण वधितां गाती शक्रादि सर्व सुर रामा ४७
घननादें अनुजसह प्रभु रिखळितां गंधवाह-सुत रक्षी
प्रभु सारें उपकारें अनुगाही असुद गुरु असें लक्षी ४८
घनरव कृत्रिम सीता मारी प्रभुगंड अश्रुनीं भिजवी
प्लवगाधि हरि बिभीषण सौमित्रि अरिस उठावया निजवी ४९

---

१ नत-आग-त्याच्या अपराधातें. २ गरुड.

दशवदन जित-सहस्र दृ- गंगजघातें पडोनि शोक-भरीं
क्षोभे नागापरि घे श्रीतें मारावयासि खड्ग करीं ५०
खळ गंडशैलसा अनि- वार्य महावेग जानकीजवळ
गेला जागा केला सचिवें यश जोडिलें सुधा-धवळ ५१
बहु शतकोटि कटक अरि धाडी तें हुतभुगंतरीं यवस[2]
होय तसें प्रभुतेजीं म्हणे नगाराति पुरविला नवस ५२
भीषितयज्ञभुगंगन रावण ये शेवटीं पुन्हा कलहा
गाढायुधाहि भंगुनि बळ पाडी लक्ष्मणा रणीं खळ हा ५३
गंधवह-तनय पुनरपि सौमित्रिसि तेंचि शिखर आणून
उठवि प्रभु-हृद्रोगा उडवी तो शूर दूर खाणून ५४
प्रभुनें करुनि अतुळरण दशमुख मारूनि यश दिगंतांतें
पाठविलें गायत्री- सम बहुमत होय सर्व-संतां तें ५५
गगनीं दुंदुभि वाजे पुष्पांची वृष्टि होय गंधर्व
गानीं नाचति देवी प्रभुची स्तुति करिति देव मुनि सर्व ५६
प्रणत पदीं बैसविला कळवी श्री हुतभुगंतरीं[3] शुचिता
रुचि तामरसाची[4] धरि कांतोत्संगा सुखें धरी उचिता ५७
दशरथ भेटे उठवी हरि[5] मृत बळ सर्व गंतुकामातें
लंकापति पुष्पक दे सुगति खगाधीशसेंचि रामातें ५८
सुखद महाभूतांचे गुण शब्द स्पर्श रूप रस गंध
बंधहर प्रभुविजयीं झाले निववी जगासि ऋतसंध[6] ५९
प्रभु साकेताप्रति ये पुर सुरंगें अळंकृतें झालीं
भरतादिमनें भेटुनि गाईतें वासुरें तसीं धालीं ६०
होय सहस्रदृगंगण[7]- सम पौरांगणहि भगवदभिषेकीं

---

१ तुफानानें किंवा धरणीकंपानें जो पर्वतांचा खडक उडून पडतो त्यासारिखा. २ गवत. ३ अग्नीमध्यें. ४ कमळाची. ५ इंद्र. ६ सत्यप्रतिज्ञ. ७ इंद्राच्या आंगण्यासारखें. + उत्तम दृष्टि आणि अंगें.

दिव्यें वाद्यें नृत्यें गानें मोहीं तदा न मह एकीं ६१.
पूजुनि सुगळ बिभीषण बहु सुरवची गंधवाह-तनयातें
गाती प्रभुच्या कवि सुरव-पुरीं गजबंध वाहत नयातें ६२
प्रभु-गुण अघराशीतें उरवि तृणांच्या न दाव गंजीतें .
जडहि तरति जे गातां सुयश प्रभुच्याचि पादकंजीं तें ६३
गंगारामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ६४


समास.

# शिवरामायणप्रारंभ.

श्रीकांत कंजनाभ- ब्रम्हादि-समस्त-लोकपाळ-नुत
वैकुंठ होय दशमुख- मथना दशरथ- नराऽधिराज-सुत १
कौसल्या प्रवरा स्त्री तीचा जो पुत्र विष्णु तो राम
कैकेयी नरपतिची दयिता तत्सुत तया भरत नाम २
सुगुण सुत सुमित्रेचे लक्ष्मण शत्रुघ्न हीं तयां नावें
सर्व मिळोनि प्रभुवर एकचि यांचें चरित्र गानावें ३
आधींच शुद्ध यश घे मख रक्षुनि तोषवूनि गाधिसुता
दोष हरुनि करि गौतम- पत्नीतें प्रभु सती-सहस्र-नुता ४
उत्सव जनक-नृपा दे प्रभु कामाऽराति-चाप मोडूनी
पण पूर्ण करुनि मुनिस क्षितिसहि तदपत्यरत्न जोडूनी ५
दशरथ आणुनि दिधल्या तनया रामानुजां तिघां कन्यकें
मणि-निकरें समलंकृत करुनि सुविधिनें महोदयें जनकें ६

---

१ तत्- अपत्य- रत्न-त्या पृथ्वीचें अपत्यरूप रत्न (सीता)
२ रत्नसमुदायें. + श्रेष्ठ.

येतां पुरा अमर्षी भार्गव हर-चाप-हानिनें क्षोभे
दे भास दशरथातें त्या जिंकुनि राम वरयशें शोभे ७
साकेतीं नृप लावी पौरांला रामभद्र-यश गाथा
झाल्या प्रजा समया वृद्धनृपापरिस फार वशा गा थे ८
सानुजभरता वत्सल मातुळ घेऊनि निज-पुरा गेला
युवराज सुत करावा हर्षें भूपें विचार हा केला ९
अभिषेकाच्या समयीं कैकेयी हट धरूनि वर मागे
मनु- वर्षे वन रामा राज्य सुता भूप विनवितां भागे १०
रामप्रभु सानंद- स्वांत जनक- सत्यधर्म पाळाया
दशवदनाहि वधाया त्वरित निघे पुसुनि भूमि-पाळाया ११
पत्रिपति स्यंदन ज्या तो सीता-लक्ष्मणा- सहित रानीं
जाय वसाया न गणुनि सुख वर्ताया असेंच इतरानीं १२
वल्कें शंका न धरुनि- कैकेयी दे तयांसि मान्य करी
तात- प्रियार्थ वेसे तात-रथावरि मनुष्यरूप हरी १३
असक जातां दुःख तसें झालें पौरांसि शोक तो भारी
विसरति देहा गेहा साकेतीं नर जसे तशा नारी १४
शिशुहि प्रभुवर जातां खेळवितांही करूनि आ रडती
वदनीं दिलेंहि थान न पीती वत्सहि तसेचि आरडती १५
विकळ सकळ पुर झालें सुत-विरहें भूप काळजीं उलला
भुलला व्यवहार सकळ आयुःशेषें न तत्क्षणीं डुलला १६
प्रमुदित सुदुःखितहि करि भेटोनि सख्या गुहा निषादास
भुजग-वराच्याहि म्हणे प्रभु-वल्कज-ताप तो विषादास १७
वृद्धा नृपा न सोडीं तद्दास्य विशेष हें कथी सूता
रघुपति उतरें गंगा अभयें निर्व्यथ करी गुहा पूता १८

---

१ रामा. २ आनंदयुक्त आहे चित्तज्याचें असा. ३ गरुड. ४ फुटला.

विनयें वेदज्ञोत्तम पूज्य भरद्वाज वंदिला आधीं
तो मुनि म्हणे प्रयागीं बा वत्सा जय सुकीर्ति जा साधीं१९
प्रभु वसुनि चित्रकूटीं विज्वर[1] शमधन सहस्र राम करी
मुनि वृंदा दूर सोडी येतां हरि[2] निकट जेविं धाम[3] करी[4]२०
ऐके नृप सूत-मुखें वटतरु-पथ गुह जटार्थ दे हातें
शोक-विशीर्ण हृदय तो सोडी हा राम म्हणुनि देहातें२१
मालवला शाप-महा-वातें भूप-प्रदीप शोक-तम
म्हणवि कटकटा क्षमेहि[5] भ्रमले मग सावधान तो कतम[6]
कालविलें अमृतें विष कैकेयीनें असें प्रजा वदली
हा हा ऐशा हाका लक्षपुरी कांपली जसी कदली२३
दानशा रडले यतिही तें दुःख अगण्य राज-दूतांहीं
आणुनि साऽनुज भरत द्रुत केलें राज-कार्य पूतांहीं२४
झाला चंड समजतां क्षुद्रमतिस तो विशेष जाच करी
खर शब्द-बाण हाणी पति-पुत्रघ्नी म्हणे न भीड धरी२५
वपु राजाचें विधिनें संस्कारी तदुचित क्रिया करुन
राहे न पुरीं राज्य-श्री-प्रीति मनांत भरत तो धरुन२६
पक्वान्न-पात्र जैसें विषमिश्रित तेविं राज्यपद सोडी
मोडी कुळ-गुरु-वचनहि शीघ्रतर स्वाग्रजासि कर जोडी
देउनि पिंड पित्यातें राम वदे तात-धर्म रक्षावा
वत्सा भरता त्वां म्या वेदसमचि गुरु-निदेश लक्षावा२८
सरतां पण येइन मी न समय लंघुनि कदापि राहेन
शिशुस्या भरत वदे दे माथां श्रीपादुकांसि वाहेन २९
दे योगींद्रांऽर्चित-निज-पद-पद्म-स्पृष्ट पादुका राम
त्या माथां धरुनि निघे नंदिग्रामीं करी भरत धाम ३०

---

१ शांतिधनज्यांचें ते योगी. २ सिंह . ३ स्थान. ४ हनी. ५ समर्थहि. ६ कोणता. ७ कळ. ‡ भय. + दुःखरहित. * योगीशानीं पूजिलेल्या आपल्या चरणकमलानें स्पृष्ट असा.

जटिल फलाशी वल्की उष्णीं वर्षीं हिमीं वसे भरत
कृश-विग्रह प्रभु-पदें भद्रासन-निहित पादुका स्मरत ३१
समहि खचर मर्दाया प्रभु सोडी चित्रकूट भूजेतें
सांभाळित सानुज घे जाउनि अत्र्याश्रमांत पूजेतें ३२
श्रेय करि विराधाचें राक्षसपण राम तत्क्षणीं उडवी
जो हिंसानिष्ठ धरुनि सीतेचें चित्त कश्मळीं बुडवी ३३
दंडक-वनवासी जे भूसुर राक्षस-भयें मनीं भग्न
ते शरभंगप्रमुख प्रभुनें केले महासुखीं मग्न ३४
भवहर कव्यर्चितपद विप्रप्रिय घटजमुनिस सद्यास
जाउनि सुखवि श्रीश ग्रहपति उगवूनि जेविं पद्मास ३५
पक्षी गृध्र दशरथ – प्रियसख नामें जटायु सुखवी त्या
मेघश्यामहि १वरितें जें वश होउनि पुरांत सुख वीत्या ३६
गोदावरी पहातां रमलें मन राम तत्तटीं राहे
पंचवटींत उटज करि रघुनंदन न खरराक्षसा साहे ३७
परिसुनि लावण्य-गुण प्रभुचे पूर्वज जिचा दशास्य वरी
होउनि शूर्पणखा चे मायेनें वर्ण वयहि रम्य धरी ३८
पत्नी होऊं पाहे दंभमति प्रार्थना करी निंदी
श्रीतें प्रबळें दर्पे जसि खर्जूरीस निंदिती सिंदी ३९
श्रीरामबंधु करि खर-खड्गें तत्-कर्ण-नासिका छेद
वेद जसा असदुक्तिस दे तीस करूनि दुर्दशा खेद ४०
तीचा मत्त भ्राता खर अहिंसा क्षोभला कुधी अहित
वधिला प्रभुनें समरीं सहज चतुर्दश-सहस्र-बळ-सहित ४१
शंका न धरुनि सांगे शूर्पणखा रावणासि बुडवाया
स्त्रीरत्न-हरण मूढा मणिलोभें जेविं भुजग तुडवाया ४२

---

१ सीतेतें. २ कवि-अर्चित-पद- कवीनीं पूजिलें पद ज्याचें असा.

दुर्भगिनीचें कुमत स्वीकारी राक्षसेश तो कपटी
मारीचासि कनकमृग करुनि बळें अंतकाननीं दपटी ४३
दाटुनि गरळ गिळाया सांगे तो जड गतायु मान्य करि
श्रीच्या दृष्टीस पडे शीघ्र पळे नाशभय मनांत धरि ४४
कनक-मृग धरा म्हणतां प्रभुहि धरुनि चाप लागला मागें
जड पळुनि दूर गहनीं शिरतां ताडी शरें तया रागें ४५
अहित म्हणे हा सीते हा लक्ष्मण हाक तीस ती सीता
जनकसुता दयिताची मानुनि उटजांत जाहली भीता ४६
भय किमपि श्रीराम- प्रभुला नाहींच खचर मायावी
वदला हें कीनाशें-[1] हि दशा सति यास न चरमा यावी ४७
ऐसें लक्ष्मण विनवी सीता प्रकटूनि कोप कटुक-वचें
शस्त्रें हाणी त्यांचें वारण झालें न सत्व-पटु-कवचें ४८
प्रभुला बहु-दुःखाकुळ लक्ष्मण गेला स्वताप कळवाया
तो अवसर सांपडला दशकंठा जानकीस पळवाया ४९
तों क्षिप्र जटायु तया गांठी समरांत तद्रथा मोडी
वधितांचि पहि अधर्मे खड्गें नतसक्ती कुधी तोडी ५०
क्रीडा मानुषरूप प्रभु गहनीं लक्ष्मणें नमुनि खेद
कथितां बहु हाय म्हणे ज्याचे निश्वास सर्वही वेद ५१
पंचवटींत खोटज वर-तनु- विरहित विलोकितां हाय
प्रभुवर वदला न धरी क्षण मोह- निमग्न आपुला काय
उदकें वातें शमवी लक्ष्मण सीता- वियोग- तापातें
धैर्या अवलंबा दे हुडकाया जागवि प्रतापातें ५३
वन शोधितां दिसे तो मूर्छित गंभीरसिंधुसा पक्षी
विसरुनि विलाप पहिला बहु दुसरा आदरी न धृति रक्षी ५४

---

[1] यमें हि.

भूरवरा तात-सरवा साबध यातें जळें करिति दोघे
नेली वधू दशास्यें हें कथि ततुला म्हणे रहा मोघे ५५
करि तत्क्रिया यथाविधि बापाची तसिच कीर्ति हे ओली
झाली गंगे तुज असि सूक्ति महा-कवि-शताननें आली ५६
स्फटला दुर्गतिपासुनि जो योजनबाहु घातकामुक तो
अत्युग्र कबंध गतिस रवळ नभजुनियां +अपातका मुकतो ५७
जनि-मृति[2] वारुनि गति दे शबरीतें पूजितांचि दे वरवी
यासम हाचि दयाकर पाहे आणिक जगीं असा न रवी ५८
पंपेंत राजहंसी[3]- सह वेरटा कमळकाननीं पाहे
त्यां धन्य म्हणे सीता- विरहीं प्रभु कामज व्यथा वाहे ५९
लक्ष्मण म्हणे नरेशा सोडविशिल अरिस वधुनि ती आर्या
सोडुनि विश्व नगेला तस्कर बा सुकर समज या कार्या ६०
अनिलात्मज मति-सागर आधीं भेटोनि होय वर-दास
मग रविसुत सुगळ सरवा जोडुनि दे हा सदिष्टवरदास ६१
स्वाश्रित-सर्मी हित-प्रद मत्त महाबळ महेंद्रसुत वाली
मारुनि कपि-राज्यपदीं स्थापुनि सुगळासि बंधु-परि पाळी ६२
योगि ध्येय प्रभु करि शिरवरि-गुहेमाजि वास घन-काळीं
सुगळा हो धन्य म्हणे धनतन्वाद्यधिक सत्य वच पाळीं ६३
उष्णांशु[4]किरण तसे ते कपिरूप सुरांश चहुंकडे लक्ष
प्रेरी त्यांत मरुत्तनु- जनु विभुचें कार्य करि महादक्ष ६४
सांगे जटायुचा गुरु संपाती शोध मारुति क्षिप्र
गोष्पद समुद्र शतयो- जन करि धांवे धना जसा विप्र ६५
जगतीधर मैनाक प्रियकर जो प्रकटला तया न भजे
सुर जय वदति पहाती सुरसा-छळ-कुतुक वरुनियां नभ जे ६६

---

१ सवि. २ जन्ममरण. ३ हंसस्त्री. ४ सूर्याचे किरण. ** धन-तनु-आदि- अधिक- द्रव्यशरीर इत्यादिकाहून अधिक. + अनघा.

समजे छायेसि धरुनि ओढी जी सिंहिका तिच्या घाता
उदरीं शिरोनि तोडी काळिज घाता करी सुखी ताता ६७
त्रिभुवन-गीत-बळ जगत् प्राणसुत नगारि-नुत-यश शंका
त्यजि भूषवी जग यशें देखिसि रण करुनि हुडकि मग लंका ६८
श्री लंकेंत न दिसतां होय अति व्यथित-हृदय तो कीश
पाहोनि अशोकवनीं निवुनि म्हणे पावला त्रिलोकीश ६९
तों सरिपु रावण ये श्रीस म्हणे आठवीं न रामातें
हो महिषी नवरिसि कां बहुमानुनि तापसा नरा मातें ७०
तो पाप-पुंज जडमति रीति विलंघुनि वदे महाकामी
राक्षस अप्रिय ऐके कपिहि म्हणे म्हणतसे अहा कां मी ७१
प्रभु-दयिता त्यासि म्हणे मरणप्रद कर्म वरिसि कां मत्ता
या अपराधें बसतिल तुझिया माथां विपत्तिच्या लत्ता ७२
होउनि तो उन्मत्त क्रुद्ध वदे राक्षसीस सांगातें
जें हित दोंमासांवरि करिते इच्छा प्रातराश आंगातें ७३
कमनीय वपु समर्पू भोगाया भोगवर मला वश हो
गौरव पावो म्हणतो मन्महिषीचें जगीं इचें यश हो ७४
ऐसें बोलुनि गेला स्कर-घातक पापनिष्ठ देवीतें
कटु कथिति राक्षसी बहु जें जाचिति गरळसेंचि सेवी तें ७५
साहों नशके जाच क्षितिजा उद्बंधनें मरायास
पाहे तुटतां आशा कष्टहर स्मरुनि रामरायास ७६
स्तवुनि प्रभुतें मारुति एकांतीं जानकीस दे मुद्रा
परम धृति धरी मानी पति-कुशळें तृणचि ती खळा क्षुद्रा ७७
चूडामणि दे सांगे प्रभुला संदेश शत्रु हा निकर
करितो तीव्रतर मजो तुमचा कोदंड शत्रु-हानि-कर ७८

---

१ न्याहारी. २ सुंदर. ३ गळफांसानें.

स्फुटला कपि वात तसा प्रखर करी प्रथम वृक्षवर चूर
राक्षस-बळ फणिकुळ करि आपण पक्षींद्र होय तो शूर ७९
समरीं दशमुख-पुत्रा[+] अक्षा वधितां सुरर्षि नृत्य करी
दावुनि संक्रंदनजि-द्ब्रह्मास्त्रा सांपडे न भीति धरी ८०
कपि कवि कथि दशवदना प्रभुला ये शरण मरण चुकवील
नाहींतरि अपराध क्षय करिल त्वन्मुखांसि सुकवील ८१
तो दुष्ट अंजना-सुत- वधकामें घे करीं कराल असी
परि साधु[2] बिभीषण दे स्मृति[3] तूर्ण अवध्य दूत होय असी ८२
कामादिसानेटांचें जो अजिर दशास्य तो तया तुच्छ
मानुनि वात-तनूजा पेटविना जाहला कुधी पुच्छ ८३
सहसा चढोनि जयति श्रीराम असें उडे पुरी जाळी
रडवी दशमुख दारहि साधु-बिभीषण-गृहासि परिपाळी ८४
निज-चरितें रंजवि बहु जगदीशातें नमूनि संदेश[4]
श्रीचा कथूनि कळवी केला पुर-दाह भग्न मंदेश ८५
दीर्घ-भुजांहीं प्रेमें आलिंगी पवननंदना राम
वंदीसा करि मधुर स्तवन श्रित-सर्व-नंदनाराम ८६
प्रभु दशमुख-क्षयार्थ त्रिदशांश प्रबळ ऋक्ष कपि कोटी
घेउनि निरहंकृति नत- तारक जलधीस भीति दे मोटी ८७
विटुनि दुराग्रह धरित्या दशकंठावरि नमी महाभाग
साधु बिभीषण राम- प्रभुस म्हणे भागल्या न ह्या भाग ८८
वानील न कोण तया लोक-त्रय-हित-करास जो नमनीं
लंका बिभीषणा दे ज्याच्या न तसा दुजा भरे न मनीं ८९
सेतु करवि शतयोजन सबळ प्रभु सागरा स्फरें उतरे
व्यथित श्री करि त्या मथि सुगळ म्हणे कुशळ न न मदें उतरे

---

१ खड्ग. २ कामादिसहाशत्रूंचें. ३ अंगण. ४ निरोप. + संक्रंदन-जित्-ब्रह्मास्त्र- इंद्रजिताच्या ब्रम्हास्त्राला.

सामनमानी अंगद- वध वांछी धरिति कपि वधी धरिते
क्षीणायु करि प्रभुसीं रण बधिलें वीर जरि बली तरि ते ९१
कुंभिमद्दु घनरव अहि- पाशांनीं प्रभुसि बद्ध करि भवा
तीक्ष्णा ताता सुखवी श्री पाहे होय पळ तमोमया ९२
नेणें उपाय कोणी गरुड हरि व्यसन नाग पळवूनी
घटकर्णा उठवि बळें धाडी युद्धास ताप कळवूनी ९३
उद्दामा त्या धरिला सुगळ सुटुनि करि विरूप खेदानें
तो सीमातिग- बळ कपि यधि गिळि चिरि नगाहि शूल- भेदानें
समरीं नितांत-कठिना अवयव खंडूनि दाशरथि मारी
गमलें बिभीषण- वचन सत्य खचरपति विलाप करि भारी९४
मायावी सप्रभु बळ शस्त्रघनें विद्ध विकळ सर्व करी
वातात्मज ओषध्यग- शिखरें क्षत- शल्य- मोह- ताप हरी ९५
पिशुन-शिरोमणि ताता द्याया सुख संगरांगणीं सीता
मायामयी वधी हा म्हणवी त्याही महत्स भागीता ९७
सबळ- प्रभुसि बिभीषण कपट असें कथुनि सावधान करी
खाणी लक्ष्मण-शतमख- हृच्छल्य व्यथित होय फार अरी९८
भग्नमनोरथ दशमुख पुत्राची ऐकतां तसी वार्ता
जाय वधाया खड्गीं सीतेतें प्रभुसि ती स्मरे आर्ता ९९
सचिव परतवूं शकला त्या प्रभुतेजें कसा वधिल तिस तो
विभु निपट मानवापरि परदृष्टिस यश कुरावया दिसतो१००
बळ भगवच्छर- दहनीं हुत होतां खळ निघे करूनि पण
सौमित्रि पडे मूर्छित कटक तुरे करि असा महाघ रण१०१
वेगें मारुत- नंदन घेउनि आला तसेंचि तें शिखर
लक्ष्मण उठे प्रभु म्हणे त्या स्वयश जगीं असाचि वा विरस१०२

विनवी मातलि बैसे शक्र-रथीं द्या वया नया यश तें
दशवदना सव्यथ करि तो खंडिलिया शिरांचिया न शतें १०३
शिकवि रवि हृदय कुंभज वरद दिवाकर म्हणे जयास्तव मग
ब्रम्हास्त्रें दशवदन-क्षय करुनि करी जयें प्रहृष्ट जग १०४
निघवि जग यशें बरवी प्रभुवर दशकंधर-क्रिया करवी
मिरवी बिभीषण पदीं त्याला लंका पवित्र-कथ निरवी १०५
निरसी जनापवाद श्री दिव्यें प्रभुसि मुदित[1] करि तात
वधिलीं बळें हरि करिति पति जळजें जेविं उदित करितात १०६
वरुनि वर विमान निघे मद्यश जोडूनि ये पुरा भरता
निघवी राज्य करि अतुळ सुचिर प्रभु उद्धरी प्रजा स्वरता १०७
अनिळ-कुमारा परम स्व-यशोमृत-पान सुचिर वर दे हा
नेल्या प्रजा विमानीं बसवुनि सुपदा करूनि वरदेहा १०८
यांत श्रीशिवनामें अष्टोत्तर-शत म्हणोनियां याचें
शिवरामायण ऐसें नाम शिवप्रदचि होय हें साचें १०९
शिवरामायण प्रेमें मयूरें राम-नंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृत-वंदनें ११०

समाप्त.

# शिवरामायणप्रारंभ.

विधि शशि-शेखर शतमख यांहीं संप्रार्थिला दयाळु हरी
दशमुखवधार्थ दशरथ-सदनीं अति रम्य मूर्ति चार धरी १
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न शिशु स्व-मूर्ति-कांति-भरें २

---

१ चंद्रसूर्यउदयपावोन. + इंद्रराम. ≠ प्रफुल्ल.

करिति नृपाचें भवनाहि हृदयहि विनमस्क हर्ष-पूर्ण बरें २
राम सलक्ष्मण अर्पी कुशिक-सुता गुरु-निदेश-कर भूप
तो त्यांसि, बलाऽतिबला विद्या दे अस्त्र-शातक भवरूप ३
कौशिक-निदेश होतां प्रथमचि रघुवीर ताटकेशि करें
बाणें वधी कळवि कीं निज-गुरुचें वाक्य देवरूप खरें ४
सिद्धाश्रमीं रघूत्तम विशिखें क्षणदाचरांसि संहरिती
सव-सिद्धिनें मुनि निवे यशा तुरवि दिशा हरूनि अंह रितीं५
कौशिक-मुनि जनकनृपें व्हावा निज यज्ञ सफळ या भावें
स्व-सचिव-मुखें विनविला कीं ताराया नता तुम्ही यावें ६
प्रभु विनवी मुनिनें हे त्या शिष्य पुराऽरि-चाप दावाया
गुरुहि अवश्य म्हणे घे गौतममुनिला नृपाहि पावाया ७
शप्ता सती अहल्या जगदीश हरी तिच्या शिलाभावा
पूजुनि ती स्तवन करी प्रथम म्हणे त्या महामुनिच गावा ८
जनक तपोराशिप्रति भेटे तों निकट दाशरथि पाहे
लाहे समाधि-भव सुख विसरे पूजादि चित्तसा गहे ९
पुसतां कौशिक सांगे जनका हे राम लक्ष्मण भ्राते
दशरथ-वत्स खपविली ज्याहीं राक्षस-चमू अदभ्रा ते १०
हा राम लक्ष्मणाग्रज आला शितिकंठ-धनु पहायाला
दाखिव रायातें या कुशला सद्धर्मपथ-सहायाला ११
आणिति आणवितां तें पुरुष सुशिक्षित सहस्त्रशः अमुनी
मुनि चिवुक धरूनि म्हणे वत्सा श्रीरुद्र-धनु पहा नमुनी १२
नमुनि मुनिस राम उठे श्री-शशि-शेखर-धनुष्य-वल्लीला
करुनि प्रदक्षिणा प्रभु वंदी दावी मनुष्यवल्लीला १३
सांबा सदाशिवातें सीता प्रार्थी धनुष्य उचलाया

१ पाप. २ हनवटी. ३ मनुष्य-वत्-लीला-मनुष्यांप्रमाणें लीला.

कुचला याहुनि परनर राघव चि म्हणे मनास रुचला या १४
प्रभु लीलेनें उचली त्र्यंबक-धनु शिंजिनि-वीर-कोटि-नुत
सज्य करुनि योद्धी तों मोडे तद्भव करी त्रिलोक धुत १५
सीता प्रभुला अतुळा प्रीति श्रीकौशिकाहि कीर्ति बरी
रवि-वंशाला जनका चिंता उडवूनि दूर शांति वरी १६
कौशिक सांगे जनका राजा दे लक्ष्मणा निजा कन्या
भरता शत्रुघ्ना त्या स्वाश्वरजाच्या स्वलंकृता धन्या १७
मुनिनें ख्यात जगद्गुरु-शिष्य त्रिजगीं असा बरा केला
मुनिच्या या कीर्तीसीं कवण्यानि घडे तुळा न राकेला १८
सिद्धाश्रमासि कौशिक गेल्यावरि दशरथा स-तनयास
स्वपुरासि याज्ञवल्क्य-च्छात्र द्रुत आणवी नत नयास १९
केले विवाह शिबिका हय रथ गज रत्न भूषणें कनकें
देउनि स-पौर-स-सचिव गौरविला पंक्तिरथ बरा जनकें २०
नाशित आला मत्त क्षत्रिय बहुकोटि जो महातेजा
तो भार्गव मार्ग धरी न दिसति शिर निजपदीं वहाते ज्या २१
प्रभु-घटयोनिउदें भृगु-रामाऽहंकार-तोय-राशि सरे
परपुरुष असें समजे शांति धरि पराभव-व्यथा विसरे २२
कर्णाहीं विजय-कथा प्रभुची प्राशिति सुमूर्ति नयनाहीं
वदती पौर प्रेमें आतां आम्हांसि किमपि भय नाहीं २३
शिष्ट युधाजित् मातुळ ने सानुज भरत आपल्या नगरा
नगराज होय आतां बाधींदे साधु भव-भया न गरा २४
राजा प्रजा-शिवार्थ श्रीरामाला गुरु-प्रधान-मतें
युवराज करूं लागे कैकेयीच्या मनासि दे श्रम तें २५
तीतें सुर-दूषित-मति दासी दुर्बुद्धि मंथरा शिकवी

१ काजरा. २ कंपित.

मागे दोन वर दिले  राज्यांत महा अनर्थ ती पिकवी २६
सत्यव्रत शिष्टोत्तम  पति जो त्यातें म्हणे असो भरत
अभिषिक्त राम तापस  मनुवर्षें मन तुझें अपाप-रत २७
ती नंद्वे शिलाधिक  कठिना बहु सांवितांहि हें कळलें
गुरु-सत्य-धर्म बुडतां  त्रिजगद्गुरु-हृदय रक्षणा वळलें २८
कैकेयी-शब्द-शिली-मुख-विद्ध-हृदय पित्या पुसे नवुनी
वल्कल धरुनि निघे प्रभु  दारानुजसह जसा रुसे न मुनी २९
बहु रडले साकेतीं  शिशु पशु शुक सारिका सर्व दास
वंचुनि जाय जनास  प्रभुवर सदयहि तया सर्वदास ३०
राजानुशिष्ट मंत्री  राज-रथीं बसवि ने निषादातें
भेटे राघव गंगा-  तीरीं त्याच्या हरी विषादातें ३१
रचुनि जटा क्लेशित करि  गुरु-सचिवा त्या म्हणे पुरा जाच
उपदेशा तो न वसुधा-  रसचि परि तया गमे पुरा जाच[1] ३२
उतरुनि मदनारि शिरो-  मुक्ता-माळेसि ये प्रयागातें
देव भरद्वाजातें  नमन करी सर्व जग ज्या गातें ३३
जगदीश चित्रकूटीं  शुद्ध-तपोराशि-संकुळीं राहे
हें सचिव कथी राजा  व्यसु होय न विरह-दुःख तें साहे
शोकीं साकेत बुडे  रघु-कुळ-देशिक वळी कुशाळ पूत
जवन प्रेषी भरता  आले घेऊनि न कथितां दूत ३५
शोक-शिथिल भरत रडे  कैकेयीतें म्हणे खरी कृत्या
स्व-गुरु-वसिष्ठाऽनुमतें  ताताच्या आदरें करी कृत्या ३६
स्व-जनक-कनक-कशिपुतें  जेविं प्रल्हाद जळजनाभ-रत
जननीतें अवमानी  कळवी निर्दोष फळ जना भरत ३७
तो साधु चित्रकूटीं  शिरसा करुणाब्धिच्या गळां पडला

---

१ दुःख. २ तामसदेवताविशेष.

रडला वत्सल-तिळकें श्रीरामें साधु सांविला अडला ३८
श्रीपादुका शिरीं घे परते परते त्यजी न मन पाय
नंदिग्रामींच वसे रक्षी तें आर्य-राज्य अनपाय. ३९
अत्रिस अनुसूयेस प्रभु वंदी पुत्र शिष्यसा पूजा
पावति मुनि-पति-पासुनि साध्वीनें बहुत सुखविली भूजा ४०
उद्धरुनि विराधातें शुद्ध शिलोंछादिवृत्ति तापस जे
दंडक-गहनीं होते त्यांचा शमवावयासि ताप सजे ४१
तापस-शिरोमणि घटज पूजुनि दे प्रभुसि वैष्णवें शास्त्रें
जीं दैत्य-दानव-क्षय- निपुणें तो गाधिसुत जसीं अस्त्रें ४२
पितृ-सख-जटायु-गृध्र- क्षितिपतिला शिशुतसाचि सुख दावी
पंचवटींच अयोध्या गोदा सरयू खगा जनक भावी ४३
मेघश्यामा रामा घन मानुनि नाचती शिखी हर्षें
जैसा प्रावृट्काळीं अति मुदित मुदिर विलोकनें वर्षें ४४
तेथें शूर्पणखा ये जी रक्त प्राशिनी महादुष्टा
माया-रुचिराकारा प्रभुची स्त्री व्हावया रता तुष्टा ४५
तद्घ्राण-कर्ण लक्ष्मण आर्य-निदेशें शिताऽसिनें खंडी
सबळ खर वधवि पाडवि शून्य जनस्थान ती कुधी चंडी ४६
पिशिताशनेंद्र धाडी कपट-कनक-मृग तयास ती पाहे
सांगे धरावया प्रभु जातां सौमित्रि रक्षणा राहे ४७
ब्रम्हास्त्रें अभिमंत्रुनि पळतां प्रभु शितशरें तया हाणी
हा सीते हा लक्ष्मण असि तो रामस्वरें वदे वाणी ४८
त्या पिशिताशन-कपटें सीता भी लक्ष्मणा म्हणे स्वामी
प्राण-व्यसनीं रक्षीं धांव कसा भय नसे मला धामीं ४९
सौमित्रि म्हणे माते पिशिताशाचीच हाक हे खोटी

1 मायारूपी फिरे. 2 जानकी. 3 उदकवृष्टीनें. + दूर ++ वर्षाकाळीं. ✱ बाजार, रस्ता इत्यादि ठिकाणीं पडलेल्या धान्याचे कण एक एक निवडणें आणि शेतकऱ्यानें शेतांतटाकलेल्या कणसाचें ग्रहण तेणेंकरून निर्वाह करणारे.

कपट-मृग वधुनि येइल कुशळी प्रभु या तृण द्विषत्कोटी ५०
ती कोपे त्यासि म्हणे अशिवाचार तुझ्या मनीं आर्या
मृत्यु घडावा पापा वांछिसि मातें करावया भार्या ५१
अशिवा उक्ति अशी त्या देवीची ऐकतांचि तो जोडी
कर होय उदश्रु निघे धैर्य उटज-अयन नापला, सोडी ५२
पिशिताशनेंद्र तों ये श्रीतें वाहे रथीं निघे भीना
हाका मारी नाथा दीरा श्वशुराहि वत्सला सीता ५३
धांवुनि जटायु अरिच्या धैर्याहि रथाहि नाशिता झाला
त्याला रावण पक्ष-च्छेदी करि विकळ पाप-धी त्याला ५४
श्रीतें ने गगन-पथें पावे जलराशिमाजि लंकेतें
दशकंठ अशोक-वनीं रोधी तीतें त्यजूनि शंकेतें ५५
पिशिताशनासि मारुनि फिरतां सौमित्रि भेटला आर्या
सांगे जें वदली तें राम म्हणे हा गमाविली भार्या ५६
शून्य स्वोटज पाहुनि राम म्हणे हा सुकेशि हा तन्वी
हा सुदति हा वरोरु क्षणदा-पति-मृग हरील हा धन्वी ५७
प्रभुचे विलाप परिसुनि मृग शुक शिखि सारिका मृगेंद्र करी[1]
रडती वदनें वीही[2] प्रभु-शोक व्याकुळ दुनासि करी ५८
हा शशिमुखि हा सुंदरि म्हणत असें शोधितां स्वचुलत्यातें
पाहे वनांत शोकें क्षत-विकळातें उरांत उलत्यातें ५९
नर-पिशिताशन दशमुख घेउनि गेला सतीस मम पक्ष
छेदुनि असें वदे तो त्यजितां तनुतें म्हणे स्वयश रक्ष ६०
ज्याचीं नामें नाशिति दुरितें तो तीर्थ-पाद राम हरी
तातसखा गृध्राची तन्नुभवमा क्रिया स्वयेंचि करी ६१
करि कवळित्या कबंधा शतमख-यम-पाशि-धनद-नुत राम

---

१ हस्ति- २ पक्षिहि-

शबरीस वरा गति दे पुरवी मारुति दिनेश-सुत-काम ६२
श्रीरामें संहरिला एकेंचि शिलीमुखें बळी वाळी
कपि-राज्य दिलें सुगळा धर्मन्याया वरूनि तो पाळी ६३
श्री शोधाया सुगळ प्लवग सुशिक्षित चहूंकडे प्रेषी
पवन-सुतें शत-योजन सागर लंघूनि गांजिला द्वेषी ६४
शिर चरणीं ठेवुनि दे मुद्रा चूडामणी तिचा पावे
वन बळ भंगी जाळी लंकेतें कीं असाधु तापावे ६५
चूडामणि दाखवितां विश्वाचा ईशिना निवे फार
आलिंगी बहु वर्णी त्या मारुतिच्या यशा नसे पार ६६
अमिताऽमरांश- कपि-बळ घेउनि जळ-राशिच्या तटा पावे
ये रावणाऽनुजन्मा शरण न तद्यश जगत्रयीं मावे ६७
प्रभुनें बिभीषणाला चरणीं शिर ठेवितां दिली लंका
रंकाहि तराथाची करुणार्णव हा धरूं नदे शंका ६८
सुर-शिल्पि-पुत्र नळ करि शत-योजन सेतु त्या पथें पारा
पावे सुग्रीवसह प्रभु विजय-श्रीस जो सदा थारा ६९
शिक्षी कोपें सुगळ प्रथमचि दशकंधरा महा-मत्ता
श्रीस रडवि पति-मस्तक दावुनि जो त्रिभुवनीं करी सत्ता ७०
उपदेशिला सकरुणें प्रभुनें अंगद-मुखें नकरि साम
हांसुनि वदे कपिबळें सीतेतें इच्छितो मनुज राम ७१
समरः करी पंक्तिशिरा बुडवी भृत्य प्रधान बंधु सुत
प्रभुच्या प्रताप-दाव- ज्वलनीं झालेचि शलभतेविं हुत ७२
घननाद नागपाशित करि मायेनें सलक्ष्मणा रामा
लीला-मानव-रूप- प्रभुच्या ये गरुड संकटीं कामा ७३
सुगळ-विरूपित सुटला घटकर्ण प्राशित प्लवंग-बळा

राम वधी त्या काळ- प्रतिमा खंडूनि पाद-बाहु खळा ७४
शित-शस्त्र-वृष्टिनें करि मूर्छित घननाद स-सुगळा देवा
उठवि पवन-सुत ओष- ध्यग-शृंगें आदरें करी सेवा ७५
मायामयी जनकजा दावी घननाद शिर तिचें कापी .
तो लक्ष्मणें निवटिला भक्त-विभीषण-मतें महापापी ७६
सुत-शोकें खळ कोपे निशिनाऽसि धरी सतीस माराया
त्या सचिव म्हणे मारीं अरिस इला मथुनि काय या राया ७७
प्रभु-मथनार्थ प्रेषी निशिचर-सेना दशास्य तो भारी
त्या अर्णव-तुल्येतें राम मुहूर्तद्वयें रणीं मारी ७८
असकृत भंगत आला तरि तो पिशिताश-राज ये युद्धा
भ्याली प्लवग-बळें बहु लक्ष्मण हटकी तया अतिक्रुद्धा ७९
तो निशिचर-नाथ रणीं दारुण-तर-शक्तिनें उरीं ताडी
सौमित्रिनें महीवर मूर्छित रामाऽश्रु-बिंदु-सह पाडी ८०
ओषध्यऽचल-शिखरनें मारुति आणी सुषेण तद्रस या
देउनि उठवि शचीच्या त्यांचें चिंतिति सदैव भट मया ८१
शक्र-रथीं बैसोनि प्रभु विखरी विशिख किरण जेंवि रवी
प्रकटी दश-वदनहि निज तेज त्रिदशेंद्र-धैर्य जें चिरवी ८२
सप्त अहोरात्र रण प्रभु करि शान अरि-शिरें जरिहि तोडी
तरि नमरे देव पुन्हा नाहीं तुटलीं असीं सपदि जोडी ८३
प्रभुसि रविहृदय सांगे जो सिंधु प्राशिता महातेजा
तज्जप-तुष्ट तरणि दे वर बहुमत वंदिते पहाते ज्या ८४
अद्भुत-तेजो-राशि प्रभु राम ब्राम्ह मार्गणीं जोडी
सोडी दशकंठाचें वक्षाभेद्योर तक्षणीं फोडी ८५
वातें चैत्यद्रुमसा प्रभु-विशिखें शत्रु पाडितां भारी

१ तीक्ष्णखड्ग. २ तत्क्षणीं.

सुर-दुंदुभि-रव कोंदे ब्रम्हांडीं हृष्ट होय जंभारी ८६
दंशित स-शस्त्र-वाहन राक्षस पळतांहि मारिले हरिनीं
परि भिंदिले न कोणी कीं वरिली सुगति मरुनियां अरिनीं ८७
प्रभुच्या शिरीं सुरानीं दिव्य कुसुम-वृष्टि स-स्तवा केली
गेली त्रिभुवन पीडा वाटे मारीच मारितां मेली ८८
शशिशेखर विधि शतमख नारद हे बंदिजन-सम स्तविती
नाचति गाती जयजय हा ध्वनि वदनें तदा समस्त विती
निशिचर-पति क्रिया प्रभु करवी वसवी पदीं पद-नतातें
श्री दिव्य करी भेटुनि पुत्राचें देखिलें वदन तातें ९०
उठवी रण-मृत कपि-बळ ईशित्वा धरिल-सिद्धिचा भर्ता
यश देवनायका दे ब्रम्हादि-समग्र-सृष्टिचा कर्ता ९१
पूजायाचा प्रांजळि तो निशिचर-नाथ जाणवी काम
भेटिव भरत मज सबळ-सुगळातें पूज हें म्हणे राम ९२
उपदेशिलें करुनि दे पुष्पक लंकेश नमुनि रामातें
धनद-विमान प्रभुच्या पूर्ण करी जव करूनि कामातें ९३
शितिकंठ-सख-विमानीं बसुनि बिभीषण-सुकंठ-बळ-युक्त
सेतु वधूला दावुनि ये साकेता करी खरें उक्त ९४
सानुज भरत शिखीसा प्रभु घनसा पौर सर्व चातकसा
दुरवार्णव-मग्नातें द्रवुनि नदेईल सदय हात कसा ९५
शिष्ट कुळ-गुरु-प्रमुख प्रभुतें राज्याभिषेक तीर्थ-जळें
करिती सोत्सव दे हा सुरतरु धर्मार्थकाममोक्ष फळें ९६
निज-पद-पद्म-शिलीमुख सुगळ बिभीषण ससैन्य शोभविले
प्रभुनें बहुप्रसादामृत-वर्षे ताप हरुनि लोभविले ९७
औरस शिशुसा मारुति गौरविला स्मरुनि तत्कृतें कार्ये

१ इंद्र. २ सज्ज. ३ मोरसा. ४ आपल्याचरणकमळसंबंधीभ्रमर.

श्रीसह रामें दिधले वर जे त्यां इच्छिलें महा आर्ये ९८
सु-तपोराशि घटजमुनि सांगे प्रभुला दशास्य-जन्म-कथा
जपुनि तपुनि वर जोडुनि पीडी विश्वासि धरूनि पाप-पथा९९
श्रीदत्त-शिष्य अर्जुन शक्रात्मज वल-समुद्र जो वाली
तत्कृत दशमुख-परिभव सांगे कथिता न गुंफना वाली१००
पवन-सुत-शिशुपणींचें अद्भुत चरित मुनिमुखें सेवी
सानुज-राम प्रभु बहु हर्षे वसुधा-सुताहि ती देवी१०१
शक्र-यम-पाशि-धनद- प्रमुख सकल लोकपाळ यश गाती
जी सुख-समृद्धि-न कधीं झाली होय प्रजांसि वशगा ती१०२
हय रथ गज शिबिका तों प्रभुच्या राज्यांत पौर वागविती
नागरिकांच्या वर्गी गाउनि गीतज्ञ नित्य जागविती १०३
शिबिरें श्रीसाकेता- भंवतीं शोभति असंख्य भूपांचीं
पौरांचीं जीं रूपें तीं बिंबें गमति देवरूपांची १०४
स्वर्गस्थ शरण्य शिबि प्रभु-यश परिसुनि म्हणे मम नगातें
नंदन-वन-स्थितातें हें म्हणतें मत्परीं रम न गातें १०५
सानुज-राम-प्रभुचे सद्गुण मणिराशि पुत्र जे आठ
ते कुश-लव-प्रमुख गुरु- समक्षि मदा सांग वेद ज्यां पाठ१०६
रवि-शशि-कुलज नृप बहु श्रीरामाचें परंतु शुचि राज्य
वर-महित अमृत-रससें नदितर नें होय जेविं रुचिराज्य१०७
जो प्रभु शिला समुद्रीं नळकपिस निदेश करुनियां तारी
पावन-यशें प्रजांचें त्राण भवीं त्यासि काय हो भारी १०८
वाल्मीकि-शिष्य होउनि जोडिति हित-काम हात पाठ कवी
कुश लव करिति विभुयशें षड्रिपु नारद महातपा ठकवी१०९

शिव-रामायण ऐसें मयूरें राम-नंदनें
श्रीराम-चरणांऽभोजीं अर्पिलें कृतवंदनें ११०

समाप्त.

---

१ नामविशेषवानर. २ त्यागी.

# प्रयागरामायणप्रारंभ.

श्रीश प्रभु विधि-वचनें सुर-गो-द्विज-रक्षणार्थ दशवदना
मारावयासि अंगज होय करी धन्य पंक्तिरथ-सदना[1] १
कौसल्येचा पुत्र प्रथम श्रीराम नाम या ठेवी
कैकेयीचा अंगज भरत दुजा गुण-समृद्धि ज्या सेवी २
प्रसवे सती सुमित्रा सुत दोघे त्यांत सुगुण जो पहिला
नाम तयाचें लक्ष्मण दुसरा शत्रुघ्न सुख गमे महिला ३
विप्रवर गाधिनंदन ये त्याच्या पंक्तिरथ पदीं लागे
तो राम-लक्ष्मणातें वृत्त कथुनि याग-रक्षणा मागे ४
प्रत्याख्यान करूं दे न कुळ-गुरु वसिष्ठ तत्करीं दोघे
देवर्षि विनयादि-सु-गुण-सागर ते सखुमर्थसे तो घे ५
प्रथित[2]-यशा मुनि विद्या अस्त्रें रामा सलक्ष्मणा शिकवी
बहु ताटका-वधें निज-याग-घ्न-वधेंहि धरि सुखासि कवी ६
होय प्रसन्न मुनि ने जनक-मखा हर-धनुष्य दावाया
सांगे मुनि-पत्नीतें अघ-भव-सागर-तटासि लावाया ७
उद्धरुनि अहल्येतें प्रमथाधिप-चाप ओढितां मोडी
या पांडित्यें जगतीं कन्या सीता सुकीर्तिही जोडी ८
प्रचुरानंद जनक दे रामाऽवरजां तिघां तिघी तनया
कीं सागरासि सोडुनि हर्षें अन्यत्र नांदती न त्रया[3] ९
प्रकट करी क्षत्रांतक भृगुराम क्रोध गुरु-धनुर्भंगें
धरुनि भयासि गडबडे दशरथ परि निवविला रमारंगें १०
प्रमुदित पुरचि न केलें या राम-यशें समस्त जग धालें
प्रभुच्या विजया गातां गजमुख-गुरु-हृदय बहु सुखी झालें

---

१ दशरथगृहा. २ ख्यातकीर्तिअसा. ३ नद्या.

भूप प्रजावनोचित- तनया युवराज जों करूं लागे
केकेयी त्या जगती- पतिस हठें पूर्वदत्त वर मागे ११
पुत्र प्रबुद्धमति परि होता मातुळ-पुरीं तयामागें
गडबड करि कैकेयी नघळे जरि विनविली महाभागें १३
प्रथम वर पतिस मागे चवदा वर्षे वनीं वसो राम
या नगरीं राज्य करू भरत असा जाणवी हठें काम १४
सत्यव्रत-प्रतिष्ठित नृप कुंठित-यत्न होय हें कळतां
राम प्रियाऽनुजाऽनुग जाय वना स्व-पितृ-सत्य डळमळतां १५
प्रणता रामा माता वल्कल नेसावयास दे हातें
शोकार्थ नृप प्रार्थी जगति विवर दे मदीय-देहातें १६
रडति प्रजा समस्ता पति तिघे पाहतांचि राज-पथीं
प्रेषी दयालु जगती- वल्लभ वसवी सुमंत्रराज रथीं १७
नघडो प्रयास गहनीं म्हणउनि पौरांसि सदयही फटवी
आधीं गुहा मग भर- द्वाजा भेटोनि आदरी अटवी १८
प्रत्यक्ष होय तापस- समुदाया ब्रम्ह तापसत्वानें
नग चित्रकूट सेवुनि वसतां साहोनि ताप सत्वानें १९
सूत कथी नृपति-प्रति विनयानें कथुनि मज तुझी सेवा
गंगा उतरुनि वसला जटिल वरुनि चित्रकूटनग देवा २०
महिषीप्रति कळवुनि तो सुत-शोकें मरण लब्ध-मुनि-शाप
क्ष्माप त्यजि कायातें गति पावे परि पुरासि दे ताप २१
भरत पुराप्रति गुरुनें आणविला वृत्त तें तया कळलें
गमलें बहु दुःख म्हणे सयश कैकेयि तुजमुळें मळलें २२
प्रयत-मना भरत करी जनकाची उत्तरक्रिया उचिता
मग जाय शरण रामा मळल्या स्वयशासि यावया शुचिता २३

---

१ प्रजा-अवन-उचित-तनय-प्रजारक्षणाविषयीं योग्यपुत्राला. २ अरण्य.
३ तपस्वीपणानें.

प्रभु त्या प्रिया ऽनुजाला सांत्वुनि सांगे गुरूक्तिचें अवन[1]
धर्म-त्याग न करितां पनही होईल वा मला अवन २४
भरत प्रभु-पद-पूता माथां मणि-हेम-पादुका वाहे
परते नंदिग्रामीं याचिपरि[2] त्यक्त भोग तो राहे २५
प्रभु निकट वास सोडी करुनि कृपा भेट अत्रिला दे हा
अनुसूया लावी श्री-सीतेच्या अंगराग वर देहा २६
प्रबळ-विराध धरि श्री-सीतेला याहि सानुजा अजिता
हा आधीं मारुनि त्या झाला मग देवतागुणें सजिता २७
प्रयत-तम-दंडक-वन- स्थित-शरभंगादि-मुनि-समाजाला
भेटे दयालु गति दे साधु परि न बहुमता रमा ज्याला २८
अतुळ प्रताप ज्याचा त्या घटज्यातें स्तवी जसा वंदी
रघुपति सदार सानुज विनयानें जगदघघ्नकथ[3] चंदी २९
प्रख्यात विष्णुशस्त्रें दे शक्र-स्थापितें तपोराशी
विनया वनता रामा गमनीं अर्पी पुन्हाहि तो आशी ३०
प्रणयी सखा पित्याचा जो गृध्र जटायु करि तया नमन
शमन त्रास-हर-यशा पंचवटीप्रतिहि तन्मतें गमन ३१
गोदावरी-प्रवाह श्रीच्या हृदयासि बंधुसा गमला
उटजीं पंचवटींत प्रभु साकेतीं जसा तसा रमला ३२
प्रमुदित करि हरि हृदया शूर्पणखा-घ्राणकर्ण कापवुनी
सुर जगती-सुर निववी सकळ-खर-वधें दशास्य तापवुनी ३३
प्रणति करिति उदयार्थी देवादि जिला दशास्य हरि तिला
कनकांग दाखवुनि हरि न विचारुनि पाप-कर्म-परिणतिला ३४
प्रभुला उटजांतून श्री मायामृग धरावया तोषें
सुर-कार्य-सिद्धि चिंतुनि दवडी मग देवरासही रोषें ३५

1 रक्षण. 2 रामापरि. 3 जगत्-अघ-घ्न-कथ-जगाचें पाप नाश करणारी कथा ज्याची असा.

प्रज्ञा-बळ-निधि वृद्धहि गृध्र जटायु सुषेमि रक्षाया
करि विरथ क्षत अरितें अहि ह्मणती देव गरुड दक्षा या ३६
प्रखराऽसिनें अधर्में पक्ष-च्छेदुनि पराजया करितें
पाहुनि जगती-कन्या हाय ह्मणे सांपडे पुन्हा अरिनें ३७
नेली प्रभु-प्रिया ती लंकेंत निरोधिली अशोकवनीं
श्री त्या वदली पर-गज-हरि-मत्पति-यश भरो पशो कवनीं ३८
प्रभु करि विलाप नाना- परि विषयासक्त नर नसा रमला
भ्रमला वनांत शोधित मूर्छित पाहुनि जटायुतें श्रमला ३९
श्रीचें दश-वदन-कृत प्रसभहरण[⁂] साश्रु गृध्र तो कळवी
करि तत्क्रिया सुततमा हरि आधीं गळ अश्रुनीं भिजवी ४०
प्रभु उद्धरी नशाही जो योजन-भुज कबंध धरि खाया
शबरीतें वर गति दे बदरें भक्षूनि साधु हरिखाया ४१
राम प्रफुल्ल-वारिज-वन शुक पिक बर्हि हंस पाहून
हाय प्रिया-वियोग व्याकुळ पंपा-तटींच राहून ४२
प्रभुला लक्ष्मण सांत्वी ने त्या भेटावयासि सुगळातें
मारुति भेटुनि पाहुनि परितृप्त करी स्व-नेत्र-युगळातें ४३
प्रक्षाळी रवि-नंदन रघु-पति-सख्याऽमृत-हृदीं काया
तों श्रीनें त्यजिलें नग दावी रामासि खेद टाकाया ४४
प्रमथी[+] राम श्री-स्त्री-हरित्या सुर-राज-नंदना अनया
दे प्लवग राज्य मित्रा स्व-कुळकर-सहस्र-रश्मिच्या तनया ४५
प्रभुची प्रिया दशास्यें नेली तीचा करावया शोध
कपि-सार्वभौम सुगळ प्रेषी सर्वत्र कपि-महायोध ४६
पुत्र प्रभंजनाचा परिसे राम-प्रिया-समाचार
श्रीरामाचा गति धरि पक्षिपतीच्याचि गतिसमा चार[1] ४७

१ दूत मारुती. + मथन करी, मारी. ⁂ बलात्कारानें हरण.

मैनाकाद्रि प्रकटे घ्याया विश्राम सागरीं वाटे
पाडी उर-प्रहारें विघ्नचि या प्लवग-सत्तमा वाटे ४९
प्रजव महाकपि सुरसा- वदनांत शिरे निघेहि सटकरि तें
तेज तयाचें समजे शक्रा कीं अरि-मदाग्नि गटकरितें ४९
तानप्रभृति सुखविले सुर जी छाया धरूनि आकर्षी
त्या सिंहिकेसि उदरग होउनि वधि हृष्ट होय नाकर्षी ५०
प्रचुर बळ विलंघुनि शत- योजन-जल-निधिस उतरला पारीं
लंकाधिदेवतेच्या हृदया गजवजवि कीं म्हणे तारीं ५१
प्रथम तनुतनु[2] कपि पुरीं धुंडाळी रावणालया पाहे
मग साधि अशोक-वनीं श्री पाहुनि शिंशिपानगीं राहे ५२
प्रहर निशेचा तिसरा त्यांत दशाननहि ये भया देहा
तन्वंगे तथापि दडे श्रीही झांकी गुणालया देहा ५३
प्रकट करी खळ पापा स्वाभिप्राया सतीहि ती पूता
रोषहि तोषहि होय प्राप्त सदागतितनूद्भवा[3] दूता ५४
प्रत्याख्यान दशास्य क्षोभे तो राक्षसीस हें सांगे
बोधा नच वळतां घा खाया हे गर्व दाविती कां गे ५५
प्रभुच्या-दयिता-हृदया देती मग ताप राक्षसी दुष्टा
त्यांवरि न होय होय स्वासूवरि ती क्षमासुता रुष्टा ५६
तों प्रणति करुनि कपि दे श्री-हृदय मुदित कराया मुद्रा
कळवुनि कुशळ म्हणे सति जगदीश वधील सत्वर क्षुद्रा ५७
प्रमुदित-हृदया देवी निज चूडामणि निरोप दे कपिला
द्रवली सदागति-सुतीं वत्सीं जसि वत्सला महाकपिला ५८
प्रध्वंसी उपवन बहु पर अक्ष-कुमार-सहित तो खपवी
करि घनरवा भयाकुळ बळ रगडुनि धरि अनंत तोरव पवी ५९

१ मार्गी. २ कृशशरीर. ३ वायुपुत्रामारुतीला.

पुत्र प्रभंजनाचा ब्रम्हास्त्री सांपडे रणीं कपटें
बांधी या घनरव मग गांठावा शीत अग्नि कां न पटें ६०
परम प्रवीण नेतां दशकंठाजवळ हिन तया बोधी
तत्रागलथैं शोभे साम नमानीं वधीं धरी नो धी ६१
शुद्ध-प्रज्ञ बिभीषण दूत नव्हे वध्य हें वदे वारी[1]
पुच्छ प्रदीप्त करवी दंडाया मग कुबुद्धि देवारी ६२
प्रबळ कपि सुटोनि उडे दावाया शत्रु-दुर्दशा शंका
गवताची राशि तसी लंका जाली बहु च्छळी वंका ६३
प्रलयीं तसाचि धडके एका न बिभीषणालया भक्षी
श्री प्रार्थी मित्रां ऽगज- लांगूला ऽयस्थ लोमही रक्षी ६४
येउनि वंदी प्रभुला दे चूडामणि कथूनि संदेश
यावरि गंभीरहि कथीं छळिला जैसा सपुत्र मंदेश[2] ६५
प्रमुदित होउनि रघुपति आलिंगन दे समीर तनयातें
भगवत्प्रसाद जो हा झाले पात्र न जगांत जन यातें ६६
प्रस्थान करी सानुज विजयार्थ प्लवग-लक्ष- कोटि-सह
प्रभुसह सुग्रीव निघे यात्रा दे प्रथम सागरा न मह ६७
प्रणत-बिभीषण-हृदया सुखवि म्हणे हाचि काळ वर देश
दे राज्य सागर-जळें- करवुनि अभिषेक राम वरदेश ६८
राम प्रभूत कपि-बळ आणुनि विजयार्थ सागराजवळ
आला हें अरि परिसे परिसेचि न साम मृत्युचा कवळ ६९
प्रभुची प्रिया मुहूर्त क्षणदाचर शोक-सागरीं बुडवी
मरमा शिर धनु कृत्रिम ऐसें सांगोनि तद्भ्रमा उडवी ७०
प्रभुला भेटे अस्त्रें पावोनि भयासि सागर प्रार्थी
सेतु करवि नळहस्तें श्रीराम नकेचि केवळ स्वार्थी ७१

---

1 निवारी. 2 गंभीरहि.

प्रचुर कटक सेतु-पथें पावे पारास याम चोवीस
लागति कपि म्हणति कथे तूंचि सुधेहूनि अधिक होवीस ७२
प्रथमचि सुकंठ पाहे दुर्गी त्या निर्भया महादर्पा
उडुनि मुकुट उडवि मथी गरुड जसा विषमदोद्धत्ता सर्पा ७३
प्रभुनें साम कराया पाठविला वालि-पुत्र अंगद हो
वदला देंवी दे प्रभु सुख-संगद हो तुला न भंगद हो ७४
प्रमथूं पाहे रावण यातें तों हाचि वीरमणि धरिते
राक्षस रगडूनि निघे झाले विभ दशमुखादि जे अरि ते ७५
समर प्रवर्तवी दश- मुख जाया अंतकाननीं सकुळ
तो गमला प्रेक्षक-सुर- मुनि-नयन-मधुप-मधु-प्रपा-बकुळ ७६
मेला प्रहस्त पहिल्या युद्धीं दशमुख पराजया पावे
मुनि वदले प्लवग प्रभु- शरसे तेजस्विवर्य हे गावे ७७
प्रत्यह पराजयातें पावे दशकंठ सुगळ-बळ गाजे
डाजे घननाद-मनीं तो शत्रूत्कर्ष नित्य जो माजे ७८
प्रभुस समौमित्रिस तो मायावी शत्रु नागपाशानीं
बांधी मुनिनीं हा हा जप केला राम-जय- निराशानीं ७९
प्रम्लान सुकंठादिक कपि-सेना कांपली जसी कदली
मृदुहृदया श्री ती गति दाखवितां हंत हा असें वदली ८०
प्रकटे सेवासमया समजुनियां गरुड सर्प ते पळवी
तूं वत्सल कोण म्हणे प्रभु तो पहिला सखा असें कळवी ८१
प्रमुदित सर्वहि झाले करिति पुन्हां राक्षस-क्षयारंभा
जागविला घटकर्ण प्रेक्षूं ये सोडुनि क्षेया रंभा ८२
तो प्रबळ यातुधान प्लवग-चमूतें रणीं करी भग्न
कपि-पतिस धरुनि परते केले चिंतेंत सर्वही मग्न ८३

---

१ रहा. ≠ तेजरहित. + हाय. ≠ होऊ.

सुटला प्रताप-शाली कश्मळ सरतांचि तो महाप्राण
यातुर्महावीराचे छेदी कृतवेग कर्ण सघ्राण ८४
प्रकुपित होउनि परते माराया यूथपांसि तो लागे
सगळेचि गिळी देवी काळासीं म्हणति यासि तोळागे ८५
प्रभु तद्भुज चरण-[१]शिरें कायापासूनि वेगळीं पाडी
जो निजबळासि अयरवळ खळरयळ रुधिरोघ वाहवी ताडी ८६
प्रबळ-तराऽनुज-शोका- कुळ-हृदया रावणासि दे धीर
घननाद शिरे गगनीं बाणाहीं सर्वही खिळी वीर ८७
प्रभुसह सर्वहि खिळिले मूर्छित माया- बळें रणीं केले
सुर मुनि हा हा वदले गमले गजादि सर्वथा मेले ८८
पुत्र प्रजापतीचा सदुपायातें कथी मनावरि घे
मरुदंगज ताराया शैरिहि जलधींत कां न नव रिघे ८९
क्षिप्र उडे कैलासा- पासीं [२]औषधि-शिलोच्चया पावे
त्याचें शिखरचि आणी [३]यांचे जगदीश- भुज नसे गावे ९०
घातें क्षुरप्र काया- सधुनि निघाले नराहिले व्रण तें
सामर्थ्य औषधींचें गणिलें अमृतें महागुरुप्रणतें ९१
उठले प्रबळ सकळही जाळाया शत्रु-बळ-वना वणवे
क्षण वेचला न तों ये मरुदंगज [+]ज्या न कपि असें म्हणवे ९२
विभ्रम झाला रावण पाहुनि रक्षःक्षया सचिव भेले
अंगज घटकर्णाचें जे यांचे ते यम- क्षया गेले ९३
मेघध्वनि प्रतापी पुनरपि देऊनि धैर्य तातातें
करिता झाला खड्गें मायासीतोत्तमांगपातातें ९४
प्रभुलाहि हा म्हणाया लावी भ्रमवी समस्त- सैन्यातें
सौमित्रि सुगळ मारुति रडले युद्धीं धरूनि दैन्यातें ९५

---

१ दुष्ट. २ औषधिपर्वता. ३ मारुतीचें ४ ध्यालें. ** राक्षसंम हावीराचे. + ज्या मारुतीला.

शोक-प्रसर हराया लागे सुज्ञा बिभीषणा न पळ
मग लक्ष्मणें निवटिला यजितां विजयद-रथार्थ तो चपळ ९६
प्रखरासि धरी रावण सीता मारावया महाखळ हा
सचिवें निवारिला मग बहु बळ बुडवी स्वयें करी कलहा ९७
प्रमथुनि बहु-बळ लक्ष्मण भेदुनि हृदयासि पाडिला अग्निं
आणुनि नेंचि अगशिखर सुख-सुप्त तसाचि उठविला हरिनें ९८
प्रभु शक्र-रथीं बैसे सप्त अहोरात्र रण करी भारी
यातुवरा दशकंठा मत्तगजा जेविं हरि तसा मारी ९९
प्रमुदित सुर मुनि झाले विजया गाऊनि नाचल्या देवी
गर्जति दिव्यें वाद्यें पुष्पांची वृष्टि रघुवरा सेवी १००
प्रभु देववी दशमुखा विधिनें तोयादि मग पदीं स्थापी
भक्ता बिभीषणातें या सुयशा विश्व धरुनि आस्था पी १०१
प्रत्यय दहनीं शिरुनी श्री दे आत्मप्रियासि शुचितेचा
स्तविती सुर जगदीश स्वीकार करी द्रवोनि उचितेचा १०२
अहित-प्रमथित कपिबळ उठवी भगवत्प्रियार्थ देवेश
त्या ससुगळा बिभीषण पूजी मणिभूषणादि दे वेश १०३
प्रभु पुष्पक-नाम-नभो यानीं कपि राक्षसेंद्र घेऊन
भरतादि सर्व निववी गगन-पथें निजपुरासि येऊन १०४
निववी प्रजा समस्ता राजा होऊनि कीश-यातु-पती
पूजी जगदीश शमवि ज्याच्या शोकाग्नि मानसीं धुपती १०५
तनुज प्रभंजनाचा बहु गौरविला दया-सुधा-निधिनें
विधिनें सु-तुरग-मेध- क्रतु केले सर्व गायिले विधिनें १०६
प्रस्तर तरले जल-निधि तोयावरि जेविं वाळलीं पर्णें
तो जगदीश न तारिल यश गातां काय सेवितां कर्णें १०७
विप्र-प्रियार्थ वधिला शत्रुघ्नें लवण गज जसा हरिनें[1]

[1] सिंहानें.

भरतें गंधर्व जसे गरुडें अहि वर्णिला विजय हरिनें १०८
प्रवरगुण कुशलवादि क्षिति रक्षायासि ठेविले आठ
पांठ निगम ज्यांला ते सदरींची नित्य पुरविती पाठ १०९
प्रभुनें दिव्य-तनु करुनि पुष्करयानांत सर्व वसवीले.
नागर कपि पशु पक्षी उत्तमलोकांत मुदित बसवीले ११०
प्रयागरामायण हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें १११

समाप्त.

# पंचशतीरामायण.

## साकीछंद.

गातां राम-चरित्रास स्मेरमुख-धरिति अरि श्रास. धृ.
श्री-रवि-कुळ-मणि दशरथ राजा शतमख-सख शूरवर
ज्याचें अरि-कुळ-सह दुरित पिटित यश गेलें दूरवर १
अनपत्य-नृपासि म्हणे चिंता-ज्वर उतला भाजीन
परि पात्र होय गुरु-मख-सुकृतें तो सुतलाभा जीनें २
प्रभुसि विनवि विधि हो खळ-दशमुख-नाशास नरसमान
अमृताधिक पावेलचि खळ-जननाला शासन-रस मान ३
अंशें झाले कपि ऋक्ष सुर ज्वलनादि हरि-सहाय
म्हणावया त्या अति-मद-मत्ता सर्व-जगदरिस हाय ४
भक्त-सुरद्रुम जगदवनव्रत जो वरद उदारांतें
मूर्ति-चतुष्टय धरि नरपतिच्या धन्य करि सुदारांतें ५
कौसल्या-सुत राम सु-गुण-निधि कैकेयी-सुत भरत

१ व्योमयानांत. २ कामप्रमुख. ३ वृद्ध. ४ दुष्टजनांचासमुदाय.
+ सुरवेष्टत.

लक्ष्मण शत्रुघ्न सुमित्रासुत सर्वहि सदय शुभरत ६
वाढति मूर्त महोत्सव बरवे सु-गुण-गणांसह अवघे
चवघे सुत आलिंगुनि दशरथ निरुपम सुख नवनव घे ७
निववि ति सुजन-चकोरांच्या ते राकोडुप[1] नयनांतें
अर्थी सुखवउनि रघुराज[2] करी त्यांच्या उपनयनांतें ८
होय वसिष्ठ जगद्गुरु-गुरु कीं सद्विद्या दे त्यांतें
शिष्य करूनि प्रणतां सर्वां सद्विद्या देत्यांतें ९
गाधिज ये पूजुनि त्यासि म्हणे दशरथ नृप बा ज्ञात्या
ज्या[3] कार्यें तव येणें करिनचि मी करितां आज्ञा त्या १०
मुनि सांगे क्रव्यामिष भक्षुनि सेवुनि मद्या गाते
दशमुख-यश जे तदनुग पीडिति येउनि मद्यागा ते ११
राम सलक्ष्मण मख रक्षाया मज देदि महाबाहो
वेचुनि तप अपराधी दंडुनि ऋषि रिक्त न हा बा हो १२
नृप वचके नच केवळ लोभी परि भी सुत-विरहानें
गुरु-वचनें दे म्हणवि न भेटुनि जें नत्सरव चिर हातें १३
मार्गीं क्षुधा तृषा सुकुमारा तिळमात्र न बाधाया
दोन बलाऽतिबला विद्या दे सानुज-देवा धाया १४
वधवि नाटका शत दिव्यास्त्रें दे सु-तपो-राशि कवी
अतुळा विद्या न निजा सोडुनि गुरु सुतपोरा[4] शिकवी १५
ज्याचे चरण भवीं सुज्ञानीं जाया आधि जपावे
त्या प्रभुसह निज सिद्धाश्रमपद भगवान् गाधिज पावे १६
यज्ञायतन-द्वारीं ठाके प्रभु करवि प्रारंभा
तों ये यातु-चमू मोहाया जसि वर-विप्रा रंभा १७
प्रबळ सुबाहु वधुनि तद्राक्षस- कटकानें प्रभु बुडवी

१ राका-उडुप-पूर्णिमेचा चंद्र. २ दशरथ. ३ त्या कार्या. ४ सु-तप-उर-
उत्तम तपश्चर्या जी तेंच हृदय ज्याचें असा. + मत्-यागा.

तेव्हां पत्रिपवन शतगावें मारीचातें उडवी १८
तरि न ताटका-सुत तो मेला उडुनि समुद्रीं पडला
झाला तापस रघु-वर-खर-शर-संत्रास मनीं जडला १९
म्हणति श्रीस्तुत्याशीस सगुरु- मुनि-वर-विप्र भुला जे
गुरुजनसमक्ष पूजा नवरी जरि वरथि प्रभु लाजे. २०
तों मुनितें यावें यज्ञातें जनक असें आमंत्री
त्र्यंबक-दर्शन-कुतुकि-प्रभुतें प्रेमें ने हा मंत्री २१
प्रभु करि रजें अहल्या-वपुतें ध्यानें धोत मनातें
प्रभुसीं पिता श्वशुर हें लाविति साधी गोतम नातें २२
जनक निववि आलिंगुनि मुनितें तीर्थें न वपु निवे नें
न नृप श्रीमूर्तितें चकोरचि पाहे नव-पुनिवेतें २३
गाधिज-वचनें दशरथ-सुत हें जनकनृपा यां समजे
स्व-समाधि-सम-सुखें ब्रम्ह असें त्यांसहि कवि यासम जे २४
स्व-मखावन-सत्युद्धरणचरित मुनिनें जनका कथिलें
या पावुनि इतर बळें तेसीं जैसीं कनका कथिलें २५
त्र्यंबक-चाप-विलोकन-कामहि रघुपतिचा जाणविला
बहुशत भट आज्ञापुनि तो त्या नरनाथें आणविला २६
सीता प्रभुसि विलोकुनि वदली तात जनक थोर पण
घोरपण प्रकटुनि कळवितसे परम स्व-कठोरपण २७
प्रभु नमुनि गुरुसि शिव-धनुसि तया मज्य करी आकर्षी
मोडी थोडी शक्ति प्रकटुनि एक नभी नाकर्षी २८
वंदुनि हृदयीं श्रीसांबातें मुदिना सीता बाळा
वाळाया पर-वदनें घाली प्रभुच्या कंठीं माळा २९
कौशिक-वचनें जनकें दशरथ स-गुरु-सुत आणविला

---
१ बाणवायु. २ सांगितलें. ३ धातु कथिल.

स्व-विचार निघांसि तिघी कन्या द्याव्या हा जाणविला ३०
श्री सीता रामासि वरी तीं मांडव्याख्या भरता
दे ति ऊर्मिळा श्रुतकीर्त्यो व्हा सुमति-यमांतें श्रेता[2] ३१
वर्षे नृप पौर-बळावरिहि स्वबर-मणि-कनकांहीं
हर्षे रघुप वदे नातें बहु वांछा अणिक न कांहीं ३२
दासी दास तुरग रथ हस्ती वस्त्रें रत्नें कनकें
विपुळ दिलें प्रिय जामात्यांतें परम-यशान्वें जनकें ३३
प्रथमचि कन्या-दान-सुनिश्चय करवुनि कौशिक गेला
जनकहि सानुज राम प्रभुही विरहें व्याकुळ केला ३४
घेउनि सकळ स-कळत्र-सुत नृप जनकाज्ञेनें परते
परतेजा भार्गव भेटे त्या गमले नभ्रहि परते ३५
विधि-जन्मद-तन्मद हरि पावे साकेतातें हर्षे
प्रभुच्या सुयशें सुजन निवविले जैसे बर्हि[4] वर्षे[5] ३६
निज-नगरासि युधाजित् मातुळ ने सानुज-भरतातें
निश्चय केला स्थापायाचा रामीं भू-भर तातें ३७
देव म्हणति दशवदन वधावा प्रभु[6] या कार्या नर हा
नृप-दयिता कैकेयीच म्हणो यों ती आर्या न रहा ३८
ब्रम्हादि अमर अशा विचारें मंथरिका मति हरिती
करि ती कैकेयी-धी-भेदा लोभा झाली धरिती ३९
वर-युग देऊं केलें होतें ती अडवुनि तें मागे
सत्य-व्रत-रत-मति-पतिस तिचें वाक्य करावें लागे ४०
अभिषेकोत्सव-समयींच रुसे नृप साम वदे विनवी
यश नमकिव कळिव प्रिय दाखिव रीति मज न देवि नवी
ती बोले हे दोन वर प्रिय घे हें हर्षेच वदा

---

१ लक्ष्मण आणि शत्रुघ्नातें. २ श्रेष्ठता. ३ शत्रु. ४ मोर. ५ पर्जन्यवृष्टीनें. ६ रामा.

भरत असो युवराज राम वन-वासी वर्षें चवदा ४२
भूप म्हणे सर्वस्वहि दयिते घे प्रेमा आटीव
या वृद्धीं करुनि कृपा न वनीं रामातें पाठीव ४३
नकळे कैकेयी सुत-शोकें पतिचें मन घाबरवी
प्रभु वन-वास वरी दे कीर्ति स्वपित्या अनघा बरवी ४४
गुरु-सत्य-व्रत संरक्षाया लक्ष्मण-सीता-सहित
प्रभु पितृपद नमुनि निघे घ्याया साधुनि भीतास हित ४५
बळकट-सुत-शोक-व्याघ्र धरी नृप-हरिणाचें नरडें
आलें फार अयोध्येला परि कैकेयीला न रडें ४६
प्रभुसि सुमंत्र सचिव राज-रथीं राजाज्ञेनें वाहे
साहे पुरजन न क्षण विरह प्रभुतें वेढुनि राहे ४७
क्षुधित-तृषित-निद्रित-पौरांतें सदयहि ठकवुनि सोडी
गोडी प्रभुकृत वंचन दावी बहु अमृत निपट थोडी ४८
भेटे प्रभु भक्त सखा जो त्या स्व-विरह-भीत-गुहातें
घाटे अमृत चकोरा भरवी प्रेमें शीतगु हातें ४९
वट-दुग्धें रचुनि जटा होय प्रभु सानुज तापसमा
वल्क-जटा-धर मूर्ति ध्यातां हरि तद्भवतापससा ५०
गुरु-सचिवासि गुरुकडे जा हें कथि बहु मानव-रीती
प्रभु दावी जी साधु-सभेंत स्तुति बहुमान वरी ती ५१
ज्याची कीर्ति सु-दुस्तर-भव-जल-निधि-पतितांची सेतरी
त्यासि सखा गुह निज-नौकेनें गंगापारीं उतरी ५२
वंदी प्रभु प्रयागीं प्रेमें तात-सख-भरद्वाजा
त्या मुनि सुखधी वेद कवि म्हणति नित्य सुखभर द्वाज्या
श्रीस उतरिती यमुनेंत प्रभु काष्ठमय करिति तापा

१ चंद्र. २ नृपाकडे. ३ उत्तमनौका. ४ द्वार. ५ नदींत तरण्या
स्तव काष्ठमय केलेलें साधन ताफा, नौका, इत्यादि.

जे नेती भवसागरपारीं नामेंचि हरिति तापा ५४
करिति चित्रकूटस्थ-मुनींसीं प्रभु सहवास वनाचे
गुण घेती पावुनि ऋषिगणसा बहुमह[1] वासव नाचे ५५
तें प्रभुवृत्त गुह-पुरुष-कथित श्रवण करि सचिव देहें
थिकलें परते स्वपतिस न्हाया मुदित अरिसचि वदे हें ५६
सुत-शोकें मरण असा कळवुनि कौसल्येतें शाप
राम राम म्हणतचि असु सोडी जोडी सुगति क्ष्मोप[2] ५७
तैलीं स्थापुनि नृप-वपु गुरुनें त्वरित भरत आणविला
मातेनें येतांचि नया तो स्व-कृताऽनय जाणविला ५८
कैकेयीतें भरत परम-गुरु-विरहाकुळ-तनु गांजी
गुरु-घात करुनि शोकीं बुडवी दुष्प्रज्ञा भजुगां जी ५९
त्या मंथरेसि मारित होता शत्रुघ्न क्रोधानें
भरत निवारी त्यातें प्रभु-मत-सु-यशस्कर-बोधानें ६०
करुनि पित्याचें उत्तरकार्य प्रभुसि पुरा आणाया
भरत निघे स-स्वजन म्हणे मी नत घालिन आणा या[3] ६१
धरि गंगचा घांट होय गुह सिद्ध कराया युद्ध
मग तो प्रभुचा भक्त सरया दे वाट वाटतां शुद्ध ६२
सिद्धि-वळें सबळा सत्कारी भरद्वाज कैसा या
तुमजुनि सोडिल मुनि दावी त्या सिंहासन बैसाया ६३
भद्रासन वंदुनि तत्पार्श्वीं भरत कृतांजलि राहे
पाहे साश्रु मुनि शिरीं त्याच्या आशी-रत्नें वाहे ६४
मुनि आज्ञा दे नमुनि तयातें प्रभुतें भेटे भरत
न रत वनांत म्हणे तापससा साकेतां ये परत ६५
भरत-कथित ताताची वार्ता सीता-लक्ष्मण-सहिता

---

१ मोठाउत्साह. २ पृथ्वीपतिदशरथ. ३ रामा.

प्रभुला हा वदवी प्रकट करी गुरु-वत्सळता महिता ६६
ब्रम्ह स्वीकारी पुत्रत्व प्रेमें दे पिंड पित्या
क्षाळी नयन-जळें तत्कर्मा संसारीं हिंडवित्या ६७
हठ करितां प्रभु बोधी भरता भक्ता परमा ज्ञात्या
म्यां त्यांही जो गुरु यश द्यावें वंदुनि चरमाज्ञा त्या ६८
भरत वदे चरमांती दर्शन सर दे हा हो मीन
चुकतां दिनहि दहनकुंडीं मी नरदेहा हांमीन ६९
श्री-चरणानुग्रहीता द्याव्या या पादुका नयातें
धर्मातें पाहुत रक्षत जें बापा दुकान यातें ७०
देउनि अभय पादुका सांत्वुनि भरत पुरा पाठविला
पाठ विलाप जया तो प्रभुनें प्रेमळ बहु आठविला ७१
नंदिग्रामीं वल्क-जटा-धर फळ-शाकाशी राहे
श्री पादुका पदीं स्थापुनि तें राज्य नयांवरि वाहे ७२
बसतां निकट पुन्हा स्वजनागम ऐसें चिंतुनि चित्तीं
भेटे प्रभु अत्रिस जो स्वजनीं जैसा लोभी वित्तीं ७३
अनुसूयोक्ति सुधेचा सर्वहि हरि गर्व स्वादु-हिता
श्री केली पात्र तपःसुकृता जसि सर्वस्वा दुहिता ७४
ऋषि-वृंदासि म्हणे प्रभु निर्भय वधुनि विराधा राहें
आधार प्रभु-यश होय जना परम-निराधारा हें ७५
प्रभुसि समर्चुनि शरभंग मुनि ज्वलनीं वपु करि मेंदी[3]
बसुनि विमानीं वरि सुगतिस हें प्रभु-यश कवि-शान नदी[1] ७६
निववुनि सुतीक्ष्णादि मुनि निज- नुति-सुरधि नवि प्रभु लावी
म्हणति त्यजुनि प्रभुयश अमृता जीभ न विप्र भुलावी ७७
यत्तत्व कथाया पुरति असे योजति न रद पुराणा

---

१ सरोवर. २ कन्या. ३ तृप

शास्वें देवुनि हर्षविला तो घटजें नरवपु राणा ७८
दशरथ-सख गृध्रेंद्र प्रभुला भेटे कळवी नातें[1]
प्रभुच्या गुरु-विरहज-तापातें मग कां पळवीना तें ७९
गोदावरी-तटीं पंचवटी तेथें वस वत्सा जें
प्रिय तें कृळिव करिन सु-सर-स्थित-नव-सारसवत् साजें ८०
प्रभु त्यासि म्हणे धर्में आम्हीं सुत हे बापा सून
हूं राजा दंडकगहनाचा रक्षीं[2] यापोसून ८१
प्रभुसि जटायु म्हणे स्वस्थ रहा जय जोडुनि जा[3] गेहा
न बन तात-गृह हें निद्रेतें जळ सोडुनि जागे हा ८२
नमुनि पुसुनि ते त्या ताताला प्रेमाऽमृत-कलशाला[4]
जाउनि पंचवटींत रहाती रचुनि रुचिर दलशाला ८३
काहीं काल सुखानें क्रमिला तों शूर्पणखा आली
झाली कामार्ता प्रभु-रूपें दुर्मति तीच न धाली ८४
ज्याचें तत्व असुगम युक्ति शत जरि कवि लाख विवरिती
त्या भुलवाया कपटें सुंदर- पण बहु दाखवि वरि ती ८५
कपट-प्रेमवती बरवीहि प्रभुसि नको विदरी ती
हंस साररुचि नसतां गाते वरिलि न कोविद-रीती ८६
ती प्रार्थी न वरी स्त्री पहिली बहु बरवी मीं दुसरी
रमवि न गमवि न धन्य वरा मज जाणे सु-कळा-कुसरी ८७
प्रभुवर म्हणे मदनुजासि तूं वरीं पुरुष सुंदरि तें
या सुर-तरु-कुसुमें पाडावें पुरुषांतर कुंद रितें ८८
प्रभुवचनें ती प्रभुसि तसेंचि प्रार्थी कामांधा त्या
त्यजुनि सुधागुळि[6] सुरुचि सुरांगुळि देइल कां मांधात्या[5] ८९
लक्ष्मण म्हणे स्वामिनी हो जा पावें मुदतिशयातें

१ नातें. २ आजपासून. ३ मी गृध्रराज. ४ पर्णशाला. ५ नामविशेष राजा त्याला. ६ सुन्- अतिशय- आनंदाच्या अतिशयातें. के अमृतरूप अंगुली

पडतां गळां प्रभु स्वीकारिल तुझिया सुद्दति शाथानें ९०
केला बोध वरुनि गुरुसि सुख यश वाढिव हा तेणें
उच्चैःश्रव्याप्रति पुन्हा गेली ती गाढिव होतेणें ९१
समजे न विनोद प्रभु-हरितें विनधि जडा कुतरी ती
हास्यें श्रीतें लंघूं पाहे जसि गंगेतें कुतरी ९२
आर्याज्ञेनें धरिलि लक्ष्मणें हंसें जैसी काकी
खड्गें कर्ण घ्राण खंडितां हर्षति भीतिहि नाकी ९३
शुक-नासा हीन म्हणे रुचिरा जी हरिची हीन कटी
गुर्वपराधें स्वसा होय हरि- च्या अरिची ही नकटी ९४
जाय दटावुनि रडत राक्षसी तद्बंधु खर क्षोभे
स-मनु-सहस्र-बळा त्या वधुनि प्रभु पुरहरसा शोभे ९५
कुमति जनस्थानातें बुडवुनि बुडवाया लंकेला
भेटुनि मुख दशवदना दावी ती न धरुनि दांकेला ९६
सांगे पंचवटींत निरखिलें अतुळ नर-स्त्री-रत्न
तें घ्याया साधुनि तुज भोक्त्या म्या केला बहु यत्न ९७
तद्भर्त्यानें केल्यें तव भय न धरूनि विनासा हे
मानी पळही अपमानातें नच मृत्युविना साहे ९८
खवळुनि दशमुख करुनि कनक-मृग दभ्रमहा मारीच्या
जाय पडाया वदनीं दाटुनि सभ्रम हा मारीच्या ९९
कपट-हरिण जाय पुढें मागें पाप चाप-धर राहे
स्वाश्रमपदीं तयातें फिरतां सीता सहसा पाहे १००
प्रभुसि म्हणे नाहींच कनकमय मृग लोकांत असा या
घ्यावाचि धरुनि मज हा उचित स्वसदोकांत असाया १०१
प्रभु उटजीं बंधुसि ठेवुनि घे शार कोदंड करानीं

---

१ हातातें. २ कामाच्या इच्छेनें. ३ वाइटनौका. ४ सिंहाची. ५ महा मारीच्या. ६ स्व-सत्-ओक- आपल्याउत्तमगृहीं.

जाय मृगामागें रुद्राचा धरि तो दंडक रानीं १०२
भिउनि कपट-मृग करुनि पवनसम जव नव नीच पळाला
प्रभु शार सोडी लागे तो अति- जवन वनीं चपळाला १०३
हा सीते हा लक्ष्मण ऐसें मोटयानें आरडला
खळहि धन्य कीं आइ बा म्हणुनि तो न करुनि आ रडला १०४
अत्यार्त-प्रभु-कृत शब्द असें मानुनि झाली भीता
बा सौमित्रे धांव प्रभुला पाव म्हणे श्रीसीता १०५
लक्ष्मण विनवी आर्ये स्वस्थ प्रभु आहे हे माया
बेगड पर-शक्ति न जिंकिल त्या हरिणाची हे माया १०६
क्रोधें बोले सीता माझा अभिलाष मनीं धरिसी
प्राण-व्यसनीं तरिच उपेक्षा मन्नाथाची करिसी १०७
विंगळ मणि म्हण सर्वांहि विटिव संता पाप्या वेंच
म्या विष अयशें न भजाया चिर संतापा प्यावेंच १०८
तापें चिघरे मन निघरे या न गृहांत असें जोंची
व्यसनीं तत्काळ पडाया ती भक्तासि असें जोंची १०९
आर्येतें नमुनि निघे लक्ष्मण हाय म्हणत शोकानें
तों श्रीनें हरि हरिच्या सभयें आयकिला जो कानें ११०
हा रघुवर हा लक्ष्मण ऐसी हाक तिची परिसून
पावे श्वशुर जटायु तयातें ती अंजळि करि सून १११
दे अभय विरथ करि अरिस तिला रोधूनि नभा जीन
सोडवि म्हणे अरे अंडीं कां शोधूनि न भाजीन ११२
खडें पक्ष छेदुनि पाडुनि संमूर्छित खग-पतितें
स्कंधीं वाहुनि नेली देवी दशकंठें मग पतितें ११३
ऋष्यमूक-गिरिवरि पाहुनि कपि पांच तयांतचि नेग ती

---

१ वेग. २ राहें. ३ पीडी. ४ वृद्धजटायु. ५ अलंकार. + गमन कर.

जगतीजा सोडी कीं प्रभुला आपुलि मोहिल न गती ११४
खळ शत-योजन सिंधु विलंघुनि लंकेतें तो पावे
श्रीस अशोकवनीं रोधी ज्या कर्में यति कोपावे ११५
फिरतां गहनीं लक्ष्मण वंदी साश्रु तया आर्यातें
कळवी वल्ली पद-लीना जें सजुनि दया आर्या तें ११६
प्रभु परिसुनि तें स्त्रैणतसाचि व्याकुळ होय वदे हा
उटजीं दयितेसि नसा पाहे आपुलियाहि न देहा ११७
सांजलि साश्रु पुसे अमकृत-प्रभु देखिलि गोदावरि ती
तुज भेटुनि दिवसांत दहादां जी बहुमोदा वरिती ११८
वत्सा त्वांहि पुसावें पुनरपि विनवुनि तुळसी लवती
जी सुमति तुला देखिलि काय सु-गात्री कुल-शील-वती ११९
कनक-मृग न तो राक्षस वधिला म्हणुनि देवि न रुसा हो
मरुसा हो जलधि म्हणा नंदन- विरह कल्पतरु साहो १२०
वत्सा वनवासींहि मला जी नित्य नवा उत्सव दे
न रुसावीच जनकजा चुकतां दासहि गत-कुत्स वदे १२१
हिंस्त्रें वधिली तरि रुधिराचा एकहि न दिसे बिंदु
इंदुमुखी नेलीच पलाशें त्या जग शापू निंदु १२२
प्रभु धरि विषयि-जन-विडंबन जें त्यास्तव नव-सोंगातें
कवि म्हणति वसों वैकुंठीं भव- चक्रीं न वसों गातें १२३
जाती-मल्ली-धात्रीस पुसे आम्रा पनसा बकुळा
नकुळा सर्पा खग मृग यांच्या मग पुसेल कां न कुळा १२४
वा सीता सांग पुसे ऐसें अंजलि करित नगातें
गातां शोक न [illegible]तें तरि कवि-कुळ हें चरित न गातें १२५
सानुज गह[illegible] कुरूत फिरतां प्रभु तात-सखा पाहे

१ अरण्यांत २ सी[illegible] -अपह[illegible] [illegible] ३ सा ४ घातकें. ५ मांसभक्षकें राक्षसें.

साहे न सुनेच्या हरणा जो सासु कथाया राहे १२६
उद्कें पवनें सावध करुनि प्रभु त्यासि पुसे बा हें
झाली दशा असी कां सांग त्वत्पुत्रचि हीं आहे १२७
सांगे वत्सा रावण गेला सीतेतें घेवून
सोडी प्राण प्रभुच्या अंकीं स्पर्शे सुख सेवून १२८
त्याचें उत्तरकार्य करि प्रभु साश्रु तिळोदक ओपी
तो पी दशरथसा मुक्ति तया यश गात्या ही सोपी १२९
योजन-बाहु कबंध धरी त्या वधुनि तयाच्या पापा
शापा वारुनि बसवि विमानीं प्रभु निववी भव-तापा १३०
तो दनुनामा सांगे शबरी- प्रोक्त-पथें जा आर्या
सुग्रीवातें भेट सखा हो तो करिल तुझ्या कार्या १३१
प्रभुतें पाहुनि मतंग-मुनिची सच्छिष्या ती शबरी
पूजुनि होमी वपु तीतें दे गति तो जगदीश बरी १३२
शबरी-कथित-पथें जाय प्रभु पावे पंपासरसी
कामासि म्हणे न क्षय मागें देउनि कंपा सरसी १३३
कुसुम-शर म्हणति धन्य नपावति जे कवि दयिता-विरहा
चिर हो रघु-कुल-जा मज हि म्हणवि काम नव्हेचि रुचिर हा १३४
त्वत्प्रिय सन्मुनि- शिष्य दाशरथि सति म्हणता पथिस रहा
दयिते नपडों देचि कुसुम-शर- भव पण ताप विसर हा १३५
तुजहुनि मज मजहुनि तुज अधिकचि ताप नवनवा सीते
रक्षिति तप मज तुजहि न देती शाप न वनवासी ते १३६
हा हा राक्षस-वृक तो गेला घेउनि तुज एणीतें
त्वन्मृदुपण नवनीतींहि नसे सखि केवें मेषीं तें १३७
सीते तुज विरहाऽनल कीं तो क्रव्यादचि [illegible]ात

१ श्रीराम. २ पंपासरोवर. ३ हाय. ४ यज्वा. ५ अ[illegible]नीं. ६ मृदु पण.

रक्षील प्राण न हा राघव जरि न तुला लक्षील १३८
सौमित्रि म्हणे आर्या आर्या व्रत-वज्र-कवच वाहे
पापा त्या पाताळगताही तव शर वधितिल बा हे १३९
धैर्य धरुनि भेटावें आधीं सुग्रीवा आर्यानें
सख्य करावें पावविलचि तो सिद्धिस या कार्यातें १४०
तेथुनि ऋष्यमूक-पथ धरुनि प्रभु सानुज जों चाले
देहीं भुज-नेत्र-स्फुरण वनीं शुभ शकुनहि बहु झाले १४१
तापस शस्त्री दूरुनि पाहुनि भी सुगळ मनीं मानी
वाळीनें पाठविले बहुधा करवाया निज-हानी १४२
शोध कराया वात-सुतातें धाडी द्विजसा तो या
भेटे पाहोनि निवे सहसा बहु तृषित जसा तोया १४३
पुसतां लक्ष्मण आर्याज्ञेनें वृत्त कथी ऋजु-भावें
जातों सुगळा शरण म्हणाया व्यसनीं आम्हां पावें १४४
सूक्ति-श्रवणें मारुति हर्षे दोघे पृष्ठीं वाहे
अचळीं भेटवि सुगळा यश हित अन्योन्याचें पाहे १४५
पावक-साक्षिक सख्य करुनि तो दावी ते नग यातें
ज्याची कीर्ति सुकृत दे दीना न सुरनदी न गया तें १४६
राम म्हणे नग मद्दयितेचे हें कीं काय पहावे
वत्सा श्रुत्यर्थ तसे निरुपम तव हृदयांत रहावे १४७
लक्ष्मण म्हणे नजाणे अन्या दृष्टि अळंकारा हे
नमितां पळ या नूपुर-तीर्थी धूत कळंका राहे १४८
प्रभु हृदयीं धरुनि प्रक्षाळी नयन-जळें नग गमले
श्रमले सरव वियोगें समसुख दुःखालिंगित शमले १४९
सुगळ म्हणे वाल्यपहृतदार प्लवगहि मी बा न रडें

१ राम. २ सीता. ३ पक्षिसा. ४ सुग्रीव. ५ अलंकार. ६ रामातें.
७ वालि-अपहृत-दार- वालीनें हरिली स्त्री ज्याची असा.

जरि धरिलें प्रबळाधि-व्याघ्रें दृढ चावाया नरडें १५०
व्यसनीं कठिन असावें सखया हा म्हणणें कुत्सा हें
तुज सीता भेटवितों तूं हो युक्त निजें उत्साहें १५१
प्रभु त्यासि पुसे भ्रात्यासीं हें अति वैर कसें घडलें
सांग सविस्तर कोणापासुनि अंतर कैसें पडलें १५२
सुगळ कथी मायावीनामक असुर रणातें वाहे
धांवे वाळी त्यावरि अरिवें पळहि न गर्जित साहे १५३
झालों सहाय बंधुस मी कीं काळा अरि हो घांस
पाताळ-बिळीं पळुनि शिरे जड भी आम्हां दोघांस १५४
द्वारीं स्थापुनि मजला वाळी जाय बिळीं त्यामागें
रागें आखु वधार्थ जैसा व्याळ खवळला रागें १५५
असुर-बळाचे शब्द ऐकिले न भ्रात्याचे रामा
रक्त-पूर बिळ-वदनीं आला बंधु न जगदभिरामा १५६
वर्षांतींहि नयेतां वाळी वधिला ऐसें गमलें
ठेविलि महासिळा विवर-मुखीं शोकें चित्त भ्रमलें १५७
किष्किंधेप्रति परतुनि आलों अग्रज-शोकें रडलों
कथितां वृत्त स्वाप्तजनाला रामा मूर्छित पडलों १५८
रामा पात्र बळें सचिवानीं केला राज्य-पदा हा
जैसा ज्वररोगी बंधूनीं विपुला आज्यप दाहा १५९
खळ-बळ वधुनि बिळ-मुखीं येतां न मला पाहे दगडा
रगडा मुष्टीस म्हणे मजसीं करि अरि मानुनि झगडा १६०
दंडुनि सचिवांसि मज वधाया वाळी पाठीं लागे
भ्रमतां भूवलयीं बा रामा हाहि न तोहि न भागे १६१
या ऋष्यमूक-गोत्रीं नशके याया बापा वाळी
अपराध करुनि मतंगमुनिच्या पावुनि शापा वाळी[1] १६२

१ पर्जी, गाळी.

असुर महिष-तनु दुंदुभिनामा युद्ध कराया आला
झाला व्यसु[1] बाहुबळें वाळी दूर झुगारी त्याला १६३
शुद्धाश्रमांत तच्छव घाली शोणित वमुनि सडा जो
गर्वे अपराध असा केला तो कां न मुनिस डाजो १६४
करिल प्रवेश या स्थानीं जरि तरि तो वाळी पापी
व्यसु हो तत्प्रिय कपिहि उपल[2] हो ऐसें ऋतपा शापी १६५
नकरी प्रवेश मरण-भयें या स्थानीं रामा वाळी
त्याकाळापासुनि मज नग हा रक्षिलो[3] शिवसा पाळी १६६
रघुवीर म्हणे वधुनि खळातें देतों कपिराज्य तुला
गंधतैलहि न पावे होउनि यज्ञोचित आज्य-तुला १६७
सुगळ म्हणे वधिन म्हणसि परि तो सखया अरि बळकट कीं
देवांच्याहि नसे वध याचा होय असें बळ कटकीं १६८
दुंदुभि-देह पहा तो दिसतो जो श्वेताद्रि-शिखरसा
योजन एक उडविला अरिला हा हर जेविं खरसा १६९
पादांऽगुष्ठें त्यातें उडवि प्रभु दशयोजन दूर
गुरु पूर्वी लघु आतां म्हणतां तो संशय हरि शूर १७०
एकें एक असे शालद्रुम सप्त भेदि तो रोपें
ऐसें म्हणतां प्रभु बळ दावी तें कळवाया सोपें १७१
एकेंचि शरें सप्त शालतरु भेदुनि खडकहि भेदी
छेदी संदेह प्रभु राहों दे न स्वाश्रित खेदी १७२
सुग्रीव म्हणे बा रघुवीरा आला प्रत्यय पूर्ण
चूर्ण प्रभु तूं करिसिल अरिला एकेंचि शरें तूर्ण १७३
गेला सानुज राम सुगळ-सह किष्किंधेच्या जवळ
कवळ स्वशरा वाळी देउनि यश जोडाया धवळ १७४

---

१ वि-असु-गतप्राण. २ पाषाण. ३ मार्कंडेया.

एकीकडे वनीं गुप्त प्रभु बाण-धनुर्धर राहे
समरा होउनि सिद्ध सुकंठ स्वभ्रात्यातें बाहे १७५
वाळी क्रोधें ये अनुज्याचे घ्याया युद्धीं प्राण
दोघांत न लेशाहि भेद दिसे राम नसोडी बाण १७६
भंग-व्याकुळ सुग्रीव पळे पावे स्वस्थानातें
त्या प्रभु सांखुनि सत्य सखा हें कळवी स्वस्था नातें १७७
पुष्पित वल्ली कंठीं बांधुनि पुनरपि सुगळा प्रेषी
गुप्त बसे प्रभु तोहि हटकितां क्षोभे परम द्वेषी १७८
तारा म्हणे भग्नही आला झाला राम सहाय
सुगळा न भिडें अभिमानें तो म्हणतो तामस हाय १७९
वाळी म्हणे प्रिये मीं जाणें रामा गुण-पात्रास
तोष पहातां सुजना चंद्रा कुजना कुणप त्रास १८०
ऐसें म्हणे निघे श्येनास श्येन तसा झडपाया
परि तोचि खचे सुग्रीव टिके कीं त्याचा धड पाया १८१
प्रभुनें तो सुगळ सखा रक्षुनि लक्षुनियां वल्ल्यंका[1]
उर चिरुनि शरें वाळी केला उचित चितापल्यंका[2] १८२
वाळी निंदी प्रभुला ईश्वर समजुनि मग कर जोडी
पितृ-दत्त कनक-माळा देउनि अनुजासीं करि गोडी १८३
तारा महिषी पुत्र अंगद प्रभुला अंतीं निरवी
प्रभु-दर्शन-बोधाऽमृत त्यांच्या शोक-विषातें जिरवी १८४
कपिचें उत्तर कार्य करवुनि प्रभु यश जोडी प्राज्य
देववि देव विश्वहित सुगळा अनुज प्रेरुनि राज्य १८५
राज्यश्री ताराहि रुमासी सुगळासि दिली रामें
सीतेच्या तेविं जिच्या जळतें अघ संकीर्तित-नामें १८६

---

१ वल्लि·अंका-पुष्पवल्लीरूपचिन्हाला. २ चितारूपशय्येला.

विनवी बहु सुग्रीव परंतु व्रत-संरक्षण पाहे
राहे किष्किंधेंत न वर्षा[1] प्रस्त्रवण[2]-नगीं साहे १८७
वृष्टि सरे तरि सुगळ न भेटे न मनावरि घे कार्य
मानी परम कृतघ्न तया कीं सीता-विरही आर्य १८८
अनुजासि म्हणे जा त्या पाठिव बंधुकडे मत्तातें[3]
परि शोधीं स्वर्गीं लावावा शब्द न मज मत्तातें १८९
गेला लक्ष्मण किष्किंधेतें गुण जोडुनि चापातें
तापातें कपि पावति जेसे करुनि महा-पापातें १९०
अंगद-तारा-युत सुगळ म्हणे, या समज न कोपावें
मानूं हृदयांत कृतघ्नत्वा वास मज नको पावें[4] १९१
गेले दूत ऋक्ष-कपि-कटकें येतिल करितिल कार्या
आर्या भेटवितिल वधुनि रणीं दशवदनाप्रति भार्या १९२
सौमित्रि म्हणे चाल स्वमुखें प्रभुसि असें सांगाया
न कळविला केला उद्योग प्रथम तुवां कां गा या १९३
लक्ष्मण-सह बैसुनि शिबिकेंत प्रभुला भेटे सुगळ
ज्याचा प्रताप काळासि म्हणे गिळितां कवळा उगळ[5] १९४
तों बहुलक्ष यूथपति आले गगनीं भरला धुरळा
जे म्हणणारे निज-नरवरांतें वज्रशिळांतें भुरळा १९५
शोधाया श्रीस सुषेणातें वरुण-दिशेला राजा
शतबळिस उत्तरेला विनता पूर्वेस म्हणे बा जा १९६
जांबवदंगद[6] वायुसुत बळी अन्यहि हरि शमनाशा[7]
धुंडाया पाठविले गेले वाहुनि अरिशमनाशा १९७
मास-अवधि न विलंघुनि शोधुनि काष्ठात्रय[8] कपि आले
विंध्य-बिळीं सुतृषित कपि शिरले फळ जळ सेवुनि धाले १९८

१ वर्षाऋतु. २ नामविशेषपर्वतसाचे ठाईं. ३ मत्- तात- माझ्या बापानें (दशरथानें.)
४ रहाणें किंवा घर. ५ भात बहुत दिवस एकत्र ठेविलें असतां त्यांत जो फसफसुक आणि पडतो.
६ जांबवत्-अंगद-जांबवान आणि अंगद. ७ शमन- आशा- दक्षिणदिशा. ८ दिशात्रय.

सुर-गणिका हेमा प्रिय मयकृत दिव्य स्थळ पाहून
झाले साधि अलब्ध-विनिर्गम कपि तेथें राहून १९९
हेमा-प्रियालि सावर्णिसुता स्वयंप्रभा ते साधी
नेत्रें झांकवि बाहिर काढी कपि यश सदया साधी २००
शोध न लागे प्रभु-दयितेचा अवधि लंघिला श्रमले
उग्र-शासना भ्याले सगळा सांगद सर्व भ्रमले २०१
सागर-तीर-महेंद्र-पर्वतीं झाले सिद्ध मराया
कीं नसुचेचि उपाय तयांला मृत्यु-विपत्ति तराया २०२
धन्य जटायु यशस्वी न तसें अस्मद्भाळीं मरण
न रणा व्यर्थ मरतसों घडलें न प्रभुचें परिचरण २०३
अग्रज जटायुचा संपाती तो ऐके ती वाणी
ज्याच्या मनीं असें कीं आपण भक्षावे ते प्राणी २०४
जाणुनि अनुज-मरण तो त्यांतें वृत्त पुसे तें हरि ते
कथिति सविस्तर राम-प्रभुचें सद्गुण-वर्णन करिते २०५
बंधु-स्नेहें क्षण रडुनि म्हणे न्या जलधिजवळ मजला
तोयांजळि देइन अनुजाला साधु मला बहु भजला २०६
सिंधुप्रति गृध्र विपक्ष तिहीं नेला जळ दे भावा
पुनरपि म्हणे साधुहो मज न्या स्वस्थानातें पावा २०७
नेला होता तेथें मग तो निज वृत्त कथी हरि हो
परिसा सीता शोध सांगतों स्थिर तुमचें मन परि हो २०८
जातां तपन-निकट तत्तेजें मदनुज जटायु भाजे
पोटारवालें धरिला तो म्या पक्ष जळाले माजे २०९
याच्चि महेंद्र-नगीं मी पडलों मूर्छित दुःसह तापें
हरिला दाह निशाकर-मुनिनें शिशुचा ज्यापरि बापें २१०

---

१ बाहेर पडण्याचा मार्ग, ज्याना सांपडला नाहीं असे. २ स-आधि-मनोव्यथायुक्त ३ सेवा. ४ सूर्याजवळ.

वदला तो मुनि तेथेंचि रहा श्रीसीतेचा शोध
सांगुनि हृष्ट करीं श्रीराम प्रभुचे वानर योध २११
फुटतिल पक्ष पुन्हा मग जा तूं तोंवरि येथेंचि रहा
या कार्याकरितां यास्थानीं होता कपिहो चिर हा २१२
नेली श्रीसीता दशतुंडें पर-बळ-मत्तें अनयें
रोधुनि मार्ग प्रणत सोडिला सदयें माझ्या तनयें २१३
कपिहो वाटो तुमच्या कथितें हें सत्य मना दिसती
कीं गृध्र दूरदर्शी मी ती लंकेंत अनादि सती २१४
ऐसें वदतां होय सपक्ष व्योमीं भरला उडुनीं[1]
तो हर्षप्रद नमिला कपिनीं अमृतांभु जसा उडुनीं २१५
शत योजन सिंधु उडुनि जाणें कोणाची किति शक्ती
ऐसें अंगद युवराज पुसे व्हाया तदभिव्यक्ती[2] २१६
दश-योजनें उडेन गज म्हणे दुसरा गवाक्ष वीस
शरभ तीस ऋषभहि चाळीस प्रेक्षी न नमी श्रीस २१७
पन्नास गंधमादननामा मैंदाभिध कपि साठ
द्विविद म्हणे सत्तर अधिक न मी जरि थापटिली पाठ २१८
वीर सुषेण म्हणे मी गावें जाइन उडोनि ऐसीं
ऋक्षेंद्र वदे नव्वद संप्रति मच्छक्ति असे ऐसी[3] २१९
पूर्वी प्रदक्षिणा म्या केल्या तीन त्रिविक्रमातें
करितां अमृतार्थ मथन औषधि-शत मेळविलें या तें २२०
अंगद म्हणे उडुनि जाइन मी लवण-जळधि शतगावें
परि घाटे मज परतुनि येतां बळ माझें न तगावें २२१
वृद्ध म्हणे उडसिल युवराजा जरि तूं बहु-शत-गावें
भृत्यांहीं न प्रेषावें न स्वामीनेंही जावें २२२

---

१ नक्षत्रांनीं. २ तत्-अभिव्यक्ति-त्याचीस्पष्टता. ३ याप्रकारची.

अंगद म्हणे तरि कसी प्रभुची कार्य-सिद्धि वा होती
वृद्ध म्हणे प्रभुतेजें होती जाण महाबाहो ती २२३
एकांत-स्थित-मारुतिस म्हणे सुगळासम तूं बापा
लक्ष्मणसम किंबहुना राम- प्रभुसम तूं निष्पापा २२४
पुंजिकस्थळी केसरि-भार्या होय अंजना शापें
केलासि समुत्पन्न तदुदरीं प्रिय सुत वातें बापें २२५
तूं उपजतांचि पक्क फळ असें मानुनि चित्तीं रवितें
त्रिशत योजनें उडालासि वा गाती ज्ञाते कवि तें २२६
शतमख वज्रें ताडी पाडी मूर्छित कोपे वायु
तुज दे शस्त्रास्त्रावध्यत्व ब्रम्हा पुष्कळ आयु २२७
गरुड-तरणि-मारुतसम गति तूं सिंधुलंघनीं शक्त
जा देवीतें पाहुनि ये बा हो प्रभुचा प्रिय भक्त २२८
तापस-शापें जें निज-शक्ति- ज्ञान लोपलें होतें
करी प्रकाशित मारुति-हृदयीं बोधें विधिसुत[1] तो तें २२९
दश-योजन-तनु झाला वृद्धें स्तवितां हर्षे फुगला
भगवत्-प्रसाद-सद्यश मिळतां सुज्ञ नराहे उगला २३०
शिरला तळीं दडपला भारें उडतां नग तो खचला
मुनि म्हणति कुतुक पावों आधीं ध्यानें मग तोख[2] चला २३१
शक्र-प्रेरित मैनाक उठे त्यास उरें कपि ताडी
पाडी सांखुनि हस्त-स्पर्शे जलधिस वेगें फाडी २३२
विघ्न-परीक्षार्थ करी सुरसा जी नागांची माता
विंशति योजन मुख पसरी ती देव+प्रहिता घाता २३३
ती विधिवरें गिळीन म्हणे तों होउनि गावें तीस
मारुति म्हणे सती सांखूं[3] दे त्वांही गावें तीस २३४

१ ब्रम्हपुत्र (जांबवान्) २ संतोष. ३ सुरसेस. + देवांनीं पाठविलेली.

सोडीनाचि म्हणे मुख पसरी ती गावें चाळीस
खेचर म्हणती कपि सांपडला असुर जसा काळीस[2] २३५
जो धांवुनि संरक्षी समयीं द्विरदा आपन्नास
त्या प्रभुतें चिंतुनि कपि झाला गावें हा पन्नास २३६
षष्टि-योजनें सुरसा त्यातें भक्षाया मुख वासी ·
मारुति पोषी सप्तति गावें वपु जैसें सुखवासीं २३७
ती नागांची माता पसरी आनन गावें ऐसी
नवति-योजनें कपि-वपु हि कथा आन न गावें ऐसी २३८
शत-योजन मुख पसरी वाटे गिळिल व्योमहि सुरसा
लघु होउनि त्यांत पडोनि निघे विषयीं कवि महिसुरसा
होय करुनि हें यश सर्व जसा मारुत-सुत, पाठ कवी
तो सुरसेसि तसा संसृतिला हाही सुतपा ठकवी ४०
छाया धरुनि सिंहिका ओढी तद्देहीं शिरला जो
छेदी काळिज कोण ठेवितां तच्चरणीं शिर लाजो २४१
पावे तैसाचि जवें पारीं तो कवि लंबागातें
चरिता लावुनि हें जड लक्ष्मी- नाक विलंबा गातें २४२
अधिदेवीतें भंगुनि संध्या- समयीं पुरींत शिरला
फिरला बहुत श्रीस पहातां शोकें हृदयीं चिरला २४३
सुकृती कृती अशोकवनीं त्या साधीतें पाहून
राहून नगीं गुप्त निवे तो[3] हर्षातें वाहून २४४
तों चंद्रोदय होय निशीथीं रावण ये विनवाया
कीं कामांधा विषयाख्य मदा उत्सव सेवि नवा या २४५
तो विधि-मातेसि म्हणे सुभ्रु श्रमविसि कां हें गात्र
गात्र प्रिय-सुख- भोगातें हो सुंदरि म्हण हूं मात्र २४६

---

१ गजेंद्रा· २ विपत्तियुक्तास· ३ मध्यरात्रीचेवेळीं.

मदधिक काय पद-च्युत वल्की पनवासी प्रिय नर तो
मानस सोडुनि मन हंसीचें पळहि पल्वेलीं नरतो २४७
आज्ञेंत तुझ्या मत्प्राणस्थी जनपद लंका राहो
त्यज हठ सुदति मुदतिशय घे दे पद सदलंकारा हो २४८
एकें दिवसें निष्कंटक भू देतों साधुनि जनका
म्हणतिल होतां अभ्युदय बरा नेतों साधु निज न कां २४९
पावेल तुला नर तो न रतो मन धृतलोभ स्मरणीं
ऐसा नाहीं अमरहि माझ्या होय न जो भस्म रणीं २५०
साध्वी तृण आड करुनि बोले रे मत्ता हरिणा मी
नर-सिंह-स्त्री समजेल तुला कामांधा परिणामीं २५१
उटजांतुनि कपटें त्वां प्रभुवर सानुज दवडुनि दूर
पळविलि चौर्यें वीरवधू घे स्वमुरेवंचि म्हणुनि भूर २५२
पाताळीं जासिल तरिहि तुला प्रभु-शर करितिल चूर
प्रभु विरचिति खरतर शर समर्थी कर-दश-शत-मित सूर २५३
प्रभु-फणि-पतिच्या पचविसिल कसा तूं उंदीर मणीतें
विघ्नोपहता होऊं देइल तो तुंदी रमणीतें २५४
मज करुनि उपायन जासील प्रभुला जरि तूं शरण
तरण घडेल व्यसनीं नाहीं तरि तुज आलें मरण २५५
इत्यादि वदे देवी कोपें दशकंठ म्हणे उडसी
गर्वें मुग्धे बेट भेटतां दुःखसमुद्रीं बुडसी २५६
दासींस म्हणे मन सीतेचें हित सांगुनि वळवावें
मास-द्वय भरतां भक्षिन हें स्पष्ट इला कळवावें २५७
त्यां समजावुनि त्याची दयिता घेउनि गेली मागें
करिति राक्षसी जाच क्रूरा विष-कटु वदती रागें २५[८]

१ नामविशेषसरोवर. २ अल्पसरोवरीं. ३ देश. ४ विघ्नेश्वर. ५ नज राणा. ६ रावणा. ७ कां.

त्रिजटा त्यांसि हटावूनि म्हणे साध्वी छळितां कां गे
दुःस्वप्न दशास्य-क्षय-सूचक अनुभविला ती सांगे २५९
उद्बंधनार्थ काढुनि घेती वेणीचा आगवळ
स्वमतिस म्हणे विपदुदधिपारा दृढ होउनि लाग वळ २६०
तों कवि गाय तया घटजन्मा जो सुर-भीति-समुद्रा
मग अर्पी प्रभुची प्रणतांची जी सुरभी तिस मुद्रा २६१
नमुनि कुशळ कळवी सुगळाचें सख्य वालि-वध सांगे
स्तवुनि म्हणे चाल तुला नेतों माते श्रमसी कां गे २६२
स्मित करुनि श्री वदली वत्सा त्वां न मला पळवावें
मळवावें न यश वधुनि रिपुला तेज जगीं कळवावें २६३
मारुति म्हणे असेंचि घडेल प्रभुचे अक्षय तूण
जातों प्रभुतें घेउनि येतों यावी कांहीं खूण २६४
काक-कथा कथि चूडामणि दे माराया संदेशा
मज कीर्तिस संरक्षा ऐशा सांगे श्री संदेशा २६५
आज्ञा आशी घेउनि हर्षें मारुति उपवन मोडी
झोडी वनपाळांतें उग्रें राक्षस-कटकें तोडी २६६
लीलेनें मारी रण-दक्षा शत्रु-कुमारा अक्षा
भस्म करी घनरव-भट-लक्षा जेविं दवदहन कक्षा २६७
घननाद ब्रम्हास्त्रासि बळें सांपडतां त्या बांधी
ने तात-सभेसि महाकपि न श्रमविल अरिंची कांधी २६८
दशकंठ पुसे कोणाचा तूं ऐसा मत्त नयांतें
लंघुनि वधिता झालासि रणीं कैसा मन्ननयांतें २६९
कपि सांगे श्रीराम-प्रभुचा दूत सती शोधाया
आलों रण तव दर्शन व्हाया हित तुजला बोधाया २७०

---

१ गळफांसार्थ. २ वेणीच्या अग्रांची गाठ घट्ट यावी म्हणून गंगावन इत्यादि कांचा जो दोर लावितात तो. ३ विपद-उदधि-पार-विपत्तिरूपसमुद्राच्या पारास. ४ भाने. ५ निरोपा. + कामधेनु. ‡ गवता.

साध्वी जनक-सुता प्रभु- दयिता नोहे कोंडायाची
साम त्यजि कलि-रुचि जड कीं कण टाकुनि कोंडा याची २७१
वांच शरण चाल प्रभुला दे प्रभु-दार उपायनसे
यावांचुनि वांचाया दुसरा तुज सार उपाय नसे २७२
रोधावें ब्रम्ह-कुलोत्पन्नें त्वां काय अशा स्त्रीतें
शास्त्री असोनि करिसि न करिती जें कर्म अशास्त्री तें २७४
नकटी होय बहिण अन्यायें मेला भावु खरचि तो
सर्व स्वप्राणांतें काळ- ग्रस्त व्यर्थ खरचितो २७४
न टिकति खळ हृदय-बिळीं उजळी बोध दिवे कपि कवि तो
घनें सुक्षेत्रीं शालि तसाचि प्राज्ञ विवेक पिकवितो २७५
खळ खवळे कपि-कदन कराया करवी करवाळातें[1]
त्या तदनुजनि बिभीषण यत्नें वारी अरवोळातें[2] २७६
वेष्टविलें वायुज-पुच्छ खळें बहु तैलार्द्र-पटानीं
पेटविलें चालविला नगरी फिरवायासि भटानीं २७७
तें ऐकुनि देवी दहनातें प्रार्थी तो केशातें
त्याच्या नस्पर्शे सुरवचि सख्या त्याही लोकेशातें २७८
कपि वधि भुज-पाश-धरा सर्वा त्या पाशा हिसकून
स्वामि-यशोर्थ दशमुखा न मथी तन्नाशाहि सकून[3] २७९
साधु-बिभीषण-गृह संरक्षी लंकेची करि होळी
घोळी बहु कटकें हरि अरि तो हाय म्हणे कर चोळी २८०
सन्मणि-कनक-प्रासादांचे काळ धडकले वर ते
खचरांचेंहि न राहों देती ज्वाळ धड कळेवर ते २८१
त्या लंकेच्या सेवुनि पावे सुख वासव धूमातें
म्हणे न दे निववायास असा मुखवास वधू मातें २८२

१ तलवारीनें. २ हलक्यातें. ३ समर्थ होऊन.

ब्रम्हांड भरिति बहु रक्षरची शोकार्त स्वर पुरतें
जेव्हां करी प्रदीप्त शिखाशन् तो कार्तस्वरपुर तें २८३
विझवि समुद्रीं पुच्छ ह्या म्हणे- सीता-लय मानून
तीस पुन्हा पाहुनि सुकवि निघे तो नगमे भानून २८४
अंगद-जांबव दादि- कपींतें कुशळ वृत्त आयकवी
नायक-वीरानंद अतुळ जो त्या वर्णिल काय कवी २८५
सुगळ-प्रिय-मधुवन लढुनि बळें तदधिप दधिमुख मथिला
तेणें तो अपराध क्रोधें कपि-पति-पतिला कथिला २८६
समजे केलें कार्य मोडिली तरिच मदाज्ञा त्यांहीं
न जयोत्कर्षाविणें लंघिली धरुनि मदा ज्ञात्यांहीं २८७
प्रभुला कार्य- सिद्धि कळवी त्या सांवी मधुवन-पाळा
सांगे जा म्हण त्यांसि न लावा मज भेटाया काळा २८८
दधिमुख सोडुनि परिभव-खेद प्रेरी हरि- चक्रातें
ते अतिहर्षे नमिति प्रभुतें अमर जसे शक्रातें २८९
श्रीराम पुसे त्यांसि सखेहो भटमणिहो बोला हो
मद्दयिताशुभवृत्त अमृत या श्रवणयुगा लोला हो[४] २९०
मारुति चूडामणि दे सांगे जें वदली आर्या तें
ताततसा आलिंगी प्रेमें प्रभु त्या कृत- कार्यातें २९१
प्रभु बोले अभिषेक न बहु बा केला मणि- कनकांहीं
तुज आलिंगन सर्वस्व दिलें समुचित अणिक न कांहीं २९२
या एका उपकारासि दिले ह्या तुज सर्व प्राण
यावरि करिसिल जे त्यांचा मीं बंधुसह ऋणी जाण २९३
पर-पुर केलें भस्म लंघिला मकरालय शतगावें
हें चिरें म्हणावया गात्यां हा न करल यश नगावें २९४

१ सुवर्णनगरलंका. २ भानु-ऊन-सूर्यापेक्षांउणा. ३ उशीरा. ४ होऊं. ५ हेंत व यश गात्यांला हाय न करल असें म्हणायाचिरकाळ व्हावें.

इत्यादि बहु स्तवुनि प्रभुनें शुद्ध-यशें साजविला
साजविला उत्साह मनीं तो परि सन्मणि लाजविला २९५
वर्णुनि लंका-रचना सेना कथुनि खळ दुरभिमाना
तो कथि म्हणे प्रभुजि चापलता हे सत्य सुरभि माना २९६
तव शर पवन जलद तो कीं हा पावक तो कापूस
बापा चापा सोडुनि न मला वानर- तोका पूस २९७
प्रभु सुगळासि म्हणे चाल सख्या विजयश्री तुज वरिती
वत्सा सौमित्रे जी कीर्ति प्रीतिमती तुजवरि ती २९८
विजयमुहूर्तीं सुगळानुमतें घेउनि भाउ निघाला
खळ-दशकंठावरि घालाया कोपें जाउनि घाला २९९
वायु-वालि-सुत राम-लक्ष्मणा उडति नभीं वाहून
पाहुनि द्विजवर आशी दे तदुत्कर्ष साहून ३००
अगणित कपि-बळ घेउनि गर्जत सुगळ सागरा गेला
उत्तर जलधि गमे त्यावरि तें स्मरुनि आग[1] रागेला ३०१
तें चार कथिति दशमुख पुत्र भ्याले मंत्री बाहे
मत्त मतें रण-पण करि नाश स्पष्ट बिभीषण पाहे ३०२
सीता रामा दे अग्नि बळें लाविसि कां गेहातें
अहित गमे पुत्रांसह मूढा जें हित सांगे हा तें ३०३
हितशत्रु असें समजुनि खळ त्या परमहिता अपमानी
प्रभुच्या तेजाहूनि आपलें तो जड बहु तप मानी ३०४
वदला नर कपि भय दाखविसी भ्याउन हा फटकाळा[2]
गट काळा-मेका करिता मी व्याळ महाफट कोळा ३०५
होतां धिक्कार सभेंत निघे घेउनि मंत्री चवघे
सुज्ञ बिभीषण पाहे मोहें काळें गिळिले अवघे ३०६

---

१ अपराध. २ कृष्णवर्ण.

त्यजि राज्यातें दाव[1]-परिवृता . जेविं गज अरण्यातें
शरणागत तो बहुमत झाला त्या विश्वशरण्यातें ३०७
प्रभु अनुजातें सांगुनि करवी अभिषेक पद-नतातें
देववि राज्य जसें ननयातें द्यावें स्व-सदन तातें ३०८
नाथ अहोरात्रत्रय विनवी परि न घणमणी सिंधू
शर चापगुणीं जोडुनि म्हणे हा या शोषूं विंधु ३०९
तापे सागर कोपें भेटे अभय प्रभुला मागे
शरणागता तया प्रभु रक्षी हृदयीं करुणा जागे ३१०
सेतु नळ करिल मी धरिन शिरीं सयश वा पसरेल
सागर विनवि असें गातां हें सर्वहि पाप सरेल ३११
पांचा दिवसांत दहा गांवें लांब रुंद शतगावें
सेतु समुद्रीं प्रभु करवी हें यश सुरबहुमत गोवें[2] ३१२
कृत्रिम धनु शिर दावुनि वधिला तव पति हें खळ सांगे
हो मद्दयिता मर्त्यबळानें होतीस उडत कां गे ३१३
मद्बळपति प्रहस्त करि असा सुविजय उत्तरे[3]-रोधीं
लक्ष्मण सुगळ पळाले नरडें बहु हित मत्कृत-बोधीं ३१४
ऐसें छळितां सचिवानीं तो खळ नेला बाहून
सरमा बोधी श्रीतें माया लोपे क्षण राहून ३१५
संपूर्ण अहोरात्र-त्रय तें उतराया बळ लागे
सरमाहि कथी श्रीस अरि सचिव- बोधासि न बळला गे ३१६
चढुनि सुवेळीं लंकादुर्ग प्रभुवर देखत राहे
बैसुनि तत्प्राकारशिरःशृंगीं खळहि कपि- कटक पाहे ३१७
दूरुनि पाहुनि सुगळ समजला छत्रें कीं खळ आहे
सर्पी गरुड तसा उडुनि पडे दुष्टीं श्रीस नसाहे. ३१८

---

१ वणव्यानें व्यापलेल्या. २ गायन करावें. ३ उत्तर तीरीं.

उडंवुनि मुकुट नियुद्ध[1] करि तया बहु धिक्कारुनि ताडी
पाडी त्या प्राकाररवालें नख-दंतांहीं फाडी ३१९
ये फिरुनि सुवेळार्थी त्यातें राम म्हणे बापा हें
साहस न बरें तुझिया क्षेमें क्षेम जना या पाहें ३२०
लंकेला जेव्हां सैन्यें तो कपिवर वेढा गमला
कोट म्हणे ती नदिसति बरवे तरि बरवे ढीग मला ३२१
पाठविला सामार्थ प्रभुनें[2] अंगद भेटे अरितें
प्रभुची आज्ञा कथि अवतंस त्रिभुवन जीतें करितें ३२२
दशकंठा देवर्षि पीडिले त्वां बहु अन्याय-शतें
बहुभाग्येंहि न तुज कुजना जें स्वल्पें अन्या यश तें ३२३
कामी कोपी लोभी प्राणी तो सेवुनि विषय मरे
यांसम नसती जरि गमती हे उग्र दहन विष यम रे ३२४
माजें हरिलें स्त्रीरत्न मला वंदुनि दे मत्ता तें
कथिलें शरणागत-रक्षण हें स्वव्रत मज मत्तातें ३२५
प्राणादि तत्सर्वस्व रणीं व्यर्थ न खरचो राहो
अथवा हो जात्यन्ध-सुधैर्य त्यजुनि न खर चोरा हो ३२६
प्रभुची आज्ञा कथि मारुतिचा अंगद-वर वीर गडी
त्या प्रकटुनि शक्तिहि अरिचा तो भंगद बरवी रगडी ३२७
दशकंठ म्हणे कोण प्रभुला कथिता पथ वानर तूं
आम्हीं रतूं नीति-धर्म-पथीं स्वरसें अथवा न रतूं ३२८
तातसखा निंदिसि मज मूढा तातघातका गासी
त्यजुनि यशा-हंसासि अपयशा देसि हात कागासी ३२९
मातें जा त्यातें भजसी कां भाजन धिक्कारा हो
जडा न करिसी प्रतीकार कां म्हणसी हिक्का राहो ३३०

---

१ बाहुयुद्ध. २ तुरा.

तातसखा मज भज मी धर्मे तात तुज पद-नतातें
देतों त्या म्याही घालावें खालें न वदन तातें ३३१
तारेय म्हणे काळाऽजगर ग्रासितसे कीं अंधा
संधा काय तुझी तूं नेणसि नय-धर्माच्या गंधा ३३२
श्रीराम-प्रभुच्या बहु गाती मुनि कविवर कृत्यातें
मूढतमा तुज काय ठावुकें विषय-नरक-भृत्या तें. ३३३
देतों देवी पद नमुनि असें कीं मत्ता वद नाहीं
साधु म्हणुनि घेसिल तूं देतां साधूंच्या वदनाहीं ३३४
लंकेचे नाथ बिभीषण केला सुज्ञप्रभुनें बरवा
भरवायास यशोमृत न धरीं या पापाची परवा ३३५
कोपे दुष्ट धराया सांगे धरिति भुज द्वय चवघे
अवघेहि उडुनि झाडुनि मारी प्रसादहि परिभव घे ३३६
प्रभुला वंदुनि अंगद अरिचें दुर्मत सांगे सारें
आज्ञा प्रभुनें करितां कांपे क्षोणी कपि-बळ-भारें ३३७
अगणित कपिबळ सहसा[4] लंका- प्राकारावर वेघे
वाटे त्यागुडगर्जीचें नें नाकाराव रवें घे ३३८
मारिति राक्षस कपिनीं वधितां हाका यम हा मारी
कपिरूप धरुनि म्हणवील असी हा काय माहामारी ३३९
चतुरंग कटक आणुनि भारी दशमुख तो युद्ध करी
केवळ मदांध होउनि जैसा सिंहासीं कुद्ध करी ३४०
कपि राक्षस बहु मेले नटले बहु कबंध रणरंगीं
अंगीं क्षतशत गणिति सुखजसें कामुकजन रतिसंगीं ३४१
वरिला सिंधु तदितरस्थानीं न टिकुनि रक्त-नदीनीं
कीं लोकीं प्रायशः स्त्रियांचें मानस सक्त न दोनीं

---

१ अंगद. २ प्रतिज्ञा. ३ बळ. ४ नाक-आराव-स्वर्गी शब्द ज्या- (सैन्याचें विशेषण.) ५. हस्ति.

सेनापति प्रहस्त निवटिला रावण केला भग्न
प्रथम रणीं झालें चिंतेंत क्षणदाचर-बळ मग्न ३४३
मग त्या घननादें केले ते दाशरथी बद्ध रणीं
नर किति म्हणे मजपुढें क्षम मीं जो वज्री तद्रणीं ३४४
खचरी नेती श्रीस पुष्पकीं पति-वचनें वाहून
हाय म्हणे कपि पाशबद्ध ते पति देवर पाहून ३४५
अति-मूर्छा-व्याकुळ मानुनि ते मृत शोकीं श्री पडली
रडली तेव्हां त्रिजटा चिंता हरि हृदयीं जी जडली ३४६
नेली पुन्हा अशोकवनीं श्री आला पक्षीश तदा
तत्त्रासें तें अहि-कुळ पळतां मागें लक्षी शतदा ३४७
तक्षि-वर-कर-स्पर्शे झालें व्रणहि फणीसे नाहीं
केले जयजयकार पहातां स्वस्थ धणी सेनाहीं ३४८
पुनरपि राक्षस कदन करिति ते सुगळ दाशरथि भारी
मारी घटकर्ण रणीं सोरी सेना मागें सारी ३४९
मूर्छित करुनि सुकंठासि धरी विजयी होउनि परते
पर-तेजस्वी तत्प्राण हरी हा हा वदले पर ते ३५०
सुरडे कुंभकर्ण तो क्रोधें प्लवगभट गिळी सगळे
तन्नादें खचलीं नगशिखरें मग कपि-बळ कां नगळे ३५१
खंडुनि भुज चरण शिर प्रभुनें रणरंगीं लोळविला
बोळविला परलोका दशमुख तच्छोकें पोळविला ३५२
देउनि धैर्य पित्यातें मेघ-ध्वान महा-मायावी
प्रभुसह सर्व खिळी कीं विजय-श्री निज-धामा यावी ३५३
मारुति दशमुख-बंधु निराळे करुनि कमळें गिळिले
वर्षुनि खरतर शार गगनस्थें सुमें सर्वहि खिळिले ३५४

१ सगळी. २ मूर्छेनें.

जांबवदुक्तें मारुति गेला श्रीकैलासा जवळ
आणी ओषधिश्रृंग गमे तें तसीपाणिस्थितकवळ ३५५
त्या दिव्यौषधि-गंधवहानें उठले विशल्य सर्व
पावुनि शिखर पुन्हा ये नधरी अद्भुतकर्मे गर्व ३५६
त्यावरि करिती श्रीदाशरथी राक्षस-बळ-कदनातें
आठवलें विधि नंदिकेश जें वदले दशवदनातें ३५७
माया-सीता आणी दावी घननाद रणीं पापी
दापी सर्वांसि तिचें खड्गें प्रभुसमक्ष शिर कापी ३५८
मोहुनि रडवी सुगळ-मरुत्सुत- लक्ष्मणसह निर्मोया
जाय रणीं-अमरत्वप्रद रथ होम करुनि निर्माया ३५९
कळवि बिभीषण कपटसलक्ष्मणा शीघ्र विघ्न करि होमीं
जो घननाद क्षोभोनि म्हणे वधिन तुम्हां अरिहो मी ३६०
दारुण रण रावणि करि परि तो प्रभुच्या अनुजें वधिला
शक्र म्हणे उद्धरिला कांटा माझ्या हृदयामधिला ३६१
सुत-शोकाकुळ रावण गेला सीतेला माराया
सचिव सुपार्श्व म्हणे नव धावी स्त्री बरवी माराया ३६२
मग चतुरंग कटक बहु-कोटि प्रेषी प्रभुवरि अरि तो
त्यातें प्रभु करि भस्म तृणातें जेविं दवानळ करितो ३६३
राक्षस-दार-विलाप-लक्ष जें तया परिसवेना तें
समरार्थ निघे मुनि म्हणति भला जया परिस वेनातें ३६४
निश्चय करि नर-कपि मारावे कीं आपणचि मरावें
तद्दैव म्हणे जें शेवटिलें चिंतित तेंचि करावें ३६५
उत्पातांतें नगरी गांठि तो प्रभुसीं अरि घाली
त्याच्या तेजें भीति प्रभुच्या मात्र मनीं न रिघाली ३६६

---

१ नद-पाणि-स्थित-कवळ-त्याच्या हाता मधें असणारा ग्रास. २ मायारहिता रामा.

रावण होय प्रभु-बंधूरीं उग्र शक्ति शिरकविता
ती त्याचें कांपवि जसि सुनिची रसिकाचें शिर कविता ३६७
ते क्षांहि उठवि मारुति आणुनि औषधि-गिरि-शिखरातें
वर्णुनि सांगे सर्वकवींस प्रभु कीं यश विखरातें ३६८
दशमुख रथीं क्षितिवरि प्रभु तें शक्रास पहावेना
स्वरथ पाठवी तो कीं अरिचा उत्कर्ष सहावेना ३६९
मातलि सारथि वंदी प्रार्थी प्रभु शक्र-रथीं चढला
पढला गुरुपाशीं तें प्रकटी शत्रु-क्रोधें कढला ३७०
प्रभुहि न आटे अरिहि न आटे शस्त्रांहीं नभ दाटे
वाटे दुर्जय दशमुख-समरीं सुर-हृदय भयें फाटे ३७१
सप्त अहोरात्र महायुद्ध क्रुद्ध हेष्ष करि तो
परितोष नहोय सुरर्षींतें वाटे प्रभु-यश हरितो ३७२
अरिचें शिर एकेक दहादां खंडी प्रभु शत पाडी
फुटलीं जेविं न तुटलीं उटलीं दशाहि न मग विभु ताडी ३७३
प्रभु निज-शस्त्राऽस्त्रांची शक्ति क्षीणा ऐसें मानी
वचकेनच केली वाटे त्या शत्रु-शरांची हानी ३७४
प्रकटे घटज प्रभुला सांगे रवि-हृदय-महामनुतें
धनुतें इषुतें विजयश्री दे भेट भरुनियां हनुतें ३७५
रवि-दत्त-वरें ब्रम्हास्त्रधरें उर तीक्ष्ण शरें भेदी
दे दीर्घस्वाप तया प्रभु कीं झाला स्थिर तो खेदी ३७६
रावण-तनु-भूवरि कुसुमाची वृष्टि प्रभुवरि पडली
झडली चिंता कार्यसिद्धि जी बहु अवघड ती घडली ३७७
देवानीं दुंदुभि वाजविले मेघध्वनि लाजविले
आशांत मुनिनीं गाजविले लोक यशें साजविले ३७८

---

१ धिष्ण्यांतपसरा. २ दीर्घनिद्रा (मरण.) ३ दिशांत.

अग्रज भार्या समजावी तो साधु बिभीषण यलें
वाक्य ममोप्येषयथानव हें ऐकविनां रघुरलें ३७९
जें उत्तरकार्य भ्रात्याचें करि साधु यथाविधि तें
श्रुतिसी मान्या होय प्रभुची सत्कीर्तिकथा विधितें ३८०
श्रीरामें बंधु- करें विधिनें करवुनि अभिषेक महें
शरणागत सुपदीं बैसविला सयश नुरधि श्रम हें ३८१
यावच्चंद्रदिवाकर धरणी स्वकथा तावद्राज्य
दिधलें बिभीषणासि प्रभुनें स्वच्छ सुख यश प्राज्य ३८२
मग मारुति पाठविला प्रभुनें श्रीस विजय सांगाया
ती तृषिता आळस सुरसिक तो भक्त करिल कां गाया ३८३
श्री बोले वत्सा तुज यावें तरि योग्य नसे कांहीं
अमृत धनाच्या सत्कार घडे कोणाहि न सेकांहीं ३८४
मारुति म्हणे राक्षसी होत्या म्हणविति तुज वरदे हां
यांचा वध परम प्रिय मातें मज दासा वर दे हा ३८५
देवी म्हणे नमाराव्या बा बळहीना या दासी
कोसार सुके उग्रत नसे मग दीना यादासी ३८६
मारुति वर्णी श्रीसीतेच्या पुण्याचारा शीला
वारंवार नमस्कारी त्या पुण्याच्या राशीला ३८७
प्रभुसि निरोप पुसे श्री सांगे श्रीचरण पहायाचा
सुचिर मनोरथ आहे त्यांच्या छायेंत रहायाचा ३८८
मारुति येउनि कळवि प्रभुतें कळवी लंकेशाला
ज्याच्या कीर्तिस चिंतामणिची बहुतचि शंके शाला ३८९
न्हाणवुनि अळंकारवुनि नेतें देउनि शुचि- शिबिकेला
श्री भेटविली प्रभुला जेणें स्वयशोरुचि शिबि केला ९०

---

१ मम- अपि-एषः यथा-नव- माझाहि हा जन्मानुज्ञा. २ यावत्- चंद्र-दिवाकर औं चंद्रसूर्य. ३ तावत्-राज्य- तो राज्य. ४ हात. ५ सरोवर.

प्रभु तीस म्हणे समरीं तपलों निंदा-परिहारा मी
स्वीकार तुझा अयशस्कर या होइल परि हा रामीं ३९१
स्त्रीरत्न म्हणुनि यत्नें आला घेउनि तुज अरि कामी
राहों देइल निद्रालु बरी सुखशय्या न रिकामी ३९२
याया स्व-शुचित्व-प्रत्यय ती करि दिव्य अनादि सती
झाली कनकमूर्तिसी ज्वलनीं देवादिजना दिसती ३९३
सुर-मुनि-गीता सीता दहनें प्रभुच्या अंकावरि ती
बसविलि घनीं अकंपा शंपा असि किति शंका वरितीं९४
शतमख-सख दशरथ नृप भेटे तात असें शिव कळवी
पळवी श्रम पितृसुत-संगम तो पतिमतिमतितें वळवी ३९५
आलिंगी पुत्रांस सुनेस प्रेमें हुंगी शिर ती
भेटि मुक्ति कीं नृप-मति जैसी क्षौद्रीं भुंगी शिरती ३९६
सीतेचें व्रत वर्णूनि म्हणे क्षिति बहुतचि रंजीव
म्हणति प्रजा न तेजें करितां अरि न हुत चिरंजीव ३९७
शक्र म्हणे वर माग प्रभुही मृत उठिव असें मागे
अमृत-वृष्टिनें उठवी बळ तें वाटे निजलें जागे ३९८
प्रभुला लंका-नाथ कराया पूजन सेवा विनवी
नयनाहीं शोभवुनि मूर्तिची शोभा सेवावि नवी ३९९
प्रभु सांगे सबळा सुगळाचें प्रेमें पूजन बा जें
माजें भेटिव भरत शीघ्र मी त्याच्या विरहें भाजें ४००
त्वां जोडुनि दिधली विजयश्री भेटविली हे पूजा
तिसरी सत्कीर्तिहि केली बा रघुवंशाची पूजा ४०१
भक्त बिभीषण आज्ञा प्रभुची प्रेमें माथां वाहे
सबळा सुग्रीवातें पूजी परमसुखातें लाहे ४०२

---

१ मधाचे ठाई. २ + पतियुक्त जी कैकेयी तिच्या बुद्धीतें.

प्रभुला पुष्पक-विमान दे जें रंजवि नाका मग तें
कां त्या लोकेश-स्तुत-चरणा रंजविना कामगतें ४०३
प्रभु-संकल्पें पुष्पक गगनीं शिरला खगवरसा जो
कां न गगनमणिसा तेजस्वी तो कामग-वर साजो ४०४
अत्यद्भुत रणभूमि श्रीतें दाखवुनि श्रीरामें
नामें स्व-पर-भटांचीं कथिलीं वर्णुनि कर्में धामें ४०५
श्रीस प्रभुनें सेतु दाविला जो रुंद दहा गावें
शंभर गांवें लांब जगें ज्या पावोनि महा गावें ४०६
कथिलें नळ या झाला त्याचा विजय-घनाच्या रचिता
या यमदंडावांचुनि वरिता तो न अनाचार चिता ४०७
देवी म्हणे पसरला वाटे क्षुधित महाभुजग मला
खल-संहर्ता मन्मातेचा उग्र महाभुज गमला ४०८
प्रभुच्या विजय-श्रीलाभाचा हेतु सेतु देवीतें
बहुमत झाला तद्दर्शन जें अमृत नमें सेवी तें ४०९
राम म्हणे सुंदरि इकडे हें सिंधूत्तरतीर[1] पहा
या स्थानीं मज भाग्यें भेटे मूर्त विजय वीरप हा ४१०
झाला स्थिर जो होता जैसा चंचल पारावारा
भेटवि मज याच्याचि युक्तिचा अंचळ पारावारा ४११
मग ऋष्यमूक दावुनि सांगे मजले मदसु गळाया
तों मारुति मज भेटवि येथें सु-यशःपद-सुगळा या ४१२
रडविति मज दाखविले सुगळें दयिते जे तव नग ते
वदलों मजविण वांचसिल कमी जानकि खळ-भवन-गते ४१३
तुज चिंतित या प्रस्रवण-नगीं होतों मी घनकाळीं
दिग्वदनें भिववित वहु माझें तरि धिरहीं मन काळीं ४१४

---

[1] सिंधु-उत्तर-तीर-समुद्राचें उत्तर तीर.

ती किष्किंधा सुदति पहावी तीतें पहिला वाळी
आतां माझा हा सुगळ सखा धर्में न्यायें पाळी ४१५
स्व-विमानीं आणविली प्रेमें प्रभु-दयितेनें तारा
दारा कपि-यूथ-पतींच्याही सुगुणा रम्याकारा ४१६
पंपा सरसी दावी प्रभु जें आपण विरह-व्यथितें
तत्तीरीं अनुभविलें होतें श्रीस सविस्तर कथितें ४१७
आश्रम दावी सांगे केला शबरीनें स्वादर तो
कीं निज-भजनीं घेउनि विश्व-प्रेम-सुधा-स्वाद रतो ४१८
प्रभु-उग्र-कबंध-कथा-कथनें श्रीतें आधीं भिववी
मग तन्मनोक्ष[1] तदुक्त-सुकंठ-प्राप्ति-वर्णनें निववी ४१९
पाहुनि नमुनि म्हणे प्रभु देसी सद्गति गोदावरि ती
जीतें श्रवणं करुनि संसारी परमा मोदा वरिती ४२०
सीता नमुनि म्हणे भक्त तुझा मोदा वरि परमेला
तुज भजल्यें त्या पुण्यें माते गोदावरि पर मेला ४२१
गोदेतें प्रेमें दाशरथी ते तोकांपरि पुसती
म्हणती त्वदभक्ता संसारीं देतो कांप रिपु सती ४२२
सीता पंचवटी दल-शाला मुरडुनि बहुदा पाहे
शून्य निरखितां वट अश्रु तिच्या नयनांतुनि बहु वाहे ४२[३]
सुगळ म्हणे सति केला तृप्त स्वपितृसम निवापानें
हें यश म्हणतें सुश्रोत्यांतें सफळ मम निवापानें[2] ४२[४]
श्रीराम म्हणे या ताताचा त्या ताताचा सम जो
तो शतदा स्मरतो स्नेह मला तुज सत्य सख्या समजो ४२[५]
जाणे त्या गृध्रेंद्रीं प्रभुचा प्रेमा बाट विमान
तन्न्यग्रोधा उजवें घाली जातां वाढवि मान ४२[६]

---

1 तन्-मन-अक्ष-त्यासीतेचें मन आणि नेत्र. 2 पितृतर्पणानें.

घटजादि-महर्षींचे जे ते आश्रम दावुनि नमवी
शमवी विरह-श्रम-सुकथांहीं सीतेचें मन रमवी ४२७
अत्र्याश्रम वंदुनि सीतेला प्रभु सांगे नमन करीं
हें यश गाती साधु पडाया गर्वाच्या न मन करीं ४२८
प्रभु कथि म्हणे श्रिता जो मोहा मित्र कूट न गजा ये
भक्षू हरि अहिस नकुळ तो हा चित्रकूट नग जाये ४२९
या श्री-गंगा-यमुना यांचा विश्व-स्तुत संगम हा
भंगे महापापांचा करि दे यन्मारुत भंगे महा ४३०
ती श्रीमती अयोध्या दिसती सीते नमुनि पहावी
मत्-पूर्वज-दयिता सुर-गीता तीस सुदृष्टि वहावी ४३१
सुगळ बिभीषण कपि-यूथप ते देखति नभीं उडूनी
द्विज-राज-पुरी अवलोकावी सादर जेविं उडूनीं ४३२
राहे प्रभु प्रयागीं प्रेमें नमुनि भरद्वाजातें
सांगुनि वृत्त प्रमुदित करि त्या जेविं पित्या आज्यातें ३३
तेथें भरत गुहहि निजभक्त श्रीरामें आठविला
आलों गेसें कळवायाला पवन-तनुज पाठविला ४३४
कपि शृंगिवेर-पाळ-गुहातें भेटे मग भरतातें
तो सुख पावे जें प्राणांतीं अमृत-सरीं भरता तें ४३५
प्रभु वनवास-व्रत प्रयागीं सांग संपवी कपितें
नमुनि निघे गुह-भरत-लोचनें तृप्त कराया तृषितें ४३६
गुह चातकसा पुष्पक घनसा भेटे प्रभुची वृष्टि
सृष्टि सुखानें दाटे वाटे यत्सचि तो प्रभु गृष्टि ४३७
भारी प्रभु-पद-दर्शन-नमन-प्रेमाचा भर भरतें
गणिलें मंदगति विमान मनीं जरि धांवे भरभर तें ४३८

१ नाश. २ तरंग. ३ चंद्रनगरी. ४ नक्षत्रांनी. ५ एकवेळ व्याले लीगाय. + ह्याती.

प्रेमळ गुरु जननीजन सचिव द्विज पौर सर्व दास
भरत अधिक विरहीं बहु पावे शिशु औरस खेदास ४३९
कपिस गमे करि लोक-वृंद तें चातक-कुळ आ. सारें
प्रभुघन तृप्त करी निववी जें दर्शन त्या आसारें ४४०
पुष्पक महिवरि उतरे भेटे प्रभु सानुज भरतातें
प्रथम पादुकांसह उतरुनि घे जो दिधला भर तातें ४१
नमुनि वसिष्ठप्रमुख गुरुजन प्रभुनें बहु हर्षविला
आलिंगुनि आत्मशिरीं प्राज्य प्रेमजळें वर्षविला ४४२
वंदुनि माता तात सचिवही पौर वृद्ध गौरवि तो
भेटुनि पाहुनि सर्वजन असें प्रभु यश शशि-गौर वितो ४३
सुगळ बिभीषण हे भेटविले शत्रुघ्ना भरतातें
ते त्या बहुमानिति ज्या नरुचे दिधला भू-भर तातें ४४४
पुष्प-वृष्टि देवांहीं केली वाजविलीं बहु वाद्यें
आद्यें विधिच्या जग हर्षविलें वेदांत-प्रतिपाद्यें ४४५
नंदिग्रामीं उकलवुनि जटा अनुज सचिव न्हाणविले
जाणविले प्राण बहिश्चरसे सुगळादिहि आणविले ४६
स्नानें करवुनि धरवुनि भूषा-पूषान्वयवररत्नें[2]
मज्जन करुनि भूषणें वरिलीं तानें दिधलीं प्रेत्नें[3] ४४७
कौसल्येनें जैसी सीता तसि गौरविली तारा
थारा केल्या यूथप-दारा स्वंबर-भूषण-भारा ४४८
प्रभुसि सहाय मिळविले होते देवांपरि समरा जे
ते तेजस्वी सुंदर दिसले न प्रभु-हरिसम राजे ४४९
करिवरि हरिसे गमले कपि जे बसणार नगांवरि ते
सौम्य न होतां त्रासें होते तरि काय न गांव रिते ४५०

---

१ धारासंपातें. २ सूर्यवंशश्रेष्ठें. ३ नवीनें.

प्रभुचा प्रवेश साकेतीं जो तो प्राणाचा देहीं
पौर-गृहींच न केवळ सुख तें विधिच्याहि भरे गेहीं ४५१
सुगळा. बिभीषणाला देती रति बरवि प्रासाद
सुखसिद्धि पुरीं स्वर्गीं जसि दे गति वरविश्रा साद ४५२
भरताज्ञेनें कपिवर सुगळें पाठविले जे तूर्ण.
ते कनक-कलश घेउनि आले चतुरंबुधि-जल-पूर्ण ५३
पंच-शत-नदी-सत्तीर्थ-जळें कनक-घट भरुनि भरता
कपिनीं निवेदिले अभिषेका अंगीकारुनि नरता ४५४
त्रिजगदभ्युदयकरसुमुहूर्तीं[1] विश्व-हित-पर महर्षी
वसिष्ठादि करिति श्रीरामीं अभिषेक परम हर्षी ४५५
साकेतीं दिव्य-कुसुम-वृष्टि त्रिदशवर्गानीं केली
दिव्यें वाद्यें नृत्यें गानें बहु वाढे श्री-केली[2] ४५६
सिंहासनीं निरखिला ज्यांहीं श्रीराम श्रीयुक्त
मुक्त प्राणी ते झाले हें तत्वज्ञाचें उक्त ४५७
शक्र अनर्घ्य किरीट सन्मुक्ता-हार पाठवी त्यानें
स्वीकारी प्रभु निज पद देता सहज आटवीत्यानें ४५८
तो देतां हार प्रभुनें श्री त्यातें हस्तीं वाहे
मारुतिकडे मायसी प्रेमें स्वामी देखत पाहे ४५९
श्रीराम म्हणे द्यावा वांटें ज्यासि तया दे हातें
तेंपां मारुतिच्या शोभवि ती मूर्त दया देहातें ४६०
हार न तो त्या दासासि मिळे मूर्त प्रसाद धवळ
जवळ प्रेमें वाहूनि दिला कीं मातेनें कवळ ४६१
सुगळ बिभीषण यांसि मिळाली पूजा जी विततें[3]

१ त्रिजगत्- अभ्युदय- कर- सु-मुहूर्त- त्रैलोक्याची वृद्धी करण्या च्या उत्तम मुहूर्तीं. २ लक्ष्मीची क्रीडा. ३ विस्तार पावलेली.

तेविं प्रेम अपत्यार्थ जसें धरिजे जीवित नातें ४६२
तात तसा जनक श्रीरामें केला प्रमुदित रमला
न समाधिसुखांत म्हणे सगुण श्रेष्ठ नको इतर मला ४६३
आधि- व्याधि-जरा- दारिद्र्य- व्यसन-पंचता-क्लेश
लेश प्रभुच्या राज्यांत नसे संपन्न सुखी देश ४६४
व्याळ व्याघ्र चोर दुर्भिक्ष प्रभुच्या राज्यांत नसे
जन सेविति शिशुसेचि प्रेमें प्रभुचे सुगुण स्तनसे ४६५
घटज कथि पुलस्त्य-सुत विश्रवा तत्सुत दशमुखनामा
तदनुज घटकर्ण बिभीषण हे कैकस्यात्मज रामा ४६६
दुश्चर तप दशवदन करी तो करुनि नव- शिरच्छेद
दे दर्शन-वर विधिस म्हणे हा न धरीं कांहीं खेद ४६७
ब्रम्हा भेटे अयुताब्दांतीं दशम-शिराच्या होमीं
म्हणे इष्ट वर माग पुरवितों काम महाबाहो मी ४६८
नर वानर तुच्छ असें मानी देवाहित काम धरी
मागे सर्वाऽवध्यत्व-वर द्रुहिणहि तें मान्य करी ४६९
देवानीं घटकर्ण भुलविला यास्तव निद्रा मागे
साधु विभीषण धर्मवर वरी विधिच्या पायां लागे ४७०
अग्रज वैश्रवण तयाची घे वर-मत्त-बळें लंका
पीडी जग मोडी मर्यादा तिळही न धरी शंका ४७१
हित कथितां बहु खवळे जैसा दंड-स्पर्शे साप
भंगुनि धनदा तत्पुष्पक घे तो दे दुष्टा शाप ४७२
मर्कट-मुख अवलोकुनि आज्ञा मोडी हांसे पापी
वानर बुडवितिल तुला ऐसें नंदिकेशही शापी ४७३
स्तंभित पुष्पक होतां उपडूं लागे श्री- कैलास
प्रभु तद्भुज चिरडी स्वांगुष्ठें दडपुनि त्या शैलास

दशशत वर्षें गाजविरडतां दशकंठ समस्त वनें
भक्त करी प्रभु जो सर्वत्र प्राज्यदय सम स्तवनें ४७५
धर्षणं करितां वेदवतीही मत्ता दे शापाला
होय दवानळ वात्या करि तो सर्वा देशा पाला ४७६
अनयें भंगी अनरण्या ज्या दिव्यहि विषय न मोही
मत्कुलज राम वधिल तुज असें शापी मत्ता तोही ४७७
किति राजे भंगातें वरिती किति सामातें करिती
कार्तवीर्य अर्जुन वाळी हे दोघे तन्मद हरिती ४७८
यमलोकीं रावण युद्ध करी काळ धरी दंडातें
मद्वर अनृत नसो या वचनें विधि वारी चंडातें ४७९
जे प्रबळ असुरवर सामर्थ्यें त्यांसीं करितां युद्ध
विधि सख्य करा ऐसें सांगे करि शांत अति क्रुद्ध ४८०
वरुण-सुतांतें रावण भंगी समरीं कृत-यत्नातें
दिग्विजय करुनि लंका पावे हरुनि स्त्री-रत्नातें ४८१
धर्में स्नुषा परंतु न चित्तीं कांहीं आणी पाप
रंभेसि बळात्कारें भोगी नळकूवर दे शाप ४८२
स्वर्गीं दशवदन त्रिदशांसीं युद्ध करी बहु भारी
त्या समरीं घननादें धरिला वृत्र-नमुचि-जंभारी ४८३
सोडविला विधिनें तो रामा वाहे मागें झालें
घटज म्हणे सद्यश तुज समरीं त्यासहि मारुनि आलें ८४
घोर अनुज[1] दशवदन घोरतर घनरव घोरतम रणीं
जेणें त्रासविले अमर जसे भिजले घोरत मरणीं ४८५
सानुज तूं विष्णुचि न रजाचें करिता विष्णुसम हित
विधिस शिवासहि झालासि न वा केवळ जिष्णुस महित८६

---

1 कुंभकर्ण.

पूजुनि सुगळ बिभीषण सबळ स्वस्थाना पाठविले
तत्समर- श्रम उपकार बहु श्रीरामें आठविले ४८७
प्राकृत-जन-निंदा-श्रवणें ती साध्वी अंतर्वत्नी
वाल्मीकीच्या आश्रमिं त्यजिली यश रक्षाया पत्नी ४८८
प्रभुचे कुश लव पुत्र हर्षवी सत्कृतजन्म तिघांस
भरवी गुणामृताचे सर्वा जीवा सन्मति घांस ४८९
यमुना-तट-वासि-द्विज-वृंदें परम उपद्रव कथिला
शत्रुघ्नें लवणासुर समरीं प्रभुच्या तेजें मथिला ४९०
कोटित्रय गंधर्वहि भरतें नउठा यासि निजविले
ज्या मत्तांहीं गुरुजनांचे रीति त्यजुनि भिजविले ४९१
प्रकृति-कथा किति धर्मन्यायें बहु निववि श्वानातें
प्रभुचें तोकाः जेविं पित्याचें दे शिव विश्वा नातें ४९२
प्रभु हयमेध करी त्यांत रची जांबूनद-कनकाची
जनकाची कन्या देखति जे न म्हणति ते जन काची ९३
श्रीराम-चरित त्या हयमेधीं गाती कुश लव दोघे
प्रभुहि म्हणे कर्णयुगा सर्व ज्ञाता कुशल वदो घे ९४
वाल्मीकि-छात्र स्वसुत असें निजसारूप्यें कळलें
वळलें प्रभुचें मन अपवादें जें वरि होतें मळलें ४९५
आदिकवि श्रीवाल्मीकि म्हणे त्यजिली कां हे शुद्धा
कैसें होतें साध्वी होती जरि या त्यागें क्रुद्धा ४९६
राम म्हणे स्वामी हें जाणें त्यजिली अपवादानें
करवा दिव्य पुन्हा इष्टाच्या सुरतरु लपवा दानें ४९७
श्री वदली जें व्रत निवटविलें जरि माते महि म्यातें
घे पोटीं गाउत जाणति जे गरिमा ते महिम्यातें ४९८

---

१ गर्भिणी.

ऐसें सांजलि सीता वदली तोंचि वसुमती चिरली
चिर लीला गाया विश्वें ती तीमाजि सती शिरली ४९९
कोपे प्रभु. धरणीवरि तत्व स्मरण करुनि दे धाता
ताता तूं विष्णु श्री सीता त्रैलोक्याची माता ५००
अभिषेचुनि आठां पुत्रांतें दिधलीं राज्यें आठ .
पाठ पुरविते सर्वांरींची ज्यां श्रुति-शास्त्रें पाठ ५०१
द्विज-शिशु उठवी तुरवी कोटें वार्ता अन्यायाची
धन्या याची रीति न कोणी याचक अन्या याची ५०२
सर्व प्रजा विमान-कोटिनीं संतानक-लोकातें
शोकातें वारुनि ने सुखवी तात जसा तोकातें ५०३
स्व-जन-त्राण कराया ठेवी भक्त सुचिरजीवि वर
कीर्तिहि कळिस न दे देउनियां सौख्य रुचिर जी विवर५०४
रामात्मजें मयूरें श्री-राम-पदांसि हात जोडून
रामायण पंचशती वाहिलि सप्रेम वचक सोडून ५०५

समाप्त.

## एकश्लोकीरामायण.

रमापति दयानिधि प्रभु हरी पिता दशरथ-क्ष्मापति करी
दशानन वधा नगकृति वरी यशास्तव धरी जगद्द्वय हरी १

समाप्त.

---

१ आर्यी. २ हरणकर्ता. ३. सुखोद्भूत.

## सीतारामायण.

आर्या- श्री जनक-सुता-सीता- प्रभृति सुखें भेटल्या स्वमा जावा
तत्संवाद वदावा सज्जन पावुनि मह स्व साजावा १

अनु॰ भरताची मांडवी स्त्री लक्ष्मणाचीहि ऊर्मिळा
श्रुतकीर्ति रिपुघ्नाची जगीं यशीति दुर्मिळा २

आर्या पडुनि गळां गंहिवरल्या सीतेच्या कन्यका तशा गमल्या
श्रमल्या विरहें श्रीनें भेटुनि कुरवाळिनां करें शमल्या ३

मा॰ म्हणति सुदिन भाग्यें आजि हें प्राप्त झालें
अमृत परम-रुग्णा वांचवायासि आलें
सुभगिनि चवदा कीं कल्पसे अब्द गेले
स्व-सम सखि निजेनें निष्ठुर स्वप्न केले ४

र॰ वृत्त सर्व सति सांग आपलें सूक्तिनें निविव चित्त तापलें
दर्शनें पुरलि सर्व कामना या नसो श्रवण-काम कीं मना ५

आ॰ आलिंगुनि कुरवाळुनि हुंगुनि शिर पुसुनि लोचनें पदरें
श्री सांगे निज वृत्त श्रवणीं ज्याच्या उरों नयेचि दरें ६

स्र॰ भावोजी चित्रकूटीं परतुनि नगरा न्यावया शीघ्र आले
माझे डोळे तुम्हांतें निरखुनि बहु हे तेधवां तृप्त झाले
स्वामीच्या पादुकांतें वरुनि परतले बोध मानूनि मागें
विप्रांच्या मानिलें हो परम सुख अविघ्नत्व पावोनि यागें ७

आ॰ देउनि अभय मुनीतें आशीर्वाद-प्रसाद जोडून
अत्र्याश्रमासि गेले स्वामी तो चित्रकूट सोडून ८

---

१ अतिरोगिष्ठाला. २ सू- उक्तिनें- उत्तमभाषणानें. ३ भयें. ४ भरत.
* अनुष्टुप्छंद. + मालिनीछंद. ※ रथोद्धताछंद. * स्रग्धराछंद. # कां.

चालति माझ्या मागें लक्ष्मणजी काननीं पुढें स्वामी
धामीं तसीच हर्षे चालें पाहोनि आपल्या स्वा मी ९
जेसे वसिष्ठ गाधिज जेविं भरद्वाज गुरु तसे अत्री,
नमिले शमिलेखवृषभ जे सुधवळ मानसीं जसे पत्री[४] १०.
जेविं भरद्वाज तसे द्रवले पाहोनि तेहि मामाजी
झाले अतितर खरकर कर जेसे भानुचे हिमामाजी ११
तद्भार्या अनसूया मजवरि करि सासु मायसी माया
स्वकरेंचि अलंकारी आहे प्रेमासि काय सीमा या १२

शा. वेणी घालुनि लोचनी निजकरें ती लेववी कज्जळ
लावी चंदन सुव्रता मज गमे गंगाचि तें तज्जळ
गुंफी सत्कुसुमें शिरीं सुरुचिरा माळा गळां अर्पुनी
प्रेमें धर्मकथी सुधाधिक-रसें सूक्तें मला तर्पुनी १३

आ. तेसाचि मल्ललाटीं साध्वी सिंदूर-तिलक जो लावी
तोहि अगत-सार सदा कैसी तनु-सुकृत-सिद्धि बोलावी १४

व. तो अंगराग चिरकाळ तसाचि ओला
यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोला
घ्राणेक्षणासि म्हणती कुसुमेंहि डोला
वेणी नवीच न सती-यश शक्य बोला १५

आ. उष्णा उटी हिमीं ती उष्णींही सर्वकाळ परम हिमा
वृष्टि न मदतिक्रम करि साध्वीचा नवदवेचि पर महिमा १६.

शा. वसे मांडवि मद्विवाह-चरित प्रेमें पुसे ती सती
सांगावी मज लागली निज-मुखें सर्वा कथा तीसती
आशीर्वाद बहु-प्रसन्न-हृदया दे मायसी लोभवी

---

१ धना. २ शमि-लेख-ऋषभ-योगि,देव,यामधें श्रेष्ठ. ३ नावसमगेवरी. ४ पक्षिहंस. ५ मत्-ललाट-माझ्या कपाळीं. ६ घ्राण-ईक्षण-नाकावें पहाणारास. ✱ यत्-सौरभ-ज्याच्यासुगंधीं. + शार्दूलविक्रीडितछंद. ॥ वसंततिलकछंद.

त्या आर्येसि तसेंचि ईसहि महावात्सल्य हें शोभवी १७
ह०+ मग तेथुनि ऊर्मिळे निघाले प्रभु जों दंडक-काननीं रिघाले
धरि राक्षस तो शरीर हातें नच हें हे नसतां शरीं रहातें १८
आ० मी सोडविल्यें मर्मीं ताडुनि उग्रास शर⁑सदोघांहीं
क्षण आपणाहि धरितां दावविला त्यास न रस दोघांहीं १९
ह० मज सोडुनि जेंवि राहु दोघे प्रभु चंद्रार्क तसेचि उग्र तो घे
हृदयांतिल सर्व धीर गेला श्रुतकीर्ते बहु म्या विलाप केला २०
र० स्वामिनीं वधुनि तापसारिला त्या क्षणें सकळ ताप सारिला
हा विराध सुरमान्य तारिला तुंबरु-प्रबळ-शाप वारिला २१
द्रु०≠ मज वनीं प्रभुनीं समजावुनी द्विज-समाज सुतांसम जाउनीं
निववीले मुनिहो बहुमानिती सकळ तात तसे गुण वानिती २२
करि निर्मळ जो तपोनिधी शरभंगाख्य महातपोनिधी
प्रभुनीं गुरुसाचि पाहिला चरणीं मस्तक-पद्म वाहिला २३
उं०⁂ करूनि मत्स्वामिसभाजनातें[1] लावी त्वरा शक्र सभाजनातें
बैसे विमानीं मुनि काय होमीं[2] सांगों तुम्हां अद्भुत काय हो मी २४
आ० एकीं सरीं सु-वाद्य- ध्वनि ऐकुनियां विचारितां कळलें
चळलें दिव्य-विषय रत होउनि मन मांडकर्णिचें[3] मळलें २५
वं०॥ सुतीक्ष्णनामा मुनिराज देखिला षट्-शत्रुनीं जो निजकाळ लेखिला
तसाचि कुंभोद्भव-बंधु सन्मुनी स्वप्नींहि नेणे विषयांसि जन्मुनी २६
स्र० लोपामुद्रा-पति श्री घटजमुनि जिहीं प्राशिला सिंधु अन्या
सांगावी ख्याति काय त्रिभुवन-महिता सत्तपःसिद्धि-जन्या
प्रेमें मानूनि पुत्रापरि रघुवर हे मानिली हेहि कन्या
दिव्यें शस्त्रें दिलीं हो म्हणुनि वरि जयश्री दुजी कीर्ति धन्या २७

---

१ मत्-स्वामि-सभाजन- माझा धनी जो राम त्याचें पूजन. २ होम करितांचि. ३ नाम विशेष ऋषित्याचें. + हरिणीप्लुता छंद. ≠ द्रुतविलंबित छंद. ⁂ उपेंद्रवज्रा छंद. ॥ वंशस्थ छंद. ⁑ शर-सत्-ओघ- बाणाच्या उत्तम ओघानीं.

आ० त्यावरि मामाजींचे गृध्रेंद्र सखे जटायु यानावें
स्नेहाब्धि भेटले हो त्यांचें साधुत्व काय वानावें २८

ह० विनयें करितांचि वंदनातें द्रवले भेटुनि जेविं नंदनातें
प्रभु मानिति गेह काननातें निववी तें बहु देह काननातें २९

शा० आम्हांतें वदले स्व-तात-सदना आलां सुखें यावनीं
वनीं पंचवटी-स्थळीं मुनि-नुतीं गोदा-तटीं पावनीं
मत्स्वामी विनयें असें विनविती बा हे स्नुषा आपली
रक्षावी समर्थां निवो मति इची स्वादर्शनें तापली ३०

आ० वदले ते मामाजी स्वस्थ तपा मंत्र जा जपा सून
रक्षिन दंडक-वन-पति मी व्हा निश्चिंत आजपासून ३१

शा० स्वामी मातें नेति गोदावरीतें यद्यानेंही चित्त मोदा वरीतें
भावोजींनीं निर्मिली पर्णशाला तेंसें देना रत्न वा स्वर्ण शाला ३२

आ० निववी मज मातासी श्रीमत्र्यंबकजटोद्भवा गंगा
स्मरणें स्तवनें स्नानें शुचि करिती विश्वचित्तवागंगा ३३

ये म्हणवाया भेटुनि शोक-घनें वत्स हा तदा विवशी
स्वाम्याज्ञेनें तीतें हा लक्ष्मण वत्स हात दावि वशी ३४

स्र० श्रीसीतेतें तिघीही पुसति सुभगिनी प्रेमळा जेविं आली
कोणाची कोण गे ती मळ-मति विवशी सांग कोठूनि आली
दुष्टेनें काय केलें सुमुखि सकळही वृत्त तें आयकों दे
बाई दुःखें सुखेंही चरित परिसतां आमुचा काय कोंदे ३५

शा० सांगे भूमि-सुता दशास्य-भगिनी मांसाशनें मातली
नामें शूर्पणखा कुबुद्धि विधवा नक्तंचरी पातली
माया-रूपवती प्रभूंमि भुलली मोहीं स्मरें घातली

१ स्व-अदर्शन-आपल्या अदर्शनानें. २ सुखाला. ३ विश्व-चित्त-वाक्-अंग-जगाचें मन, वाणी, अंग यांला. ४ वक्षस्थल. ५ सखी. ६ देह. + शालिनी छंद. ‡ "आनें गानें पानें" असाही पाठ आहे. ‡‡ जितेंद्रिय, यांणी.
* दुर्दशेची अभिमानिनी एक देवता आहे.

⁂ ती त्यांच्याहि गळां पडे मति तुझी ज्यांचा पदीं शतली ३६

शि० मला आहे स्त्री हो मदनुजनि- सौमित्रि- दयिता
वधू तूं योग्या त्या सुमुखि गुणरू#पातिशयिता
असें स्वामी तीनें कथिति हित ती मानुनि भजा
म्हणे मातें त्यांतें तिस म्हणति ते भानु- निभ जा ३७

स्र० या आर्यांच्या पदाचा सुदति सतत मी दास तूं काय दासी
होसी मत्स्वामिनी हो सुमुखि भज तया मानदा कांय‡दासी[१]
ऐसें जें उर्मिळे त्वत्प्रियतम वदला ये पुन्हा तन्मना तें
लावूं पाहे प्रभूंसीं समुचित नसतां सद्यशा जन्म नातें ३८

पृ० प्रभूंसि कळली खरप्रकृति रम्य- कोपा सुरी
तसी वरि बरी जसी रुचिर- मूर्ति योषा सुरी[२]
गमे मजहि धी गुणीं जरिहि रंगली लाज न
त्यजी सुकुलज स्वयें नुघडि अंगलीला जन ३९

भु० प्रभूंतें म्हणे हे पहा आंग लीला- वती मी वरावें मला चांगलीला
स्तवी दाखवी ती सये आ#स्य काय स्वयें तें पहातां नये हास्य कांय[३] ४०

आ० कृत्यासी कुद्धा ती माझ्या मंदेंहि केलि[४]गेहास्यें
प्रभु देखतांहि धांवे मज खाया भीतिकेलिगेहास्यें ४१
भ्यालें मी स्वामीनीं हूं म्हणतां क्रोध- मद तिचा मथिला
लक्ष्मण- भावोजींनीं केला जो दंड तो तुम्हां कथिला ४२

भु० कथूं दुर्दशा ती तिची काय गे हीं वदे स्वापराधें कुधी जाय गेहा
खरा बंधुला अन्यथा आरडोनी स्वयें ताप सांगे करीं आरडोनी ४३
जनस्थान- वासी खर क्रूरकर्मा नपाहे नया जो विचारी न शर्मा
स्व- सैन्यासि आज्ञा कुधी दे वधाया प्रभू सिद्ध झाले यशें देव धाया

---

१ सुंदरस्थानजीलाअसी. २ देवांगना. ३ प्रश्नार्थक अव्यय. ४ भीति-केलि- गेह- आस्य- भयाच्याक्रीडेचें घर असा तुरेखें. + पृथ्वीछंद. ++ भुजंगप्रयात छंद. # गुण, रूप यांहीं करून उत्कर्ष पावणारी ‡ शरीरदेणाऱ्यासि.
## मुख. ⁂ हात. ⁂ शिखरिणी छंद.

शा० प्रेमें लक्ष्मणजींसि सांगति रणारंभीच मद्रक्षण
स्वामी लाविति न हिपद्दलवधें व्हायासि भद्रक्षण
हे.तार्क्ष्य प्रभु ते चतुर्दशसहस्र क्रव्यभोक्ते अही
बाई देखिलि दूरुनींहि रुधिरें धाली निवाली मही ४५

+
मं० मारूं ये जो स्वामि-शरें तो खर मेला
वाटे झाला दुष्ट-वधें तोख रमेला
माता माझी बुद्दि तदा भावि दीरीनें
चिंती दावी जें धृतलोभा विदरी तें ४६

अ० भावोजीनीं खोटजातें नगीं रक्षुनि आणिलें
स्वामीनीं दृष्टि-पीयूष- वृष्टिनें मज न्हाणिलें ४७

पु० स्वमुख अवदसा तसेंहि दावी नधरुनि लाज कुलागतीस लाथी
प्रकटुनि बळ पुष्करास साचें करिति भयें मुख शुष्क राक्षसाचें ४८

व० माया-सुवर्ण-मृग राक्षस त्या खलानें
जो धाडिला परम रम्य विशृंखलानें
तो वाटला निरखितां मजला धगवा
न्यावा पुरा स्वजन सर्व सुखी करावा ४९

स्वा० द्या म्हणे सुरुचिरा हरिणा मी वाड दृष्टि नदिली परिणामीं
सोडिली निपट भीड सतीहो आग्रहें तिपट भी डमती हो ५०

आ० देऊनि चाप भाते वदल्यें लांबेल मृग धरा जाच
ठेवुनि लक्ष्मणजीतें गेले स्त्रीचा नव्हे बरा जाच ५१

पृ० पळे मृग कळे छळ प्रभु तया शरें ताडिती
हरूनि असु काननीं अरिस वाड हो पाडिती
तशांत खळ हाक दे प्रभुवर- स्वगसारखी

१ संतोष. २ गांजणूक. + मत्तमयूरछंद. ≠ स्वागता छंद. ॥ पुहेतें. ⊕ धरिला लोभजीणें असी. ⁂ विरूपस्त्री. ✶ उन्मत्तानें, आडकांठि ज्याला नाहीं अशानें. ⁂ पुष्पिताग्रा छंद.

खरेंचि म्हणती श्रुती मनिंहि जें बरें पारखी ५२

**शा०** हा सीते हा लक्ष्मणा यापरीची दीना वाणी ऐकिली म्या अशीची
बाई हो ती मद्विचारासि मोडी धैर्या[1] सोडी शोक चित्तांत जोडी ५३

**आ०** वदल्यें मी लक्ष्मणजि स्वाम्यस्रसंरक्षणार्थ[1] धांवा हो
धांवा हो विपदोघीं[2] म्हणतां सर्वस्व भव्य कां वाहो ५४

तों भावोजी वदले आर्ये हें स्पष्ट राक्षस-च्छद्म
पद्म-च्छदाक्ष आहे विजय-श्री-नित्य-केलिचें सद्म ५५

गमलें लक्ष्मणजींचें वच कटु मधुरहि असत्य सत्यहि तें
त्यांतें वदल्यें वचनें हृदय विदारावयासि अत्यहितें[3] ५६

**अ०** ताप तें ऐकतां आर्ते हा केला कां न रक्षण
करिता दाळिता साधु हा केला कां नर क्षण ५७

**स्वा०** वर्ततो मदभिलाष मनात तूं तरीच सिरलास वनांत
जींत उग्रतरता[4] असिवाणी[5] मन्मुखांतुनि निघे असि वाणी ५८

**आ०** क्रोधें केलें छिन्न प्रेम हृदय दुष्ट-वाक्-शरें भिन्न
त्रासें झाले खिन्न- स्वांत महासाधु कंपित स्विन्न[6] ५९

नमुनि मला साश्रु निघुनि धरुनि विकळ-मानस त्वरा गेले
मजवरि न नियतिवरि[7] हे कवि शिखरि-समान-सत्व रागेले ६०

भ्रमल्यें भाविबळें मीं बाई कोणासही न गांजावें
साधु-पुरुष-च्छळें तों स्थैर्यें सोडुनि मही नगां जावें ६१

**शा०** गेले लक्ष्मणजी त्यजूनि उटजा जों तोंचि ओका[8] यती[9]
तैसा ये दशकंठ दाखवि तनू जी उग्र तो काय ती
सांगावी भयदा तरी नवदल्यें पावोनि मी कांप हा

---

१ स्वामि- अस्र- संरक्षण-अर्थ- पतिजो राम त्याच्या प्राण रक्षणार्थ. २ विपत्- ओघ- विपत्तीच्या प्रवाहीं. ३ अति- अहितें- अतिदुष्टें असीं. ४ अति उग्रत्व. ५ तलंवारीसारिखी. ६ घर्मयुक्त. ७ दैवावर. ८ गृहा. ९ सन्यासी. + खिन्नमन.

मंदहोवे परि तेज सोडिल निज ज्वाला हिमीं कां पहा ६२

चा० म्या वदोनि शर्म-हेतु धर्म-मार्ग दाविला
स्थापितां निजीं रथां वळें कुबुद्धि शापिला
ने नभःपथें मला प्रभूंसि हाक मारिली
दूर शूर ते तिहीं भयांत हे न तारिली ६३

आ० ऐकोनियां सुनेची हाक द्रवले जटायु-मामाजी
धांवुनि येतां नम्हणे जिव्हा सोडूनि भीति हा माजी ६४

शा० त्यांच्या षष्टिसहस्र वत्सर वया नाहीं तरी भागले
युद्धीं दिग्वदना करूनि विरथ क्रोधें वधूं लागले
मामाजी मज सोडवूनि विजयी झाले खळें ताडिले
खड्गें पक्ष मदश्रु-विंदु-सह ते क्षोणीतळीं पाडिले ६५

भु० अधर्मे असा हा करी घात मोठा मला जाय घेऊनि अत्यंत खोटा
नग स्वोत्तरीयांत बांधूनि शोधा कपींमाजि म्या सोडिले आत्मबोधा

आ० लंघुनि बहु-नग-गहनें जलनिधि सोडूनि मरण-वांकेला
लंकेला खळ गेला वेगें घेउनि मला विपंकेला ६७

स्वा० ताप दे बहु निशाचर मेळा जेविं अद्भुत पिशाच रमेला
राक्षसी करिति रक्षण दासी होय ती स्थिति चिर क्षणदासी ६८

आ० स्वामीचा मज नकळे माझा स्वामीसही समाचार
सोसित होत्यें सर्वें अहितांचे मी महीसमा चार ६९

शा० सुज्ञाना सरमा बिभीषण-वधू विद्याचि माना कळा
तत्कन्या त्रिजटाहि रंजवि जसी गानाभिधाना कळा
चिंतीं लक्ष्मणजीसमेत सतत स्वामींस मी चातकी
जैसी जीवनदासि बाइ तिळही तो नद्रवे पातकी ७०

मं० मामाजींचे शतमख सखे धाडिती अन्नपात्र

1 स्व-उत्तरीय-आपल्या अंगवस्त्रांत. 2 चेष्टा. + मंदाक्रांत छंद. ‡ मंदहोऊ. †† रात्रीसी. ‡‡ नामविशेष सरमेची कन्या.

स्वामीतें मी स्मरत कवळीं तत्प्रिया ग्रासमात्र
केलें देहाऽवन मुनि-सती-निर्मितें अंगरागें
चिंती चित्त प्रभु-जय सदा शत्रुचा भंग रागें ७१

आ० चोरुनि अमरारखूंचा नरभंकांचा मला बळें अहि ने
लंकेंत अशोकवनीं रोधी तों बहुत लोटले महिने ७२
एकाकाळीं रात्रीं प्रार्थी तो परम-दुर्मिळेस मज
पति-भक्ति-बळें नाहीं गडवडल्यें सत्य ऊर्मिळे समज ७३
प्रत्यक्ष दुर्जनाशीं बोलायाचा प्रसंग पडला गे
वत्से मांडवि बाई श्रुतकीर्ते तें मनास जड लागे ७४

शा० काडी आड करूनि चिंतुनि मुनि-स्त्री-तारकें पावलें
तेजानें वदल्यें विशंक समयीं जें सत्य तें पावलें
कां श्रीमत्-पर-दार-संग रुचला रे यांत्र मूढा सळी
काम क्रोधहि अन्य काय बुडवी देवां चमू ढांसळी ७५

पु० बुडसि करुनियां महापराधा नमुनि विभूसि पहा महापरार्धा
समजुनि बळ कां असावधान प्रभु चुकतील नसें असावधान ७६
भ्रमसि खर-विनाश आयकोनीं स्व-युवति बैसविणार काय कोनीं
हट मद करि घात थोर टाकीं प्रभु रघुनायक तूंहि चोरटा कीं ७७
स्मर-पुर-हर-चाप-भंग केला सहज सहस्त्र-भुज-घ्न-गर्व गेला
खर खर खरसा पळांत मेला तरिहि तव भ्रम कां नसाचि ठेला ७८

स्व० बोले तो राक्षसी हो हित कथुनि पहा हे सुरामा सखा या
राया मास-द्वयेंही नकरि तरि इचें द्या सुरा मास खाया ७९
गेला मेला वदोनि श्रुतिकटु मग त्या गांजिल्यें बायकांनीं
प्याले मत्कर्ण घालूं गरळ तुमचिया वाइ तें काय कानीं ७९

---

१ प्राप्त होण्यास कठीण असीस. २ पदें. ३ तेजा. ४ वृसव्हा. ५ प्रखर, तीक्ष्ण. ६ नामविशेष राक्षस. + सहस्त्रार्जुनाला मारणाऱ्या परशुरामाचा गर्व. ⁂ चंदनाच्या उटीनें. ‡ गर्दभसा.

अ० त्या कृत्याचि तयांमध्यें त्रिजटा बाइ हो भली
क्षोभली ती न धात्रीसी लोभली फार शोभली ८०

आ० उद्वंधनें मराया मग वेण्युद्ग्रथनसुगुण हे उकली
तों मारुति मुद्रा दे मृतिची वेळा म्हणोनि ती चुकली ८१

व० हा वातभू कुशळ वृत्त समग्र सांगे
दे हर्ष जेविं जवळ स्वकुमार रांगे
जे मन्मनोरथ महाधिगदार्त पांगे
झाले समर्थ अमृतें उठतील कां गे ८२

आ० मज चवथे भावोजी सुगळ मिळाले वनीं असें कळलें
टळलें व्यसन उजळलें यश मद्धरणें करूनि जें मळलें ८३

शि० मिळालीं उत्साहें बहु कपि-बळें ऋक्ष-कटकें
कळे वाटे केली मजवरि दया विश्व-घटकें
खुणेला म्या चूडामणि निज दिला जा न अटकें
म्हणे या हा भासे जनकचि वदावें न लटकें ८४

शा० जोडी हात मला निघे पवनभू स्वाडी करी हा बळें
मोडी वृक्ष सुरम्य जे उपवनीं झोडी अरींचीं बळें
तोडी मस्तक लक्ष राक्षस रणीं सोडी न एकासही
थोडी यातुचमू उरे बहु असृग्गोडी सुरेखे मही ८५

वै० गाती प्रेमें देवता अक्षमेला याच्या हस्तें जेधवां अक्ष मेला
ज्यातें वैरी पाठवी रक्षणांत स्वीया देती पाठ वीर क्षणांत ८६

अ० धरूं दे मेघनादा हा व्याघ्र तो शश काय ती
लीला शक्तहि पीडूं दे पुण्यार्थी नशका यती ८७
वदल्या रागें राक्षेसी कपि नेतां बांधून
आंबासा-हिरवा बरा खावा कां रांधून ८८

१ सैन्यें. २ राक्षससेना. ३ असृक्-गोडी-रक्ताची गोडी. ४ न मांसपणा पर्णा ला. + वैश्वदेवीक ≠ गळफांसानें. ‡ वेणी-उत्-ग्रथन-वेणी गुंफण्या विषयीं जे चांगले असे ‡ महा-आधि-गद-आर्त-महत्व्याधि रूपरोगानें पीडित असे ∗ मन-हरण-मांझ्याने ण्यानें. ∗∗ स्वकीया-आपली.

शा० पावे मारुति धर्म-नीति-रहिता पाहे असारा सभा
मानी त्यी अति तुच्छ सुच्छवि कपी वाजी जसा रासभा
वर्णी स्वामि-भुज-प्रताप करुनि न्यायेंचि धिक्कार हा
सांगे वादलि कामवृत्ति न म्हणे कीं सासुहिकार हा ९
मारा या कपिला दशास्य असितें घे घोरकर्मा सये
प्रार्थी साधु बिभीषण क्षितिपते हा दूत मारूं नये
वैरी पेटवि पुच्छ बाइ सरमा सांगे तदा अंजली
केला त्या ज्वलनासि कीं महित जे तद्धी स्तवीं रंजली १०
स्व० ज्या मत्ता राक्षसांच्या पेट अतिकुतुकें होय हास्या सभाजी
तीला त्यांच्या तयांच्या मळ-मति-पतिच्या त्यांहि आस्यांस भाजी
तेजें सर्वांसि पोळी करि कनकपुरी हा कृती वत्स होळी
याच्या पुच्छा नपोळी दहन खळ सये हो म्हणे हात चोळी ११
उ० बिभीषणाच्या परिरक्षि गेहा पुन्हां मला येउनि लक्षि गेहा
देवर्षि दे या बहु तोरव गानें वाटे नकेला रंय तो खगानें १२
आ० सांगों काय स्थें दे जें सुख चित्तास वत्स माझ्या तें
प्रभुतें मणिनें जैसें बोधें देवर्षि-सत्त माझ्यातें १३
व० रक्षू मला करुनियां अरि-हानि रोपं
स्वामीस सिद्ध सखिहो करि हा निरोप
आले महाकपि-चमूंसह सागरातें
घ्याया पराशु शिवसे सहसा गरातें १४
शा० धर्मन्याय मतें बिभीषण सभेमध्यें वदे साम या
धिक्कारी खळ भाग भेषज गतायुष्का नदे सामया
त्या लंका प्रभुनीं पदाब्ज नमितां वारूनि कंपा दिली

---

१ पूज्य. २ पात्र. ३ त्यासमेला. ४ राक्षसांच्या. ५ रावणाच्या. ६ हाय. ७ वेग. ८ विपातें. ९ औषध. १० आयुष्य ज्याचें सरलें अशा. ११ स-[illegible]-रोगयुक्ताला. * बाण. + रावणा. ‡ उचकी जाते [illegible] कार हा असें [illegible] मारिले.

हे भारी शरणागतीं द्रवुनियां सत्कीर्ति संपादिली ९५
ज्याला सागर भेटला नळकरें जो सेतु केला सये
तो सांगे शरण प्रभूंसि कुमते जों तूं न मेलास ये
गांवें शंभर लांब रुंद दश हा अत्यद्भुत शोभला
क्षोणी-बाहु गमे सुता-हर-पर-व्यापादना लोभला ९६
माया-निर्मित चाप-मस्तक मला दिक्कंधरें दाविलें
या माज्या नयनें मनेंहि सहसा तें सत्यसें भाविलें
बाई काय कथूं खळें हृदय हें शोकानळें ताविलें
दुष्टें एक मुहूर्त अश्रु सहसा सोडावया लाविलें ९७

अ० हे माया हें कथि करी सरमा परमादर
आले स्वामी तुझे ऐसें कळवी पळवी दर[1] ९८

पु० सुगळ मथिति रावणा[2] सुवेळा वरुनि उडोनि सये तदा सुवेळा
प्रभुवर वदले सख्या नयज्ञा समुचित साहस होय या न यज्ञा ९९

आ० स्वामीनीं श्रित-शर्मद धर्म दया करुनि सनय आठविला
या ताराबाईचा सुत अंगद पूत दूत पाठविला १००
धर्मज्ञ-नयज्ञ-कुशळ ऐसा लोकांत बोलका नाहीं
परि त्या अरिनें याचा एकहि वरिला न बोल कानाहीं १०१
वदला घेउनि देवी प्रभुच्या चरणासि चाल वंदाया
मंदा याद जलधिसीं विटतां वांचविल कोण धंदा या १०२

शा० कोपे दुष्ट म्हणे धराचि चवघे बाहुद्वया झोंबले
तों हा अंगद वत्स जाय गगनीं क्रव्याद ते लोंबले
वेगें जाउनि दूर भव्य भुज या शूर-सुतें झाडिले
झाले पंक धरा-नखीं सकळही तत्काळ जे पाडिले १०३

---

१ भय. २ नामर्धिशेषपर्यंत त्याला.

स्वा० बाइहो करुनि तें पुर रुद्ध क्रुद्ध वीर करिती बहु युद्ध
वाहती जरिहि शोणित-पूर क्रूर हाय नम्हणे रणशूर ४

शा० ज्या वृत्रारि-चमू-समूह समरीं दे पाठ वीरा वण,
स्वांगीं जो पविचे प्रहस्त मिरवी त्या पाठवी रावण
सेनानीं प्रथमाहवींच खपला घेऊनि सैन्यास हा
बोले पावुनि भंग हीन कटका देऊनि दैन्या सहा १०५
त्याचा दारुण इंद्रजित्कृत सये युद्धांत माया-बळें
कीशांचीं अति शोक पावुनि पळें सारीं शमाया बळें
विस्तारूनि भुजंग-पाश समरीं स्वामीस बांधी सये
स्वोत्कर्षे मग उद्धतत्व अरिच्या तेव्हां न कां धीस ये १०६
केले लक्ष्मणजीहि बद्ध अहिनीं मर्म-स्थळीं चाविले
दोघांनींहि सुनेत्रपद्म मुलिहो मूर्छाभरें लाविले
दासीनीं मज पुष्पकीं बसवुनि त्रासावया दाविले
शोकें मी रडल्यें बहु व्यसनचि मत्स्वांतें सये भाविले १०७

आ० सत्संगतिसी त्रिजटा नाशी बोधें करूनि मन्मोहा
यदलि महाभागे या मायेनें त्वन्मुखीं न जन्मो हा १०८

स्र० मातें घेऊनि गेल्या फिरूनि उपवनीं राक्षसी नागपाशा
संपूर्णा यत्प्रसादें करुनि परि हरी तत्सखा नागपाशा
दोघांचे देह केले स्वकर फिरवुनि स्वस्थ तत्काळ जेला
सर्वां साधूंसि मोटा मह दशमुख जो ताप तत्काळ जाला १०९
तेव्हां तो कुंभकर्णा उठवि अहित कीं यत्न कांहीं नचाले
मत्स्वामी सानुजन्मे कटकसह पुन्हां संगरा सिद्ध झाले
भ्याले उग्या पहातां कपि सकळ सये काळसा वाटला गे
प्राण-त्राणा धरावी त्यजुनि रण तयां सेतुची वाट लागे ११०

---

१ नाग-प-आशा-गजेंद्राचीइच्छा. २ झाला. + सोस. ∷ मत्-स्वांत-माझ्यामनानें.

शि० कळेच्या तातानें निपुण[1] कथिलें हें बुजवणें
फिरावें त्यांहीं ज्यां स्वजनु पति-कार्यें उजवणें
धरी सुग्रीवातें पळवुनि भयें सर्व परते
सये बाई तेव्हां सकळ धरिती गर्व पर ते १११

आ० मूर्छा जातां हरिती तन्नासा-श्रुति सुकंठ-भावोजी
ती यांसहि दे समयीं प्रेमें श्रीनरहरींस भा[2]वोजी ११२

पृ० खिजोनि परते अरी गिळि नचावितांही हरी
कितेक पळती परी वरुनि कर्ण-नासा-[3]दरी
अनर्थ बहु तो करी नळ-वनांत जैसा करी
गति प्रभु बरोबरी करि तयासि दे ती बरी ११३

आ० तच्छिर बाहु चरण हे कटकांचे स्पष्ट काळसे तुकडे
मृत-घटकर्णायद्रुत पळती कपि-यूथ-पाळ-सेतुकडे[4] ११४

स्वा० #अर्यनिष्ट कळवी सरमा जें होय तापहर नें सर मांजें
तो वदे विकळ-मानस हाय ध्वंसतां असुसमान सहाय ११५

+स्र० इंद्रजित् पुत्र तद्बुद्धि भेदी रहा स्वस्थ ऐसें वदे मूढ दे धीर हा
श्मश्रु हातें पिळी वीर सारे खिळी मोह सेना गिळी खंडि खड्गा थिळी[?] ११६

शा० स्वामी लक्ष्मणजी सुकंठ अवघे शस्त्र-व्रजें ताडिले
शल्यार्त क्षणदाचरेश्वर-सुतें निःप्राणसे पाडिले
होता सावध वत्स मारुति सुधी कीं हा कलानातमी
सांगे नेमकसें धरूनि फिरले हस्तीं अलाता नमीं ११७
मामाजींसम वृद्ध मान्य सकळां ऋक्षेंद्र हे ओषधी
आणाया पवनात्मजासि कथिती पावावया तोप धी
कैलासा-जवळील शृंग गिरिचें वत्सें पळें आणिलें
केलें सर्व विशल्य निर्व्रण वळ प्रेमाश्रुनीं न्हाणिलें ११८

१ आपलेंजन्म. २ वानर. ३ हत्ति ४ माझें. + स्रग्विणी छंद. * काणी हाक मारिली असतां जें प्रतिवचन नी. # अरि-अनिष्ट-शत्रूनें केलेलें अप्रिय. ## इळी भाजी चिरण्याचें शस्त्र. ### कोलिताला.

स्र० प्रेमार्द्रा मांडवी तों वदलि सकटकां नायकां जीवदाना
दे हा सत्कीर्ति याची अमृत अमृत त्या काय कांजी वदाना
सात्वें सौभाग्य रक्षी पवन-सुत असें बोलिली ऊर्मिळा तें
बोले अन्याहि हा हो सुसदभिमत जें पात्र त्या दुर्मिळातें ११९

पृ० म्हणे, जनकजा प्रभु स्व-कटकासि आज्ञापिती
सुधा तृषित तेविं ती सकळ वीर आज्ञा पिती
प्रताप-दहनीं महें करिति वैरि-होमा* रणीं
निज क्षत न पाहती सुभट बाड हो मारणीं १२०

उ० असंख्य युद्धीं अरि लोळवीले स्वर्गासि बाई बहु बोळवीले
मायाबळें दारवि मत्त मातें मारूनि मोही प्रभु-सत्तमातें १२१

आ० जो अरि लक्ष्मणजीनीं साधु-बिभीषण-मतें रणीं वधिला
सखि काढिला शर-करें हृच्छ्या कांटाचि काळजामधिला १२२
बसता अग्नि-भव-रथीं होता अरि अमरकाय होम-रता
विघ्न न करिते जरि तरि करितां चिर समर काय हो मरता १२३

अ० वर-श्री-मत्त नम्हणे जो सामा अनघा बरें
त्या पाप्याचें पुत्रशोकें जाहलें मन घाबरें १२४

आ० भावी न स्व-कुमतितें ‡ मानेंचि अनर्थ-मूळ तो पापी
ये खड्गासि म्हणाया मत्कंठ-रुधिर धरूनि कोपा पी १२५

स्वा० हो म्हणे अघ असा वध मातें त्या कुबुद्धिस असा वध मातें
प्राप्त होय परि मज्जनकाचें पुण्य बोलति न सज्जन काचें १२६

†उ० स्वर्गासि ज्याहीं नत पाठवीले ते म्या मनांत प्रभु आठवीले
वारी अरातीस सुपार्श्वनामा त्याचा प्रधानोत्तम शुद्ध-धामा १२७

वि० पाठवी मग तो शताधिक कोटि सैन्य वदे वधा
मर्त्य वानर खाचि तेहि कुधी उरोत न देव धा

---

१ मळा. + उपजाति छंद. ‡ मजप्रतीच.

त्या बळा बुडवी प्रभूत्तमबाणवार[1] समुद्रसा
होय तल्क्षितजें भिजोनि निवोनि फार समुद्रसा[2] २८
भु० प्रभूनीं रणीं दाविलें रुद्र-सत्व स्व-वीर-रसातें दिलें उद्रसत्व[3]
पुरीं न स्त्रियांचा महा हाय माये नवा धैर्य घाया महा हायमा ये[4] २९
शा० मारावे अरि सर्व आपण रणीं किंवा मरावें, असा
चित्तामाजि करूनि निश्चय निघे तो दुष्ट कांपे रसा
क्रुद्ध व्याघ्रचि रावण क्षण रणीं कीं शौर्य भासे ससा
पाडी लक्ष्मणजीस शक्ति अरिची जी स्पष्ट काळ स्वसा ३०
अ० भंगूनि शत्रुतें स्वामी शक्ति काढुनि मोडिती
वदोनि बंधु-शोकें हा दीर्घ उच्छ्वास सोडिती १३१
आ० हा साधु वत्स आणी ओषधि-शृंगासमेत पुनरपि त्या
निववी स्वयशें प्रभुसह सज्जन-निकरासि जेविं सुनर पित्या ३२
शा० युद्धीं भूमिवरि प्रभूंसि सुरथीं दिक्कुंधरा पाहिलें
शक्राच्या सखि हो न तें अनुचित स्वांतें तदा साहिलें
प्रेमें मातलिनें शतक्रतु-रथीं प्रार्थूनियां वाहिलें
तेव्हां राक्षस-सैन्य-रक्त विपुल क्षोणीतळीं वाहिलें १३३
होय द्वैरथ-युद्ध रावण-शर स्वामींमहीं लागले
स्वामींचे शर दिङ्मुखासहि न हे दोघे भये भागले
सप्ताहर्निश निर्निमेष अतुळीं त्या अध्वरीं जागले
तेव्हां वात न बाण-रुद्ध-गगनीं सूर्यांशुही यागले[5] १३४
ख्वा० खंडिलीं शत शिरें परं तो न प्रेत होय उठलीं परं तोन
ग्लानि लेशहि शिवे नच काया लाविनाच हृदया वचकाया ३५
आ० कुंभज-मामाजीनीं केला मंत्रोपदेश समरांत
उर भेदुनि अरि वधितां जय जय हा शब्द होय अमरांत ३६

---

१ रामचंद्राचा बाणसमुदाय किंवा कवच. २ समुद्र-रसा-आनंद युक्त पृथ्वी. ३ दि. वस. ४ उत्सया. ५ यातलें. ✱ उत्-रसत्व-उत्कृष्टरसपणा. + तत्-क्षतज-त्या सैन्याच्या रक्तें.

व० झाली प्रभूत्तम-शिरीं वर पुष्पवृष्टि
स्वर्वाद्य-नाद भरि तत्क्षण सर्व सृष्टि
देवांगना करिति हर्षित-बुद्धि नृत्यें
गंधर्व गाति मधुरस्वर पुण्य-कृत्यें १३७
स०देव मुनि स्तविती पवमान सुमंद सुगंध सुशीतळ वाहे
प्रेरुनि साधु बिभीषण शत्रुहि उद्धरिला पुर शोक न राहे
त्या दशकंठ-पदीं सरमा-पति बैसवितां कपि वर्णिति या हे
बाइ दया इतरत्र दिसे प्रभु-हृत्कमळीं परि संतत आहे १३८
आ०स्वामीनीं पाठविला मारुति मच्चित्त-ताप पळवाया
कळवाया प्रिय बाई कीं करि देहा वियोग पळवा या १३९
माशुनि विभु-विजय-कथा ज्या सन्मलिनीस सेविती सदली
पद-लीना या बा तुज योग्य नसे देय हें असें वदली १४०
शा० मार्थी मारुति गांजिलें तुज जिहीं त्या या महापापिणी
दासी दुर्मति राक्षसी वधिन मी पक्षींद्रसा सापिणी
मेला यांजक अस्वतंत्र जन हा बापा न दीनावरी
क्षोभावें वदल्यें असें अघ करीं आपा नदी नावरी १४१
आ० हें ऐकुनि मज बाई सुविचक्षण आंजनेय कर जोडी
बोले जेविं स्वामी पुण्ययशाची अशीच कर जोडी १४२
अ० निरोप म्या पाठविला दावा चरण-सारसें
वियोग-तापें गमलें मना मरण सारसें १४३
आ०आज्ञा होय बिभीषण आले घेऊनि नव्य-शिबिकेला
नेउनि दारवविले ते यत्स्मरणें प्राम-भव्य-शिबि केला १४४
शा० तों स्वामी वदले हरी सुरुचिरा कांरागुणें या तुतें
तद्देहीं वसलीस तूं चिर न दुःशीलें उणें यातु तें

१ मी सीता. २ हात. ३ अतिसुंदरा. ४ बंदिशाळा+ वाळविलेली पाले भाजी.

केला तद्वध कीर्ति-शुद्धि-करितां वंश-प्रभावा रण
त्वत्स्वीकार करील पूर्वज-यशश्चंद्र-प्रभा-वारण १४५

आ० स्वामी सर्वज्ञचि परि जपती निंदक-यशा विराळाया
त्या दिव्य म्हणुनि केलें प्राकृत जनसें यशा पिटाळाया. १४६

दहनीं मुहूर्त होती हे स्पष्ट गमे ऱ्हदींच तनु गांगीं
प्रभु-नामें न मदंगीं साधूंच्या जेविं ताप अनुगांगीं १४७

स्र० होतें मी अग्नि-कुंडीं प्रमुदित-ऱ्हदया जेविं पाटीर-पंकीं
स्वामीच्या मूर्तिधारी दहन मज सये स्थापिता होय अंकीं
राहे नाथ-प्रसादें असुरव न निधिनें जेविं रंकत्व रंकीं
तेव्हां माझ्या नमावे मह-भर सखि हो मानसीं त्यक्त-शंकीं

तों मामाजी विमानीं बसुनि तरणिसे शक्रसे पातले रवे
व्यापूनि स्वप्रकाशें स्तविति बहु तयां जोडिती हात लेख
त्यांहीं स्वाराज्य आम्हां निपट गमविलें वंदितां पाय सौनें
कीं द्यावें प्राशितां जें सुख अमृतरसें काय तें पायसानें १४९

शा० संसारीं असतात साधु कुलज स्नेहाढ्य कैं सासरे
मामाजी परि एक यांसह दुजा साम्यास कैसा सरे
पोटासीं धरिलें सये मज शिरीं हुंगोनियां दाटले
प्रेमें तातचि वाटले नयनिंचे नाहीं झरे आटले १५०

आ० अस्मद्दर्शनशोकें तृणसें सर्वस्व जीवित त्यजुनी
स्वर्गींहि खिन्न होते प्रीति नव्हे सन्मनांत सत्य सुनी १५१

शा० मातें ते वदले तुवां उपवनें तेसींच वत्से वनें
केलीं जें पति-भक्ति-सद्व्रत सती-सर्वस्व तत्सेवनें
भर्ता तारुनि संकटीं कविसभा श्रीसंपदे वारिला
विश्वोपद्रव जाहला तव तपें या कंप दे वारिला १५२

---

१ अनुन-अंग-सेवकाच्या आंगीं. २ चंदनाच्याचिखलीं. ३ आकाश. ४ लहान. ५ कैं ६ अस्मत् -अदर्शन-शोक-आमच्या दर्शनास न पडल्यामुळें जो शोक त्या

व० त्वां सूर्यवंश सुयशें सति धन्य केला
वैदेह धन्य तुज पावुनि कन्यकेला
प्रेमें असा मज दिला बहु मान लज्जा
सांगे मदीय-नयनांसि पदींच मज्जा १५३

आ० स्वामीनी कैकेयी- सासूबाईवरि प्रसाद करा
मामाजीपासुनि वर बरिला गमला तयासि फार बरा १५४
दशमुख-वध-प्रसन्नें शक्रें वर मागवूनि बहु हर्षें
रण-मृत ऋक्ष कपि यथा-पूर्व सकल उठविले अमृत-वर्षें १५५

शा० प्रार्थी साधु बिभीषण स्तवुनि कीं लंकेंत या चाकरा
या हें पूजुनि घ्या मनोरथ विभो हा पूर्ण याचा करा
मत्स्वामी वदले नकोचि भरतावांचूनि माजाचि तो
जो सत्कार कपींस तद्भ्रम मला आत्मोत्तमा जाचितो १५६

आ० टळतां अवधि ज्वलनीं न चुकेलचि तो स्वकाय होमाया
नश्वर-वपुची अवितथ- संधा सुज्ञास काय हो माया १५७
पुर दूर मार्ग दुर्गम अवधि-दिवस एक राहिला आहे
साहे भरत न संधा- लंघन चिंता सुदुस्तरा वाहे १५८

पृ० बिभीषण म्हणे प्रभो प्रणत-कार्य जें साधितें
प्रसन्न तुमचें असो हृदय वा नसो साधि तें
पहा भरत पुष्पकीं बसुनि सत्व रक्षाल न
स्वकां नत-विपत्तिचें करुनि सत्वर क्षालन १५९

व० पूजी बिभीषण न हें सुगळा ससेना
ज्ञात्यास इष्ट यश वित्त असें असेना
स्वामीस बंधुकर पुष्पक हें वसाया
त्या कीशपाहि म्हणति प्रभु हे वसा या १६०

---

१ सत्वप्रतिज्ञा ज्याचीत्याला.

अ० विमानीं बैसले स्वामी मज सादर बाहिलें
बाहिलें बाइ अंकीं हें प्रेम कोठें न पाहिलें १६१

शि० रण-क्ष्मा दावूनि प्रभु मज कथा आयकविती
तसी अन्य ज्ञाते कथितिल मुखें काय कविती
सुमार्गे या पावे हृदय-हर हासे तुज पती
भवीं जैसे साधु त्रिपुरहर हा सेतु जपती १६२

आ० कांहीं स्वामी कांहीं लक्ष्मणजी सांगती कथा सारा
साराया क्षिप्र पथ स्वामींचा विरह-तापही सारा १६३
मत्स्वामीचा माझा अभिलाष जसा तसी विमान-गती
नग तीर्थाश्रम गहनें जगती दावी रुचे न का मग ती १६४
सुग्रीव-राजधानी किष्किंधा ती स्वयेंचि जाणविली
म्या स्वामीतें प्रार्थुनि ताराबाई क्षणांत आणविली १६५

अ० वर्षाकाळीं यांसि झाला जो भूभृत साधु आसरा
सासरा न कसा केला तद्यशा जेविं आसरा १६६

शा० पंपाख्या सरसी स्वयें मग मला मत्स्वामिनी दाविली
माझी दे स्मृति यांत ती प्रियसखी मद्बुद्धिनें भाविली
जी शिष्या शबरी मतंग-मुनिची तीची कथा लाविली
तीतें म्या म्हणतां सुधा स्वरसना हे बाइ हो चाविली १६७

आ० गोदावरी नदी जी जें तत्तट होय माय माहेर
यतवन म्हणे जीवा पद नियमा हो यमा यमा हेर १६८
अश्रु तिघांसहि आले मामीजींच्या विलोकितांचि वटा
शुचि गुणमय तद्भव पर-भव यां अंतर जसें पटा चिवटा १६९
घटजादि सत्तपोनिधि विधिसम समयज्ञ यज्ञपर महित
परम हित तदाश्रम-पद शान दावित येति नाथ मजसहित

१ युद्धभूमि. २ मगळा. ३ सुताच्या गुंडाळ्यास. ** जटाधुच्या. **: यमधर्माला. + व्रताला, इंद्रियनिग्रहाला. ≠ शरीर मात्रें करून साध्य नित्य जें कर्म त्याला.

अव्याश्रमपद बाई सत्य-पदाहुनि उणें नसे तिळ तें
म्या ओळखिलें नमिलें ज्यांत बहु शिव प्रवेशतां मिळतें १७१
वदल्यें सति अनुसूये लाजेल तुझ्या सुधा सदाशीतें
बहु निववितें तव-यशें सर्वा विबुधा बुधा सदा शीतें १७२
र० जो यशो-धवळ मान्य नंदिला चित्रकूट नग तोहि वंदिला
तीर्थराज हृदयांत राहिला श्रीप्रयाग बहु भव्य पाहिला १७३
अ० देखिली सूर्य-कन्या कां यमुना नमुना मग
गंगा नेती पदा पानें जिष्णुच्या विष्णुच्या जग १७४
शा० ताराया जग जे प्रयाग दुसरे मूर्त स्वयें राहिले
पुण्याचे निधि तीर्थ-तीर्थचि भरद्वाजर्षिनें पाहिले
आम्हीं मस्तक तत्पदांवरि महा भाग्यें सये वाहिले
ज्यांच्या दुःसह कष्ट दारुण तसे आशीर्बळें साहिले १७५
स्वा० यत्पदाब्ज विजया नवसावें तत्प्रियास्तव कसें न वसावें
अर्पिलें अभय जें भरता तें नाथ देति दुसरें भरतातें १७६
मा० गुह पण भरतांचा मानसीं आठवीला
त्वरित पवन-पुत्र स्वामिनीं पाठवीला
पळहि न निजले त्या सांगतां सत्समाजा
म्हणति दिसति केव्हां दृष्टिला वत्स माझ्या १७७
शा० तीर्थ क्षेत्र तपोवनें मुनिजन प्रेमार्द्रधी पाहुनी
स्वामी या विषया पुरा विसरते पुण्याश्रमी राहुनी
स्वप्नीं नत्यजिते विरक्ति नसती चित्तें सखी हो ढिले
आले गाय तसेचि वत्स-भरत-स्नेहेंचि हे ओढिले १७८
भक्त-प्रेम-वश प्रभु प्रिय नसे याला दुजें काय ती
जातीनें शबरी खरी गति जिला भव्या दिली आयती

---

१ सद्-भाशि-उत्तम आशीर्वादातें २ नमस्कारून.

बाईहो गुह हा सखा भरतसा जो गृध्र तो तातसा
यां नग्राम असे दयालु नसतां सत्कार होता नसा१७९
आ० त्रैलोक्य-हृदय-कंटक-दशमुख त्याच्या समूळ-उद्धरणें
मुनिहो प्रसन्न झाले मामाजी अत्युदार शुद्ध-रणें १८०
स्वा० बोलिले रघुपते वर माग ब्राम्हणेंद्र गमले पर[1]माग
मागती वर फळधि असा हे कीं क्षितार्ति तिळमात्र नसाहे१८१
वाटले मुदित-धी कपि नाकीं कांम हा वरद ते न पिनाकी
देतिल द्रवुनि कां न निरोप म्लान हें भरत काननिं रोप१८२
ज० अभीष्ट बहु तें दिलें फळ गुहा तदा नवसल्या महाचळ गुहा
सये प्रभुसखे खरे भरतसे परत्र नमुदश्रुचे भर तसे १८३
स्त्र० मार्गें शत्रुघ्न आले कवि भरत महाभाग मेघांसमोर
प्रेमें जें प्रेक्षिनि क्षुद्रिकळ कवळिली हा गभे घांस मोर
श्रीकंटीं बाष्प दाटे न विजय मिळतांही असा हर्ष[2] दाटे
जाणों ग्रीष्मीं तृषार्ता विपुळतर मिळे तें सुधावर्ष वाटे१८४
आ० भगिनीहो या सासू-बाईचें पुण्य तें अगाध रणीं
आला जय शत्रु भयें कांपुनि हे कांपवी अगा धरणी१८५
सांबचि अरुंधती-पति केलें अस्मद्धिता सुतप याहीं
यांची दया यशाहीं पोषी माता जसी सुत पयाहीं १८६
श्रीसीता भगिनीतें अर्पी सांगोनि असि कथा रतितें
प्रभुचें पुण्य यशोमृत ईत सकळ ज्यांत रसिक धारति तें१८७
आ० सीतारामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणीं भावें अर्पिलें कृतवंदनें १८८

समाप्त.

---

१ कल्पवृक्ष. २ भासे.

# दिव्यरामायणप्रारंभ.

कल्याणाच्या मूळा श्रीकांता भक्त-वत्सला ताता
प्रार्थी अत्युन्मत्ता दिक्कंठातें वधावया धाता १
भास्वद्वंशोत्तंस[१]- ज्ञातात्मा दिग्रथ- क्षमा-भर्ता
त्याची स्त्री कौसल्या तीच्या पोटासि ये जगत्कर्ता २
रामाख्या स्वीकारी जी कैकेयी तिजी सुमित्रा त्या[२]
माता साध्वीत्वें या विश्वाच्या फार मानल्या त्राता ३
भव्या रत्ना तत्वा आधींचे तीन वर्ण तन्नाम
जो कैकेयी-पुत्र ज्ञात्यां याचा रुचे गुण-ग्राम ४
श्रीरामासीं युक्त प्रेमानें लक्ष्मण क्षमा-सक्त
ज्ञाता शत्रुघ्न श्री कैकेयी-सूनुचा सदा भक्त ५
आधींच श्रीराम क्रव्यादांच्या चमूसि जाळून
विश्वामित्रातें दे आनंद प्राज्य याग पाळून ६
केलें श्रीशें[३] होय श्रोता जेणें समस्त हर्षी तें
कीं ग्रावत्योन्मुक्त स्त्री भेटे गौतमा महर्षीतें ७
रुद्राच्या कोदंडा मोडी दे मैथिला महा हर्ष[४]
स्वस्वीकारें झालें श्रीला तसा जसें सुधा-वर्ष ८
विश्वामित्राज्ञेनें त्या त्वेदेहें स्वलंकृता अन्या
श्रीरामाच्या सर्व- भ्रात्यांला उत्सवें दिल्या कन्या ९
क्षत्रघ्ना रामाच्या होता चित्तांत कोप जो भारी
त्यातें हा तेजस्वी सूर्य ध्वांता जसा तसा वारी १०
ताताच्या सत्यातें कैकेयीच्याहि हा मना रक्षी

---

१ भास्वत- वंश- उत्तंस- सूर्यवंशसंबंधीतुरा. २ रक्षिल्या. ३ ग्रावत्व- उन्मुक्त- पाषाणत्वापासून सुटलेली. ४ अमृतवृष्टि.

राज्य त्यागी रानीं राहे वल्की जटी, फळें भक्षी ११
मातेच्या आज्ञेनें सेवी ज्या चित्रकूट[1]-गोत्रास
देतो गात्या श्रोत्या जीवाच्या संसृतीस तो त्रास १२
शोकें शापें राजा साकेतीं[2] गेह देहही सोडी
निंदी कैकेयीतें पुत्र[3] श्रीचीच जी धरी गोडी, १३
यावें मागें ऐसें प्रार्थी तो हस्त बंधुला जोडी
चौदा वर्षे रक्षीं भू हे आज्ञा न साधु तो मोडी १४
राहे नंदिग्रामीं होही वल्की जटी जसा आर्य
स्वामीच्या श्रीपादू+ पीठीं स्थापूनि चालवी कार्य १५
सौमित्रि-श्री-सीता-युक्त श्रीराम अत्रिनें वंदी
त्याही तद्भार्येतें ज्याचे ब्रम्हादि वेदही बंदी १६
ती साध्वी सीतेच्या दिव्या देहासि दे उटी भव्या
पुष्पांची माळाही कीं जी वाळों नये सदा नव्या १७
जो सीतेचा हर्ता संहारी दंडकीं विराधा त्या
तारी सारी शापा तो ज्याची ज्ञान दे गिरा धात्या १८
ज्यांची धर्मीं निष्ठा ऐसे जे दंडकीं वनीं होते
भेटोनि श्रीराम प्रेमें तारी दयानिधी तो ते १९
प्राशी पारावारा[4] जो योगी त्यासि[5] भेटता तो, यों
शस्त्रें दे जीं राहों देती न द्विड्मुखी[6] तोया[7] २०
ताताच्या सन्मित्रा भेटे गृध्रा जटायुला बापा
रक्षावी हे सून प्रेमें ऐसें म्हणे खग-क्ष्मापा २१
गोदा-तीरीं राहे ख्यात न्यग्रोध पांच ज्या स्थानीं
जेथें संपादावी सिद्धि ध्यानादिकीं धृनास्थानीं २२

१ चित्रकूटपर्वतास. २ अयोध्येंत. ३ भरतहि ४ समुद्रा. ५ रामाला.
६ द्विड्-चक्षु-मुख-शत्रुसेनेच्यातोंडीं. ७ उदका. + शांभाथमानपादुका. ✻ वड.

सौमित्रीनें केली पर्णानीं हे मनोरमा शाळा
कांतप्रेमें होती स्व-प्रासादीं तसी धरा-बाळा २३
तों माया-रम्यांगी कामांधा रावण-स्वसा आली
झाली विघ्राणा[1] ती कीं सिंहाची कसी शुनी[2] ओली २४
दुष्टेचा दुष्टात्मा जो कैवारी खराख्य ये युद्धा
मारी रामस्वामी तत्सैन्या त्याहि संगरीं क्रुद्धा २५
रक्षोराज क्षोभे मारीचा राक्षसापुढें प्रेषी
तोही तन्निर्बंधें झाला स्वर्णैण[4] सज्जन-द्वेषी २६
सीता त्यातें पाहे प्रार्थी स्वामीस तो धरायाला
धन्वी मागें लागे देवांचें वांछिलें करायाला २७
त्यातें रामस्वामी दूरारण्यांत मार्गणें[5] ताडी
हा सीते हा बंधो हे फोडी हाक तो भ्रमीं पाडी २८
झाली सीता भीता दीरा वीरा म्हणे पति-प्राण
रक्षीं लक्षीं धर्मा साधो बाधो न मी करीं त्राण २९
तो प्रार्थी माने हे रक्षो-माया न हाक आर्याची
श्री त्या गांजी व्हाया शक्राच्या शीघ्र सिद्धि कार्याची ३०
बोले ती जा पापा सोडी दुःखार्त तोहि शाळेला
तों ये कामी क्रोधी लोभी ते शीघ्र भूमि-बाळेला ३१
त्या भंगी गृध्रेंद्र छेदी तत्पक्ष तोहि तत्काळ
ते व्योमाच्या मार्गें रोधी लंकेंत तीस सत्काळ ३२
भेटे भ्राता भ्रात्या सांगे संताप जो मना झाला
भ्याला दुश्चिन्हेंही श्रीराम क्षिप्र आश्रमा आला ३३

---

१ नासिकारहित. २ कुत्री. ३ सरधी. ४ स्वर्ण-एण-सुवर्णमृग. ५ बाणानें.

शून्या झाला पाहे स्वैणाच्या श्रीश रीतितें वाहे
बोले वाणी हा हे प्राणी कोणी न शोक तैं साहे ३४
रानीं श्रीतें शोधी तो धीर-ध्येय-पाद ताताच्या
मित्रा पाहे ऐके तत्तुंडें हेतुतें स्व-घाताच्या ३५
त्यातें देता झाला प्रेमें अंतीं मुकुंद तो माडी[1]
सांडी स्त्रीच्या शोका ताताची तेविं तत्क्रिया मांडी ३६
त्या शोकींही तारी खावूं पाहे कबंध जो त्यातें
भिल्ली पूजी प्रेमें या विश्वाच्या जपोनि जो[‡]त्यातें ३७
पंपा-तीरीं बोले सीतेतें आठवूनि हा राम
जो साक्षात् सर्वांही दासांचा स्वर्गभूरुहाराम[2] ३८
वाताच्या पुत्राला भेटे सूर्यात्मभू[3] सखा जोडी
सुग्रीव श्रीभूषा[4] दे दीर्घ श्वास देखतां सोडी ३९
अन्योन्य क्लेशांतें जाणोनि श्रीश तो म्हणे आधीं
त्वत्कार्याचा कर्ता मी वा मत्कार्य तूं पुढें साधीं ४०
सुग्रीवातें मारूं पाहे स्त्री श्री हरूनि जो वाळी
त्यातें एकें बाणें मारी मित्रासि राज्य दे पाळी ४१
जातां वर्षाकाळ श्रीसीतेचा करावया शोध
राजा ते सर्वत्र प्रेषी देवांश जे महायोध ४२
कीशर्क्ष प्रोत्साहें गेले जे अंगदादि काळांशा[5]
शोधाया ते कष्टी झाले होतां न पूर्ण पाळांशा ४३
मासातें लंघूनि भ्रांत-स्वांत[6] प्लवंग ते झाले
प्राण-त्याग ध्याती उग्रा सुग्रीवशासना भ्याले ४४
प्रायस्था[7] सेना जों झाली प्राणा म्हणोंनि संपाती

1 आरंभी, करी. 2 स्वर्ग-भूरुह-आराम-कल्पवृक्षांची बाग. 3 सुग्रीव. 4 सीतेचे अलंकार. 5 दक्षिणादिशा. 6 भ्रांतचित्त. 7 प्रायोपवेशन केलें जीणें असी. + राम मुकुंद हे जे पालन करते यांची इच्छा. ‡ पावातें.

सिंधूच्या तीरागीं तों ये खायास गृध्र संपाती ४५
ऐके त्यांच्या गोष्टी मध्यें आलें जटायुचें नाम
सीता-रामाचेंही जेणें साधे असाध्यही काम ४६
वृत्त भ्रात्याचें तो त्यांतें प्रार्थी पुसे तयां सारें
कीशानीं तें नेलें त्याच्या चित्तांत तच्छ्रुति-द्वारें ४७
दे तोय भ्रात्याला त्यांतें सांगे स्ववृत्त तो दक्ष
भास्वत्तेजें झाले माझे हे दग्ध कीशहो पक्ष ४८
भ्राता तो म्या ज्येष्ठें पोटाखालींच अडसा केला
याचि क्ष्मोध्रीं झाला दाहार्ता पात तापही गेला ४९
अंतातें मत्ताप ज्ञानिश्रेष्ठें निशाकरें नेला
सीतेच्या बोधातें सांगें मातें निदेश हा केला ५०
श्रीरामाच्या कार्या या जेव्हां साधिसील तूं भावें
त्वद्देहीं पक्षांहीं मद्वाक्यें तत्क्षणीं पुन्हा यावें ५१
हे आज्ञा स्वामीची ऐका लंकेंत जानकी आहे
गृध्रत्वें हा दूर ज्ञानें योगी जसा तसा पाहे ५२
मध्यें आहे भर्ता सिंधूंचा योजनें शत स्पष्ट
श्रीरामाच्या भक्ता संसारांभोधिही नदे कष्ट ५३
ऐसें सांगे जों तों आले पक्ष क्षणांत संपाती
जाय व्योमीं चिंता संपे त्यांतें म्हणे न संपा ती ५४
वाताच्या पुत्रातें ऋक्षेंद्राच्या स्तवें दिली शक्ती
ती वाढे उत्साहें भक्ताच्या मानसीं जसी भक्ती ५५
वेगें श्रीरामाचा पत्री जैसा तसा उडे ताडी
वक्षें मैनाकातें वृक्षातें उग्रवातसा पाडी ५६

१ तीर-अग-तटस्थवृक्षीं. २ भास्वत्-तेज-सूर्यतेजें. ३ पर्वतीं. ४ नगांचा ५ बाण.

नागांच्या मातेतें विस्तीर्णी तन्मुखीं सिरे वंची
भक्त-ग्रासाकाळीं नाहीं ती सिंहिका वरी कंची ५७
पारा पावे शोधी लंका पाहे सतीस जें क्षुद्रा
श्री धिक्कारी तेंही एकांतीं दे सुधी तिला मुद्रा ५८
ऐके वृत्त प्रेमें श्री-संदेशा कथी सुधी-गेया
हे यातु ध्वंसाया देवी चूडामणि स्वयें दे या ५९
रुद्रा क्रुद्धा शुद्धा श्रीसीता ज्या वनांत हा राम
ऐसें बोले शोकें तापे ज्याचें अशोक हें नाम ६०
त्यांतील क्रोधानें शाखी मोडूनि मारुति स्वैर
रक्षःसैन्यें मर्दी तीं ज्याचें वज्र-पाणिसीं वैर ६१
मारी दिक्कंठाच्या पुत्रा क्रुद्धा महाबळा अक्षा
लक्षा वीरांच्या हा तैसा दावाग्नि तो जसा कक्षा ६२
सेना-कोटि-ध्वंसें युद्धीं अत्यंत इंद्रजित् क्षोभे
तेजस्वी कार्यार्थ ब्रम्हास्त्रा सांपडे तरी शोभे ६३
तो बांधूनि क्रुद्धें मेघध्वानें पित्याकडे नेला
आचार्ये दुर्च्छात्रा तैसा त्या बोध या बुधें केला ६४
बोधें राजा क्षोभे पाहे याचे हरावया प्राण
केलें व्हाया भव्य प्राप्त प्राज्ञें बिभीषणें त्राण ६५
सांगे पुच्छ स्नेहें आर्द्रं वस्त्रें करा वरें गुंडा
लावा ज्वाला लंका दावा सोडा दमूनियां पुंडा ६६
मित्राच्या पुत्राच्या श्रीनें संप्रार्थिला न पुच्छातें
स्पर्शी पेटे वन्हि क्षोभे घायासि हानि तुच्छातें ६७
आधीं रक्षःसेना तो ती लंका मग क्षणें जाळी

---

१ उकवी २ राक्षस. ३ मारुतीला. ४ वृक्ष. ५ गवना. ६ दुष्ट शिष्या. ७ तेजनें. ८ वायूच्या. + लक्ष्मीरूपिणीसीतेच्या निरोपानें. • कोणची.

आळी केल्या दीता प्रासादांच्या बिभीषणा पाळी ६८
प्रशवारीं केला लांगूलाग्राग्नि वातजें शांत
आला श्रीचा पश्चात् तारेचा तोहि भू-रमा-कांत ६९
सीतेच्या संदेशें चूडारत्नेंहि हर्षला भानें
झाला त्यक्त स्वामी तो बर्हीं जेविं वर्षलोभानें ७०
आलिंगी स्नेहानें स्वामी तो वर्ण्य होय या दास
पोषी भक्तास श्री-कांताचें प्रेम तोय यादास ७१
कीशर्क्षांच्या सेना घेऊनि श्रीश सागरा गेला
वाटे हा शुद्धाब्धि क्षारीं जाणोनि आग रागेला ७२
धिक्कार ज्येष्ठानें केला कल्याण सांगतां प्राज्य
वंदी जो स्वामी दे लंकेचें त्या बिभीषणा राज्य ७३
अभ्यस्थें तापे ये प्रार्थी जो त्याहि सागरा मानें.
केला भारी हर्ष प्रेमें सोडूनि राग रामानें ७४
केला श्रीरामाच्या आज्ञेनें सागरीं नळें सेतु
सैन्या पारावारा विश्वा पापा तरावया हेतु ७५
मूर्धा चाप श्रीला मायेनें पंक्तितुंड मायावी
दावी हा हा ऐसें बोलायाला मुहूर्त तो लावी ७६
त्या पारावाराच्या पावे तें सैन्य सेतुनें पारा
पाडी दिक्कंधाला सुग्रीव क्ष्मारुहा जसा वारा ७७
सामार्थ श्रीराम प्रेषी दिक्कंधराकडे दूत
पूतश्रेयोबोधें क्षोभे मंत्रें जसा महाभूत ७८
श्रीरामासीं युद्ध प्रारंभी राक्षसेंद्र अज्ञानें
केले अत्याश्चर्यें चित्र ब्रम्हादि यान्वि यज्ञानें ७९

---

१ लांगूल-अग्र-अग्नि- पुच्छाग्रसंबंधी अग्नि. २ मोर. ३ पर्जन्यवृष्टीनें. ४ दशवक्त्ररावण. ५ पवित्र-कल्याणाच्या बोधानें + वृक्षाला.

मोठे मोठे योद्दे युद्धीं मेले सर्वे जरी भंगे
मत्त क्रव्यादांचा भूतार्ता तो दुराग्रही रंगे ८०
मेघध्वान क्षोभे सभ्रात्या क्रूर- नाग-पाशानीं
बांधी भंगी सेना बाणानीं ध्वस्तदेवपाशानीं[1] ८१
त्यांची दुःखावस्था सीतेला दाखवा म्हणे पापी
द्वेषी प्रेषी युद्ध- स्थानीं मोहार्थ पुष्पकीं स्थापी ८२
यन्नामीं आधिं श्रि प्रांतीं टा ह्या जकार त्यांमध्यें
ती श्रीला सांगे हे माया केली[2] खळात्मजें यध्यें ८३
त्या पाशांपासूनि व्याळांचा कोळ सोडवी देवा
हे वात्सल्यें राम- स्वामीच्या पक्षिपा घडे सेवा ८४
जागा केला यत्नें तो कुंभश्रोत्र धाडिला काळ
सुग्रीव व्योमोहीं त्या तार्क्ष्या सांपडे जसा व्याळ ८५
तत्- कर्ण-घ्राणातें मूर्छा जातांचि तो तुटे तोडी
थोडी सेना राहे भक्षी मारी न देखिला सोडी ८६
त्याची शक्ति प्राज्या सेनेला कांपवी जसी थंडी
तेशाचाही मूर्धा लीलेनें राम मार्गणें खंडी ८७
हर्ष स्वर्गीं शोकें होतां दिक्कंट घाबरा माजे
भ्याले क्ष्वेडात्युग्या होते मानीत राव रामा जे ८८
दिक्कंठ स्व-भ्रात्या शोची लोभी जसा धना नष्टा
सांत्वी पुत्र ज्येष्ठ क्रूरात्मा द्यावया महाकष्टा[3] ८९
गूढ व्योमीं राहे तो मेघध्वान बाण- वृष्टीतें
निर्मी पाडी सैन्यें तीं त्याही भक्त[4]- वत्स- गृष्टीतें ९०
श्रीकैलासापासीं सांगे ऋक्षेंद्र ओषधीगोत्र[5]
तच्छृंगातें आणी अक्षारी वज्रभृत् करी स्तोत्र ९१

1 ध्वस्त- देवप- आशा- भग्न आहे देवेंद्रांची इच्छा ज्याणीं अशा. २ गरुड. ३ अतिशय मोठीं.
४ भक्तवत्साची एकवेळ व्यालेली गमरूप गाय तीतें. ५ ओषधिपर्वत.

त्या ओषध्युत्पन्नें गंधें शल्यें निघोनियां गेलीं
घातें त्या शृंगाच्या सैन्यें जागीं पळांत तीं केलीं ९२
शल्यें गेलीं, झाले नाहींसेचि व्रण प्रभूत रणीं
ये तेज व्यथींचें ते दोघे भासले प्रभू तरणी ९३
आगस्कर्ता हस्ती तैसा तो मेघनाद या रामा
सिंहा मत्तत्वें दे क्षोभा नेणोनि दुःसहा धामा ९४
श्रीरामाच्या तेजें सेना बव्ही रणांगणीं आटे
त्याला अभ्युत्पन्नीं बैसावें स्यंदनीं असें वाटे ९५
माया-सीता दावी तच्छीर्षब्जा रणांगणीं कापी
स्थापी मोहीं सारे एकांतीं होम तो करी पापी ९६
माया ऐसें सांगे वारी त्याचा पितृव्य मोहातें
सौमित्रीनें केला युद्धांत प्रेत शत्रु तो हातें ९७
या पुत्राच्या शोकें क्षोभे सीता वधावया पाहे
त्यातें मंत्री वारी आयुःशेषें कु[illegible]हि तो राहे ९८
सारे मारा ऐसें सांगे धाडी हठी च[illegible] भारी
कोटीनीं मोजावी ऐसीतें राम रुद्रसा [illegible]ारी ९९
झाला अत्युद्विग्न स्त्री-कोटीच्या तदा वि[illegible]ानें
ताप क्ष्वेडांच्याही ऐसा कोणा न दाविला पा[illegible] १००
क्रव्यादांच्या अंता जाया न्यायास हा निघे रा[illegible]या
सुग्रीव स्वानीका सांगे चिंता न हानि घेरा य[illegible] १०१
युद्धीं सौमित्रीतें पाडी तद्वक्ष शक्तिनें भेदी
आणी तो त्या शृंगा होतां श्रीराम मानसीं खेदी १०२
गेला, आला गेला आला तत्काळ काय सांगावें
मारुतन्या गातां हंसा सोडूनि वायसां गावें १०३

१ निरभ्रांतील. २ अपराधकर्ता. ३ तेजा. ४ मारुति-अन्या-मारुतीवांचून दु[illegible] ५ कावळ्यांना. + पुष्कळ. ॐ विषाच्याही.

भाता हो तों स्वस्थ त्रैलोक्याचा हरावया ताप
पाप-क्रव्यादेशा माराया श्रीश घे करीं चाप १०४
या पूर्वी युद्धांत क्रूरा शूरा दशानना मोडी
थोडी दावी शक्ति क्रीडायाला पुनःपुन्हा सोडी १०५
या अंतींच्या युद्धीं शक्राच्या स्यंदनीं बसे भारी
समाहोरात्र श्री- राम क्रीडे यशें जगा तारी १०६
दिक्कंठाचें केलें शौर्य प्रख्यात मानदें आधें
गाया सारज्ञानीं गंधर्वांनीं सजूनियां वाद्यें १०७
श्रीगंगेच्या पावे ये या ओघा बरोबरीला जो
सद्रीतीला अन्या नम्रा हो घाबरी बरी लाजो १०८
श्रीभर्ता लंकेच्या नाथाचीं मस्तकें शत च्छेदी
पावेना अंतातें ब्रम्हास्त्रें तेधवां उरीं भेदी १०९
दिक्कंठाच्या अंतीं शक्र ब्रम्हा महेशही हर्षे
श्रीरामीं पुष्पांतें देवर्षि-व्रात संस्तवी वर्षे ११०
दिव्या भेरी वाजे गाती गंधर्व याचि कृत्यातें
स्वर्वेश्यांचें वृंद आरंभी प्रेक्षणीय-नृत्यातें १११
रामाज्ञेनें प्रेता दिक्कंठाची क्रिया करी भ्राता
त्राता विश्वाचा दे कारुण्यें हर्ष सज्जन-व्राता ११२
सौमित्रि स्वामीच्या आज्ञेनें त्या पदीं नता स्थापी
दिव्यें श्री-सीतेची भव्या कीर्ति त्रिविष्टप* व्यापी ११३
भेटे तात प्रेमें पुत्रा रामा सलक्ष्मणा नम्रा
हुंगी माथां आज्ञा राज्याची दे नया रमाकम्रा[२] ११४
उद्या युद्धामध्यें होतें कीशर्क्ष[१]सैन्य जें मेलें
पीयूषाच्या वर्षे शक्रें जीवंत सर्व तें केलें ११५

---

१ देव, ऋषींयांचा समुदाय. २ लक्ष्मीकामुका. * त्रैलोक्य.

पूजा घ्याया प्रार्थी श्रीशा लंकेश हात जोडून
स्वामी सांगे पूर्जी आम्हां दोघांसि मात्र सोडून ११६
पूजीं या सुग्रीवा या सैन्या यांत मी सुखी जाण.
या भेटीव भ्राते दोघे ते सत्य मूर्त मत्प्राण ११७
पूजी सर्पातें दे बैसाया पुष्पक स्वभावातें
भेटों ये घेऊनि प्रेमें त्यांही शुचि-स्वभावातें ११८
सेतु श्रीला दावी विश्लेषींच्या कथा स्वयें लावी
सद्भक्त-भ्रात्यांला दे भेट श्रीश जी सदा गावी ११९
विप्र भ्राते माता पौर श्रीवल्लभासि पाहूनीं
बाहूनीं आश्लेषा देती रोमांच-भार वाहूनीं १२०
स्तोत्रांच्या पुष्पांच्या आनंदाच्याहि वृष्टि लाजांच्या
ते भाग्याची वेळा ती झाली प्राप्त दृष्टिला ज्यांच्या १२१
भ्रात्यांला त्या भक्तां कीशर्क्षांलाहि भव्य दे वेश
साकेतीं ये दावी सर्वांला शर्म नव्य देवेश १२२
राजा झाला राम श्रीसाकेतीं प्रजा सुखें धाली
आली वैकुंठाची शोभा धन्या वसुंधरा झाली १२३
श्रीराम स्वामी दे सर्वांला सर्व अर्थ साधूनीं
त्यातें गावें भावें केला हा सूपदेश साधूनीं १२४
सर्वांच्याही ठाईं त्यांत प्रेमां मरुत्सुतीं मोठा
या हें दे कीं यावत्-कल्प प्राशीं कथा नसे तोटा १२५
या तें जें पावावें पीयूषांच्या नदांत यादोनें
कीं कामें दावावे कोणालाही न दांत या दानें १२६
दिव्य-रामायण प्रेमें मयूरें राम-नंदनें
श्रीराम-चरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें १२७

समाप्त.

---

१ वियोगींच्या. २ आलिंगनाला. ३ संपादून. ४ संतांनीं. ∗ आपल्या भावातें (भरतानें.) + वायुपुत्र जो मारुती त्याचे ठाईं. ‖ जलचरानें

## बाळकांड.

श्रीशा ब्रम्हादिदेवांहीं प्रार्थिला दिग्रथात्मज
होय चार धरी मूर्ती जो रक्षी संकटीं गज १
राम ज्येष्ठ महातेजा कौसल्योदरसंभव
कैकेयी-पुत्र भरत स्मर्त्यांचा नाशिता भव २
महिला तिसरी तीचे दोघे सद्गुण नंदन
नामें लक्ष्मण शत्रुघ्न शील-विजित-चंदन ३
जगतीपति दे दोघे राम लक्ष्मण गाधिजा
देती सुबाहु मारीच क्रतु ध्वंसुनि आधि ज्या ४
यज्ञाऽवनें हृष्ट केला गुरु रक्षो-बळ-क्षयें
गौतम-स्त्री-समुद्धारें पापांचीं नाशिलीं भयें ५
राज-कोदंड भंगूनि वरिली जानकी सती
न केवळ तिचीच क्ष्मा-देवीची हर्षली मती ६
महर्षि देववी कन्या तिघां रामानुजांस त्या
तिघी दिल्या मैथिलानें ऊर्मिळादि महासत्या ७
जनका दिग्रथा विश्वा-मित्रें संबंध जोडुनी
सिद्धाश्रमासि गमन केलें तें पुर सोडुनी ८
यमसा गुरुचापाच्या भंगें भार्गव कोपला
रामापुढें रविपुढें दीपसा परि लोपला ९
जय पावोनि साकेता बहु हर्षवि दिग्रथ
योग्य पुत्र-स्नुषा-लाभें हर्षें होय गत-व्यथ १०
यश गाती पौर तैसें स्वर्गीं राहून देवहीं
साहुकारां उत्सव तो बांधू पाहूं नदे वही ११
राजाज्ञेनें मातुळ ने सानुजा भरता पुरा
जो ताप शमनें स्वच्छें यशें लाजवि कापुरा १२
मनोरथांच्या साफल्यें सुख सर्वत्र दाटलें
धन्या दशरथा राजा सत्य साकेत वाटलें — १३

---

१ भार्या. २ विश्वामित्र. ३ अयोध्या.

## अयोध्याकांड.

स्वश्री देतां रामभद्रा कैकेयीच्या नये मना
राज्य पुत्रास घे रामा धाडी चौदासमा वना १४
सुरानीं व्हावया कार्य दशास्य-वध काढिला
मरे शोकें वियोगाचा साहे हा न धका दिला १५
सुमन्त्र मंत्री भरता आणिती साधु तो तिला
गांजी म्हणे विषरस स्वजनास्यांत ओतिला १६
दे-जळादि पित्या होय आर्याच्या विरहें श्रमी
फिरवाया चित्रकूटीं राम-पादांबुजें नमी १७
प्रिय भ्रात्या सांत्वुनि दे पादुका फिरवी बळें
मुनिही म्हणती आज्ञा-पालनीं धर्म बा वळें १८
न राहे लघि मन्वब्द सरतां काय-होम हा
करील च्चि म्हणे ताप ज्वलनीं काय हो महा १९
समर्थी भेट देईन कष्टी होऊं नको रहा
स्वस्थ राम म्हणे कीं तो चंद्र भक्त चकोर हा २०
तो जपे बहु राज्यास रामचंद्र-पदासही
नंदिग्रामीं वसे वल्की पाहे माता तसी मही २१
भय जें राक्षसोत्पन्न मुनीचें सर्व तें हरी
अत्रितें वंदुनि पदें पुत्रसाचि सुखी करी २२
न ज्या शुष्कता श्रीतें अंगराग सदाम ती
दे अत्रि-स्त्री ज्या धरितां हृष्टा राहे सदा मती २३
प्रयता अनसूया या हर्षवी श्रीस मायसी
सांगे स्त्री पतिच्या संगें स्वर्गाच्या जेविं आयसी २४
धराजा पुसतां सांगे स्वयंवर-कथा स्वयें
जावें सोडुनि यद्दानें जना संसृतिच्या भयें २५
श्री-मस्तकें नमी प्रेमें अनसूया पदें नतें
वदवे न कवींद्रा जें यश काय वदेन तें २६

---

१ चौदावर्षें. २ वल्कलें धरणारा. ३ उठी. ४ मालायुक्त. ५ पवित्रा.
६ परिसाव्या. ७ लोखंडी. + कोपयुक्त.

## अरण्यकांड.

हेरि श्रीतें त्या विराधा राक्षसा राम दे गती
जी दया हृदयीं शोधी क्रोधाचा नित्य वेग ती २७
जें धरासुर-संकीर्ण दंडकारण्य सर्व तें
पुण्य केलें नगणिला मेरु तर्भेत्य-पर्वतें २८
प्रणाम शरभंगादि-घटजांत-महर्षितें
करि सानुज सश्रीक चित्तें श्रीराम हर्षितें २९
सखा जटायु ताताचा गृध्र जाला तथापि त्या
म्हणे त्वद्दर्शनें गेली वियोगादि व्यथा पित्या ३०
विजय-प्रद-नामा तो पाहे पंचवटी वरी
गोदावरी-तटीं राहे पर्ण-शाला सुखें वरी ३१
स्वसा राक्षस-राज्याची पापा शूर्पणखा मज
श्रीरामातें म्हणे कुरूपी सीता सोडुनियां भज ३२
माया मनोहर-तनू ती चालवुनि दंडिली
श्रीलक्ष्मणें तिची नासा कर्ण खंडुनि खंडिली ३३
कोपे जनस्थानवासी न धरी परवा खर
भंगे सबळ रामेषु पवि तो पर वारंवार ३४
क्षोभे यक्षेशाऽनुजन्मा कपटें नवल क्षण
स्वर्णैण दावी श्री चोरी बुडाया अवलक्षण ३५
मनुजत्व स्त्रैणभाव प्रभु दाखवि हा वदे
तो विलाप वना तैसा जैसा संताप दाव दे ३६
सदय प्रभु दे गृध्रा पुत्रसा परमाग ती
मागती जी यती शोधी श्रीपदीं परमा गती ३७
उद्धराया कबंधातें सांपडे भगवान बळें
शबरीतें अमृत दे बहुमानी तिचीं फळें ३८
दुर्धर्षाऽमल-यशा स्वामी मुग्धाच्या रीतितें धरी
पंपातीरीं भक्त-शोक संपाया हा म्हणे हरी ३९

---

१ हरणकरी. २ राम-इषु-रामबाण. ३ वज्र. ४ स्वर्ण-एण-सुवर्णमृग. ५ वणवा. ६ परम-अग-उत्तमवृक्ष (कल्पवृक्ष) + नर्मोळपर्वतानें
∴ कुत्सित स्त्री. + दुधास खरखेंस्वच्छ आहेयशज्याचें असाराम ..

## किष्किंधाकांड.

मारुति श्रीवरा भेटे सुग्रीवा मग भेटवी
तो सखा होय हाही त्या दहना वायु पेटवी ४०
रघुवीरा अळंकार सीतेचे दाखवी हरी
नूपुरें तींच सौमित्री म्हणे राम उरीं धरी ४१
त्या अर्यम-सुत प्रार्थी सख्या होऊं नको श्रमी
हरिली श्री अग्रजानें हा म्हणे हरिही न मी ४२
तुझी तुज प्रिया यत्नें भेटवीनचि अन्यथा
करूनि त्या रावणाच्या मदुक्ता जाण सत्य या ४३
श्रित-श्रेयस्कर म्हणे तूं असावासि साधिन
सख्या मी तों तुझें आधीं सर्वथा कार्य साधिन ४४
भार्या-हरा हंतुकामा प्रमत्ता वाळिला वधी
त्याची श्री स्त्री दे सुकंठा म्हणे धर्मींच लाव धीं ४५
धाडी समर्थ प्लवग श्रीशोधा सुगळ स्वयें
लंघितां मास मारील या चित्तीं कांपले भयें ४६
ते महाजव शोधूनि आले आशा-त्रयाप्रती
अवध्यऽतिक्रमें झाली अन्यांची व्याकुळा मती ४७
तयां प्रायगतां सांगे जटायु-ज्येष्ठ शोध हो
सिंधु शंभर गावें ती सीता लंकेंत योधहो ४८
तो अंडज स्व-पक्ष्यांच्या दाहाची ऐकवी कथा
तत्काळ पक्षोत्पत्तीनें दे प्रत्यय हरी व्यथा ४९
वातकायज ऋक्षेंद्रें पुराणें ब्रम्ह-संभवें
केला स्व-शक्ति-तत्व-ज्ञ वरादिकथनें स्तवें ५०
महा-पराक्रम-ज्ञान जांबवान् दे जसा गुरु
म्हणे बोध महामोहा परगर्वा तसा चुरु ५१
निज सामर्थ्य कळतां उत्साहें कपि दाटला
शत-योजन पाथोधि स्पष्ट गोष्पद वाटला ५२

---

१ वानर. २ सूर्यपुत्रसुग्रीव. ३ नाश. ४ मोठे वेगवान्. ५ दिशात्रयाप्रत. ६ प्रायोपवेशन करून बसलेल्यास. ७ पक्षिजटायु. + बुद्धी. ः समुद्र.

## सुंदरकांड.

चिंतूनि तो श्रीरामातें महेंद्रा ढांसळी उडे
फुटले तों राक्षसींचे सीतेचे दाटले चुडे ५३
ताडी मैहोरा मैनाका ठकवी सुरसेसही
सिंहिकेतें वधी लंघी लीलेनें सागरा मही ५४
लंका-देवी-मद हरी योगें होय लहानसा
पावे श्री-दर्शन जसा क्षुधाकुळ महानसा ५५
अशोकीं राजखळ ये जें देवीसीं वदे कटु
साहे महावीर होता जरि तन्मथना पटु ५६
जें धर्म-न्याय-युक्त श्री-वाक्य तेणें निवे कपी
तापे घृतें ज्वरीसा जो खळ नष्ट विवेक पी ५७
दुष्ट सांगे राक्षसीला इला शिक्षा करा बरी
मास-द्वयांत नवळे प्रातराशार्थ हो तरी ५८
उद्बंधनें मरूं पाहे जातां पापी महामती
स्तवी मारुति दे मुद्रा वंदी पावे महास ती ५९
चूडामणी जनकजा दे संदेश कथी मग
अशोकोपवनांतील मोडी सर्व महा नग ६०
सैन्याचा क्षय अक्षाख्य- कुमाराचाहि हा करी
ब्रम्हास्त्राला सांपडे या इंद्रजित् क्षोभला धरी ६१
लावी धनंजय पुरा पुच्छ पेटवितां खळें
जळे मनीं म्हणे द्रष्ट्या विलंघी सागरा पळें ६२
अंगदादि यशा गाती त्या मानी हित रामही
भेटे घे अधमर्णत्व देताही इतरा मही ६३
सांगे समीरात्मज तो मार्गदुर्ग दुराग्रह
श्रीचा निरोप स्वकृत नरक्षिति पुरग्रह ६४
बिभीषण महासाधू तयाची सरमा वधू
त्रिजटा राक्षसी बाधू भय काळ न या वधू ६५

---

१ महा-उर-मोटें वक्षस्थळ ज्याचें असा मारुती. २ तेजस्वी. ३ स्वयंपाकगृहास. ४ रावण. ५ भाशी. ६ व्यहारी करितां. ७ गळफांसानें. ८ उत्सवास ९ निरोप. १० अग्नि. ११ ऋणीपणा. १२ स्त्री. + कुशल. ≍ मोठे वृक्ष

## युद्धकांड.

सुग्रीव-युक्त श्रीराम बहु-कीश-बळासह
उतरे सागर-तटीं होय त्यांसि भयावह ६६
सांगतां हित रागेजे धिक् सभेमाजि ऐकवी
बिभीषण निघे भेटे वंदी रामासि तैं कवी ६७
लंका-राज्य नमस्कारें दे सेतु करवी हरी
प्रभु-चाप-शिरें दावी श्रीस हा म्हणवी अरी ६८
केला रक्षोराज-भंग देखतांचि कपीश्वरें
न मानिलें रावणें जें अंगदें कथिलें बरें ६९
बहु रक्षःक्षय घडे नचाले इंद्रजित्-छळ
कुंभकर्ण मरे साम नरी तो नकरी खळ ७०
सनाथ वानरानीक मेघनाद रणीं गिळी
सौषध्युपायें हनुमान् उठवी मोह ज्या गिळी ७१
मोहार्थ मायामय-भू-कन्या शिर कुधी हरी
बिभीषण भ्रांति वारी लक्ष्मण ध्वंसु त्या करी ७२
मंत्री चारी भूजनीतें वधितां रावणा खळा
वधार्थ प्रेरिलें तेणें जें त्या प्रभु वधी बळा ७३
सौमित्रि-हृदय क्रोधें भेदी रावण शक्तिनें
पुन्हा सावध केला तो त्याचि निःसीम-भक्तिनें ७४
सप्ताऽहोरात्र जन्यांत बसोनि हरिच्या रथीं
प्रभु मारी दशग्रीवा जेव्हां रवि म्हणे मथीं ७५
देववी त्या तोय आधीं प्रभु स्थापी नता पदीं
शोभली अग्निच्या कुंडीं श्री जेसी पद्मिनी हृदीं ७६
रक्षःप्लवग राजांतें पुष्पकीं घे पुरास ये
स्वःपू म्हणे अयोध्येला लसत्ताप पुरा सये ७७
वैकुंठ झाला महिप यश वी गौर विप्र ज्या
अर्था इच्छिति त्या सर्वा पुरवी गौरवि प्रजा ७८

---

१ हायहाय. २ गतप्राण. ३ इंद्रजितास. ४ सीतेतें. ५ युद्धांत. ६ इंद्रा ज्या. ७ डोहांत. ८ स्वर्गनगरी. ९ प्रसवे.

## उत्तरकांड.

प्रभूं तर्षिस्तुत श्रीशा स्वयशें नाशिता व्यथा
दशास्य वाळी हनुमान् जे यांच्या आयके कथा ७९
श्रीरामें पूजिले राजे जनकप्रमुख स्वयें
केला हनूमान् विश्रांत धन्य धन्य महाद्वयें ८०
ज्ञाता स्नेही परम ही गर्भिणी स्वप्रिया सती
अपवादें त्यजी दोष नलावी स्वप्रियास तीं ८१
सीतेसि वाल्मिकि जपे स्वाश्रमांत पिता तसा
पुत्र तीचे कुश लव प्रार्शिती सद्यशोरसा ८२
दोघे दोघे तनय त्यां तिघांचे गुण-सागर
चौघांतें तेवि आठांतें वर्णिती धन्य नागर ८३
शत्रुघ्न मारी क्रूरा त्या लवणा मधुरा करी
जे तीनकोटि गंधर्व वधिले भरतें अरी ८४
न्यायें करूनि रमवी श्वान गृध्र उलूक ही[2]
मृत विप्रापत्य रक्षी सद्यशें निववी मही ८५
अश्वमेधीं आत्मज ते वाल्मिकिच्छात्र हर्षले
आदिकाव्याऽमृत प्राज्य सम सर्वत्र वर्षले ८६
यावया प्रत्यय यशा पुन्हा ती जानकी धरे
असेन शुद्धा तरि घे म्हणे तदुदरीं भरे ८७
आठां राज्यांसि भजते झाले आठ कुमार ते
पुण्यकीर्ति सदा रामीं शिवीं जेविं उमा रते ८८
सत्यप्रतिज्ञत्व यशा प्रभुनें निज रक्षिलें
भक्षिलें वन्य वेदोक्त गुरूक्त सम लक्षिलें ८९
भक्त-कल्पद्रुमारामें रामें रंजविलें जग
एकादश-सहस्राब्द पुर उद्धरिलें मग ९०
चरित्रीं विश्व रमलें शमलें सर्व पातक
श्रीराम मेघ गमला भक्त ते मोर चातक ९१
मंत्रिरामायण प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीराम-चरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ९२

समाप्त.

1 प्रभून- ऋषि- सुत- पुष्कळऋषींनीं स्तविलेला. 2 घुबड ही.

## सद्काव्यरामायणप्रारंभ.

### हरिणीप्लुता छंदविशेष.

दशरथ महीभर्ता कर्ता सुर-प्रिय तो यजी
दश-मुख-वधा त्याचा साचा सुत प्रभु होय जी
अनुजहि तिघे अंशें वंशेंदु तो भरतादि जे
विधि विनवि कीं भव्या स्तव्या गति स्वरता द्विजे १
प्रथम सुत जो कौसल्येचा घनप्रभ नाम या
करि दशरथ प्रेमें श्रीराम हेंचि अनामया
भरत तनया केकेयीच्या निजा सुत लक्ष्मण
प्रियगुण सुमित्रेचा शत्रुघ्नही शुभ-लक्षण २
सकळ शिकले ह्या विद्या कळा गुरुच्या सुखें
समधिक सखा शक्रा भासे चतुर्गुण या सुखें
तदुपयम जे त्यांची चिंता नरेंद्र मनीं धरी
कुशिक-सुत तों भेटे वाटे महेश दया करी ३
निज-मख-परित्राणा मागे सलक्ष्मण राम हा
विरह गमला त्यांचा वृद्धा मनुष्य-वरा महा
स्व-गुरु-वचनें दे ते दोघे मुनींद्र करी असु
प्रिय सुकृपणें जैसें द्यावें सदर्थिजना वसु ४
अनुज-सहिता क्षुत्तृट्बाधा-शमार्थ पथीं दया
करुनि शिकवी विद्या नामें बळाऽतिबळा तया
अजित निवटी मुन्याज्ञेनें सुदुर्मति ताटका
वरुनि अतुळें अस्त्रें दावी द्विषद्वधनाटका ५
धनु धरि उभा राहे सिद्धाश्रमीं बळ-शेवधी

* साधूनीं श्रवण करण्यास योग्य.

प्रभुवर सुबाह्वादि क्रूर क्षपाचर ते वधी
विशिखपवनें मारीचातें क्षणें शतयोजनें
उडवि सुपदस्तोचा केला पराक्रम तो जनें ६
जनक-यजना जातां ने त्या महामुनि सानुजा
हरि तम मुनिस्त्रीचें पादें करेंहि न भानु ज्या
पुर-हर-धनु ध्वंसी तें ज्यापुढें तृणता पवी
धरि नृपशाना जें निर्द्रव्या जसें ऋण तापवी ७
प्रभुसि वसुधा-बाळा माळा समर्पुनियां वरी
कुशिक-तनयें आज्ञा केली तथा जनका परी
सविधि दिधल्या धन्या कन्या तिघांस तिघीजणी
कवि दशरथा पुत्रिं श्रीमद्रणीं[1] पहिला गणी ८
कळवि पहिल्या रामा[2] राम स्वतेज नव्या तुळा
सुयश भृगुच्या जें तें घे दे स्वयें रघुच्या कुळा
समधि विभु तो देनाझाला महा जनका पुरा
भजुनि चरिता या चिंतीना महाजन कापुरा ९
अवनिपतिच्या सत्या भत्यादरेंचि मनावरि
स्वसुरतरु चे प्राज्य राज्या त्यजूनि वना वरी
प्रभु सदुटज-द्वारा दारानुजांसह तो भजे
सुतसम तपःसक्ता भक्ता नमी गतलोभ जे १०
महित महि तत्पादस्पर्शी असें बुध वानिती
अहित अहि तद्ध्यानेंही विमुक्तचि मानिती
सदय सदय स्वामी त्या स्वर्ग दे हरिणा महा
विजय निजयज्ञापूर्वीचा भला परिणाम हा ११
स्व-पितृ-सख जो पक्षी झाला तयाप्रति मा[illegible]

१ गणनाकरीं. २ भृगुरामा. + राक्षस.

प्रभु गण महान् पीयूषाचा न तत्प्रतिमा नद
प्रभु परिचयें मोदा गोदावरी सहसा वरी
श्रित-हित-करी जे वंशींचे तयांसह सांवरी. १२
कुमति विषयासक्ता भक्ताऽहिता बरि शोभली
शुचि रुचि रमा जाया ज्या या म्हणे भुज लोभली
श्रुतिसह तिची नासा नासावया अघ खंडिली
मग पललभुक्-सेना सेना रणीं बहु दंडिली १३
कनक-हरिण प्रेषी द्वेषी दशास्य तयास ती
समजुनि मनीं मागे देवद्विजाद्युदया सती
प्रभुहि हरिणामागें लागे वनांत खळा बरें
मरण-द-शरें ताडी केला तरी छळ त्या खरें १४
प्रभुसमंचि हा सौमित्रे हा प्रिये महिजे असी
कपटि-मणि तो मारी हाक श्रुतींत गमे असी
भय धरि सती धीरा दीरा वदे कटु घालवी
अभयपथ दे घोरा चोरा प्रदीपचि मालवी १५
तंव दशमुखें नेली व्याघ्रें मृगी तसि आगतें
समजुनि करूं दे त्या दुष्टा तदंतक आग तें
विरथ करुनि क्रूरा शूराधिराज करी रिपी
खगतिलक तो देहत्यागें सुमुक्ति शरीरिणी १६
नग नगींवरीं टाकी नेतां कपींत नभःपथें
अरि हरि मुनि-स्वांतें झालीं अतीव धृत-व्यथें
वसवि मळधी लंकेमध्यें अशोकवनीं पुरी
त्वरित बुडवी या किंवा ती भरी जठरीं सुरी १७
अनुज मनुजच्छद्मा पद्मा-दुरुक्त कथी रडे

१ स-हना-धन्यासहितअसी. २ खड्ग. ३ अलंकार. ॥ निशाचरांची फौज. + पर्वतावर. ॥ मानवकपटानें झालेल्यारामास. + मारिच.

प्रभुहि गणुनि स्वांत[1] स्वांतव्यथेंत बळें पडे
पळत उटजा आला झाला नपाहुनि घाबरा
सहज-धृतिला सोडी जोडी नृभावचि हा बरा १८
जसिच विरहीं स्त्रैणा शून्या गमे महि मानवा
तसिच विभुला दावी गाया असा महिमा नवा
तरुसहि पुसे गोदेलाही करूनि विलाप हा
विनवि अनुजा सांगे बापा मला न तिला पहा १९
कळवि विरही ऐसे शोकें उरीं उलतात मी
मी सदय नबुडों दे ताताचा सखा चुलता तमीं
सुतपण वरी पक्षी लक्षी पित्यापरि तत्क्रिया
करि बरि म्हणे बा हा दाहादि साधुनि सत्क्रिया २०
अनुज-सहिता भक्षाया जो कबंध वनीं धरी
सदय तदघा[2] सारी मारी सुराई तया करी
प्रथम शबरी नागी यारी दिवाकर-नंदन
प्लवग सुगळ आसा हा तो महोरग-चंदन २१
प्लवगपति जो वाली वाळी[3] मदें अनुजा तया
निवटुनि सख्या पाळी टाळी क्षणांत महाभया
कथि रविसुता वा जा राजा असें स्वपदीं नया
नविसर करी मोटी कोटि-स्तुतांघ्रि असी दया २२
उपकृतिस तो राजा चित्तीं निरंतर आठवी
कपि सुभट ती श्री शोधाया दिशांप्रति पाठवी
प्रभुनि इतरां लागे ठावा जरीं नय शोध न
श्वशीन[4]-तनया देवें जें हें परा न यशो-धन २३
दशमुख जया युद्धीं पृथ्वी-सुता हरणीं मथी

१ स्व-अंत-आपलानाश. २ तत्-अघा ३ वर्जी. ४ मारुतिला

खग वडिल तद्भ्राता संपाति शोध भला कथी
पवन-तनु-भू अत्युत्साहें उडे शत-योजनें
जलधि गणिला दिव्यें राम-प्रतापचि तो जनें २४
हुडकुनि पुरी मुद्रा रुद्रावतार सतीस दे
कुशल कळवी तीही संदेश जो हित तो वदे
मग रण करी मेघध्वाना बळें कपि सांपडे
खळ नवळतां जाळी लंका दशास्य मनीं रडे २५
पुनरपि उडे ये श्रीरामासमीप महामती
प्रभुसि मणि दे सांगे ते जे निरोप कथी सती
प्रलय कळवी जें तत्ताप-द्रुम प्रसवे फळ
छळ-पटु नसे सामा मान्य प्रमत्त कधीं खळ २६
वचनं-निरत-ब्रम्ह्यालाही सुदुर्लभ जो पिता
प्रभुवर तया झाला आलिंगन प्रिय ओपिता
पडुनिच गळां जैसा तैसा गमे उपकार हा
स्तवुनि भगवान् फेडी बोले सुखी चिर बा रहा २७
जलनिधि-तटा गेला नेला मरुत्तनयें रथें
किति कपि-बळें अत्युत्साहें उडोनि नभःपथें
सदलि कमलीं तैसा रामीं बिभीषण ये रते
नवळति असे जे श्रीरामा बळी पण येर ते २८
चरण नमितां लंकाराज्य प्रभूत्तम देववी
श्रुति-नुति-बळें ज्याच्या विश्व प्रजापति देव वी
विनवि कुपिता श्रीशा भेटोनि सिंधु नसे तुला
जड करिव या बाणें दुष्टांसि विंधु न सेतुला २९
नळ कपि रची सेतु क्षारोदकीं शतयोजनें
रडविलि सती तेव्हां मायाशिरें पळभोजनें

१ हनुमान्. २ चांगला भ्रमर कमळिणीमध्यें. ३ समुद्रामध्यें

अजित उतरे पारीं वेंघे सुवेल-नगावरी
तव निरखिला त्या दुर्गीं तो कपि-प्रवरें अरी ३०
सुगळ उडोनि क्रोधें त्याच्या गळांचि बळें पडे
मुकुट उडवी मोडी छत्रें नियुद्ध भलें घडे
परिभव तया भावी दावी बळीं परते जया
मिळवुनि शके दावायाला न तो पर-तेज यां ३१
रघुपति म्हणे बापा तापावहा बुध साहसा
नवरि न तुला साधो बाधो पराभव दाहसा
रचि अहितीं देन्या सैन्या रखळावरि पाठिव
स्व-हित-वच हें राजा माझ्या सख्या मनिं आठिव ३२
परपुर बळें रोधी शोधी मनीं पटु-अंगदा
कथुनि हृदय प्रेषी द्वेषि-क्षणचर-भंगदा
अहित नवळे सामा रामा मनुष्य म्हणे तेमें
गरळरससा काटा गाढा गतायु जना गमें ३३
करिति समरारंभा रंभादि-मानस जो हरी
प्रभुसि हरि नों बाधा वा धा जयें म्हणती हरी
दशमुख महामानी मानी स्वसिद्धि म्हणे असी
किति कपि-चमू मारा मारिदत्त[2] असे[3] असी ३४
प्रथमचि रणीं मेला भारी प्रहस्त चमू-पती
दशवदनहीं भंगे काहीं दिसे न बरी गती
घनरव करी उग्रा माया वृथा जरि होय ती
तरि मन म्हणंना श्री दे कीं जगन्नुत[4] होय तीं ३५
उदधि अनुजा कुंभश्रोत्रा तया खपवि प्रभु

१ आत्मश्लाघतेनें. २ मार-अरि-दत्त-महादेवानें दिलेला. ३ खड्ग.
४ जगद्-नुत-जगानें स्तविलेली असी.

प्रखर करिती ज्या उग्राच्या क्षया तप विप्रभु
सकळ सुभट भ्राते पुत्र प्रधानहि मारवी
अतुळ विभुचा दिक्कंठाचा म्हणे महिमा रवी ३
घनरव महामाय व्योमीं दडे निकरें अरी
बळसह ससुग्रीवा रामा शरार्त रणीं करी
पवन सुत तों आणी दिव्यौषधी-शिखर क्षणें
वर यश वरी भ्राल्या-सैन्यासह प्रभु-रक्षणें ३
मग खळ वधी माया-सीता सुरांसि गमे खरें
मुनिहि वदले हा हा केलें सुदुष्कर या खरें
सुगळसह त्या सर्वांचेंही भ्रमें मन घाबरें
क्षण नगमलें लीलामर्त्या जिणें अनघा बरें ३
कपि करि-वर-भ्रात्या धात्या बिभीषण सावध
भ्रमकर तुम्हां झाला मिथ्याचि सत्य न हा वध
करवि सहसा होमीं विघ्न स्वयें पर मारवी
रघु-वर-करें त्या दे आशी तदा परमा रवी
स्व तनु-जनिच्या शोकाग्नीनें दशानन भाजला
असि धरुनियां जातां सीता-वधासि न लाजला
सचिवा फिरवी यत्नें धाडी चमू पर मारणा
प्रभुवर करी तेव्हां तीच्या वधा परमा रणा
हत-पलल-भुग् दारांचे त्या विलाप नसोसती
म्हणति पळही रुद्धा क्रुद्धा पुरींत नसो सती
प्रिय परम जे भ्राते पुत्र प्रधान तयांविणें
मरणचि बरें मान ध्वंसीं अयोग्य जगीं जिणें
सकटक निघे आंगें व्हाया रणीं शव शेवटीं.

१ वास्तविक. २ दुष्टें. ३ इंद्रजिताच्या.

खवळुनि गमे शारवा-छेदें न यक्ष वसे वटीं
कपि-बळ वधी भेदी सौमित्रिचें उर शक्तिनें
परवश तसा तो मूर्छेनें जसा श्रुचि भक्तिनें ४२
रघुपति महादुष्टा रुष्टा करी विरथ क्षणें
विकळहि शरव्रातें त्यानें कळेवर तसेंपणें
पवनज जपे दास्या लास्यावहा बहु विष्णुच्या
नुति रुचिहि दे आम्या हास्यामृतासह जिष्णुच्या ४३
पुनरपि कपिश्रेष्ठें श्रृंग क्षणांतचि आणिलें
भगवदनुज-स्वास्था-नंदामृतीं बळ न्हाणिलें
सुरप-वचनें बैसाया दे महारथ मातली
प्रभु परचमू मर्दी लंघूनि जी पथ मातली ४४
मग सदरिसीं सत्वात्यासीं महारण मानला
सुरपति जयाच्या संदेहीं क्षणक्षण घातला
प्रभु शत शिरें खंडी योगें वरें तरि जोडिलीं
दिसति दशही बाटे गेली स्वशक्ति न तोडिली ४५
घटज मुनि ये जो या विश्वीं प्रसिद्ध महातपा
रवि-हृदय दे त्याच्या लावी जगद्गुरुला जपा
रविहि वरदेव क्षोभे दे वधी दशकंधरा
गिरिश-नयनें प्रेमाश्रूनीं भरी प्रभु पंधरा ४६
दशमुख पडे वार्ता लंघी महागिरिचे कडे
बहु भय जडे शत्रुस्वांतीं-यशांत शशी दडे
कलि-बळ झडे माया मुरव्याश्रयापगनें रडे
अघटित घडे पृथ्वी हर्षे करी मणि जे खडे ४७
प्रभुवर दिसे सत्पुषांच्या मुहूर्त न वृष्टिनीं --

१ मातली. + छेदनेकरून.

मग कवळिला देवर्षींच्या अवारित-दृष्टिनीं
सकळ भरिलें तें ब्रह्मांडोदर स्तव-सृष्टिनीं
अजित-कृतिनीं झाले जैसे स्वतर्णक तृष्टिनीं ४८
मधुर विविध-ध्वानें वाद्यें नभीं बहु वाजलीं
पटु-मति कृतें गानें नृत्येंहि फारचि साजलीं
स्तवनहि करी नाचे गाय प्रियंवद नारद
प्रभु-गुण जना शोभा देती जसे वदना रद ४९
रघुप-वचनें त्या संस्कारीं बिभीषण उद्धता
वरुनि अरिता तैशालाही मिळे अतिशुद्धता
प्रभु मळ जसा कांहीं राहे मनीं न तसा धुतो
मग बसविला प्रेमें सिंहासनीं नत साधु तो ५०
अनिल-ज-मुखें ऐके स्वामिच्या विजया सती
अभिमत पदें देखावीं हें कथी निज यास ती
अजित-वदनें ने देवीतें बिभीषण पूजुनी
म्हणति विभुची लंका सासू नवी कवि भूजुनी ५१
प्रभुतिस म्हणे तूं होतीस द्विषत्सदनीं चिर
व्रत मग तुझें कांते कैसें असेल शुचि स्थिर
निज-कुळ-यशासाठीं नेलें लया अरिचें शिर
त्यजिलिस म्हणेना मी लोभें तुला निलयीं शिर ५२
क्षितिजनि म्हणे स्वामी हा मी स्वदेह हुताशनी
भसित करित्यें आलें ऐसें कसें तुमच्या मनी
झडकरि रचीं बा सौमित्रे मदर्थ बरी चिता
नगणुनि तसीं तीं दुर्वाक्यें करीं सुगुणा हिता ५३
असु बसु सुखें तत्कार्या तो दयाकर बेचिता

---

१ दांत. २. जानकी. ३ भस्म.

रचवि गुरुता न स्वातंत्र्यें तया करवे पिता.
विरलि पतिच्या ध्यानें प्रेमें तदा चरणास ती
ज्वलित-दहनीं तज्ज्वालासी सदाचरणा सती ५४
सशपथ करी दिव्या ख्याता जिची महिमा यती
हर-विधि-सुख-ज्ञाते गाती महामहिमा यती
वसवि दहन श्रीरामांकीं जगत्त्रयसंपदा
बहु निज-पदीं शोभे सीता रमा कलि-कंपदा ५५
निवविलि रमा प्रेमें रामें करूनि अनुग्रहा
यश करि जगीं तेसें बोले परंतु अनुग्र हा
दशरथ नृप प्रेमें भेटे सुतांसि निवे दिला
बहुमह शिवें तो त्या विश्व-स्तुतांसि निवेदिला ५६
नमिति रडती हें भक्तांची सभा परिसून ती
करि गुरु-पदा साक्षात् विश्वप्रसू परिसू नती
प्रभु विनवि दे केकेयीतें अभी भर तापवी
बहुत नच हो शोकाचा बा नगा भरता पवी ५७
दशरथ म्हणे रामा माझें ऐसें मन भाविते
सकळ घडलें शापें होतेंचि जें बळ भाविते
दशमुख-वधा देवांनीं या सभा पदका मति
भ्रमविलि तिची यामूळें बा धरी पद-काम ती ५८
नरपति महाबाहो बा हो असो वरवि प्रजा
चरित रघुतें गाती ध्याती मनीं वरविप्र ज्या
पुरविं सकळा कामा रामा करीं मुनि-रंजना
स्थिर यश असो बापा तापा हरो सुनिरंजना ५९
विधि गुरु हित्या अत्यानंदें अवश्य असें वदे

१ कैकेया. २ अनभय.

हृदय-गत जो पुत्र प्रेमा तथासि ढळों नदे
पुसुनि सगुण-ब्रम्हातें तो विमान-वरीं बसे
शतमख-सख स्वर्गी देहें मनें अजितीं वसे ६०
सुरप अमृतें मेलें होतें रणीं बळ सर्व तें
उठवि हनुमान् जैसें पूर्वी महौषधिपर्वतें
प्रभुसि कळवी पूजायाची बिभीषण कामना
प्रिय विभु कथी जें तें त्याच्या नयेइल कां मना ६१
सबळ-सुगळा पूजीं वा या न त्या भरताविना
वद मम मना तत्तापाचा कसा भर ताविना
मदर्पचिति हे त्याची तर्पावया असु रेवंव दे
प्रभुवर असें जाया सारीं लया असुरेवं वदे ६२
सबळ-सुगळा पूजी प्रेमें जगज्जनका मग
द्रविणपतिचें दें बैसाया विमानहि कामग
अनुज दयिता किष्किंधेशा क्षपाचर-नायक
प्लवगहि नभोयानीं घे तो प्रभु-प्रिय-दायक ६३
रघुपति जयें त्रैलोक्यातें प्रहृष्ट करूं निघे
अवनिजनितें अंकीं घ्यात्या प्रहृष्ट करूनि घे
रणमहि तिला दावी लावी कथा विरह-व्यथा
कळवि पुरवी गानें पानेंहि जी सुमनोरथा ६४
प्रभुवर म्हणे प्रेक्षीं शोभा स्वधानदि सेतुला
सुपट नळ हा याला कोठें बुधा नदिसे तुला
सुकवि रचिना तत्त्वासीच्या न या जरि हेतुतें
सखि निररिवते माझे डोळे कसे तरि हे तुतें ६५
सुमुखि मज या स्थानीं भेटे बिभीषण आडवा

१ माझीपूजा. २ यथेच्छफिरणारें. ३ तुलना.

विजयचि गमे किंवा आमंत्रणोत्सव पांडवां
सुगळहि सखा झाला या ऋष्यमूकनगीं भला
सुदति जय हा या साधूनें द्रवोनि दिला मला ६६
जनक तनया स्वस्वामीतें मनोगता जाणवी
सुगळ-दयिता तारा तारावयास्तव आणवी
मुदित-हृदया आली आलीतसी बहुमानिली
उपकृति मुखें सख्या अत्यादरें बहुवानिली ६७
अजित कथि हे पंपा संपावया श्रम सेविती
बहु मुनि इतें आले धाले सदा तरि देवि ती
न तव विरहीं रीति-प्रीतिप्रदा मज आढळे
न निववि मना रामें वामें धृति त्यजि या ढळे ६८
सति मम-गुणासक्ता भक्ता तपोनिधि पाहिली
अनुदिनहि मध्यानीं ज्ञानीं जसे तसि राहिली
मधुर बदरें अर्पी तर्पी प्रिये मज मायसी
तदर्पचि तिनें धाली झाली मनि क्षण हायसी ६९
सति धरि मला खाया वत्साहि राक्षस या वनीं
परि पर मरे मारी तेज व्रतीं तव पावनी
भुज उतरिले दोघानीं दोन जे गुरु योजन
त्रिदश-पतिसा झाला प्रामारिख्ला-मिष-भोजन ७०
सुतनु दनु तो त्वत्स्वामीचा उपाय मला भला
कथि हित तया ऐसा कोणीहि साधु न लाभला
तरणि-तनया सुग्रीवासीं महामति भेटलों
खळ-बळ-वनीं या वातें मी दवानळ पेटलों ७१
मतिमति सति प्रेमें गोदावरीस पहा नमीं

१ सखीतसि. २ उतरून नेणारी नौका. ३ बोरफळें. ४ ब्राह्मणाला. ५ नीच्या भोजनें करून.

सरसिजनाभ समस्त- स्वजनाऽमरवृक्ष तीर्थ पाद हरी
होउनि पुत्र दशरथ- क्षितिपतिस जगत्त्रयांत धन्य करी २
श्री-कौसल्या-कुक्षिज लक्ष्मीपति राम हें धरी नाम
कैकेयी-तनय भरत याचें दे मह धरावरा धाम ३
गुण-सिंधु सुमित्रेचे लक्ष्मण शत्रुघ्न पुत्र हे दोघे
रुचिरूप सुधा यांच्या मुख-चंद्रींची यथेष्ट नृप तो घे ४
शिशुहि प्रगल्भ-जन-मन मोहिति तत्काळ+ सुरुचिरें रूपें
वचनें सुधाधिकरसें गुरु-सचिवांसह निषेविलीं भूपें ५
विमळ-द्युति-मति-रीति- स्थिति गतिहीं पुरजनांसि तापातें
धिक्कारुनि सुख देती जें त्यां मातांसि जेंचि वापा तें ६
नायक सद्विप्रांचा आचार्य वसिष्ठ धीरमणि वेद
शास्त्रें पढवी करि ते स्वसम न देतां नपावतां खेद ७
प्रमुदित नृप होय परि ह्रास वयाचा म्हणोनि दायाद
व्हाया सदार मन करि सुकलुष चिंता-नदींत हो योद ८
तों गाधिज ये भेटे नरपतिस म्हणे सलक्ष्मणा रामा
दे मन्मख-नाशक खळ- खचर-वधा पुरिव शीघ्र या कामा ९
सुखपुंज पुत्र दे असु- दानाहुनि जड पडे तथापि कवी
रघु-कुळ रीति निरुपमा रसिक जन-मनोहरा कथा पिकवी १०
सप्रेम बळातिबळा विद्या अस्त्रेंहि दे शत नतातें
करि वात्सल्य मुनि जसें केलें तैसें सुतावरि न तातें ११
बहु दारुणा छळी जी विप्रांतें ताटका महाचंडी
तीतें स्व-गुरु-निदेशें राम प्रभु मार्ग रोधितां खंडी १२
व्याधि मुनींचा मुनिच्या- लीलेनें खळवधें अनघ नाशी
सव-सिद्धि सुप्रसन्न प्रभुला दे तो तपोधन घनाशी १३

---

१. तेजकिंवाउत्साह. २ दशरथ. ३ जलचर. + सेविजेली.

ग्रंहे[1] अहल्येचें तें बहुहि रवि जसें तमिरं[2] सर्व हरी[3]
क्षिन्मात्रहि[4] कैसा राहों देईल हस्ति-गर्व हरी[5] १४
शुद्ध-यशो-निधि-मुनिनें नेला मिथिलेसि राम यज्ञास
करि जनकास प्रमुदित भंगुनि हर-धनु तया हितज्ञास १५
बळ शौर्य-निधिस जनक-क्षितिपति दे भूमि-संभवा कन्या
मुत्युक्त भरत-लक्ष्मण-शत्रुघ्नांलांहि तो निपी अन्या १६
निज-गुरु-कार्मुक-भंगें बहु कोप क्षत्रियघ्न राम परी-
क्षिति कांपतां तयाच्या क्षोभा प्रभु-बाहु-तेज दूर करी १७
निज-पुर वृजिन[6]-हर-यशें रवि-कुल-सत्तिलक राम हृष्ट करी
कीं भार्गव होय विमद तेविं[+] निपट जेविं सिंह-दृष्ट करी[7] १८
सुज्ञा नरपतिस पुसें न्याले युधाजित् तया शुभ-रतातें
दे विरहा वचके परि आज्ञा न्याया पुरासि भरतानें १९
सोसे कैकेयीस न राजा दे यौवराज्य रामा तें
पाडी व्यसनीं पतिला नवळे दे वर म्हणं दिले मातें २०
क्रमु वन्य-वृत्ति वल्की[8] राम चतुर्दश-मितें वनीं वर्षें
कुरु[9] राज्य भरत सत्या स्वोक्ता बांधां न ईश्वरा हर्षें २१
सानुजे सस्त्रीक निघे प्रभु चांदाचा वियोग तापातें
जेविं चकोरातें दे वन वरित्या सूनुचा क्षमापातें २२
भौं भूपतिच्या देहीं पुत्र वियोगीं नुरे म्हणे हाय
दाशरथि सत्य-रक्षण-काम पितृ-रथीं बसे वना जाय २३
लक्ष्मण-सह वळुनि जटा सचिवा सस्यंदना पुरा धाडी
करुनि[10] कपर्दमुकुट गुह-मन शोकीं तरुनि सुरनदीं पाडी २४

---

१ पावक. २ अंधार. ३ हरणकरी. ४ किंचितमात्रहि. ५ सिंह. ६ पापहरणकरणाऱ्यायशें. ७ हत्ति. ८ वल्कलें धरणारा. ९ सानुज-बंधूसहित. १० जटाजूटरूपमुकुट. + मंहुणा. ** कांति.

एकांतवास-रुचि शुचि- शील भरद्वाज कोमल[1]-स्वांत
त्या पंडिता प्रयागीं दे दर्शन पुत्रसा रमा-कांत २५
करि वास चित्रकूटीं शिव म्हणति महर्षि-जन पहाते ज्या
स्वाश्रित-मुनि-राक्षस-भय- घन-पटल-समीर हां महातेजा
नंदन-वियोग-शोकें श्री-धरणीं[2] ननुहि सोडिली भूपें
शोकार्त पुर न शोभे जेविं मखायतन भंगल्या यूपें[3] २७
साकेतीं[4] दूत कुशळ धाडुनि वसिष्ठ आणवी भरता
तो गति जाणोनि म्हणे धिक शातदा तीस जी कुलोभरता
अवनीशा[5] संस्कारी तदनंतर साम तो निघे जाय
साधु गुह भरद्वाजाऽनुमतें स्व-स्वामिचे नमी पाय २९
तो कृपण भरत सोडी दीर्घोष्ण श्वास साऽश्रु तात-गती
कळवी दावी प्रभुही सकळा जी पुत्र दाविती मग ती ३०
जळ पिंड यथाविधि दे राजाला प्रभु मनुष्यसा तर्पी
गुरु-वाक्य-धर्म-पालन हित हें सांगोनि पादुका अर्पी ३१
आला परतुनि नंदि- ग्रामींच वसे क्षुधा तृषा दवडी
मूळ-फळें पूर्ति करी राज्यांतिल घे न एकही कवडी ३२
बहु रंजवि प्रजा त्या गतलोभ महामना पथ न सोडी
प्रभु-पादुकांसि कर तो स्थापुनि भद्रासनीं[6] सदा जोडी ३३
दाराऽनुज- सहित प्रभु मग सोडुनि चित्रकूट जो अत्री
मुनि-वर तदाश्रमाला जाय जसा मानसा[7] सरा[8] पत्री[9] ३४
अनसूया कष्ट वनीं न शिवाया श्रीस आपल्या हातें
दे निपुणा अंगराग न जो व्हावा शुष्क आतपें[10] वातें ३५
राम विराधा[11] उद्धरि वधुनि रुचिर रूप गतिहि दे कांहीं

---

१ कोमलांतःकरण. २ यज्ञस्थान. ३ यज्ञस्तंभ. ४ अयोध्येंत. ५ अवनि-ईश-पृथ्वीपति दशरथाला. ६ सिंहासनीं. ७ मानसनामका. ८ सरोवरा ९ पक्षि. १० उष्णें. ११ नामविशेष (राक्षस)

या प्रभुला जें अघटित तद्घटन[1] अशक्य तों कधीं नाहीं ३६
केवळ विरक्त जे शर-भंगादि तपस्वि-वर्य ते रामें
स्वाश्रित कृतार्थ केले मीन पयोदें तसें घनश्यामें ३७
जो प्राशी जलराशि द्विज-वर कुंभज[2] तदाश्रमीं गेला
धनुरादि[3] महाशस्त्रें देउनि सत्कार पितृसमें केला ३८
तात-सख-जटायु खगा पुत्रतसा राम रंजवि नयानें
वंदी सादर विधिनें ध्यावें यत्पादकंज[4] विनयानें ३९
गोदावरी-तटीं प्रभु उटज करुनियां वसोनि चिर धन्या
पंचवटी करि हर्षे बहु माहेरीं रमी धरा-कन्या ४०
दाखवि बहु सुंदरपण मायेनें जी रतिप्रिया चंडी
पंकमयी शूर्पणखा लक्ष्मण तद्घ्राण-कर्णही खंडी ४१
राक्षस खर तद्भ्राता नागया सबळ ये तया रुष्टा
दुष्टा श्रीरघुनंदन भस्म करी होय शक्र-धी तुष्टा ४२
कनक-मृगें श्री चित्त भ्रमवी सर्वस्व-हानि-बीज रची
पति देवर दवडवि हरि दशमुख सीतेसि भी निवेहि शची ४३
रोधी पथा विरथ करी त्या अहिता दारुणा महासमर
करि जो जटायु अरि त्या पक्ष च्छेदुनि म्हणे सहास मर ४४
मत्त भुलून करि असें दारुण सर्वस्व-हानि-कर आग[5]
लंकेंत अशोकवनीं रोधी हंसव्रजीं जसा काग ४५
लक्ष्मण सोऽश्रु[6] कथि वनीं हरिणाख्या गणुनि सत्य हा केला
आर्या दापी पाजी परुष विष खळें अनर्थ हा केला ४६
खेद धरी रघुनाथ-प्रभु जाय स्वोटजास[7] तें ओस
पाहे बहु हाय वदे अनुज म्हणे बा वृथा तमा सोस ४७

---

१ तत्-घटन-त्या अघटिताचें घडणें. २ अगस्त्य. ३ धनुष्यादि. ४ यत्-पाद-कंज-ज्याचें चरणकमळ. ५ अपराध. ६ स-अश्रु-रडत. ७ स्व-उटज-आपल्या पर्णशालेस. ⁑ दीर लक्ष्मण. ≠ पर्णशाला + पापमयी.

शोधी गहना नकरी प्रभु आळस पाहिलें पुन्हा पाहे
स्त्रैण गमे रडवि रडे शोक दुजा तात-सख-वधें वाहे ४८
अर्पी जळा समीरा बाई षन्मात्र बोल हा. काय
झालें कोणें पापें हतकें केला क्षतार्त हा काय ४९
कथी दशमुख-कर्मा बाईट वधूपमर्दन स्वांतें
ऐसें वदोनि सोडी रामांऽकीं देह तो शुचि-स्वांत ५०
करितां क्रिया न औरस पुत्र श्रीरामभद्र भासेना
ह्मावी यशोमूर्ती या रसिकांची विष्णु-वल्लभा सेना ५१
परमाऽधमा कबंधा कवळ करायासि आपणा धरित्या
दारुण शाप निवारुनि सद्रूप ज्ञान लोक दे हरि त्या ५२
शबरीचें प्रेम अतुळ सीमा प्रभुच्या कृपेसही नाहीं
भावें वर-प्रसादा ध्यावें सत्पात्र जाति-हीनाहीं ५३
दे व्योमयान सुरुचिर रूप सकळ-लेख पूज्य-पद दावे
सद्यः स्व-पूजनाचें फळ यश गाया असंख्य कवि लावी ५
पंपा-तीरीं रागी विरही मदन-क्षुरप्र-विद्ध मना
तैसा होय व्याकुळ चेडावी दूर दयितखिन्नजना ५
त्रिनयन विक्रम-मतितें स्मरवि द्विज-वेष-पवन-सुत वाणी
मग दोघे दाशरथी सुग्रीवाच्या समीप तो आणी ५
सख्य दिनकर-सुतासीं करि करुणा-सिंधु हरि निवे पूर्ण
काम-हतापरि झाला तेणें श्रीची निवेदितां भूषा ५
केकी जैसा वळल्या अनुकूळा वारिकाहि जीमूता
बहुमानी सुगळ तसा साऽनुज-रघु-सत्तमा तथाभूता ५

---

१ किंचिन्मात्र. २ देह. ३ स्व-अंत-आपला नाश. ४ श्रुद्धांतःक
रण. ५ सर्व देवांनीं पूजा करायास योग्य पाय ज्याचे असा राम तो. ६ मदनबाण
नीं वेधिलें मन ज्याचें असा. ७ लांब स्त्री ज्याची अशा जनाला. ८ सूर्य. ९
लंकार. १० मोर. ११ मेघा. + जटायूच्या वधें करून. ※ सुग्रीवाशीं

सुगळाचें दुःख श्रुत होतां त्या अभय दे वधी वाळी
प्रभु कपि-राज सुकंठा करि तारापतिहि आदरें पाळी ५९
स्फगळ प्रभु दारेतें शोधाया वीर मर्कट प्रेषी
द्वेषि-क्षपाचर-वधा देवचि ते जाहले तथावेषी ६०
संपाती या नावें मतिमान् अग्रज जटायुचा शोध
सांगुनि दे उत्सव जल-. निधि लंघी वात-भू महायोध ६१
तों सुर सुर सेसि कथिति हित करुनी हृदय तच्छळीं सक्त
पसरी कपिला खाया सुख बळिचें भवन तें गमे व्यक्त ६२
जंव करुनि सूक्ष्म वपु-कपि सुरसा वदनीं शिरे निघे चुकवी
नीरनिधींत वधी जी छाया धरि सिंहिका तिला सुकवी ६३
यंत्रोत्थित गोळकसा पारा पावे प्लवंग कुंजर हा
लंकेस उगीच म्हणे मूर्त प्रभुचा प्रभाव-पुंज रहा ६४
सांजे सूक्ष्म वपु करुनि वातात्मज तो पुरींत शोध करी
मानी वधिली दुष्टें अबळ गमे आधिनें बळीहि हरी ६५
खेदीहि अशोक-वनीं संचरतां विश्व नुत पदा देवी
पाहे बसोनि वृक्षीं दर्शन तें स्तन्य बाळ तो सेवी ६६
चिंती प्रभुतेंच सवड पाहे भेटावयास कर जोडी
तों दे रावण येउनि ताप दुरुक्तें क्रुधा करी खोडी ६७
दाशरथि-प्रभु-दयिता परमोद्दामा तया महोदरदा
दे परिभव धिक्कारें तें श्रीयश मित्र करि गणेश-रदा ६८
परतुनि तो लंका-पति गेल्यावरि वायु-सुत सुधी वाणी
लावि प्रभु-स्तुतिस दे मुद्रा ओंडी सतीपुढें पाणी ६९
बोले सर्व कुशळ दे निज चूडामणि धरा-सुता कपिला
हा वत्स होय पार्जा संदेश स्तन्य ती महाकपिला. ७०

---

१ वेग. २ दूध. ३ महाभयदेणारी. ४ गणपतीच्या दंताला. ५ वत्सला. ६ निरोप.

ओषधिनीं वातात्मज निजलीसी उठवि निर्व्यथा सेना[1] ९३
घनरव म्हणे नयांचो राघव मायामयी वधी सीता
लेखाधिप भ्रमे बहु[2] झाली शोकाकुळा चमू भीता ९४
झाल्या सशंक राजी बाळांच्या तेविं वानरांच्या तो
साधु बिभीषण वारी भ्रम तज्ज्ञें जेविं बोधितां जातो ९५
लक्ष्मण बिभीषण-मतें घननादा खर-पराक्रमा मारी
हाय[3] म्हणे रावण धृति बाहिर वाहे मनीं व्यथा भारी ९६
शितधार असि वधाया देवीतें घे तया सचिव वारी
धाडी प्रभुवरि सेना दीनत्व वरूनि ती मरे सारी ९७
प्रकट ह्रास बळाचा तो दशमुख दुष्ट आपुल्या पाहे
बडबडुनि निघे वेडा लक्ष्मण तच्छक्तिमि न रणीं साहे ९८
पवन-सुत पुन्हा आणी त्या अमृत-रसौषधी हरी बाधा
राम म्हणे या स्वयशें[4] म्हण विश्वाला स्वयेंहि तूं बाधा ९९
जगदीश सत्य-पांडो- पद्रवकर बालिशारिचा सात
दिन आधीं रण मग सुर- हित संपादावया करी घात १००
विधिसह वदले लागो बा त्वत्पादाऽरविंद सुरसाची
गोडी भासावी लघु इतर सुखें स्व-रुचि कथिति सुर साची
साळूनि वायका दे जळ उत्तर-कृत्य करि वितृष्ण-मना
बैसे बिभीषण पदीं बाच्या सुतसा निवा म्हणे स्वजना १०२
श्री कळवि शुद्धि दिव्यें प्रभुहि कथौरत्व सद्यशोर्थ धरी
भेटे बाप दशरथहि दायादा सानुजा प्रहृष्ट करी १०३
सांगुनि बिभीषणातें सत्कारवि कपि-बकें सुगळ-सहितें
हर्षें चरि पुष्पक निज- नगरीनें ये सुखी करी महितें १०४

---

१ स-इना- धन्यासहित. २ पंक्ति. ३ तीक्ष्णधाराज्याची असा. ४ सत्य-प:अंड-उपद्रव-कर- बालिश-अरि- ब्रम्हांडाला उपद्रव करणारा मूर्ख रावण जो शत्रु त्याचा. + शक. ÷ द्रोणाचल.

बाधा हरि अंबूद्भव[1]- सें पुर रवि राम तनयसा भात
पावे प्रजा सदा शिव सर्व प्रभु- चरण- भक्ति- लाभ- रत १०५
अभिषेक स्वीकारी भरता युवराज करि अधिसमान
कवि गुण- मकरंदास आशिति एका नसे कलिस मान १०६.
वैकुंठा श्रम वाटे प्रभु साकेतांच वाटला रमला.
रमला न स्वर्ग अधिक पौर म्हणे सत्यलोक- रुचि न मला १०७
पंचास्य राज्य वणी मूढ खर पुरुष पर- स्व- सक्त नसे
वाणी शुचि दासीही सर्वत्र गुणौघ- भाग्य नित्य वसे १०८
हर्षे भरि विख्यातें करि रामप्रभु भव व्यथा नाहीं
दे आशा यज्ञ जें सुरव नामाहीं शिशुसि नें न थानाहीं १०९
श्रम नघडतांचि वर गति निज- गुण सक्ता जनासि दे राम
सरसिज- लोचन करुणा ऽ मृत- घन सेवक- मयूर- विश्राम ११०
सन्नामगर्भ श्रीरामा- यण हें राम- नंदनें
श्रीराम- चरणांभोजीं वाहिलें कृत- वंदनें १११

समाप्त.

## श्रीगुरुरामायणआरंभ.

श्रीरामासि वहावया जनक ये स्नेहें धिंडोका पुरा
भेटे फार निवें म्हणे न गुण हा चंद्रीं शिरो कापुरा
त्या सुग्रीव- बिभीषणादि नमिती सेवा करी रामही
चित्ता लुब्धमती तसी बहु जपे ज्याच्या शरीरा मही १
प्रधानादि गेले तया आडवे शैं वसिष्ठें समालिंगिला वाडवेशें[2]
सुधी याज्ञवल्क्य- प्रिय- छात्र वर्षे प्रमोदाश्रु भेटे शतानंद हर्षे २

१ कमळसें. २ वाडवईशें- ब्राह्मणश्रेष्ठें. + डोंभार.

गमे भूप[1] रामासि तो नात साच प्रिय प्रेमळ श्रेष्ठ होता तसाच
नमस्कारिला पूजिला कन्यकाहीं जया त्याविना नावडे अन्य कांहीं २

आर्या कौसल्या कैकेयी सुमति सुमित्रा तिहीं अनव्याही
नात्या नव्यत्व[2] दिलें गौरविला फार सज्जन व्याही ४

ब्रम्हण्यवर्य परि तो जनक स्वकन्या सीता विलोकुनि रडे बहु तोहि धन्या
श्रीरामचंद्रहि म्हणे चिर सासु राहो हा मत्सिताचि भरता नव सासुरा हो ५

जावयांसि बहु दे मणि वस्त्रें स्यंदन द्विप तुरंगम शस्त्रें
तो पुसे कुशळ वृत्त कथाया श्रीवसिष्ठ कथि सर्व कथा या ६

श्रीराम प्रभु तों वदे गुरु कृपा-पीयूष-पाथोनिधी
ज्ञाते सर्व तुम्हीं प्रजा-समर्थनीं तेसेचि जेसा विधी
या आचार्य-वसिष्ठ-गाधिज-भरद्वाजाभ्यगस्त्या तुगा
राजर्षे कुशळ प्रसन्न गहनीं होता जरी हा उगा ७

प्रयागीं भरद्वाज दे फार हर्ष प्रभो तो मला चातका होय वर्ष[3]
मुनी चित्रकूटीं तसें देखिले हो स्वयें ज्या चकोरें शशी लेखिले हो ८

अधि स्नेहें भेटला यसदासी प्रेमें सिद्धी सेविती जेविं दासी
आशी[4] देती दंडकारण्य वासी या मोक्षश्री ज्यापुढें तोंड पांसी ९

शरभंग सुतीक्ष्ण पाहिले कवि जे भूमि हितार्थ राहिले
घटजें जनकें तसी कृपा बहु केली वदवे न ती नृपा १०

मातें विलोकूनि जटा-सुतातें केली कृपा फार जटायु-तातें
गोदावरी दे सुख मायसी ते म्हणे वदावें नच हाय सीते ११

अध्यात्मविद्या तुज जेविं बापा तैसी मला पंचवटीहि नापा
स्पर्शो नदे श्री त्रिव कीर्ति पापा कीं जेविं अस्त्री-कवरोक्ति सापा[5]

लक्ष्मणें निर्मिली पर्णशाळा ती जेविं सत्सभा
पोषी हर्षकला तैसी सुरभी जेविं वत्सभा १३

---

१ नवीननव्हे अशाहि. २ नूतनत. ३ उदकवृष्टी. ४ आशीर्वाद. ५ पसरी.

खोटी शूर्पणखा दशास्य भगिनी या लक्ष्मणें दंडिली
खड्गें तत्क्षण कर्ण-युग्म-सहिता नासा तिची खंडिली
तीचा मातुलबंधु ये खर मरे तें रावणाला कळे
तो मायामृग पाठवी महि-सुता-धी त्याविना नाकळे १४

आर्या मद्बाण लागतां त्या यातुमृगानें वनांत मोठ्यानें
हा सीते हा लक्ष्मण असि मारिलि एक हाक खोट्यानें १५

श्लो० मार्गे येतां अनुज मज हा भेटला साश्रु सीता
क्रोधें बोले कटु मद्वना पाठवी यासि भीता
गेलों राया त्वरित उटजा शून्य पाहोनि बापा
क्ष्मापा झालों अतिपनितसा दुःसहा पात्र तापा १६

पृथ्वी० निजाश्रम पुनःपुन्हा हुडकितां न गोदावरी
तटस्थ-वन शोधितां हि नयन प्रमोदा वरी.
क्षताकुळ विलोकिला तंव जटायु तात क्षण
प्रभो हृदय पावलें मज गमे सुता तत्क्षण १७

अनु० अधर्मे रावणें नेली सीता तोडुनि पक्षती
सांगे सोडी प्राण त्याची दशा दे दुःख लक्ष ती १८

आर्या दाटे कंठ प्रभुचा लक्ष्मण कथि अंत्य कार्य देहानें
संस्कारुनि भरत तसा साश्रु सतिळ तोय आर्य दे हातें १९

श्लो० शत्रूंसि साधूंसि म्हणे विरोधी वधूनि हा आर्य जमा थिर ना
तसा धरी दारुण जो कबंध माझा नयाचा हरि [illegible] २०
विमानीं बैसे तो दनु हित कथी त्याचि अयने
निवाली या पुण्याश्रम निरखितां आर्य-नयनें
मतंगर्षि स्वात्रा वरि पुजुनि रामा यश वरी
शुचि-स्नेहाट्या ती निमि-कुळ-वरा माय शबरी २१

---

१ मारणें. २ भरतानें जसें दशरथास दिलें तसें राम भरताहूनसें अस भावार्थ. ३ थिर, घळा. ४ दुःसहा. ५ मार्गे.

गेलों तत्प्रोक्त-मार्गें निरखिलि सरसी[+] ती जिचें नाम पंपा
संपार्था धैर्य दे यो उपेगत[२]-जनता-सानुकंपाहि कंपा
सांगों दुःख प्रभो मी निमि-कुल-तिलका काय वा आपेवातें[३]
आर्या मंदें सुगंधें परम सुख हिमें होय जो ताप यातें २२

वदे राम स्वामी सुमति धृति देहा समवन
प्रभो नित्य प्रेमें करि गमवि गेहासम वन
न सौमित्री भ्राता सकळ गुरु सुस्नेह सजला
प्रवासीं रक्षाया द्रवुनि मजला स्पष्ट भजला २३

रायाजों न्या ऋष्यमूकास जावें या सुग्रीवा सूर्यपुत्रा भजावें
जेणें विश्वीं अंजना भासमाना हा या धाडीं कंजनाभा समाना २४

आर्या हा सुगळ पवन-पुत्रें मजला प्रेमें करूनि भेटविला
झाला प्राण सखा या वातें उत्साह दहन पेटविला २५

श्लो० तों सौमित्रि म्हणे अहो गुरुजि जो वाळी बळें माजला
माराया सुगळा सदैव जपला नाहीं मनीं लाजला
आर्य स्थापुनि नसदीं प्रियसखा या सद्यशें साजला
सर्वत्र प्रभु-साधुवाद सुजन[४]-स्तोमाननें गाजला २६

अनु० प्रेषिलीं मग शोधाया सुग्रीवें जानकी न्रानें
करी हा हनुमान् लक्ष क्षमले ज्या न कीश[∗] तें २७

श्लो० धैर्य पाहुनि न लेश तगीवें[#] हा पयोनिधि उडे शतगावें
यासि पांघुरविती सुर सेला कीर्तिचा टकवितां सुरसेला २८

आ० त्या सिंहिकेसि मारी जी छायेतें धरूनि आकर्षी[♣]
याच्या पराक्रमातें कां मानवला नसेल नाकर्षी[÷] ३१

---

१ रामाला. २ प्राप्त झालेल्याजनसमूहाच्याठाईंदयाळुअसीहि ३ व सिघातें. ४ साधुसमूहाच्यामुखानें. + सरोवर. ∗ वानर. # टिकावें. ♣ ओढी. ÷ नारद.

श्लो० आर्येतें आर्य मुद्रा परम कुशळ हा गुप्त भेटोन अर्पी
स्वमीच्या भव्य-[1]वृत्तें अमृत-समधिकें फार देवीस तर्पी
भंगी दिव्यद्रु-लक्षा दशमुख-तनुया ऽक्षाहि भी तोहि दर्पी
ज्याच्या तेजासि लंका कनकपुर करी स्वप्रतापाग्नि [2]सेर्पी ३०

आर्येचा प्रभुला पदें नमुनियां दे वीर चूडामणी
या आलिंगुनि हा निवे बहु जसा सच्चंदनाला [+]फणी
घे माथां उपकार मेरुहुनही भारी स्वचित्तीं गणी
याचा होय हरी प्रवीर-निकरीं वंदी रघूंचा धणी ३१

रघुपति म्हणे याचा साचा ऋणीच सदा असें
हृदय कळवी त्यांना दाता [4]स्वं-साधु-सदा असें
[+]हरि वरि न तो पाहे साहेबिना स्तव-भार हा
कवि म्हणति या लोकीं शोकीं न मज्जुनि बारहा ३२

बहु-लक्ष-कोटि-कपि वीर-युत स्तुत सद्गुण-प्रभुसि सूर्यसुत
द्रुत ने पयोनिधिस घाबरवी वरवि प्रमोद धृति दे बरवी ३३

अजित कथि भियालों दुस्तरा सागरा मी
बहुतचि विधिचा या फां असा राग रामीं
निजमनिं वदलों हें नित्य निःशंक रातों
भजनिं म्हणुनि चिंतूं लागलों शंकरा तों ३४

तेथें बिभीषण महामति भेट दे हें
चिंतार्णवांत वरिलें पृथु बेट देहें
बा बंधु हा चुकवि संकट-[5]मज्जनातें
सर्वाहि रक्षि भरतासह मज्जनानें ३५

पृ० वसिष्ट जनकाप्रति प्रभुसि वंदुनि प्रीतिनें

1 उत्तमवृक्षांच्या लक्षां. 2 तृप. 3 आहे. 4 स्वकीय साधुसभेला. 5 याप्रकारें. 6 मत्-जनानें. + वानर(मारुती) + सर्प.

विभीषण म्हणे अजी भुलविलोधि या रीतिनें
असा प्रणत वत्सल त्रिभुवनीं नसे मानद
प्रणाम करिनी तुजे अमृत-सागरा या नद ३६

राजारामचि दीनबंधु करुणासिंधु स्वयें सत्य जी
भ्राता अग्रज धर्मनीति कथितां भक्तानुजास त्यजी
स्वीकारी मज वंदितांचि विजयश्रीचा स्वलंकार हा
वात्सल्यें वदला प्रभूत्तम सुखी रक्ष स्वलंका रहा ३७

तों सुग्रीव वदे वसिष्ठ मिथिलेशातें असें आर्य हो
श्रीराम प्रभु हा म्हणे मज सख्या आधीं तुझें कार्य हो
दोषावाचुनि गांजिलें बहु मला ज्या अग्रजें उद्धतें
त्या दंडी प्रभु या मिळे यश न जें शक्रासही श्रुद्ध तें ३८

दंडावें नगरेश्वरें नचुकला त्या नागरा कां महा
याची काय अहो जगत्पति शरें दे सागरा कंप हा
तत्काळ प्रभु बांधवी नळकरें या सेतुरूपें गुणें
हें आश्चर्य यशांत दंडित-जनाच्याही पडेना उणें ३९

सांगे सौमित्रि आर्या प्रभुसह चढलों जों सुवेळाग्रभागीं
लंका-प्राकार- शृंग-स्थित- दशवदनीं दूरगी पातकाऽगीं
जातां दृष्टि प्लवंग-क्षितिप उडुनि हा जेविं हर्यक्ष[1] नागीं[2]
क्रोधावेशें पडे हो नग्रहुनि सहसा कीं जसा तार्क्ष्य नागीं ४०

प्रभु म्हणे नकरीं मन घाबरें तुज न साहस हें अनघा बरें
म्हणनि ऐकुनि यासि नयज्ञ हो झटिति[4] एकलसाध्य[5] न यज्ञ हा ४१

अंगद दूत प्रेषिला कथुनि बरा संदेश

---

१ हरि-अक्ष-सिंह-वाडोळा . २ गजीं . ३ हाय . ४ शीघ्र . ५ एकट्यानें साधावयाचा .

साम नकरी मारा म्हणे तो दशमुख मंदिशा ४२
मग जलद-रवाच्या मांडिलें युद्ध तातें
परिभवहि नवारी त्या महाउद्धनातें
अगणित-रुधिराच्या मग्न देवारि पुरीं
प्लवग नगहि झाले भग्न देवा रिपूरीं ४३

पृथ्वी० वदे सुगळ आर्य हो कपटि-मेघनादें खळें
बळें मथुनि हे प्रभू भुजग-बद्ध केले छळें
जळें न नयनोद्भवें तुटति दुःख तें आगळें
गळेंचि धृतिला म्हणे कपिचमू विवेका पळें ४४

श्लो० ये संकटीं धावुनि राजपक्षीं तो त्या अहीतें जरि हीन लक्षी
तत्तेज तत्पक्षज नाद भक्षी हे आमुचे मूर्ति धरासुरक्षी ४५
बोले सौमित्रि कष्टें उठवुनि गुरुजी प्रेषिला कुंभकर्ण
क्रव्यादेशें महोग्र प्रबळतम महाकाळसा काळवर्ण
अस्मत्प्राणा सुकंठा धरि बळ उडवी तो जसा वात पर्ण
क्रूरा त्यातें तसें कीं सकळ जळधिचें वाडवाजेवि अर्ण
फिरे ते पुरीं तो महावीर यातें तुळा तों न याच्या पहावी रयातें
सुटे मोह जातां हरी कान नाक प्रहर्षे म्हणे साधु या कां न नाक
पुन्हा आला क्रोधें प्रलय-समयीं सिंधु फुटला
गमे कीं युद्धांत प्लवग सगळे खात सुटला
जसा बोधें मोह प्रभुवर-शरें तो खपविला
दिला या सद्गीतें परम विजयें तोरव पविला ४७
कीश्वा० धीश कथी वसिष्ठ-जनक-त्यांतांसि हर्षविघा
तन्नेत्रांतुनि उष्ण शीतळतर प्राज्याम्बु वर्षविघा

---

१ शिशु-उर-शत्रूच्या वक्षस्थळीं. २ उदक. ३ वेगानें. ४ भर्ग. ५ संतोष. ६ बज्याला. + इंद्रजिताच्या.

ब्रम्हास्त्रें बळ इंद्रजित् खळ खळीं पावोनि संताप हा
सारेही बद्ध होंचि कश्मळ म्हणे सर्वांहि संतापहा ४९
अस्मत्प्राण बहिश्चर प्रभु रणीं दोघेहि हे ताडिले
निश्चेष्ट क्षणदाचरेश्वर सुतें निर्जीवसे पाडिले
होता सावध हा बिभीषण दुजा हा मारुती माहितें
शल्यार्ते सकळें बळें जड म्हणे देवर्षि जो तो हितें ५०
रात्री उल्मुक-हस्त हे हुडकितां युद्धांगणीं भागले
दैवें या परमाधि-सागर-तटा ऋक्षेश्वरा लागले
हा सांगे सदुपाय पाय धरितां शल्यार्तहीं औषधी
क्ष्माभृच्छृंग मरूज्ज आण विभुची पावे महातोषधी
अनु० विशल्य झालें कटक श्रीरामासह सर्वतें
शिवें आशीर्वच दिलें सत्य श्रृंग नग पर्वतें ५२
प्रसवे पुत्र विश्वाच्या ताराया अंजना भया
देवू सदग्रगण्यत्व-ख्याति श्रीकंजनाभ या ५३
वदे राम हा मारुती प्राणदाता निवारी स्व-लीला-लवें सर्व-घाता
कुलाचार्य त्यातें म्हणे सत्य ताता स्तवीं साश्रु होवूनि वैदेह-ताता ५४
आर्या शत्रुघ्न भरत वदले याचे आम्ही खरे ऋणी आर्या
सचिव म्हणाति फेडावें ऋण याच्या करुनि कोणत्या कार्या ५५
ताते सर्वहि जांबवान् सहनुमान् गाथा सदा स्थापिती
हा सिद्धांत चरित्र तें धरुनियां चित्तीं सदास्था पिती
बोले अंगद मेघनाद गमतो मायामयी जी वधी
ती देवीच गमे भ्रमे अमरधी कां न भ्रमे जीव-धी ५६
आर्या हो तात बिभीषण दे आम्हां सर्वांसिं धीर हे माया
ऐसें सांगे गुरुही हा न म्हणोंदेचि धीर हे माया ५७

---

१ कौशीत.

जन्मो त्साऽध्व शतांग होम करितां निर्विघ्न वा त्यावर
व्हावें बैसुनि त्या रणीं अमर हा मागोनि घात्या वर
घे शक्राशनि तोडितां घनरव श्रीरामचंद्रा कथी
हें त्यांचानि पितृव्य लक्ष्मण तया होमीं अपूर्णा मथी ५८
मायावी घननाद तो अरि अहोरात्र-त्रयें मारिला
शक्र-त्रास समूळ आर्यवरहो सौमित्रिनें वारिला
शवी भेदुनि शक्तिनें उर दशग्रीव प्रतापा रणीं
हृष्टीं चीं सकळांचिया पवनभू फेडी पुन्हा पारणीं ५९

पृथ्वी॰ बिभीषण म्हणे करी वरुनि शक्ति मद्रक्षण
त्यजी स्व-तनु-भान हा सदय रामभद्र क्षण
न बंधुपण पाहिलें परिशिलेंहि अन्यत्र या
असें बहु जगांचिया म्हणवि हेंचि धन्यत्रया ६०

श्लो॰ वदे राम प्रेमें द्रवुनि शिव दे वात-तनया
परा भक्ता पश्चात् प्रथम शिवदेवा तत-नया
नगावा हा सुज्ञें करुनि हित कां जी वद न तें
न जें गाय त्यागू अमृत पिवु कांजी वदन तें ६१

पृथ्वी॰ म्हणे जनक मारिला मग कसा कुधी दूर सा
न जो अरि करि स्तवा न विषया त्यजी दूरसा
वसिष्ठहि वदे यशोमृत कवीस तर्पू रहा
म्हणा परयशा उगे म्हणत जेविं कर्पूर हा ६२
सुगळ म्हणे अहो न ग्ण निस्तुल तो कथवे
निरग्निति चित्रसे करुनि निर्जरलोक थवे
मृत-कपि-राक्षस-प्रवर-रक्त-नदी शतशा
स्मरनि न देव वृद्ध मुनि तेंहि नदी वा तशा ६३

अभ्य॰ खोटा दशास्य रया मोयच वाढवि न तो शाकि आग्रह अरी

तोटा नघे सुजन कोटास याहि पण लोटावया दृढ धरी
झाडी मदांध-मद नाडी सुरारि बहु धाडी असा रथ हरी
नाडी तयावरुनि पाडी शिरें रघुप फाडी उर व्यसु करी ६३
समाहोरात्र-काळ प्रवर रण करी रावणा क्रूरकर्मा
तन्नाशें विश्व पावे यति-पति-मतिही शंभु धाताहि शर्मा
झाली सत्पुष्पवृष्टि प्रभुवरि गगनीं गर्जलीं दिव्य वाद्यें
केली श्रीनारदेंहि स्तुति समुनिजनें कश्यपें वासवाद्यें ६४
हर्षे गंधर्वराज स्वजन-सह करी रम्य आलाप हा या
श्रीरामा गाय नाचे स्मर-युवति-गण क्षिप्र आला पहाया
वेधा श्रीकंठ गौरी-युत सजुनि वृषाधीश्वरा रुद्रवर्णा
आज्ञा ऐसी करी कीं सुकुशळ कविहो सर्व हें युद्ध वर्णा ६५
अनु० बिभीषण-करें राम इष्टांची करवि क्रिया
द्वेष वधूनि नधरी हा कृपाकर विक्रिया ६६
आर्या- पुसनि वसिष्ठ जनक या वत्सा सीतासती-व्रता पाहे
केव्हां प्रिय-चरणानें योग्या नेत्रा न तीव्रताप हे ६७
बोले अक्षारि शोकाकुल हनरिपुचे दार जे आर्य होते
श्रीरामें सांत्विले कीं सुगुण शुचि शची शाहि सत्कार्य हो ते
केला सौमित्रि-हस्तें वर-पद-गत हा साधु धीं निष्कें लंका
पावे ती कीर्ति मानी निजहृदयिं कलोपोषका निष्कलंका ६८
आर्या-देवीस सन्मुखें या प्रभुनें निज-विजय-सिद्धि आणविली
या लंकेशानुमतें मग नगरींतूनि निकट आणविली ६९
देवी दिव्य करी बहु द्युति धरी दृग्दोष सारे हरी
कामाचाहि अरी स्तुति प्रभुपरी प्रेमें स्वयें आदरी
सावित्रीश हरी मुनिव्रज वरी बंदीपणानें रवरी
हे सत्कीर्ति तरी भवांत दुसरी पावे न ईची सरी ७०

---

१ इष्ट. २ बिभीषण. ३ नौका. ४ सुवर्णाचीलंका.

**आर्या-** उठवी सात्विकभावा अघशमना दिव्य थापटुनि रसिकीं
शंका निंद्याचि नतें सकळ अनादि व्यथा पटु निरसि कीं ७१

वसुनि वर-विमानीं यें महाराज तो या
प्रभुसि तृषित हस्ती जेविं घर्मार्त तोया
प्रिय-तनुज-युगानें भेटला आर्यहो तें
अमृतहि न जसें हें तन्मनीं कार्य होतें ७२

प्रेमें आपण भक्तवत्सल वदे शोकाग्नि जो पेटला
होता त्या शमवावया गुरु-कृपा-मेघ स्वयें भेटला
गाढालिंगन जें शिरीं करि अवघ्राण स्त्रवे अश्रु तें
ने तापा तद्दर्शनें असुख या तिघा जसें अश्रुतें ७३

**आर्या-** लक्ष्मण सांगे वदला आर्यतें तात हें असें सरलें
संकट वत्से त्वद्गुत- तेजें मत्कुळ निमज्जतां तरलें. ७४

महेंद्र बोले रघुसत्तमा रणें प्रसन्न झालों बहु मत्त-मारणें
जरि श्रितांचा परमागसा रे तूं यशीं जगा वा वर माग सारे-तूं
श्रीराम हा मानद देवराया मागे उठावे कपि दे वरा या
केले सुधा वर्षुनि वीर होते- तसेचि शाकें अजि धीर होते

जोडी हस्त म्हणे बिभीषण नघे त्या प्रार्थितां पूजना
या आचार्य वसिष्ठ तूं मत जसा देव स्वयंभू जना
माता आर्य पिताचि हा परि भवत्स्नेहें न आकर्षिला
जैसा या भरतें प्रभूत्तम रुचे हें फार नाकर्षिला ७७

**आर्या-** राम म्हणे त्वां रक्षिलि जरिहि असुनश तरि प्रतिज्ञा ते
वा तरिच जपति सेविति बहु सत्संगति-तरि प्रति ज्ञाते ७८

कैसा येतों सुदूर त्वरित जरि न मी पावतों या विमाना
माझ्या वाक्या नयेतां भरत-कृत-पणा सत्यता यावि माना.
हें साचें आर्य हो हा प्रिय परम सदा प्राणसा कायसा हो

---

१ त्याच्याशीं विश्वर नव्हाय. ॥: तत्-अदर्शनें. + त ऐकिल्यानें.

कौसल्या-सूनुही हा मग विरह अशा माधुचा काय साहो ७९

ऋक्षाधीश सुषेण अंगद नळ स्नेही भले भागले
हे सुग्रीव बिभीषण प्रियकर भ्राते खरे मागले[1]
हा वातात्मज हे गजादि सकळ प्रज्ञाबळें आगळे
देणारे जय यांपुढें परबळ त्रासें करी आ गळे ८०

याहीं दिला विजय साधुनि आर्य हो या
हे हेतु सिद्ध अति दुर्घट कार्य होया[2]
हा दाससा सतत लक्ष्मण वत्स माझा
देहा जपे बहुजसा शिव सत्समाजा ८१

आर्या- सौमित्रि म्हणे आर्या गुर्वाशीर्वाद सतत तुज जपला
निष्फळ होइल कैसें सानुज ससचिवहि भरत जें तपला ८२
दाखवि प्रभुहि लोक-रीतितें मान्य सद्गुरुहि तो करी तितें
याज्ञवल्क्य-मुनि-शिष्य मानवे गाति तीच कवि उत्तमा नवे ८३

प्रेमें श्री-रघुवंश-सद्गुरु वदे बा राघवा मानदा
देव-ब्राम्हण-धर्म-नीति-निरता रामा सुधेच्या नदा
वंशीं स्वत्सम तूंचि या द्युमणिच्या[3] वत्सा जगा तारिता
लोकामाजि पडो तुझ्या सुचिरता भावें न गाता रिता ८४

पृथ्वी० वदे जनक साधु हो चिरसुखें प्रजा नांदवा
भवद्यश जगत्रया उपरि हो सदा चांदवा
जशा म्हणति वाढल्या शिव असो नद्या वासवा
प्रजा म्हणुत या तुम्हां सुबहुमान द्यावा सवा ८५

श्रीगुरुरामायण हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें ८६

समाप्त.

---

१ पूर्वजन्माचे. २ व्हावया. ३ सूर्याच्या.

# मोरोपंतकृतगद्यरामायणप्रारंभ.

दशरथ क्षितिपनाथ तो यजी[1] श्रीश तनय राम होय जी
मौलि-रत्न करि भानुवंश ज्या बोलती भरत[2] हें नरेशजा १
लक्ष्मणाभिध अरिघ्न सन्मती दोन हे भगवदंश जन्मती
या महीं बहु मदश्रु वर्षले सर्व देव मुनि भक्त हर्षले २
कौशिक क्रतु-विघात-शांतिला ने नवीन-घन-सांद्र-कांतिला
दे शतास्त्र धन यों[3] तपोनिधी हर्षवि प्रभुवचा जपांनिधी ३
गौतमर्षि-दयितेसि पद्रजा[4] देव दे म्हणति साधु भद्र ज्या
तत्क्षणीं करुण उद्धरी तितें गाति या सुकवि रुद्र-रीतितें ४
ज्या जगें स्व-कर-युग्म जोडिलें रुद्र-कार्मुक सलील मोडिलें
भूमिजा प्रभु-गणासि शोभली स्वप्रिया वरुनि फार शोभली
कौशिकें जनक-भूप बोधिला याज्ञवल्क्य मुनिनेंहि शोधिला
दे तिघांस निज कन्यका मना ज्यांचिया न तिळ अन्य कामना
क्षत्र[5]-काळ धरि मार्ग वाघसा देखतां कुपित-भार्गवा घसा[6]
दाटला दशरथ क्षमापन प्रार्थही करूं शके क्षमा पन ७
जाण विस्मय लहान टाकवी गाति या बहु महानटा कवी
कीर्ति शीत-कर कांत वाणवी स्वामिचा मुनिस शांति बाणवी ८
तो यशें करुनि निस्व कापुरा पुत्रयुक्त नृप ये स्वका[7] पुरा
दृष्ट पौरहि सुवर्ण वेंचि तो उत्सव-स्थिति न वर्णवेचि ती ९
साधु मातुल परा युधाजित- स्नेहसिंधु भरता युधाजित
ने गृह्या करुनि यत्न सानुजा मानवे स-सुर रत्नसानु ज्या १०
नंदनासि युवराज-भाव दे तों हठा धरुनि वल्लभा वदे
सुख्य लोक हित रत्य रक्षया कीर्ति यास्तवचि होय अक्षया
दोन देइन वर स्वयें कृपा दाखवूनि वदलासि हें नृपा.

---

१ यज्ञकरी. २ भगवत्-अंश. ३ शमाम. ४ पद-रज-पायधूळी
ला. ५ परशुराम. ६ कंठ. ७ स्वकीया.

यौवराज्य भरता वरें असो रामही मनुसमा वनीं वसो १२
वल्कली जटिल वन्य-सेवनीं होउ सादर मुनी जसे वनीं
स्त्री धरी कुगतिचीच वाट ती मृत्यु होय नृपतीस वाटती १३
याचया करिहि तो दया स्तव ज्ञानवान् तरि हितोदयास्तव
बोलिली न अनघा वरें न ती घे नसांत्वि मन घाबरे नती १४
ऐकतांचि अभिषेक सोडुनि श्रीश हस्त जननीस जोडुनी
भ्रातृ-दार-युत जाय ह्य वना पावना-पितृ-वर-व्रताऽवना १५
दुःख तें जन-मनीं नमाय हो बोलिले असि परा न माय हो
बोलती धृति-सहाय हा यती कां पुरी नम्हणु हायहाय ती १६
पत्ति होय अटवी-पथा वरी त्या सुमंत्र बसवी रथावरी
जाय भेटुनि निषादपा वना त्यासि वेचि न विषाद पावना १७
जी करी वरुचि सुरापगा तितें जाय जें हित सुराप गाति तें
नौय सेउनि रची जटा विती त्या सुशांति समवा दटावि ती १८
जो प्रधान बसवी रथावरी तन्मनासि रघुवीर थावरी
पाठवी जनक-सेवना वदे त्या गुहासि मग देव नाव दे १९
स्वर्णदी उतेरित्या गुहा सहो ताप यापरि वदे सुहास हा
भेटवी प्रभुवरा तया भर-द्वाजिनाममुनिनें दयाभर २०
चित्रकूटरचितोटजीं हरी तापस-व्रत निवास तो करी
वर्तमान गुह सर्व आणवी तें सुमंत्र नृपतीस जाणवी २१
तापला बहु दवांत तापतो नाग तेविं महिषीस शाप तो
ऐकवी स्मरुनियां परा सुता पावला नरपती परासुता २२
श्रीवसिष्ठ भरतासि आणवी त्यासि माय कृत कार्य जाणवी
फार तीजवरि धीर कोपला जी करी मृदुल हीरकोपला २३

१ स्तुनि. २ नसामधे. ३ पुरी. ४ नौका. ५ उतरणाऱ्या. ६ सोस. ७ चित्रकूट-रचित-उटज-चित्रकूटपर्वताच्यावाई रचिलेल्यापर्णशालेत. ८ हीरक-उपल-हीरकपाषाणाला. + चवदावर्षे. ∗ होवो. ∗ मरण.

तो म्हणे स्व-जननीस हा जडे आठवूनि सुत-वत्सला रडे
पिंड दे मग निजाऽग्रजाकडे जाय दंडसम त्यापुढें पडे २४
शुद्ध बुद्ध गत-शोक आयतें धर्म केवळ तथापि हाय तें
बोलिलें करुनियां निवाप या घावरूनि लजे नहीं निवापया २५
त्या म्हणे भरत पाव पावना या घना नभज विवर-भावना
पीडितो विरह वा पुरा सदा राससा पर-चमू दुरासदा २६
त्या म्हणे प्रभु असें नर क्षण त्यागु धर्म-गतिचें न रक्षण
न स्मरोनि निज-जन्म-लालन त्यागिजे जनक-वाक्य-पालन २७
वा चतुर्दश समा वनात मी लोटितों न बुडवीं मना नमीं
दे म्हणे भरत पादुका तया जाणती धरुन वा दुकान या २८
अन्यथा करिल काय-होम हो यावदांपरिस काय हो महा
भक्त-वत्सळ म्हणे अवश्य हो कीं न तो सुमुकुंता अवश्य हो
घे शिरींच भरत प्रभा-वहा पादुका मग महाप्रभाव हा
वास बाहिरचि तापसा हुनी चालवी नियम ताप साहुनीं ३०
चालतां म्हणवि पत्रिपा दहा-वेळ हाय धरि अत्रि-पाद हा
श्री-मनासि मुनिची महासती दे समर्चुनि वनीं महास ती ३१
राघवें मग विराध मारिला तन्महोग्रनर शाप वारिला
नाशिला सुचिर ताप सांचला देवता म्हणति तापसां चला ३२
हृष्ट संप्रति न जीव कांचला कां विमान म्हणतात का चला
सर्व निर्भय मुनींद्र बोलती रामदर्शन-सुतृप्त डोलती ३३
जो स्व-तात-सख त्या जटायुनें तो नमी प्रभु शिरें जटायुनें
प्रीति याचि कवि साधु-रीतिनें जी सुधा न असि माधुरी तिनें

१ पितृतर्पणा २ शांतजन हो. ३ कठीण, दु:साध्य. ४ चौदावर्षें. ५ न आळांतर. ६ मी भरत. ७ अगत्यपूर्वक. ८ वशानळें असा. ९ तेजधरणाऱ्या असा. १० उन्माहास. ११ तनू-मध्या-उग्र-नर-ज्याचा मोटाउग्र असा. १२ जटायुक्तें (शिरें या शब्दाचें विशेषण.)

जी सुरांसि कथि धौंत मी नद्या स्वर्ग यांसि जिणि गौतमी नद्या
तत्तटीं प्रभु रची दलालया नाक जो कवि म्हणे पलोलया ३५
जो अलभ्य इतरा परस्वसा त्या म्हणे वरिन मी परस्वसा
घेववी अजित कान नाक हा तें म्हणेल अजि कां न नाक हा
ये स-राक्षस-समूह आहवा जो म्हणे अरिसि अंत पाहवा
त्या वधूनि रुधिरांत वाहवी शत्रु एकहि न राम राहवी ३७
दाखवी कथुनि ती नरा वणा साहवे तसि दशा न रावणा
आयके युवति-रत्न सानुजा त्यासहि प्रणत रत्नसानु ज्या ३८
दाखवी कनक-रंकु तो अरी श्री म्हणे मृग धरा प्रभा वरी
त्या हरी अनुसरे जसा हरी अभ्र-चंद्र-गति-रीति तो धरी ३९
शत्रु जाणुनि शरासनी शरी श्रीश विंध गहनीं तया करी
हा प्रिये खळ म्हणे गमे खरी राघवोक्ति भय भूमिजा वरी ४०
ईशशक्तिचरितार्थ तीहि भी यूथपा-कुळ-रवें जसी इभी
देवराशि कथि धांव बा पहा धर्म जा मज शिवो न ताप हा ४१
तो म्हणे सति नमान सत्य या राक्षसोक्तिस करील अत्यया
कोण भूरमणिच्या नवा उगी मह्रिरा सुमति हे न वाउगी ४२
श्री वदे मदभिलाष नांदतो त्वन्मनात परि कांत चांद तो
तूं कुधी मलिन काजवा खरा रे नहोय असि काज वाखरा ४३
खोट जाणुनि निघोनि जाचि ती त्या म्हणे बहुत होय जाचिती
साधु वंदुनि म्हणोनि हा निघे ती वदे कटु म्हणोनि हानि घे
जो दशास्य खळ होय तो यती दे भला म्हणुनि पीठ तोय ती
तो करी प्रकट हा निजाकृती मानिती सुकृत-हानि ज्या कृती
जानकीस खळ घे रथावरी आग्रहें मग नभः पथावरी

---

१ इल-आलय-पर्णशालेला. २ कडवा, वावुक. ३ परद्रव्यसा. ४ शत्रुभगिनी शूर्पणखा. ५ युद्ध. ६ मेरु. ७ सुवर्णमृग. ८ सिंह. ९ बाणयुक्त. १० हरीण. ११ मरणा.

जी दया न करि हा कदापि ती होय मारुनिहि हाक झपिनी ४६
हाक ऐकुनि जटायु ये रहा रे म्हणे करि अधर्म येर हा
मोडितां स्वरथ खड्ग तो धरी पक्ष तोडुनि पुन्हा सती हरी
आक्रमी गगन चोर तो पळे पर्वतस्थ-कपि-पंचका कळे
स्वोत्तरीय-पट-बद्ध भूषणें त्यांत ती त्यजि निरस्त-दूषणें ४८
तीस ने खळ पुरींत आपल्या देवता म्हणति हंत तापल्या
तो अशोकवनिकेंत रोधवी राक्षसींस कथि पाप शोधवी ४९
काननीं प्रभुसि बंधु भेटला शोक-वन्हि हृदयांत पेटला
जेधवां उटज शून्य देखिलें विश्वही निपट शून्य लेखिलें
जो चराचर-निवास हा मये तो म्हणे बहु शिवास हाम ये
वर्णिती सुर सदा विलाप हा कीं म्हणे सुरस दाविला पहा ५१
शोधितां वन जटायु देखिला वत्सलें परम घात लेखिला
बोलिला क्षत असावधान[*] हो योग्य सद्गुरु असावधान हा
गृध्रपा करुनि राम सावध प्राप्त घात-कर-तामसा वध
हो म्हणे मग पुसे तया परा रावणा कळवि तो दया परा ५३
रावणें हरिलि जानकी असें सांगतां खग रडे दयारसें
पाहतां स्वसुख मूर्तिस त्यजी देह ती कुशल-पूर्ति सत्य जी ५४
पुत्रसाचि करि राम तत्क्रिया तातसाचि वरि गृध्र सत्क्रिया
गाति या सुकवि राम-रीतितें जी सुधा म्हणति पामरी तितें
योजनायुत-भुज-प्रभा हरी सानुज-प्रभुसि राहु सा धरी
त्या करूनि वध राम उद्धरी क्रुद्ध रीति कवि-बुद्धि मोहरी ५६
गोड रीति शबरीसि तारि ती ह करी यत्न वरी सिना रिनी
पाडिली किनि सुधाहि ताकसी होय हो मग बुधा हिना कसी
पं असा प्रथम वर्ण या मग स्पष्ट दोनचि यदीय-नाम-ग

---

१ उत्कृष्टा. + टाकिला होय ज्याणी असी भूषणें या शब्दाचें विशेषण.
* हाय.

होय ती सु-सरसीहि तापदा त्या पयोधि-जनिच्या हिना पदा
मारुति प्रथम भेटला भलें सागरांत गुरु बेट लाभलें
सूर्य-नंदन सुकंठ तोखदा पावला स[1]गद जेविं ओखदा ५९
त्या सखा करि कपीस हा मग क्षिप्र ते सपट दाखवी नग[2]
ऐकवी प्रभुसि विस्तरें कथा तो समव्यसन मानसी-व्यथा ६०
ज्या खळें हरुनि दार +वांकिला बंधु त्या मति-मदांध-वाळिला
दे सख्यासि कपि-राज्य-संपदा होय ती दशमुखासि कंपदा
शोधिनां कपि-समूह भागला शोध मारुतिस मात्र लागला
तोय-राशि शत-योजनें उडे न प्रभु स्मरुनि संकटीं पडे ६२
लं[3]किका हुडकिली मनोजवें घेतलें वपु कपीश्वरें नवें
श्री अशोक-वनिकेंत देखिली जी स्वभक्त-हृदयांत रेखिली
तों दशास्य खळ काम-दास ये हो म्हणे सुमुखि कामदा सये
श्री वदे उचित रामराज या पावसील नच पामरा जया ६४
श्री-ऽधिक्कृत निघोनि तो खळ- धीश जाय बहु कीश तोखला[4]
मुद्रिका स्तवुनि शब्द भाव दे तीहि युक्त अतिशब्दभा वदे
दे शिरोमणि कथी निरोप ती काळसा खळ-बळीं शिरे पती
बोलिलासुखनदोनमासखा येउसत्वर बदोनमासखा ६५
बोलिला कपि मनो-गदा सहा योग्य शत्रु-दलनीं न दास हा
कोटि कोटि कपि-सैन्य आणिल स्वामिराज खल-राज्य खाणिल
तो अशोक-वन-वर्ति-सन्नगां संहरी गरुड जेविं पन्नगां
मारुती वधुनि अक्ष मारि तें सैन्य होय वश अक्ष[5]मारि तें ६८
त्या म्हणे कपि अरे दशानन प्रार्थुनी तुज अरे दशानन
वांचला न विषयांसि लोभला शोभलाहि न सुशील तो भला
भस्म होसिल महा-सती-व्रतें दाखवीलचि महास तीव्र तें

१ रोगी. २ अलंकार. ३ लंका. ४ संतोषला. ५ अक्षम- अरि-सोसण्यास कठीण अशा शत्रुतें. + वर्जिला.

रक्षि तो प्रभु पदा नता रितें भाग्य तों धूनमदा न ताशि तें ७०
धिक्करूनि कपिसत्तमा रणा ऐकुनीहि अनिमत्त मारणा
खड्ग घे निशिचरेंद्र काळसा व्याळसा कुपित मूढ-बाळसा ७१
त्या बिभीषण म्हणे अजी अहो वध्य दूत न अधर्म दान हो .
जाणते नवधितीच बा[१]चश जें यशा उचित तेंचि आचरा ७२
जो अनंतबळ विश्व-वेष्टवी तास्विसैकसुत-पुच्छ वेष्टवी
त्यासि अग्नि दशकंठ पेटवी तैल सिंचुनि बळेंचि पेटवी ७३
राक्षसांसि कथि कीं अशाम न कूटलेलय असो अशासन
त्या पुरींत फिरवा बरा धरा पापबुद्धि मग मुक्त हा करा ७४
स्थूल-दीर्घ-गुण-बद्ध-बाहु ती हिंडपुरी शिखि-मुखांत आहुती
तो करीं सुटुनि वीर टोळसे जाहले किति पलावा कोळसे ७५
बोलिले दशमुखादि तुच्छ हो सागरांत विझवी स्वपुच्छ हा
श्रीस वाचिक[२] पुन्हा नमूनि घे लाजवूनि पल-भुक-चमू निघे
सिंधु लंघुनि सलील पातला वानरौघ सुमहांत घातला .
तज्जयें प्रभुहि पावला सुखा भेटला निरखि तातसा मुखा ७७
हे शिरोमणि कथी निरोप हो बोलिला प्रभु न तोंहि रोप हा
ऋक्ष-वानर-बळाब्धि नायक तो म्हणे प्रभुसि चाल पाय रे
जाय सिंधुवरि सिंधुसा महा[३] हे सुरांसि जगदीश राम हा
दारवी म्हणति आर्य मोधिना[४] की उपायचि न कार्य साधिना
जे बिलंघिति कुधी सदा नया ते सुनादि कथिती अदान या
तों बिभीषण म्हणे अधा तरे नीतिनें हित नि[५]चा न घात रे ८०
साम जें हित करील आजि तें रत्नशन्यचि करूनि आजितें
भव्य धर्म नय होय राजया हे न बंधु सुन सायरा जया ८१
पंडिता कपि-चमू न[६] मावळी ते महाबळ तुम्हीं नसा बळी

१ सेवका. २ निरोप. ३ उत्साह. ४ आधियुक्तपणा. ५ युद्धानें.
६ थोडी. + हाय. ∗ मारुती. ∗ बाण.

जीवनप्रद दुजा उपाय न श्मासुतेसचि करीं उपायन ८२
दून एक कपि तोहि नावरे संगरांत बुडवाल नाव रे
त्याचि ऐकुनि नरा रखरा हवा हें करा कुळ न राख राहवा ८३
वांचती न नर वानर क्षण स्वामिचें उचित मान-रक्षण
तूं मृतास जड-नायका तरें नीघ जाचि हित काय कांतरें ८४
त्या म्हणे नमिन मी नरा महा राज-भक्ष्य मृग मीन राम हा
ठाबुकें सकळ देव वेद या हे न कीं यतिस देववे दया ८५
धिक् सभेंत म्हणतांहि तो कवी शांत-कोप न दुरुक्त ओकवी
ये जगद्गुरु कडेचि तापला जावया सकळ ताप आपला ८६
पावला गज दशार्त या नदा मानला अह्नि बंधु मानदा
दे पडों न शरणागता रिता अन्य याप्रभुअसा न तारिता
दुःख होय स्वरव जें निवेदिलें तोहि राज्य-पद ही निवेदिलें
भक्ति देउनि म्हणे उशी रहा स्वस्थ राम न करी उशीर हा ८८
सागरें अचळ-सेतु वाहिला भास्करें भुजगसाचि पाहिला
नीळ-वारि-रुह-हार वाटला चस्त सागर उरांत फाटला ८९
लांब सेतु शत योजनें दहा रुंद सुंदर विलोकितां महा
विस्मया त्रिदश पावले अहा वर्णवे न म्हणति प्रताप हा ९०
त्या तशा गुरु-पथेंहि ती अहो-रात्र तीन उतरे चमू अहो
श्रीस राम-शर-चाप दाखवी कांत-शोक-विष दुष्ट चाखवी ९१
जी विभीषणवधू महासती शोक सर्वहि हरी सहास ती
होय आश्रय महाविभूतिला श्री म्हणे बहु वहावि भूं तिला
सिंधुपारग सुवेळ-नाम या पर्वतीं सुगळ ने अनामया
बैसला प्रभु पहात दुर्ग तें ज्यापुढें सुरपुरेंहि दुर्गतें ९२
दुर्गवर्ति दशकंठ देखिला कीशपें परम तुच्छ लेखिला

---

१ सुह्रांत. २ भूमिम्हणे. ३ आरोग्याला. ४ दरिद्रें. + नजराणा
ॐ मिथ्यानें.

कोपनें उडुनि शत्रु नाडिला शीघ्र तन्मुकुट तोहि पाडिला ९४
वेष्टवी आजित शत्रुची पुरी तेधवां वहुन हर्ष त्या स्फुरी
पाठवी कथुनि राम अंगद न्याय-धर्म-पटु-शत्रु-भंगद ९५
त्या म्हणे शिव सदा विवेक ही रे पदें न भुजगा शिवे कधी
न्याय धर्म निपटूनि सोडिले दोष काय समजोनि जोडिले
सोड खोड यश ऋद्ध जोड वा भव्य सद्गुण-मणीस होडवा
दे हिरण्यकशिपूसि तो तुला व्याघ्र काय नगिळील ओतुला
श्रीविदेह-तनयेसि सोडुन प्राणद प्रभुसि हस्त जोडुन
वांच कां चळसि वाचु आंच ती लागतां सदिशुची न वांचती९८
तो वदे स्वर्ग-असक्त रक्ष माकडा मेरुचा वुज न लंघ्य हा कडा
शत्रुला भजुनि साधु हो पित्या कायरे म्हणति घांस ओपित्या
लाजतास उलतास दार ते त्यांसमेत चुलता सदा रते
त्याहि तद्विषय सख्याहि तार या किं त्वया जड नयाहि तारया
मत्त केवळ म्हणोनि मारिला वारिला सकळ दोष तारिला
हा जगद्गुरु अघा असा धुतो जो असें न समजे असाधु तो
ऋद्ध ये प्रभुचिया मनास जें ऋद्धिची धरुनि कामना सजे
तूंहि हो प्रणत पातका तरें जोडिजे प्रभुसि हात कातरें१०२
मत्प्रभावजित तर्क टाकिती देव-मर्त्य-बळ मर्कटा किती
बोलसि प्रभुपुढें असार हा दुर्गुण त्यजुन तूं असा रहा१०३
मोडु बालिश तशास न क्षमा रे मुखालि शत शास न क्षमा
बोल पावुनि न खेद हा शिरें कांते न त्यज मस्ते दहा शिरें१०४
कांपला बहु कुधी म्हणे धरा चार झोंबति जसे फणी धरा
वीर अंगद उडे बळी पुरा बाहु झाडुनि करी तयां चुरा१०५
तद्धरें परसभाहि फाटली ती तदा पविहिताचि वाटली

१ बरोबरी. २ मांजरास ३ उत्तमबाणाची. ४ आपले प्राण :
५ पृथ्वी. ६ मोसकपणा. ७ लज्जेंत. ८ पर्वता. + मस्तकें

लाज राक्षसपतीस लागली- तन्मनीं तसि बळींहि वागली १०६
वाळिसूनु कळवी अमाम या छद्म गर्व न असे असा मया
सिद्ध होय रघुसत्तमा रणें बा तुला उचित मत्तमारणें १०७
देखती कपि-पती मुखाकडे त्यांस हा प्रभु-निदेश सांपडे
व्हा घरेंद्र पर ते नवे गहूं पिष्ट होउत धरा न वेग हूं १०८
राक्षस-प्लवग-वीर-युद्ध तें मांडिलें परि-भवार्थ उद्धतें
रक्तपूर बहु दूर वाहिले ज्यांत अश्व गजही न राहिले १०९
भंगला दशमुख स्वयें तरी मूढ युद्धचि पुनःपुन्हा करी
त्या रणीं बहु कबंध-नर्तनें वीर-पाद-भुज-शीर्ष-कर्तनें ११०
मेघनाद स्मरपाळ जो धरी सानुजप्रभुसि बद्ध तो करी
नागपाश खगपाळ ते हरी जानकीस बहु शोक दे अरी १११
कुंभकर्ण उठवूनि सर्व तें वृत्त ऐकवुनि दोष-पर्वतें
धाडिला जरि धरूनि आळसा ये गमे तरि कपींस काळसा
संगरीं बहुत तो वधी हरी[1] पाडुनि प्लवग-पाळका धरी
हा हरी[2] तुटुनि कर्ण नासिका निर्जरांसि कथि वर्णना सिका
तो सकोप शतशः कपी गिळी सर्व वानर-चमू पडे शिळी
तों करि प्रभु तदंग-कर्तन स्वः[3]सदांत बहु होय नर्तन ११४
ऐकतां खळ म्हणे असावध स्पष्ट तो तरिच हा असा वध
घोळिना हरिस लक्ष्महायन[4] स्वानतीं शिरवि दक्ष हाय ना ११५
धैर्य दे दशमुखा मिशा पिळी मेघनाद सबळा अजा खिळी
जिष्णुस प्रळयकाळ वाटवी तोय तो यमसुखस्थ आटवी १६
आणि मारुति महौषधि क्ष्मा[5]-भृन्महाशिखर त्या हरि श्रमा
सर्व होउनि विशल्य कोपले त्यां पुढें अहित वीर लोपले १७
तो रणीं कपटजानकी वधी फार हा म्हणवि ज्या न की व[illegible]

१ वानर. २ हरणकरी. ३ स्वर्गसंबंधीसभेंत. ४ लक्ष्यवेधें. ५ क्ष्माभृत्-महाशिखर- पर्वताचें मोठें शिखर. + घिरट, जांतें.

त्या बिभीषण खळास मारवी होय लक्ष्मण तया तमा रवी ११८
घे दशास्य बहु तापला असी जी विनाश करि आपला असी
हे वधाविच म्हणे सतीहि भी सिंह पाहुनि पुढें जसी इभी ११९
तो स्वपार्श्वसचिवें निवारिला आयु वांचवि तया विचारिला
तत्प्रयुक्त बळ ये समक्ष या पाठवी हरनसा यमक्षया १२०
मारणेंचि मरणेंचि हा पण स्वाननें करि निधान आपण
ऋक्ष वानर महाबळ क्षया लागता यश मिळे बलेक्ष या १२१
शक्ति हाणुनि उरांत लोळवी लक्ष्मणास हनु-भान बोळवी
शृंग लक्ष्मणहिता तशाहि तें आणिलें पवनजें सशाहितें २३
राम भूमिवरि तो रथीं अरी यास्तव स्वरथ पाठवी हरी
मानद प्रभु चढे तयावरी निस्तुळाहव सुरारिशी करी १२३
राम रावण रणांत कोपले तों परस्पर बळौघ लोपले
पाहणार बहु दूर थोपले आधि नें सुरमुनींद्र चोपले १२४
राम-रावण-कृता रणा कवी राम-रावण-रणा-परि स्तवी
शीनि दाखविलि अद्भुता नवी आजि आजिमुख मरवो म्हणे रवी २५
एक एक शतदा असी दहा तोडिलीं तरि तसीच तीं महा
विस्मय प्रभुहि पावला अहा ओळिलाहि कुतुकी महा महा १२६
भेटला घटज पूर्णजो तपें भानुचें हृदय दे म्हणे जपें
सुप्रसन्न रवि होय याबर क्षिप्र दे करुनियां दया वर १२७
बाम्ह योजुनि महाबळें शरें भेदिलें दशमुखोर मावरें
पाडिलाहि पवनें जसा नग स्वस्थ होय बहु सर्वही जग १२८
पुष्पवृष्टि जगदीश्वरी पडे स्तोत्र गान नटनें चहूंकडे
दुंदुभि-प्रमुख वाद्य वाजलें गाजलें सुयश विश्व साजलें १२९
तत्प्रताप बहुवार वानिला श्री वरें मग न शत्रु मानिला

१ खड्ग. २ वाघकारें. ३ हत्तीण ४ इंद्र. ५ रावणाचें उर. + सु स्व, पांढरें. ∴ युद्धरूपउत्तमयज्ञांत. ॥ कुत्र्याचा वा शत्रु अशा प्रयाला.

तत्क्रिया तदनुजाचिया करें सांग चालविलि त्या दयाकरें १३०
तो बिभीषण तया पदावर स्थापुनि स्थिर असें सदा वर
दे असा प्रभु महादयाकर स्वारि ते जुळिति जे न या कर १३१
पाठवी पवनजा सती कडे श्रीस हर्ष जय-सेवनें घडे
तत्प्रिय प्रभुसि कीवा जाणवी यातुपां कथुनि तीस आणवी ३२
श्रीस ईश्वर म्हणे यशीं रुची-सेंचि सत्वर करावया शुची
युद्ध लाविन तुला न हात मी की न मग्न कुळ हो महातमी ३३
शुद्धि नां परवशीं न राहुन स्त्रीस चारिल सुधा न राहुन
जा रुचेल तुज जो तया वर क्रोध जानकि करीं न यांवर ३४
ऐकतांचि धरि फार कांपती श्री म्हणे कठिन आजि कां पती
उग्र दिव्य करि साधु बुद्धि नें जें जगाहि कळवी स्वशुद्धि ते
पावकांतन उठीहि वाळली कुंडपंकज कुटीहि वाळली
माळसी गमलि वर्णिली अजें शंकरें सुर-मुनीश्वर-व्रजें १३६
अग्नि तो जनकसा विशाहसा दिव्य काळ वदला निवाहसा
ये करीं भगवदंकगा तिनें जावया सकळ पंक गातिनें १३५
भेट शक्र-सख दे परासुता ती मृषाचि गमली परासुता[2]
बोलिले कवि यशा निवाल या मेघिनां बहु महाशिगाल्या १३
सर्व युद्ध-मृत वीर वांचवी सूर्यसा सुरा महेंद्र सांचवी
हें चरित्र कवणा न लांचवी वाटलें नृपति पुत्र पांच वी १३
पूजना विनवि यातुराज या जो जगा अतिभयातुरा जया
लाविता हरुनि ताप गावया जावया भव लया भजावया १४
कंद मूळ फळ शाक भक्षितो त्या म्हणे भरत मार्ग लक्षितो
दर्शनार्थचि असूंसि रक्षितो केवळ प्रिय मदीय अक्षि तो १४
त्याविणें मज नकोचि अर्हणा जेविं मानिपुरुषासि गर्हणा

---

१ मजवर (रामावर) २ मरण.

मी ससैन्य सुगळांचेनें मही[1] भेटवीं भरत रक्षते मही १४२
गोरवी प्लवगनायका मग श्रेष्ठ पुष्पक विमान कामग
दे तयांस. नुति[2] आयकों वसे करसाचि विभु भक्त कोंवसे १४३
जी प्रियालि सरमा तिची[3] कळा कन्यका हितकरी गुणोज्वळा
ती त्रिवर्णसहिता जटा[4] वरी तो सुपार्श्व वर दे तयां हरी १४४
आक्रमी वर विमान तें नभा भानुहूनि मिरवी उणी नभा
अंकिं घेउनि रमेसि राम तो स्वानुजासह सुवीर वानि तो १४५
श्रीस दाखवि रणाध्वरावनीं तेपिशीर्ष हरिची वरा वनीं
तन्मनासि नगमेच सेतुला त्या म्हणे मग तुला नसे तुला[6] १४६
जें बिभीषण-समागम-स्थळ श्रीस दावि हरिता मनोमळ
ऋष्यमूक मग दाखवी वदे या नगीं मज सखा रडों न दे १४७
वायु[7] मित्र-मणिच्या सुरीतिला दाखवी प्रभु गुंहा पुरी तिला
अंगदांरणिस भूमिजानि घे पुष्पकीं मग पुरांनि जा निघे १४८
चिंतिलें पुरविता महामणी या स्थळीं हिडिंब[8]वायुचा फणी[9]
भेटला पवन-पुत्र हा स्वणी आधिनें म्हणुनि मी तुझा धणी
हें कथूनि सरसीहि पाहवी जी मुहूर्तभरि अश्रु गाळवी
प्रेमराशि शबरी तिची कथा ऐकवी नुरवि जी भवव्यथा १५०
खावया धरि कबंध देवरा या तुझ्या हृतें[10]मनांगद वरा
मारितां वरुनि शाप-मुक्ति नें तो कथी विरह शांति-युक्तिनें
गौतमी सुमुखि हे पहा नमीं मुक्ति जीहुनि म्हणे लहान मी
पांच तापहर साधुसे वट प्रार्थितां करिति गोड संवट १५२
जो तुझ्या श्वशुर गृध्र-राज तो देवि दक्ष-भवनीं विराजतो
हा नदीय सानि मित्रसा वड प्राज्य पुण्य म्हण यासि सावड[11]
कुंभजाश्रम सुलोचने पहा अत्रिचा सुमुखि सान्निपांस हा

---

१ उत्साहयुक्त. २ स्तुति ३ कन्या. ४ त्रिजटा. ५ अरण्य ६ तुळणा
७ वारेस. ८ हिडिंब-असु-वायु-शत्रुच्या प्राणवायूचा. ९ सर्पराज. १० हरणारे
लो अंतःकरणासंबंधी व्यथा तोणें असी हेमीनें ११ नमाकर

चित्रकूट सरिबि पोषितो महा हा प्रयाग म्हणतो मला रहा१५४
ती दिसे निजपुरी पहा सये जींत नित्य भरतें मॅह्मास ये
तात-मित्र-मुनि-पाद-वंदना पुष्पका उतर साधु-नंदना १५५
जोड हस्त यमुना सरस्वती जान्हवी अवनिचें बरेंस्व ती
बाह्नती खगरवें रखुणाविती प्रीति फेन-हसितें दुणाविती १५६
स्वाश्रमीं प्रभुसि राहवी मुनी तीहि तसदभवा महाधुनी
वातपुत्र भरता गुहाकडे पाठवि प्रभु यथोक्त तें घडे१५७
मारुति प्रचुर हर्ष दे गुहा भानुचा कर जसा सरोरुहा
राम-मेघ-रव शीत वात कीं होय तो भरत-बाळ-चातकीं५८
ती यथोक्त वनवास सारुनीं स्वर्गि-भूमि-सुर-ताप वारुनीं
घे निरोप मुनिचा निघे हरी त्या गुहासि पहिलें सुखी करी
मोरसा भरत भक्त वाटला मेघसा प्रभु रसेंचि दाटला
भेटला करुनि यत्न सानुजा स्वांघ्रि-पद्म-रज रत्नसाजु ज्या
हर्षले विषयसेवना गर मानिते अवनि देव नागर
वेंचले विरह-कुत्स वासर हा म्हणे इतरउत्सवा सर १६१
वाद्य गान बहु-नृत्य माजलें उत्सवें पुर उदंड साजलें
यासि देवपुर सर्व लाजलें कीं यशों पर असें न गाजलें६२
श्रीवसिष्ठ गुरु फार हर्षला त्यांसि भेटुनि मुदश्रु वर्षला
कीश यातुपति भेटले तया बंधुयुक्त भरता महोदया १६३
श्रीस कौशपवधूस दाविती प्रेम तुल्यचि मनांत भाविती
फार गौरविति सर्व सासवा ज्या मना अदितिशाचि वासवा६४
बंधु-यातु-कपि-राज शोभवी राम काम नयनेंहि लोभवी
वेष घेउनि बरीं कळेवरीं जीवसाचि शिरला प्रभा धरीं १६५
श्रीवरीं गुरुमुखवर्षि हर्षले तीर्थ-तोय विधियुक्त वर्षले
राज-राज विभु होय कामितें दे समर्पिल उदार कां मितें१६६

---

१ उत्सवासकिंवाआनंदास. २ श्रेष्ठद्रव्य.

यौवराज्य भरतासि देव दे मारुति-प्रति अभीष्ट घे वदे
तो यश श्रवण तोंचि सासुता हें वरी प्रभुहि ई जसा सुता १६७
प्रीति नित्य वरवि प्रजावनीं त्यांत चित्त वरविप्र ज्या वनीं
सर्वदा नवनवा सवा सजी सेवुं दे न वन वासवास जी १६८
श्रीरिपुघ्न लवणासुरा रणीं संहरी पुरवि विप्र-धारणीं
तीन-कोटि भरतेंहि मारिले मत्त शत्रु बहु साधु तारिले १६९
झाले पुत्र कुशादि आठ दिधलीं त्यां आठ राज्यें नवीं
केलें धन्य चरित्र हस्त बुडतां सर्वांसि नेतें भवीं
स्फारीं गांग-सुधा-रसीं गुण वसे जो तोचि नांदे लवीं
सारें पाप समूळ भस्म करितें हे शक्ति नाहीं दवीं १७०
गद्य रामायण हें मयूरें रामनंदनें
श्रीराम-चरणीं भावें अर्पिलें कृतवंदनें १७१


समाप्त.

## आर्या*रामायणप्रारंभ.

श्रीरमण दशरथाच्या सुर-कार्यास्तव कुळांत अवतरला
तें यश गातां प्राणी अगणित-भव-सागरीं तरला १
पंक्तिरथाची[1] महिषी कौसल्या राम नाम तत्तनया
हा माराया त्या जो लंघी दशकंठ मत्त नया[2] २
नृप दयिता कैकेयी तत्तनुजा नाम भरत हा स्थापी
याचें यश साधु-सभा हृदयांत धरूनि आस्था पी ३
कमति सुमित्रा तत्सुत लक्ष्मण शत्रुघ्न गुण-पद ध्याने

---

१ दशरथाची. २ नीतीस.

* छंदविशेष या छंदांत प्रथमपदीं १२ बारा मात्रा, तिसऱ्याही आणि दुसऱ्यांत अठरा व चवथ्यांत पंधरा मात्रा असतात.

रामा भरता देती प्रीति गुरुजना अदभ्रा ने ४
राजा मुनिच्या पुरवी देउनि सुत जेंवि ताटकामातें
तो त्यां[1] म्हणे अभय दे मारूनि हे ताटकामातें ५
जीची जसि मारीची[2] प्राणि-क्षय-हेतु तत्समा रीती
विश्वामित्राज्ञेनें कौसल्या-वत्स मारी ती ६
त्रिजगद्गुरुला गाधिज शत दिव्यें सद्यशोर्थ दे अस्त्रें
स्वामी प्रसन्न होउनि कृतकार्याला जसीं वस्त्रें ७
सिद्धाश्रमीं प्रभु करवि विनउनि मुनिला नवा[3]सवारंभा
राक्षस वधी जसि रुचे हे कीर्ति न वासवा रंभा ८
दे कीर्ति अहल्येतें अर्पुनि रज राम-पाद-राजीव
तरले भवार्णवीं या धरुनि यद्वां आदरा जीव ९
पापी तरावयाला धरिति प्रभुचाचि लोक विश्वास[4]
जो ऐके सोडीना नामरहित तो कवि श्वास १०
रघुपति सीतेसि वरी मोडुनि पुर-रिपु-धनुष्य-वल्लीला
दिसला मनुष्य भासे प्रभुची न मनुष्यवल्लीला[5] ११
दे जनक गाधिजोक्तें रामावरजां तिघां तिघी कन्या
दशरथ होय प्रमुदित पाहुनियां त्या स्नुषा[6] धन्या १२
भार्गव राम महेश्वर- कार्मुक-भंगें धरूनि वाटेतें
क्रुद्ध प्रसन्न हो तो होय महाश्चर्य वाटे तें १३
शत्रुघ्न-सहित भरता मातुळ ने पुसुनि आपल्या नगरा
तन्मातृदुर्मता भी नृप भीता तापल्या न गरा १४
युवराजत्व गुरु-मतें देवूं लागे नृपाळ रामातें
मागे वरद्वय दिलें जे ती दुर्बुद्धि रामा[8] तें १५
मत्सुत युवराज असो राम वसो अब्द[9] काननीं चवदा

---

१ रामा. २ महामारीची. ३ नूतनयज्ञाच्या आरंभा. ४ भरवंसा. ५ मनुष्यवत्-लीला-मनुष्याचेपरी वर्तणुक. ६ सुना. ७ विषा. ८ स्त्री. ९ वर्षें.

सुज्ञ महाराज तुम्हीं सत्यव्रत कीं अवश्य वदा १६
जनकाचें रक्षाया सत्य निघे मुदित राम सीता तें
मान्य करी लक्ष्मणही वरिलि म्हणे तापसी तातें १७
नमुनि गुरु-जना नेसुनि कैकेयी-दत्त वल्कलें गेले
नेले रथें सुमंत्रें पौर म्हणति हा वनीं केले १८
भेटुनि गुहा निषादा भक्ता गंगा-तटीं जटा रचिती
गुह-सचिवांच्या हृदयीं होय सुनिश्री कटारचि ती १९
फिरवुनि नृप-सूतातें गंगा उतरूनि विप्र-यागातें
सफळ कराया जाय प्रभु पद लावि प्रयागातें २०
नमुनि भरद्वाजातें प्रभु वसवी चित्रकूट[1]-गांवास
सोडी मुनीस जो खर[2]-मुख-रक्षो-दत्त तो त्रास २१
सूत कथि चित्रकूटीं झाले बा सर्व-तापसा मान्य
शोकें भूप मरे तो काय तया ताप सामान्य २२
जन म्हणति नृपें केला आपलिया आत्मघात हा हातें
शोक-विषाब्धींत बुडे बोले साकेत हाहा तें २३
सानुज भरत वसिष्ठें धाडुनि अतिशीघ्र दूत आणविला
राज्यार्थ यत्न केला मातेनें त्यासि जाणविला २४
भरत म्हणे हा मूढे दूषुनि निज वंश काय गे हाहा
शोकाग्नि लाविला त्वां केलें हित काय गे हाहा २५
ज्येष्ठ गुण-श्रेष्ठ वना राम दवडिला जया सर्व दास
शोचिति राज्य किति रुचे जीव नहि तया सखेदास २६
कौसल्या समजावी भरता बांधुनि गुरु-क्रिया करवी
मग जाय चित्रकूटा तुष्टि भरद्वाज दे बरवी २७
प्रभुला वंदुनि साश्रु स्वपित्याच्या कळवि भरत हा निधना[3]

---
१ चित्रकूट पर्वतास. २ खरप्रमुख राक्षसांनीं दिलेला. ३ मरणास.

राम म्हणे हा* होतां अतिलोभी जेविं हानि धना २८
पिंड पित्यासि दिल्यावरि भरत म्हणे धरुनि पाद या परतें
एक न सत्यसंध[1] त्रिदश-हितोद्यत दयापर तें २९
त्या वांहि न लंघावें स्वगुरूक्त अवश्य-शब्दच वदावा
राज्य करीं बा येनों मी सरतां अब्द चवदावा ३०
सिंहासनीं बसाया मागुनि घे पादुका शिरीं वाहे
राहे नंदिग्रामीं अंत्याब्द-समाप्तितें पाहे ३१
अत्रिस सानुज रघुपति अनुसूयेचीं पदें नमी सीता
दे अंगराग माल्यें ती सुशीला सती-गीता ३२
दंडकवनीं विराधें हरिली व्याघ्रें मृगी तसी तन्वी
सोडी तीतें धरितो ते वधिती त्या महाधन्वी ३३
शरभंग सुतीक्ष्ण घटज ऐसे दंडक-वनीं तपा रचिते
जे विप्र पावले सुख विभुसि पहातां अपाराचि ते ३४
गृध्रपति जटायु सखा ताताचा तातसाचि तो अजितें
हर्षविला थोरपणा प्रभुचें वदवेचि ना आजि तें ३५
गोदावरी-वर-तटीं पंचवटींत[2] छदालयीं राहे
प्रभुनें दशमुख-भगिनी शूर्पणखा कामुकी पाहे ३६
मायारूपवती ती प्रभुसि म्हणे मीच सार सत्य जुनी
स्त्री न वरीं कुटजकुसुम[3] चुंबि न अलि सारस त्यजुनी ३७
स्मित करुनि प्रभु सांगे स्त्री आहे मज न लक्ष्मणा तरुणा
जा त्या भज वरिली जी ईतें सोडूं नदे करुणा ३८
लक्ष्मणहि म्हणे वेडये त्यजुनि प्रभु वांछितीस कां दास
प्रतिबिंबासि चकोरी न भजे सोडूनि चांदास ३९
पुनरपि गळां पडे ती निर्लज्जा म्हणुनि हांसली सीता

---

१ खरी आहे प्रतिज्ञा ज्याची असा राम. २ पर्णशालेंत. ३ कुड्याचें फूल.
*: हाय.

क्रोधें खाया धावे शूर्पणखा होय तों भीता ४०
राम म्हणे सौमित्रे न करूं सीता-विनाश हे चंडी
तों लक्ष्मण तत्कर्णा- घ्राणातें तत्क्षणीं खंडी ४१
तद्बंधु सबळ खर ये माराया त्यासि रामभद्र वधी
प्रभुची दुर्जनदंडीं धरि करुणार्द्रीहि न द्रव धी ४२
प्रथम अकंपन राक्षस मग शूर्पणखा कथी परिभवानें
त्या दशमुखा नमोसे विधिसह रचलें परिभवानें ४३
स्त्रीरत्न-जनक-तनया-हरण मनीं धरि निघे तदा त्रास
काळाचा ऐसें त्या मारीच कथी महोयास ४४
त्या सांगे सीतेतें हरितों म्हणावयया अरिस होय
मारीन तुज न होसिल या कार्यातें जरि सहाय ४५
राम-शरें मरण बरें मारीच असें स्व-मानसीं आणी
ये आश्रमीं कपट-मृग होय विलोकी तया राणी ४६
प्रभुतें म्हणे धरा हा नेऊं स्वपुरासि चांगला गावें
हें हरिण-रत्न याचें पुर पाहूं आंग लागावें ४७
लक्ष्मण म्हणे मृग न हा राक्षस मारीच होय मायावी
जी ताटका निवटिली त्यांतो रक्षोधमा यो वीं ४८
सीता म्हणे उगे हो लक्ष्मण जी काय घालितां मोडा
जोडा चापीं गुण घ्या बाण स्वामी न या सोडा ४९
श्रीराम म्हणे वत्सा सीतेचें तूं करीं परित्राण
मृग असतां धरिन हरिन राक्षस जाणोनि मी प्राण ५०
इत्यादिवय मृग पळे ब्रम्हास्त्रें बाण राम जों हाणी
हा सीते हा लक्ष्मण ऐसी राक्षस वदे वाणी ५१
मरणीं राक्षस जाणि प्रकटी जी आपल्या स्वरें हाक

१ सीता. २ शिवानें ३ मारीच्या. ४ प्रसंगें.

प्रभु शंके पतिनाशें सीताहि धरी मनीं धाक ५२
स्व-पति-प्राण-त्राणा सत्वर जा लक्ष्मणा म्हणे सीता
सौमित्रि कथी राक्षस-कपट करी क्रोध ती भीता ५३
तूं ज्ञानि स्त्रीकाम श्रीकाम[1] भरत तसा अरे मूढा
गूढा प्रियनिरता गुरु-घातकरा दुर्नयारूढा ५४
मद्धन रक्षिल मज जा जवळ मनुष्याधमा नसावास
लक्ष्मण निघे नसोसे तो त्याच्या मानसा वास ५५
हाय म्हणे काय करिल कोय[2] न गणि गरेणा[3] माय दे खाया
घाय उरीं स्वायत्ता तो जाय प्रभु-पाय देखाया ५६
तों ये रावण देवी सिद्ध करायासि देव-कार्यातें
नेवूं दे गृध्रेंद्रा सोसेना मेघकार्यातें ५७
सुर म्हणति हरूं देइल हा पावक काय या तुपासून
सोडविली रथ भंगुनि सीता क्षत-यातुपासून ५८
पक्ष अधर्में खड्गें दुष्ट दशानन जटायुचे छेदी
ने श्रीस गगन-मार्गें सन्मुनि झाले तदा खेदी ५९
सुग्रीवादि विलोकुनि कपि पांच तयांत ती सती टाकी
स्वालंकार सपट[4] ते पाहुनि हो बोलिले नाकी[6] ६०
मारी हा[5] राम अशा ती हा[5] लक्ष्मण अशा नभीं हाका
काका हंसीसी श्री त्या सांपडली गमे नाका ६१
लंकेंत अशोक-वनीं नेउनि दशकंठ रवळ तिला ठेवी
देवी हा राम म्हणे हैं नामामृतचि ती सेवी ६२
लीला-मानुष-विग्रह राम प्रभु राक्षसा वधी परते
तों लक्ष्मण भेटे जो गुरु-पद-भजनें तरीं न रते ६३
तो सांश्रु नमुनि सांगे आर्येचें परुष[7] बोलणें सारें[8]

---

१ राज्येच्छु. २ देह. ३ भक्षण. ४ वस्त्रसहित. ५ हाय. ६ स्वर्ग स्थलोक. ७ कठोर. ८ सगळें.

प्रभु हा म्हणे सिकविलें तद्वचनें डोलणें सारें ६४
माझ्या तुझ्याहि दैवें तद्वचनें गरळ घातलें कानीं
दशरथ-सत्कीर्तीचा केला कीं घात लेंकानीं ६५
धावुनि येवुनि पाहे तों शून्या प्रभुसि ताप दे शाला
रम्या स्थळाहि न भजे यति जैसा पाप-देशाला ६६
बहु शोध विलाप करी स्त्रैणसा राम काननामाजी
गोदे कोठें ती दे माझ्या मन कान नामाजी ६७
अग नग खग मृग विनवी रडवुनि करि राम दीन वाघांस
नगिळी पोतेसुखींचा घेइल कैसा नवा घांस ६८
वन शोधितां क्षतार्त स्वपित्याचा देखिला सखा पडला
घडला नाश कथी तो प्रभु पितृ-शोकें तसा रडला ६९
त्याची क्रिया करि निघे धरिला सानुज वनीं कबंधानें
तच्छाप-हरी याचा अरिही तापे न बंधानें ७०
बसुनि विमानीं सांगे सुग्रीवा भेट रविसुता आधीं
सख्य करुनि देवांच्या कार्यातें आपुल्या साधीं ७१
भेटे मतंग-शिष्या प्रभु-पूजा आदरें करी शबरी
ती गति पावे यातें स्मरतांचि जसा करीश बरी ७२
प्रभु पंपा-सरसीतें पावे हर्षितेंसि आवरि श्वास
सोडी उष्या यदंशा प्रतिपाळिति आठ विश्वास ७३
मारुतिनें भेटविल्या श्रीरामें मुदित-मानस ख्यातें
होय स्फकंठ तयाच्या प्रभु दे बहुमान सख्यातें ७४
स्फटीक अलंकारा- सह दावी उत्तरीय देयास
त्यातें उदश्रु होउनि निजवक्षीं राम दे वास ७५
रवि-सुत सुग्रीव पुसुनि नेत्रें मांचूनियां सखे दास.

---

१ श्रेष्ठ (तद्वचनें या शब्दाचें विशेषण), २ बालक मुखींचा ३ वमति, म्हणे.
ः स्त्रीलंपटसा. + जटायु.

मी तुज भेटवितों स्त्री ऐसें बोले सखेदास ७६
दयिता हरूनि जपतो अग्रजहि वधावया मला वाळी
भक्ता प्रणताहि जसा अतिपापाला भला वाळी ७७
तरि कपिहि मी न कांहीं गडबडलों धैर्य धरुनि वां पाहें
तूं नर कां हा म्हणसी हरितों त्वदुःख बापा हें ७८
त्यासि म्हणे राम सख्या हरितों त्वदुःख सर्व मी आधीं
कार्य करुनि मग माजें सद्यश तूंही सख्या साधीं ७९
अतिबळवान् वासव-सुत जो वानरराज दुष्टधी वाळी
त्या मारी दे राज्य प्रेमें प्रभु भानुजा पाळी ८०
सर्व-दिशांत सतीतें शोधाया सुगळ कपिबळें प्रेषी
दिक्-त्रय हुडकुनि आले देखिलि न श्री न तो द्वेषी ८१
दक्षिण-दिग्गत लंघुनि मासावधि कीश चिंतितां चंडा
प्रायोपविष्ट झाले सिंधु-तटीं थाकले दंडा ८२
संपाती गृध्रेश्वर भक्ष्यार्थ महेंद्र-नग-गुहा सोडी
भक्षीन म्हणे कपि हे याच्या मांसीं असे गोडी ८३
मेला धन्य जटायु श्रीरामाच्या करूनियां कार्या
आम्ही व्यर्थचि मरतों प्रभुची न विलोकिली भार्या ८४
ऐसें अंगद बोले त्याऽवरज-जटायु-मृत्यु-जाणून
संपाती वृत्त पुसे शोकें नेत्रांत तोय आणून ८५
अंगद सविस्तर कथी प्रिय-सख-दशरथ-सुत-प्रिया-हरण
करि रावण तत्खड्गें जटायुला जाहलें मरण ८६
ऐकुनि अत्यप्रिय तें गृध्रेश्वर शोक-मग्न-धी होय
तो यतें मन आवरि अनुजा दे सागरीं तोय ८७
शत-योजनाऽब्धि-पारीं लंकेंत दशाननें हृता आहे

१ बर्जी.

सीता सुदूरदर्शी गृध्र म्हणुनि हा तितें पाहे ८८
कपिहो वधी अधर्में ज्याकाळीं देवराज वृत्रास
आम्हांपासुनि भंगे पावे तो वज्रभृत्[1] त्रास ८९
सूर्याकडे बळ-मदें आम्ही भानें उडोनि जों गेलों
रविच्या उग्रें तेजें व्याकुळ दोघे नभीं केलों ९०
पोटाखालीं धरिला म्या अनुज जटायु कीं म्हणे रक्ष
पक्ष जळाले माझे जैसें दावानळें कक्ष[2] ९१
पडलों याचि महेंद्रीं मजला महद्‌ळचि ताप दे यांचे
जीवित वाटे झालें पति भंगी शाप देवांचे ९२
वारुनि ताप निशाकर[3]- मुनि सांगे या नगीं असाचि रहा
रामप्रभुहि म्हणेल स्त्रैणा नर जसा तसा चिर हो ९३
तद्दूत श्री-सीता- शोधा येतील ऋक्ष कपि योध
त्या अति-चिंतार्तातें जेव्हां कथिसील तूं शोध ९४
तेव्हां तत्काळ तुझे फुटतिल हे दग्ध पक्ष नव दोन
गेला आणिक कांहीं तो सुतपोदक्ष न वदोन ९५
सीता-प्रवृत्ति कथिली कपिहो मज पक्ष हे पहा आले
ऐसें कथुनि उडे तो अंगदमुख हरि सुखी झाले ९६
अति-दुर्घट- शत- योजन- सिंधु-विलंघन सचिंत कपि लक्ष
जाइन येणें तुमजें वालिसुत असें वदे दक्ष ९७
त्या जांबवान् म्हणे बा तूं स्वामी राजपुत्र साजावें
त्वां आज्ञा करुनि यशें प्रेष्यजनें[6] साहसा जावें ९८
मारुतितें स्तवुनि कथीं अत्यद्भुत जन्म कर्म ऋक्षप हा
बा तूं वसंत सफळचि करिसिल संकल्प वृक्ष पहा ९९
प्रभुचें कार्य कराचें बा त्वां नघडावयासि कुंभ्मा हें.

१ इंद्र. २ तृण, वल्ली. ३ चंद्रऋषि. ४ हाय. ५ वानर. ६ पारविहवा अयोग्य अशा सेवकजनें. ७ निद्रा.

ऐसें म्हणतांचि उडे वातात्मज वीर उत्साहें १००
त्या अंजना-तनूजा प्रभु-मार्गण गरुड पवन वेगा तें
गाती धांवत येउनि आनंदें नवनवे गाते १०१
घ्याया विश्राम उठे मैनाकाचळ तया उरें ताडी
मानुनि विघ्न-स्तंभा स्तंबेरमसा तळीं पाडी १०२
शत-योजन मुख पसरी सुरसा त्यामाजि मग समा नवती
गावें स्वतनु तनु करुनि शिरुनि निघे देव मानवती १०३
छाया धरूनि वोढी यासि गिळी सिंहिका तिला मारी
सागर-पार पावे हें कर्म नसे तया भारी १०४
लंकाधिदेवतेतें भंगुनि रजनी-मुखीं पुरीं शिरला
अंतःपुरांतही तो सीता शोधावया फिरला १०५
होउनि सचिंत हनुमान् हुडकी अंतीं अशोकवन उरलें
त्यांत श्रीतें पाहे सरलें भय इष्ट तें पुरलें १०६
तों रावण ये श्रीतें प्रार्थाया कपि वनीं दडाला हो
अरिस सती धिक्कारी नाश म्हणे तुज जडाला हो १०७
तो राक्षसींस सांगे बोध करा मासयुग असे अवधी
मग मानुषी मला द्या खाया हे जरि नव्हे मवधी १०८
तो कोठें हे कोठें त्या नर-तेजें पहा कसी उडुती
त्यजुनि सुख दुरभिमानें मुग्धा दुःखीं बळें बुडती १०९
तो आतां रात्रिचरी म्हणती सीते न संप दारा हो
राज्याची तज्जीवित भोगाया संपदा राहो ११०
सीता म्हणे रहा गे दासीनीं भव्य काय सांगावें
हंसीनीं निजहंसा काकींनीं वायसां गावें १११
दासी म्हणती म्हणल्ये राजाहुनि अधिक कीं नरा खावी

---

१ हत्तीसा . २ बारीक . ३ अहो . ४ होऊ . ५ दोनमहिने . + नबद .

मोटी खोटी कोटी प्रभु निंदी हे न राम्बावी ११२
त्रिजटा म्हणे कुमतिहो वांचा साध्वीस हात जोडून
म्यां स्वप्न देखिला दश-मुख मरतो धर्म मोडून ११३
उद्बंधनें[1] मराया वेण्युद्ग्रथनें[2] सती गळा बांधी
कां धीर कपि उपेक्षिल तुटली आशा पुन्हां सांधी ११४
प्रभुतें स्तवूनि वंदुनि मुद्रा दे कुशल पुसत आयकवी
तच्चूडामणि घेउनि पुसुनि निघे वीरराय कवी ११५
वन मोडी वन-पाळ- प्राण हरी काळसा महाबळ हा
कलहा करि वधि अक्षा बहु मथिले बोलिले खळ हाः[3] ११६
घननाद-ब्रम्हास्त्रा दाटुनि घे सांपडोन बांधून
नेती सभेसि म्हणती खावा हिरवा न रांधून ११७
पुसतां कथी दशास्या शूर्पणखा-घ्राण-कर्ण-कापविता
खळ-हंता मत्स्वामी श्रीराम खळांसि तापविता ११८
मी वात-सुत हनूमान् दूत श्रीजानकी पहायास
आलों देखुनि धालों सार्थक झाला महायास ११९
प्रभुचें स्त्रीरत्न तुवां बहुधा नकळोनि आणिलें चौर्यें
शौर्यें राम अधिक रे मरसील स्पष्ट तूं क्रौर्यें १२०
या वाक्यें पुत्र-वधें वन-बळ-भंगें अरी करी क्रोध
मारुतिस म्हणे प्रभुला करिसी तूं माकडा बोध १२१
मी सर्व-रत्न-भोक्ता विषयीं शक्र स्मरोनि न रते ज्या
त्या मज विश्व-प्रभुला भिवविसि वर्णूनि नर-नंदना ज्या १२२
क्षोभे बडबड करि घे त्या माराया सि खड्ग दूतातें
साधु विभीषण विनवी बा मारावें न दूतातें १२३
तो राक्षसांसि सांगे स्नेहार्द्र-पटें करूनि पुच्छातें.

---

1 गळफांसानें. 2 वेणि-उत्-ग्रथन-वेणी च्यावर बांधण्यानें. 3 हाय.

घेवुनि पेटवुनि पुरीं फिरवा द्या दंड तुच्छातें १२४
केलें तसेंचि अरिनीं कीवा मनीं स्पष्ट दुष्ट तो हांसे
कां सेना हर्षेना नगणुनियां मृत्युचे फांसे १२५
होय प्रदीप्त सीता- संप्रार्थित वात-सख न या पोळी
होळी करि लंकेची हरि कर तो दुष्टधी चोळी १२६
मारुति म्हणे बिभीषण- गृह रक्षीं दे सुतासि वर कडवा
लंकेसि करीं दहना तुज दिधले सर्व वरकड वा १२७
विझवी पुच्छ समुद्रीं लाबुनि म्हणवावया अरिस हाय
लंघुनि सागर भेटुनि ते सर्व सुखी करि सहाय १२८
राज-प्रिय मधुवन तें मार्गीं सुसमृद्ध लागलें लुटिलें
कुटिलें बळ दधिमुख-सह वनपाळें कळविलें कुटिलें १२९
कृतकार्य असें समजुनि सुग्रीवें सैन्य शीघ्र आणविलें
मारुतिनें चूडामणि देउनियां भव्य जाणविलें १३०
आलिंगन दे प्रेमें श्रीराम प्रभु उठोनि भृत्यातें
वर्णी असकृत् त्याच्या हरेच्या तेविं कृत्यातें १३१
देवांशांशें कपि-बळें घेउनि गेला समुद्र-तीरातें
शरण बिभीषण आला ससचिव लोकैकवीरातें १३२
अपमानिला दशास्यें सीता द्यावी नमूनि वदला हें
नमितांचि म्हणे त्यातें प्रभु लंकाराज्य-पद लाहें १३३
आधीं मनुष्य मानी अस्त्रें तापोनि सिंधु कर जोडी
नळ करु सेतु धरिन मी म्हणतांचि प्रभु तया सोडी १३४
पांचा दिवसांत रचुनि शत-योजन सेतु उतरला पारीं
तीं बल यामकाळें सिंधुसि लंघिति बळें सारीं १३५
प्रभु चढुनि सुवेळाद्रीं लंकेतें कपि-चमूसि अरि पाहे

१ अग्नि. २ वानर (मारुती) ३ कल्याण. + वांकड्यानें वनपाळें याशब्दाचें विशेषण.

प्रथमचि फ़गळ तयातें भंगी तदपा न तो साहे. १३६
प्रभु निज-बळें पुरीतें वेढुनि सामार्थ अंगदा प्रेषी
राक्षस चार वधुनि ये मारिन होतांचि या द्वेषी १३७
दारुण रणं प्रवर्ते कपि राक्षस नाश पावले कोटी
मोटी हानि नमानी खल-बळ कालाननीं लोटी १३८
सेनापति प्रहस्त प्रथम मरे तो दशास्यही भंगे
ती प्रभुची कीर्ति म्हणे मत्सम धवला न तूं गंगे १३९
मग घनरव मायावी अहिशस्त्रानीं मथूनि सेनातें
करि बद्ध दाशरथि घे यश जें कोणाहि येना तें १४०
ती पुष्पकांत वाहुनि रावण-वाक्यें सती रणीं नेली
मूर्छित रघुवीरांच्या शोकें श्री घाबरी केली १४१
त्रिजटा सांगे दोघां वीरांच्या तेज आननीं आहे
वैधव्य-दोष नाहीं तरिच तुज विमान हें वाहे १४२
केली रावण-पुत्रें घननादें नागपाश हे माया
नाहीं त्वत्सौभाग्या रण-दहनीं नाश हेमा या १४३
त्रिजटेनें सांत्वुनि ती देवी नेली पुन्हा अशोक-वनीं
झाला शोक तिला जो माझ्या तो ये न तो कवनीं १४४
गरुड हरी नररूप - प्रभु-फणि-पाश-व्रण-व्यथा-राज्या
होय स्फ़रव तया त्रिजगीं रामाचेंचुनि न थारा ज्या १४५
दाशरथि बहु-बळ-क्षय करिति तदा सर्व-मारणा जागा
घटकर्ण करी दशमुख सांग हा पारणा जा गा १४६
तो मारीतचि सुटला अनिभीषण अद्रिसा महाकाय
पळति कपि म्हणति काळ फ़्लवगाशन-काम हा[2] काय १४७
मूर्छित-कपिराजातें धरि परतें कुंभकर्ण असहाय
म्हणवी फ़्रगांसि त्याचा अत्यद्भुत वीररस हाय. १४८

१ फारभयंकरअसा. २ प्रश्नार्थक अव्यय.

सावध होऊनि सुटे तत्कर्ण घ्राण कीशाहार हरी[1]
जय जय ऐसें वदले देवहि केवळ न वीर हरी[2] १४९
जो सुर-पराभव करी बहुत विटंबी रणीं हरीशा तशा
परते पर तेजस्वी सगळे गिळि संहरी शतशा १५०
तरुनीं गिरि-शिखरानीं गिरिनीं ताडिति तयासि कपि कोटी
वरि पडतांही नगणी शक्ति असी यातुची मोटी १५१
जैसा सुग्रीव बळा झाला प्रेक्षकहि सर्व[3] तापविता
प्रभुवर शर धरिति तया भेदाया पर्वता पविता १५२
जे बाहु पाद मस्तक घटकर्णाचे रघूत्तम छेदी
ते दीर्घकाळ चुरिती कपि करिति कपीश्वरा खेदी १५३
बंधुवधें हाय म्हणुनि केले अन्याय आठवी राजा
रडत म्हणे न न वधितां लोकाधिप आठ वीरा जा १५४
स्व-पराक्रम कथुनि तया तत्सुत घननाद धैर्य दे वारी
तो सबळ दाशरथि करि मूर्छित मायाज्ञ देवारी १५५
धुंडिति बिभीषण-पवन- सुत रात्री पुसति ऋक्षपा जाना[4]
तो कथि जीवन मारुति कां श्रित-सुरवृक्ष पाजीना १५६
धाडी महौषधींतें कैलासानिकट वृद्ध आणाया
आणी शिखरचि युंते कवि जाणाया न खाणाया १५७
झाले विशल्य निर्व्रण निर्मोह अशेष ते शिखर-वातें
भीतें पक्षि-पतीच्या अति दारुणही विरव रवानें[5] १५८
तें शृंग स्वस्थानीं स्थापुनि आला पुन्हा तदा सुर या
वर्षिति म्हणति असावी अति वृद्धि तुझ्या सदा सुरथा[6] १५९
सुत बंधु सचिव मेले उरला घननाद मत्त मायावी
सीता म्हणे पितृ-करा सोडुनि रघुसत्तमा यावी १६०

---

१ हरणकरी. २ वानर. ३ वज्रता. ४ वृद्धा. ५ शब्दातें. ६ उत्तम वेगास.

मायामयी जनकजा शुद्धीं रघु-वंश-नंदना दावी
मारी म्हणे यम-गृहीं हे चिर रे मंद नांदावी १६१
शोकार्णवांत बुडवी हनुमत्सुगळादि दक्ष मायावी
तों ये बिभीषण म्हणे भ्रांति जडा अक्षमा यावी १६२
हें घनरव-कृत कपट स्वस्था आहे सती अहा माया
कां तुमजा प्रभुजी त्या द्यावा अवसर न होमाया १६३
ब्रम्ह-वरें साश्व रथ प्रकटाया होम तो कराया ला
गेला अमरचि होइल आटेल न लोक-रायाला १६४
लक्ष्मण बिभीषणानें नेला मग देव-सत्तमा रविला
आनंद कुलज-विजयें व्हाया तो मत्त मारविला १६५
देवी निकुंभिला ज्या स्थानीं तेथेंचि लक्ष्मणें मथिला
हाय म्हणे रावण हा सुत-घात जसा चरें[1] कथिला १६६
शमला पराभव-ज्वर निःशेष महाबळारि[2]च्या पातें
हर्षोनि लक्ष्मणाच्या बहु गाय बळारि-चापातें १६७
सर्वस्व-विनाशाचें कारण सीता असें मनीं[3] पाहे
साहेना भंग निघे स्त्री घाता असि करीं वाहे १६८
त्या असि-धरासि पाहुनि होय अशोकीं महासती भीता
सीता आठवि हृदयीं गजवर-वरदा जगद्गीता १६९
त्या तन्मंत्री वारी राम-वधें होय वध इचा राहो
स्त्रीघात तुम्हीं सुज्ञ प्रभुजी न परा विचारा हो १७०
परते पर तेथून प्रेषी चतुरंगिणी चमू हानी
प्रभुची कराबया ती वधिली प्रभु-शर-समूहानीं १७१
बहुकोटि सैन्य मथितां आपणचि निघे रणा दुरभिमानी
दुर्बुद्धि आपली जी तीनें जड तो सुराभिमानी १७२

---

१ दूतें. २ इंद्र. ३ खड्ग

कथिति महोत्पात रहा रे काळाचा हठें नहो ग्रास
साम-नकरि राम-प्रभु- तेजा नगणी महोग्रास १७३
दारुणतर समर करी सौमित्रिस शक्तिनें उरीं पाडी
पाडी मूर्छित कपिबळ खळ बहु काळाकडे धाडी १७४
लक्ष्मण-पतनें क्षोभे बळ मथुनि करी दशास्य भंगातें
काढुनि शक्ति म्हणे हा[1] प्रभु आलिंगुनि तदंगातें १७५
करि बहु विलाप राम प्रभु मारुतिच्या मुखांबुजा लक्षी
तोंचि शिखर तें आणी भक्तोत्तम लक्ष्मणा रक्षी १७६
दिव्यौषधिरस[2]नस्यें उठवी त्यातें सुषेण हा जागा
निर्व्रण होय विभु म्हणे भृंग पुन्हां पाव बा जा गा १७७
प्रभु आपणासि बर्ही[3] मीन तया मेघ तोयराशि वदे
ऐसा व्यसनीं न पिता काय सखा सोयरा शिव दे १७८
करिति समर यज्ञाच्या निववाया दृष्टि-कान आरंभा
त्यां वीर-रसासि शची- ही करि करिकां न आरंभा १७९
निज रथ सारथि धाडी शक्र अहोरात्र सप्त रण अरिसीं
करि जेंवि सिंधुरासीं सिंधुर कीं हरि जसा हरिसीं १८०
श्रीराम रावण रणीं झाले क्षतजार्द्र-देह शस्त्रांहीं
अस्त्रांहीं इतरेतर झांकिति हे जेंवि घस्त्रांहीं[4] १८१
दशवदन-शिरें शत जों प्रभु-बाणांहीं रणांगणीं तुटलीं
स्फुटलीं न धडापासुनि ऐसीं गमलीं नवीं फुटलीं १८२
प्रभुला चुकतें लक्ष्य स्वास्त्र-बळ-विपर्ययें असें गमलें
श्रमलें भुज-युग किंवा तें पाहुनि सुर-मन भ्रमलें १८३
तों घटज मुनि प्रकटे त्याच्या नमि कपट-मनुज पाचाला

---

१ हाय. २ दिव्य-ओषधि-रस-नस्य-उत्तमऔषधांच्या रसनेंच नाकांत घालण्याचें किंवा ओढण्याचें औषध तेणेंकरून. ३ मोर. ४ हत्तीवरीं.

तो योगीश्वर सांगे सूर्यहृदयमनु[1] जपायाला. १८४
जपतां हृदय रवि म्हणे चिंता करितोसि कां महाबाहो.
माझ्या वर-प्रसादें पूर्ण तुझा काम हा वा हो १८५
ब्रम्हास्त्रें अभिमंत्रुनि शर मग जगदीश शत्रुवरि सोडी
त्या अत्यंतकठोरा परमशठोरा[2] पळें फोडी १८६
तो पाडिला प्रभु-शरें पाडावा प्रबळ तरु जसा वातें
केलें जें विश्व म्हणे भूम-द्रोही नसावा तें १८७
त्या अत्यद्भुत-विजयीं सुर-दुंदुभि-राज वाजला गाया
यश नारद मुनि लागे अमृत-रसा लाज लागाया १८८
केल्या देवर्षीनीं दिव्य कुसुम-वृष्टि राघवावरि त्या
पाहुनि ज्या मेघांच्या त्या झाल्या लाघवा वरित्या १८९
करि सुर-वृंद प्रभुचें श्रुति-वृंद जसें तयासम स्तवन
प्रभु तो वसंत शोभवि तें करुनि दया समस्त वन १९०
स्वर मुनि मयूर चातक मेघ प्रभु अप्सरा विजा लास्यें[3]
हास्यें करिति निववित्या प्रभुच्या चंद्राधिकें आस्यें १९१
सांगुनि बिभीषणाला प्रभु बरवी रावण-क्रिया करवी
हरवी नरक हित करी सद्रस माता बळें भरवी १९२
राज्य-पदीं बैसविला दास बिभीषण महा-दया-निधिनें
अभिषेक करविला निज-अनुजा सांगोनियां विधिनें १९३
श्रीसीता दिव्य करी भेटे प्रेमें पिता जसा पहिला
सांगे स्मरवी महिला[5] रक्षी धर्में नयें महिला[6] १९४
शाकें बर माग असें म्हणतां मागीतला जगद्गुरुकें
कटकें[7] उठीव उठल्या मरण क्षण भासलें लटकें १९५

१ आदित्यहृदयमंत्र. २ परम-शठ-अर-परमधूर्ताचें वक्षस्थळ. ३ नृत्यें. ४ मुरवें. ५ स्वीजानकी ६ पृथ्वीला. ७ सैन्यें.

प्रार्थी प्रभुसि बिभीषण पूजा घेवूनि शुचि करीं धाम
सबळ-सकळ-पूजेनें वा पूजित मी म्हणे राम १९६
अवकाश अल्प उरला दूर पुरी अवधि लंघितां भरत
सानुज मरेल आहे समयीं मद्दर्शन स्मरत १९७
लंकेंत सबळ-सकळा पूजुनि पुष्पकविमान देवानें
अर्पी जें सुख गंधें नादें बहु हर्ष दे यानें १९८
सबळ सकंठ बिभीषण बसउनि सानुज सदार स[1]र्यानें
त्रिजटा सरमा निवबुनि फार निघे राम सु-रयानें १९९
त्या पुष्पकें विमानें क्रमितां सानंद अंतरिक्ष-पथा
अंकीं घे सीतेतें प्रभु सांगे सर्व युद्ध-कथा २००
दिन-पंचकें नळानें शतयोजन सेतु निर्मिला रुंद
सुंदरि हा दशगावें येथें आलें जया तुं[2]दे २०१
देवि बिभीषण मज या उत्तर-तीरीं दया करी भेटे
याची नीति व्याघ्री आम्ही दोघे तिचे पेटे २०२
या ऋष्यमूक-गोत्रीं मारुतिनें मज सकंठ भेटविला
याचें प्रताप वातें ज्वलनतसा देवि पेटविला २०३
सुमुखि विलोकीं इकडे हे किष्किंधा गुहा इतें वाळी
पूर्वी आतां माझा प्रिय-सख सुग्रीव हा पाळी २०४
[3]ओलित्वें बाहून श्री तारा पुष्पकांत वाहून
हर्षातें लाहून प्रभुसि पुसे पाय पाहून २०५
प्रभु सांगे हे पंपा त्वद्विरहीं देवि दे मला कंपा
वंदलों असु हो संपा तूं मज मेघा जसी [4]शंपा २०६
देवि मतंगाश्रम हा येथें बहु हृष्ट मज करी शबरी
निर्वृति-वरि हा तासि जसि पावुनि स[5]रसी करीश बरी २०७

---

१ देवयानें पुष्पकविमानें. २ दोंद. ३ सखित्वें. ४ वीज. ५ सरव. ६ सरोवर. * गृह.

येथें कबंध राक्षस आम्हा दोघांसि देवि धरि खाया
त्वत्प्रास्युपाय सांगे तो होउनि दिव्य हरिखाया २०८
गोदावरी पहा हे पंचवटी हे त्वदीय दल-शाला
मुनि या पद जपति स्फर जैसे पीयूष- कलशाला २०९
सीते देवि पहावा ज्याचा आश्रित जटायु हा वढ तो
माझ्या दृष्टिस तात- [1]प्रसाद-तसाचि आवडतो २१०
घटजाश्रम अत्र्याश्रम दावुनि जगदीश जानकीस मग
सांगे मुनि-हित तो हा देवि पहा चित्रकूट-नग २११
प्रभु मग दावी गंगा यमुना तत्संगम-प्रयागा ती
स्वपुरीहि सख्यरिचा प्रेमें सद्विप्र या गाती २१२
उतरे प्रभु प्रयागीं नमुनि भरद्वाज-पाद-राजीवें
राहे धरुनि तरावें यन्नाम-जपादरा जीवें २१३
गुह भरंत हर्षवाया मारुतितें पाठवी पुढें राम
हा मतिमान् पूर्ण करी आला प्रभु हें कथुनि काम २१४
वनवास तीर्थराजीं पूर्ण करी [2]भक्त-स्फर-नगाराम
निघुनि म्हणे गुह-पुरगा शक्राचें पुर न गा राम २१५
भेटुनि गुहासि भेटे सानुज भरतास गुरुस मातांस
सचिवांस पुरजनास प्रेमें सुत जेंवि तातांस २१६
विधि हर शतमख सुरमुनि बहु स्फर-तरु-पुष्प वर्षतात रची
कनक-कुसुम-वृष्टि करी पुरजन धन हर्षला खरची २१७
मानुषरूप सवेष - प्लवगर्क्ष-निशाचर-स्वबंधुसह
स्वपुरीं प्रवेश करितां राम प्रभु होय मूर्त [3]मह २१८
करिती प्रभुवरि पौर स्त्री कन्या कोटि वृष्टि लाजांच्या
दध्यक्षतरत्नांच्या पक्ष्म अहित दृष्टिला ज्यांच्या २१९

---

१ बापाच्या वाड्यासारखें तसाचि. २ भक्त- स्फर- नग- आराम- भक्तांची कल्पवृक्षाची बाग असा राम तो. ३ उत्सव किंवा तेज.

राज्याभिषेक केला प्रभुसि वसिष्ठें महोत्सवें विधिनें
सर्व प्रजा सुखविल्या राजा होउनि दयानिधिनें २२०
ऋक्ष प्लवग निशाचर तस्पति सद्वस्त्र-रत्न-कनकांहीं
तोषविले श्रीरामें जेंवि तसे ते न जनकांहीं २२१
मारुतिला सत्कारुनि मोक्षसुख जिहीं असे दिले वर हो
वदला भक्त मत्सम तूं सत्पूज्य सदा इलेवर हो २२२
श्री दे मणिहार म्हणे भक्त-यश ऐकत असें चिरंजीव
अस्मन्मन रंजविलें सभ्युदय असोंचि रंजीव २२३
पाहे प्रजा बहु सुखी कोठेंही न अजरामरा याच्या
राज्यांत सदा धन्या वर्षीं अज रामरायाच्या २२४
संपेना कोणाची जरि म्हणाति वदान्य संप दानाहीं
बहु राज्यें त्यामध्यें परि ऐसी संपदा नाहीं २२५
शास्त्या तसेचि जाणति चवघांचे पुत्र आठ वेदास
प्रभुला तसा तयांला स्वप्नींही आठवे दास २२६
शत्रुघ्न वीर लवणा अंतातें कां न ने कवि प्रहित
श्रीरामें जो वारसा क्षिप्र करि अनेक-विप्र-हित २२७
गंधर्व तीनकोटि श्रीरामाज्ञे करुनि आशु भरतानें
वधिले स्तोवक केले सुर भूसुर या क्रम-रतानें २२८
कुश लव सुत सीतेचे वाल्मीकि-कवीश्वरें प्रिय छात्र
शास्त्र श्रुति स्मृति श्री-रामायण काव्य या पात्र २२९
आठहि केले प्रभुनें स्व-सम-बळ-ज्ञान-वर्ण ते राजे
ज्यांच्या सदैवहि मुखीं सन्मनुचे वर्ण तेरा जे २३०
यज्ञ अशेष करुनि सुर विप्र सुखी श्रीरघूत्तमें केले
नेले ताप दिगंतीं अर्थी होउनि धनी गेले २३१

---

१ अहो. २ दाते. ३ स्तुतीकरणारे. ४ श्रीरामजयरामजयजयराम या उत्तममंत्राचे.

ताता कडे विमानीं बैसवुनि प्रथम पाठवी माता
धाता पूजी त्यानें झाला देवर्षिही गाता १३२
सर्वांनें ताराया यशा विस्तारुनि जगीं मरुत्तनया
ठेवी प्रभुच्या महिमा निरुपम पावे मरुत्त न या २३३
प्रभु राज्य असें धर्में करि एकादश-सहस्र-हायन हो
व्याकुळ म्हणे स्व-विरहें कोणीहि वदोनि हाय नहो २३४
सर्व कपि सुकंठ सगज हय-पशु-शुक-सारिकादि खग पोर
दिव्य-विमानीं बसवी करि यश शिव-हास्यसें गोर २३५
सानुज रामप्रभुही सरयूंत स्नान करुनियां विष्णु
झाला स्तविती पुष्पें वर्षुनि विधि कामजिज्जिष्णु २३६
संतानक-लोकीं त्या पौरांतें देवदेव हा स्थापी
या वैकुंठ-यशातें मोक्षेच्छु धरूनि आस्था पी २३७
आद्य आर्या कवीडया अतितर मधुरा प्राकृतीं हे न आली
झाली देवी प्रसन्ना प्रभु-चरित-सुधा-सिंधु सेवूनि धाली
ओली श्रीमत्सितेची निज-शिशु-वचनीं आदरें चित्त घाली
व्याली दे पांडुपुत्रा मुनि-शत- सुहिता भानुची भक्ति-थाली
आद्यार्यरामायण हें मयूरें रामनंदनें
श्रीराम-चरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें १३९




---

१ नामविशेषराजातो. २ अकराहजारवर्षें. ३ अहो. ४ काम-जित्-जिष्णु-महादेवआणिइंद्रते. ५ सखि.

# श्रवणामृतरामायणप्रारंभ

दशरथ-नंदन त्रिभुवन-प्रभु होय दया
करि भजकांवरि स्वजन-चातक-तोयद या
सुरुचिस ठेविलें[1] रुचिर नामहि राम असें
स्व-जय-रता म्हणे गतिस होउनि[2] धाम[3] असें १
प्रभुवर कोसलाधिप-सुता-सुत होय जसा
भरतहि तोचि जो वरपद भक्त-भक्ति-रसा
गुणनिधि लक्ष्मण सुत अरिघ्न चतुर्थ कृपा
करुनि सुपुत्र शर्म बहु दाखवि साधुनृपा २
प्रथमचि गाधिज-क्रतु-विनाश-करांऽत करी
चरणरजें महामुनि-सती-प्रखराघ हरी
हर-धनु भंगुनि क्षितिसुतेप्रति राम वरी
जनक-सुतोर्मिला-करहि लक्ष्मण वीर धरी ३
भरत अरिघ्न जे वरिति ते जनकाऽनुज-जा
हरि रघुवीर राम सकळा भृगुराम-रजा
प्रभु भरत[4]-प्रसू-प्रिय करी पितृ-सत्य-धना
व्ययन घडो म्हणे वरुनि वल्कल जाय वना ४
प्रमुदित लक्ष्मण-क्षितिसुता-युत साधु निघे
वसुनि तपोवनीं मुनिजन-प्रिय साधुनि घे
नृप विरहीं मरे भरत ये प्रभुला शरण
प्रभुवर-पादुका करिति तच्छ्रम-संहरण ५
सुखउनि अत्रितें मग करूनि विराधवधा
विमळयशें म्हणे मुनिजनासि रमाधव धा
श्रुतियुग नासिका अनुज योजुनि कापविली

---

१ यायकारें. २ स्थान. ३ रहा. ४ भरताच्यामातेचें (कैकेईचें) इ०.

खचरपति-स्वसा कुमति दंडुनि तापविली ६
सकटक मर्दिला खर निशाचर शूर्पणखा
दशवदना म्हणे खळ नराधाति आपण खा
कपट करूनि तो जनकजेसि कुधी उडवी
वधुनि जटायुला प्रभुवरा असुरवीं बुडवी ७
पवनसुत सचें रविसुता स्फुगळा अजिता
मिळवि उरों दिला रघुवरें हरिभू[1] न जिता
पवनसुतें पयोनिधि विलंघुनि भूमिसुता
सुखविलि मुद्रिका जपुनि देउनि विश्व-नुता ८
खळ-बळ मर्दिलें नगर जाळुनियां अरितें
भिववुनि अर्पिला प्रमद दंभनरा हरितें
अमित सुरांश ऋक्ष कपि ने भिववी
जलधिस देवराज-नयनें प्रभु तो नियवी ९
दशवदनाऽनुजें नति सकृत् करितांचि तया
प्रभुवर राज्य दे करि पित्याहुनि फार दया
रचवुनि सेतुतें जलधितें उतरे अरितें
कळवि यशा किया वरवि न त्याजितां वरितें १०
कुमति दशानन त्यजुनि साम करी समर
प्रभुहि म्हणे तया मृगेप[2] जेविं करीस मर
जय न दिसे बळक्षयाचि मेघरवें अहिनें
प्रभु-युग-बंधनें करुनि कांपविलें महितें ११
सकळ खगेंद्र जो भुजग-बंधन तो हरितें
हृदय भरी महें[3] गमवि ज्या गुरु मोह रितें
प्रमुदित सानुज प्रभु उठे स्मर तोयज या

१ वालि. २ सिंह. ३ उत्सवें.

रवि विनता-सुता म्हणति सिद्धचि होय जया १२
मग घटकर्ण ये धरि रविप्रभवास वधी
अजित तया वधें निववि सामर-वासव-धी
घनरव सर्व ते प्रभुसमेत सुवीर खिळी
अजगरसाचि तो प्रबल मोह तयासि गिळी १३
उठवि मरुत्सुत त्वरित ओषधिपर्वत तें
यश मिळवी महें जग भरी बळ सर्व तेतें
कपट-सती-वधें म्हणवि हाय तया सरणी
धरवुनि मृत्युची सुपद होय जयास रणीं १४
घनरव लक्ष्मणें नियढितां दशकंठ रडे
धरि महिजा-वधा औसि सुमंत्रिप आड पडे
बळ चतुरंग जें प्रभु-वधा खळ पाठवि तें
भसित करी प्रभु त्रिदशा-मानस आववितें १५
खरतर-शक्तिनें मग विदारुनि वक्ष अरी
सुविकळ लक्ष्मणा रघुवराहि मुहूर्त करी
उठवि रणीं तया कपि महौषधि-शृंग जवें
पुनरपि आणुनि स्वयश गाववि भव्य नवें १६
परम-विभूतिचा वरुनि शक्रथासि धणी
रण करि भारती दिवस रात्रिहि सम गणी
चळचळ कांपवि क्षितिसि कंपित राजफणी
न घण मणी शिरें उडवितां शत यातुमणी १७
घटज सुमंत्र दे द्युमणिही वर तच्छमना
वधुनि दशानना वरि जय प्रभु अच्छमना
जय जय बोलिले कुसुम-वृष्टि करूनि सुर

---

१ शिखतें (महें या शब्दाचें विशेषण.) २ खड्ग. ३ भस्म.

द्रुहिण म्हणे द्विज-व्रज स्वकर्म करू निकर १८
दशवदन-क्रिया करवुनि प्रभु शज्यपदीं
बसवि बिभीषणा सुचिर जेविं झषासि नदी
मग करि दिव्य ती सुकृतकीर्ति अनादि सती
दशरथ-संघ ते सुत मयूर जना दिसती १९
रण-मृत सैन्य तें अमृत वर्षुनि वांचविलें
सुरपतिनें यश प्रभु-यशासम सांचविलें
प्रभु-वचनें करी सुगळ सत्कृति फार बरी
धनद विमान दे कवि विभीषण पाय धरी २०
बसउनि पुष्पकीं सबळ कीश-पलाश-पती
बसुनि सदार सानुज निघे प्रभु वायुगती
रणमहि दाखवि प्रभु सतीस सुवीरकथा
कथि अवलोकवी नळ-कृताद्भुत-सेतु-पथा २१
स्थळ कळवी कथी मज बिभीषण देवि जय
प्रथम म्हणे रणीं अतुळ साधुनि दे विजय
मग सुगळासिची हितकथा तिस आयकवी
त्यजिल अशा रसा इतर वर्णुनि काय कवी २२
चिर-विरह-व्यथा-शत-कथाहि रसें कथित
प्रथित-यशा सुखी करि सती-मन जें व्यथित
स्थळ अनुभूत तें अखिल दाखवि ये नगरा
प्रभु भरताऽसुखा उरवि शंभु जसा न गरा २३
करि अभिषेक या प्रभुवरासि वसिष्ठमुनी
स्तवि विभु-कीर्ति तें कविसभा नासि देवधुनी
सुगळ-बिभीषण-प्रमुख सर्वहि हर्षउनी

---

१ निष्काळजी असा (द्विजव्रज या शब्दाचें विशेषण. २ मत्स्यासि
३ विषा. ४ भागीरथी.

गमवि गुणें उणें अमृत-सद्रस वर्षउनी २४
पवन-सुतीं करी बहु दया वर दे शतदा
उपकृति आठवि स्तविहि तो वरदेश तदा
अति सुखवि प्रजा सकळ-भक्त-मयूर-घन
त्रिभुवन पावन-स्मरण-कीर्तन शुद्धधन २५

समाप्त.

## वर्दरामायणप्रारंभ.

त्रिजगीं-नगीं अखिल जो कनक स्तविती जया शिव विधी सनक
निज-तत्व-बोध-निधिचा खनक प्रभु तो करी दशरथा जनक १
वृषभ राम हें रुचिर नाम धरी अनुज स्वयें भरत होय हरी
मग लक्ष्मण प्रभु अरिघ्नहि तें करि सच्चतुष्टय समस्त हितें २
करि गाधिज-क्रतु-सुरक्षया हो वदले जयें बहु सुर क्षणें हो
प्रभु उद्धरी मुनिवधू कुशिला यश फार दे जननिच्या कुशिला ३
त्रिपुरारिचें सकळ-योध-नुतें मग मोडिलें प्रथित जें धनु तें
वरिली रमा जनकजा नवरी नव रीति जी न इतरा नवरी ४
मग लक्ष्मणासि जनकात्मभवा वरि ऊर्मिळा सुगुणसिद्धिभवा
करि मांडवीहि भरतासि पती श्रुतकीर्तिही चवथियासि सती ५
भृगुराम कोप करि त्या कळवी निज भव्य तेज भजनीं वळवी
निज धर्ममार्ग हित तो धरवी परवीर-हृत्तिमिर-योध रवी ६
निवदि प्रभु स्व-विजयें पुर तें सुख दाखवी गुरुजना पुरतें
भरतासि मातुळ पुसोनि नृप स्वपुरासि ने करि उदंड कृपा ७

---

१ त्रैलोक्यरूप अलंकारीं. २ अहो. ३ उत्सव. ४ होऊ. ५ दुष्ट स्वभावाअसी. *ः "हें रामायण प्रमिताक्षरा छंदाचें आहे.

युवराज राम करितां खवळे भरत-प्रसू विनवितां नवळे
वर घे दिले स्व-सुत राज्य करू मनु अब्द सम वनवास धरू ८
नृप सत्य-बंध-विरहीं अडला बहु वृद्ध तो म्हणुनि हा रडला
वनवास मागुनि बरा मानि घे गुरुचा निरोप रघुराम निघे ९.
त्यजि लक्ष्मण क्षितिसुताहि न ती प्रभु घे तयांसि करितां विनती
करि शोक फार निघतांचि तिघें हृदया म्हणे नृप तमांत रिघें १०
पुर हा वदे निरखि पत्ति[1] पथीं बसवी सुमंत्र नरनाथ रथीं
प्रभुनें सखा गुह सजी सुतरी[2] अमरापगा-परतटीं उतरी ११
फिरवूनि सूत निज-धर्म-सखा- हत-चित्तवृत्ति कवि तातसखा
सुमुनि प्रयाग-गत हर्षविला स्व-शिरीं दृगंबु बहु वर्षविला १२
मग चित्रकूटनग[3] धन्य करी निवसी न विप्र हरि वन्य[4] करी[5]
कथि तें सुमंत्र करितां स्मरण प्रभुचें नृपास घडलें मरण १३
भरतासि ते सचिव आणविती जननी तया अहित जाणवि ती
तिस आपणाहि बहु निंदुनि घे यश तद्यशास्तवनिं इंदु निघे
नमि कोसलेंद्र-तनयेसि कवी कथि साधु हा न तिस हें सिकवी
धरि पोटिसीं दृढ सती निववी करि साधु बोध भरता जिववी
करुनि क्रिया उचित साधुनि घे फिरवावया प्रभुसि साधु निघे
धरि घाट जो गुह तया वळवी शपथादिकें स्वशुचिता कळवी
नमुनि प्रयाग-गत-सन्मुनितें स्रग्व दे अभीष्ट बहु जन्मुनितें
मग भेटुनि प्रभुसि साश्रु करी पितृ-तर्पणावधिच धैर्य धरी १७
प्रभु-पाद-पद्म-युग तो कवळी परि सत्य-संध-मतितें न वळी
समजाविती सुमुनि जे जवळी प्रभुही यशें त्रिभुवना धवळी
पितृसत्यवागवन तूंहि करीं पया तों शिरीं अवनि-भार धरीं

---

१ पादचारी. २ उत्तमनौका. ३ चित्रकूटपर्वत. ४ अरण्यसंबंधी. ५ हानि. ६ पितृ-सत्य-वाक्-अवन- बापाच्यासत्यभाषणाचें रक्षण

प्रभु यापरि प्रिय यथार्थ वदे निजपादुकाभिष महोत्सव दे १९
परते परंतु नग[illegible] नवसे गणि राज्यभोग हृदयीं ज्ञावसे
प्रभु अत्रितें नमि तदीय सती करि जानकीस चिर मुद्दसती
वधिला विराध परि उद्धरिला ऋषिनीं प्रहर्ष हृदयीं धरिला
शरभंग कुंभज सुतीक्ष्ण मुनी प्रभुनें वनीं निवविले नमुनी
बहु मानिला गुरुतसाचि जग-ज्जनकें पितृ-प्रिय जटायु खग
धरि जीपुढें न दुरितादि नग क्षण गोतमी वरिलि सिंधु मग
दले-गेह पंचवटिकेंत रची सजि राक्षसी स्ववपु जेविं शची
प्रभुलाहि दावि कुच पीन कटी करि धीर लक्ष्मण तिला नकटी
खवके निचा कुमति भाउ खर प्रभुनें ससैन्य वधिला प्रखर
दशकंठ हेम-मृग दावि वनीं धरवी सती धरुनि लोभ मनीं २४
प्रभु धांवतां सभय एणपळे करि विद्ध राक्षस मनांत कळे
प्रभुच्या स्वरें खचर हाय वदे धृति देवरोक्ति महिजेसि न दे
नसतां तुझ्या मदभिलाष मनीं न उपेक्षितासि पति-घात वनीं
वदली असें जनकजा कटु तें करि साश्रु खिन्न दवडी पटुतें २६.
निघतांचि लक्ष्मण सतीस हरी दशकंठ जेंवि हरिणीस हरी
करि भंग सोडवि जटायु परी खग-पक्ष तोडि तिस नेचि अरी २७
प्रभु पावला प्रियतमा-विरहा वदला वनीं हुडकितां चिर हा
कळवि क्षतानें खग हानि धना घडली वरीहि मग हा निधना २८
प्रभु हा कृतातिखळकुत्स वदे मुनि-मानसासि बहु उत्सव दे
करुनि क्रिया पितृ-सखा सुखवी विबुध नंदनस्थ न असें सुखवी
धरि जो कबंध अवनार्थ तया प्रभु उद्धरी करि असीम दया
अनुगा मतंगमुनिची शबरी गति दे तिला त्रिजगदीवा बरी ३०.

---

१ मुत्-वसति-आनंदाचेंस्थान. २ पर्णशाला. ३ हरिण. ४ सिंह. ५ हाय. ६ कृत-अति-खळ-कुत्स- केलीआहे अत्यंत खळनिंदा ज्याणेंअसा. ७ कल्याण. ८ नंदनवनांतील. ९ वृक्ष. १० प्रसवे. ११ भक्षणार्थ.

रुख यानज प्रथम दे हरिनें धृतिनें भरी सुगळ-देह रिनें
प्रभु त्या म्हणे न सुरव वाळिव धीं करि तत्प्रियार्थ खळ-वाळि-वधा
म्हणता यमासि गिळिल्या उगळ प्रभु तो कपीश्वर करी सुगळ
श्रमले नदेखतिच योध कपी स्वयशासि मारुतिच शोधक पी ३२
गणि वीर गोष्पदचि तो जळधी सुखवी रमेसि दुखवी खळधी
हर हर्षवी पर-पुरी-भसितें स्वशितें यशें करि जगें हसितें ३३
मनिं जी म्हणे श्रम शिरो पतिचा प्रभुला कथी हित निरोप तिचा
कपि दे शिरोमणि पदीं नमनें करि हर्षवी बहु अदीन-मनें ३४
चिर भेटला प्रभु तया कपिला न असी सुनींहि सदया कपिला[2]
श्रुति-गीत तो कविसम स्तवि त्या गुरु साचि दासहि समस्त विल्या
कपि जाणवी अरि असामकर ग्रसिता नसे परि असा मकर
सजला कुधी धरुनि काम रणा प्रभुजी असनरु[3] भिका मरणा ३६
अमिताऽमरांश-कपि-सैन्य-युत प्रभु घे सखा सुगळ सूर्य-सुत
द्रुत[4] जाय सागरतटीं उतरे अरितें म्हणे सकळ हो हुत रे ३७
अपमानिला हित बरें कथिता नमि तो बिभीषण गुण-प्रथिता
शिवतां पदांबुज पद दे व्यथिता प्रभु जो स्मराद्यरिचमू[5] मथिता
प्रभु भीत-सिंधु-वचनें वळला प्रणतीं नकोपुनि कधीं मळला
करवूनि सेतु कुतुकें उतरे वदला अरीस न मदें उत रे ३९
खळ दावि चाप शिरही लटिकें धृतिनें सती मनिं म्हणे न टिकें
समजे सती न कपटा परमा कळवी बिभीषण-वधू सरमा ४०
प्रभुचा सखा निरखितां अरितें करि तें रुचे बहुत जें हरितें
उरगीं जसा गरुड तेंवि पडे क्षया याउदें अहित-तेज दडे ४१
न लवे दशास्य कथि अंगद या प्रभुची नवांछि तव भंग दया

---

१तृसहां. २ गाई. ३ विषवृक्ष. ४ शीघ्र. ५ स्मर-आदि-अरि-चमु- कामादिशत्रूसेना.

कर साम ओंजिस न राम सजो बुडतो अधर्म-रत तामस जो ४२
दशतुंड पुंड खवळे धरवी परवीर ने वधुनि हो करवी
प्रभुसीं भिडे वरमदें खळ हा बळ-हानि-हेतु उभवी कलहा
बळप प्रहस्त पहिला खपला घटकर्णही जरि बरा तपला
न घनध्वनीस जय ये कपटें ज्वलदग्निबंधन घडे न पटें ४४
अहिपात्रा पक्षिपतिनें हरिला बळ-भंग दुःखित करी अरिला
उडवी मरु[३]ज्ज अंगदें[४] सबळ- प्रभु-शल्य-मोह जरिहि प्रबळ ४५
जनकात्मजा-निधन[५] दारवविलें प्रभुलाहि शोक-विष चारवविलें
वधि लक्ष्मण त्रिदशापत्यरितें पडनें कुबुद्धि मह सत्य रितें
स्तन-शोक-तप्त दशकंठ असी न बरी म्हणे धरि यथार्थ असी[६]
फिरवी करूनि सचिव स्तुतितें जगवि प्रभु-स्मरण-वस्तु तितें
अरिनें मृत स्वकुळ आठविलें प्रभुच्या[७] वधा कटक पाठविलें
प्रभुसीं बरेंचि समरीं झटलें विशिरस्कही अतिरसें नटलें ४८
बुडतांहि संतति दशानन ती करि भेटतां नवि दशा न नती
नविलोकि आयु धन ह्रा लवला न धरूनि आयुध न हालवला
बहुकोटि मर्दुनि रणांत हरी प्रकटी महा-प्रलय-रीति खरी
परमेश्वरानुजनि-वक्ष अरी खरशक्तिनें दृढहि विद्ध करी ५१
कपि[८] त्यां सदोषधिरसें जगवी मग वीरराज[९]-धृतितें तगवी[१०]
जग वीतसे सहज जो अजया रज यान्विता हरि गमे अजया
[११]पविभृद्रथीं वसुनियां रिपुला निज-शक्ति दारवि रणीं विपुला
दिन सप्त रात्रिहि करी समर प्रभु त्या म्हणे मरुदरीस मर ५२
शत मस्तकें उडवि राम तरी दिसती तसींच नमरेचि अरी

१ जुह्रास. २ हाय. ३ वायुपुत्र (मारुती) ४ औषधें. ५ इंद्रजितानें. ६ खड्ग. ७ मस्तकरहितहि. ८ लक्ष्मणा. ९ रामाच्या धैर्यानें. १० संरक्षी. ११ पविभृत्-रथ-इंद्राच्या रथीं. + पराभवहरिता कपिगण ला.

प्रभु आधितें स्व-हृदयांत धरी उपदेश कुंभज जयार्थ करी ५३
रवि दे दशास्य-दलनार्थ वर प्रभु पद्मजास्त्र[1]-युत योजि शर
हृदया विदारुनि वधी अरितें निववी रमेश हरितें[2] अरितें ५४
वर दुंदुभि-ध्वनि उठे करिती सुर पुष्प-वृष्टि नुति[3] आदरिती
अमरी थिजेसि बहु लाजविती पटु गाति वाद्य-शत वाजविती ५५
वदले महेश विधि नारद या प्रभुचीच तोषविति फार दया
रति दे चि+ ना असि वस्र स्वर्गा[*] प्रभु नाशितो अशिव सुस्वर गा
अरि-दार-शोक पहिला हरवी मग तत्क्रियाहि बरवी करवी
शरणागता चिर पदीं मिरवी प्रभु पौर गौरवि तया निरवी ५७
करि दिव्य कीर्तिकर भूतनया स्तविती सुरर्षि बहु पूतनया
म्हणती स्तुती न कवि नूतन या नसती अशा दुरित धूत नयां[4]
मग भेटला दशरथ स्वसुता अमृतें हरी हरि-बळ-व्यसुता
प्रभुच्या विभीषण पदा विनवी अणु रीति तो नतं न दावि नवी
प्रभु पूजवी कपि-चमू-पतितें करि तो बिभीषण महामति तें
मग पुष्पकांत बसवी प्रभुला वदले यशा सुर सविप्र भुला ६०
कपि-यातुप प्लवग[5]ही अवघे निज-पुष्पकीं जनकजा-धव घे
मग तो निघे प्रभु ससीत नया जसि कीर्ति भूमिचि तसी तनया
परमादरें निररिव सेतुस ती समजे तया विजयहेतु सती
स्तवि वायुजा स्व-भजना ऽ नळसा नगणी मनीं पटु दुजा नळसा
प्रभुच्या मुखें रण-कथा परिसे स्व-वियोग-वासरहि जे अरिसे
विजयें निवे बहु धरी रुचि तें तिस शोभवी यश महा रुचि तें ६३
सुगळ-प्रियेसहि विमानवरीं बसवी समीपचि धरुनि करीं
भरतासि मारुति-मुखें कळवी प्रभु दर्शनें तदसुखा पळवी ६४
अभिषिक्त होउनि पदीं बसला प्रभु तो महोत्सव जगीं बसला

---

१ इंद्रातें. २ चक्रातें. ३ स्तुति. ४ नद्या. ५ सीतेसह. + रा-हुं. ✻ कल्पवृक्षा.

भरतासि राम युवराज करी सुयशें जगद्धृदयवृत्ति हरी ६५.
स्वरिपूसि होउनि परासु गळा म्हणत्या सख्या हितपरा सुगळा
करि पूजुनि स्तवुनि धन्य तम प्रभु नाशिना प्रकृतिजन्य तम ६६
कथिते मयूर नटवी निववी श्रित-चातकांसि अमृतें जिववी
भरि अंजना-भव-नदास महा-दय कंजनाभ घनदासम हा ६७

समाप्त.

# दोहारामायणप्रारंभ.

विधि विज्ञप्ति-स्तुति करी, दशमुख माराया स
झाला दशरथ-सुत हरी, त्रिभुवन ताराया स १
रामाख्य श्रीचा धणी, कौसल्येचा बाळ
कैकेयीचा सन्मणी, भरत साधु-जन-पाळ २
सुगुण सुमित्रा-सुत कवी, लक्ष्मण रघु-कुळ-हीर
आश्रित-जन-नीरज-रवी, शत्रुघ्न दुजा वीर ३
राम सलक्ष्मण गाधिजा, सुखवी रक्षुन यज्ञ
गुरु कथि राज्या आधि ज्या, तो प्रिय लक्षु नयज्ञ ४
रामें उद्धरिली शिला, गौतम-भार्या तूर्ण
आनंद त्रिजगा दिला, करुनि मनोरथ पूर्ण ५
जनक-पुरीं शिव-सुधनु तें, भंगी तो श्रीराम
निज-भुज-तेजें बुध-नुतें, पुरवी सीता-काम ६
तापे भृगुपति परि हरी, योजुनि चापीं रोप
लीलालेशें परिहरी, त्याचा दारुण कोप ७
जनक-सुता प्रभु तें वरी, जीचें सीता नाम

१ मेघासम. २ बाण.

जी ऊर्मिला ती धरी, वरीं लक्ष्मणीं काम ८
जनकाऽनुज-कन्या वरी, मांडविही भरतास
भर्ता श्रुतकीर्तिहि करी, शत्रुघ्ना स्वरतास ९
जिंकी राम प्रभु तया, देशिक ज्याचा शर्व
असुयींही करि दया, धन्य म्हणति कवि सर्व १०
साकेतीं उत्सव महा, नाकींहि नवा होय
दे सर्वां प्रफुल्ल-यशा महा, जैसें गंगा-तोय ११
भरता आपुलिया पुरा, मातुळ घेउनि जाय
ज्वाळा कांता कापुरा, लावी त्याची माय १२
राजा मनुवत्सर वनीं, वसो मुनिव्रत राम
युवराज भरत हो मनिं, माज्या ऐसा काम १३
मागे ऐसे दोन वर, कैकेयी विषरूप
समजुनि तीचा लोभभर, भी सत्यव्रत भूप १४
सीता-लक्ष्मण-सह निघे, सत्य-रक्षणा राम
तापससा हर्षे रिघे, गहनीं जगदभिराम १५
जातां राम प्रभु वना, म्हणे अयोध्या हाय
जेव्हां त्या निज-जन-धना, आज्ञा दे ती माय १६
सचिवें स्वरथीं वाहिला, भेटे सख्या गुहास
वल्कल-धरही पाहिला तेणें राम स्वहास १७
फिरवुनि सुमंत्र उतरला, श्रीगंगेतें राम
निश्चळ चित्ता सुतरला करिता जगदभिराम १८
करी भरद्वाजर्षितें, वंदन जेविं छात्र
तोही हृदयें हर्षितें, प्रभु ला आशीःपात्र १९
करी चित्रकूटीं नगीं, जगन्निवास निवास

१ गुरु. २ महादेव. ३ आनंद. ४ रहाणें.

पूजिति मुनि पाहुनि जगीं, साक्षात् जेंवि शिवास २०
दशरथ सुत-शोकीं पडे, मरे खरा करि शाप
भरत आपिला तो रडे, स्मरुनि भ्राता बाप. २१
ताताची करुनि क्रिया, जाय शरण रामास
अनादरुनि जननी प्रिया, त्यजुनि धराधामास २२
फिरवि पादुका देउनी, सत्यसंध[1] रघुवीर
राहे त्यांतें सेवुनी, नंदिग्रामीं धीर २३
रामें सुतपःसदन मुनि, अत्रि[2] सुखविला फार
सीतेनेंही पद नमुनि विनयें, त्यांचे दारें[3] २४
हाय म्हणों दे मुनिजना, राम निराधार न
सेव्य करी सुतपोधना, वधुनि विराधा सन २५
हृदयें प्रेमळ-जन-वशें, गति दे शरभंगास
लाजवि रघुवर निजयशें, दुग्धधिवरभंगास[4] २६
विभुला वैष्णव-शस्त्र-गण, दे कुंभज हरिदत्त
संहाराया करुनि पण, खळ खेचर वरमत्त २७
जो खग बहुमत शतमखा, ज्याचें जटायु नाम
भेटे तात-प्रिय-सखा, त्या ब्रम्हें घनश्याम २८
गोदातीरीं मग वसे, पंचवटींत सदार
जो योग्यासहि न गवसे, तो होय सुलभ फार २९
दुर्मति दशकंठ-स्वसा, शूर्पणखा धरि काम
जीस अनय सर्वस्वसा, तीतें दंडी राम ३०
खरमुख पातक-शेवधी, जे कंपद अमरास
लीलेनें प्रभु ते वधी, खळ येतां समरास ३१
ज्याच्या स्त्रीचा जनक मय, कपट जयाचें वित्त

---

१ सत्यप्रतिज्ञ. २ अत्रिचे. ३ स्त्री अनुसूयाती. ४ दुग्धसमुद्राच्या तरंगास.

करुनि खचर मृग कनकमय, धाडी भ्रमवी चित्त ३२
पतिला मागे हरिण ती, लागे मागें राम
लोभाचा हे परिणाम ती, पावे राक्षस धाम ३३
हरिण वेधितां उर शरें, प्रभुसा मारी हाक
प्राण-व्यसन गमे खरें, शिरे श्रीमनीं धाक, ३४
तो न धावतां भाविला, स्वाभिलाषरत दीर
गांजुनि बाहिर लाविला, सर्व-साधु-मत धीर ३५
जातां लक्ष्मण ये अरी, उटजीं यतिसा पाप
भिववी सीतेतें हरी, व्हाया कुल-लय ताप ३६
मोडी रथ गृध्राधिपति, सोडी श्रीतें रक्ष
जोडी अघ अतिपापमति, तोडी खड्गें पक्ष ३७
मूर्छित पाडुनि खगवरा, श्रीला म्हणवी हाय
भिववि धरा सवनाकरा, तीतें घेउनि जाय ३८
उत्तरीयवस्त्रांत ती, बांधी स्वालंकार
गगनांतुनि सोडी सती, पाहुनि वानरवार[1] ३९
श्रीस अशोकवनीं बळें, तो ठेवी लंकेंत
साध्वीतें हरिता छळें, खळ नशिरे शंकेंत ४०
सा श्रु सुमित्रा-सुत पथीं, भेटे वंदी पाय
त्यातें राम म्हणे कथीं, वत्सा झालें काय ४१
कथितां शोकीं प्रभु शिरे, धांवुनि उटजा जाय
तें शून्य विलोकुनि फिरे, वदे स्त्रैणसा हाय ४२
नमिवे अनुजें बोधितां, भासे विरही कोक[2]
हे बहु गहनीं[3] शोधितां, स्व-जनक-सखही शोक ४३
सांगे नाहीं पावली, रक्षण यापासून

1 वानरांचा समुदाय. 2 नामविशेष चक्रवाकपक्षी. 3 अरण्यांत.

दशकंठें जशि बावली, नेली बापासून ४४
होउनि खिन्न पराजयें, अंकीं सोडी प्राण
सुतसा क्रिया करि स्वयें, तो कृत-करिप-त्राण ४५
गहनीं योजन-भुज धरी, इच्छी घात कबंध
तात्काळ प्रभुवर हरी[2], त्याचा पातक-बंध ४६
विसरे पळही न शबरी, प्रभुला चिंती फार
होय तिला गति वश बरी, सेवी यशाही सार ४७
सेउनि पंपानीर हो, वदला विरही शूर
देउनि कंपा ती रहा, म्हणे विरागा दूर ४८
घन पवन-तनय-चातका, होय सुगळ शाळीस
वज्रपात कृतपातका, शक्र-सुता वाळीस ४९
कपि-पति होउनि आठवी, प्रभुनें केलें कार्य
श्री शोधाया पाठवी, भट रवि-नंदन आर्य ५०
पवन-तनय शतयोजनें, लंघी पारावार
लंघूनि नये जो जनें, भवसा दुस्तर फार ५१
लंकादेवीचा करी, तो लीलेनें भंग
कीर्ति किंकरा दे वरी, श्रीराम श्रीरंग ५२
पुरी शोधितां भागला, पटु पवनात्मज योध
मग अशोकवनीं लागला, श्रीसीतेचा शोध ५३
तों तो कामी ये वदे, अभाव्य असे बोल
धैर्य सतीला देव दे, होय न ज्याचें मोल ५४
बहु धिक्कारी उद्धता, देवी करि अपमान
म्हणे तिची ती शुद्धता, त्या तृण निज तप मान ५५
खल जातां ठेवी हरी[4]-चरणीं, मुद्रा शीस[5]

---

१ केलें गजेंद्राचें रक्षण ज्यानें असा गमतो. २ हरण करी. ३ हात. ४ वानर मारुती. ५ शीर्ष, डोकें.

पतिच्या जेव्हां ती धरी स्मरणीं, मुद्राशीस[1] ५६
कथुनि निरोप श्री तया, दे चूडामणि खूण
म्हणे करुन मजवरि दया, प्रभु-भुज[2]-कार्मुक-तूण ५७
वन भंगी करि युद्ध तें, निवावि बहु हरि[3]-स्वांत
जरि पुर जाळी उद्धतें, गणिला न तरी स्वांत[4] ५८
सागर बहुयोजन कपी, पुनरपि लंघी धीर
विश्वाचा तो जनक पी, वृत्त-कथा रघुवीर ५९
आलिंगी अत्यादरें, राम पवन-तनयास
जैसा स्तव करिता भरें, मेरु अवनत न यासु ६०
घे कटक मिळित आयतें[5], जें करि अगें[6] नग[7]-चूर्ण
जाय विचारें आयतें[8], प्रभु जलधि-तटा तूर्ण ६१
गुरुतम निज तप मानिलें, मत्तें प्रभुचें ऊन[9]
बंधु-रत्न अपमानिलें, कुमत-मद्य सेवून ६२
लंका-राज्य बिभीषणा, प्रभु दे नमितां पाय
कनकाचळचि करी कणा, कृपा वदावी काय ६३
शर कोदंड प्रभु धरी, सजे म्हणाया संप
भेटे सिंधु स्तुति करी, नमी चरण धृतकंप ६४
सागर-वचनें नळ रची, शतयोजन दृढ सेतु
त्या पाहोनि म्हणे शची, हो देव-विजय-हेतु ६५
कपटी दशमुख पाहवी, प्रभुचें मस्तक चाप
सीता-धृतितें वाहवी, देउनि दुःसह ताप ६६
विभीषण-स्त्री बहु वरी, सरमा जीचें नाम
ती श्री-शोक-भ्रम हरी, वर्णुनि विजयी राम ६७

---

१ मुद्-राशि-आनंदाच्या राशीस. २ रामाचे बाहु, धनुष्य, भाता, हे. ३ इंद्राचें मन. ४ स्व-अंत-आपला नाश. ५ यत्न केल्यावांचून. ६ वृक्ष. ७ पर्वत. ८ विस्तृतें (विचारें या शब्दाचें विशेषण) ९ उणें.

उतरुनि नळ-कपि-कृत-पथें, स्व-बळ-सहित जळधीस
अजितें अतुला[3]मळ-कथें, भय दिधलें खळधीस ६८
सगळें प्रथमचि उडविला, गरुडें जैसा साप
मुकुट शिरींचा उडविला, दिधला भंगुनि ताप ६९
साम कराया धाडिला, प्रभुनें अंगद दूत
नं बळें रावण ताडिला, वचनें जैसा भूत ७०
राम म्हणे उतरील रण, हरि हो याचा रेंच
सकुळ भस्म वर-मत्त पण[1], अरि हो याचारेंच[2] ७१
होतां संगर राहिले, व्यस्त होवुनि बहु शूर
दुस्तर खळखळ वाहिले, शतधा शोणित-पूर ७२
तेज बुरे रक्षोगणीं, रणीं होय जरि भंग
तोसहि खळांचा तो धणी, गणी हित कुमति-संग ७३
मायावी घनरव अरी, जो कपट-मदें अंध
तो सानुज-विभुला करी, अहिपाशानीं बंध ७४
पाहुनि ते समरांगणीं, मानी झाला अंत
दोष गणुनि लक्ष्मणगणीं, सीता बोलें हंत ७५
उडवि गरुड पक्ष-ज-रवें, दारुण परमहि पाश
प्रभुला दे सुख बळ नवें, नाशितपरमहिपाश[4] ७६
घटकर्णा मारवि बळें, करवी स्वाप-त्याग[5]
पितृ-मतिसहि म्हणतें चळें, कुमतिस्वापत्याग[6] ७७
घननाशानें ताडिलें, सप्रभु सर्वहि सैन्य
मृतसें मूर्छित पाडिलें, देवांसि दिलें दैन्य ७८

---

१ परंतु. २ याचेहिनेंच. ३ अतिउच्चही. ४ नाशित-पर-महिप-आशा - नाशिली आहे शत्रुराजांची इच्छा जेणें हें गरुडाचें किंवा बळाचें विशेषण. ५ निद्रेचा त्याग. ६ कुमति-स्व-अपत्य-त्याग-दुर्बुद्धि जो आपला पुत्र त्याचा अपराध.

जांबवदुक्तें पवनसुत राम-पदांबुज-भृंग
आणी शक्राद्यमरनुत दिव्यौषधि-नग-शृंग ७९
औषधिगंधें मारुतें उठले विशल्य सर्व
पावी स्थानीं चारु तें महावेग गतगर्व ८०
माया-सीता-शिर हरी घननाद महामाय
हा हा बदले चिर हरी म्हणे रामही हाय ८१
कळवि बिभीषण कपट मग मारवि अरिपुत्रास
लक्ष्मण करि यश निववि जग उरवी न रिपुत्रास ८२
दशमुख सुत-शोकें जळे श्रीस वधाया जाय
नबळावा परि तो वळे सचिवोक्तें खळराय ८३
नर वानर मारा असें खळ सांगे कटकास
भ्रमले वीर सुरा-रसें घालिति बहु भट कास ८४
शलभ-पटल तें बळ गमे दीप्त दवानळ राम
बहुकोटि समयहि शमे अर्ध भरे जों याम ८५
नाचुनि कांपविती रसा बहु शत लक्ष कबंध
करिल डसुनि गरुडा कसा भोगें तक्षक बंध ८६
आयण दारुण रण करी भेदी लक्ष्मण-वक्ष
शस्त्रास्त्रें वर्षुनि अरी कपि खपवी बहुलक्ष ८७
अनुज शक्तिनें पाडिला पाहुनि कश्मल-मग्न
रामें दशमुख ताडिला केला हत-बळ भग्न ८८
आणी शृंग पुन्हा हरी लक्ष्मण सावध होय
दिव्यौषधिरस बळ भरी सस्यांत जसें तोय ८९
शक्र-प्रेषित-रथ-वरीं समरीं बैसे राम
अरिस म्हणे यम-पथ वरीं पुरवाया सुर-काम ९०

---

१ शरीरानें. २ मूर्छेमधेंनिमग्न. ३ वानरमारुती. ४. धान्यांत. ५ उदक.

करिति करांच्या भस्म रण ते सम अहोरात्र
ज्यां ला कांहीं न स्मरण जरिहि क्षत-चित-गात्र ९१
हरि हरि दशींदा दशा शिरें तरि अरि वरिना अंत
म्हणे प्रभुसि मोहीं शिरें हंत वदति सुर संत ९२
घटज-कथित-रवि-हृदय-जप करिता झाला राम
करवी न रवि बहु कठिन तप पुरवी पर-वध-काम ९३
विध्यस्थें शर भारिला श्रीरामें तत्काळ
वक्ष विदारुनि मारिला दशग्रीव सत्काळ ९४
सानुग सुर मुनि हर्षले जयजय वदले सर्व
दिव्यें पुष्पें वर्षले करुनि स्तव विधि शर्व ९५
सुरवाद्यें बहु वाजलीं झालें गायन नृत्य
भुवनें सुयशें साजलीं प्रभुचें गाती कृत्य ९६
अरि-दारांचें हराविलें दुःख प्रेरुनि आर्य
करुणा-निधिनें करविलें दशकंठोत्तर कार्य ९७
लक्ष्मण-हस्तें बसविला पदीं बिभीषण दास
भाव तन्मनीं बसविला तद्वचुगणीं त्रास ९८
दिव्य श्रीसीता करी वारी जनापवाद
सानुज सांगत तो हरी ताताचे धरि पाद ९९
अमृत सुदिरसा वर्षला पावुनि पद नाकीश
नमि सर्व उठुनि हर्षला त्या सुख-सदना कीश १००
झाली रावण-भू जिता जेणें गेलें दैन्य
त्याच्या तोषा पूजिता होय बिभीषण सैन्य १०१
सुगळ-बिभीषण-सह वरी पुष्पकनाम बिमान
भरत पोर निववुनि करी सुरतरु रामचि मान १०२

---

१ क्षतांनीं व्यापलें अंग ज्यांचें असे. २ राम. ३ हरणकरी. ४ दहावेळा.

अभिषेक स्वीकारिला झाला राजा राम
संसारी जन तारिला स्वयशें पुरवुनि काम १०३
सबळ सुगळ बहुमानिला दिधला निरवधि हर्ष
भक्त बिभीषण वानिला तें स्तवन अमृतवर्ष १०४
मारुति रामें पूजिला आठविले उपकार
प्रसवे देवी भूजिला ती दे वर मणिहार १०५
वधिला बिप्राहित लवण शत्रुघ्ने बहु दुष्ट
या विजयानें जन कवण झाला नाहीं तुष्ट १०६
तीन कोटि गंधर्व खळ भरतें केले चूर
जैसें प्रभुचें बाहुबळ याचें गाती शूर १०७
राम-प्रभुखांचे तनय कुश-प्रमुख जे आठ
राजे केले ते सनय वेद जयांला पाठ. १०८
उघडुनि अनुकंपा दिली श्रीरामानें भुक्ति
पुण्य कीर्ति संपादिली देउनि अंतीं मुक्ति १०९
दोहा- रामायण प्रेमें श्रीरामाच्या पदावरी
मयूरें वाहिलें ज्याचा गाता हर्ष सदा वरी ११०




# भावरामायण प्रारंभ.

श्रीशा प्रार्थी विधि अभय या सृष्टिला दे वधाया
दिक्कंठा हो नर रवि-कुळीं देव-भूदेव धाया
तों पुत्रार्थी दशरथ करी वाजिमेधा नयाच्या
भार्या आर्या सुखवि वचनें सन्मतें धातयाच्या १

अग्नि-प्राप्त द्विज-मनु-बळें जें तया पायसाचें
घेती साध्वी सुकवळ तिघी जे शिरें पाय साचे
कौसल्येला प्रथम सुत जो होय तो रामनामा
कैकेयीचा भरत बहु दे जन्मतां धाम धामा २
दोघे पुत्र स्मर-शत-नुत श्रीसुमित्रेसि झाले
राजा त्याचा कुलगुरु तयां पाहतां फार धाले
हेले ज्येष्ठा मुनि-वर-मतें लक्ष्मण प्राज्य धाम
प्रेक्षी भाग्यें तदवरज जो त्यासि शत्रुघ्न नाम ३
हर्षे केली तदुपनयनें त्यांसि भूदेव शिष्ट
प्रेमें विद्या अपुनि सकला निर्मळा दे वसिष्ठ
तों त्या वृद्धा दशरथ-नृपा तद्विवाहाधि लागे
विश्वामित्र क्रतुसमवना रामचंद्रासि मागे ४
गुर्वाज्ञेनें नृप मुनि-करीं दे सुत प्राण दोघे
त्यांला अस्त्रें शत कथुनियां सद्यश प्राज्य तो घे
सांगे विद्या प्रथमचि बला जी निवारी क्षुधेतें
तृड्बाधघ्नी मग अतिबला लाजवाया सुधेतें ५
जी मार्गी ये स्व-गुरु-वचनें त्या वधी ताटकेला
जीणें स्वर्गी स्तुति करि शचीही असा थाट केला
पावे सिद्धाश्रम शर्म-धन-ध्येय दे आधि ज्याला
त्या हर्ष द्विट्-क्षय-मख-महा-सिद्धिनें गाधिजाला ६
विश्वामित्रा जनक नृपति स्वाध्वरा तोंचि बाहे
त्यातें प्रार्थी प्रभु शिव धनु-रत्न पाहोत बाहे
जातां तारी स्व-चरण-रजें गौतमस्त्री शिला हो
भंगे भर्ग-प्रभु-धनु म्हणे श्रीपति श्रीमि लाहो

---

१ तेज. २ गृहा. ३ पुष्कळ. ४ तत्-अवरज-त्या लक्ष्मणाचा कनिष्ठ.
५ रामलक्ष्मण. + ब्राह्मणाच्या मंत्रबळें. ⁂ तृषेची बाधा दूर करणारी.
‡ योग्यांनीं ध्यान करण्यास योग्य राम तो

अर्थी मांळा पण पुरवितां चाप-भृत्-कोटि-गीता
सीता रामा निववि बहु ती कीर्ति संसार-भीता
विप्रेंद्रोक्तें भरतमुख जे त्यांसही भूप धन्या
अन्या दे तो सगुरु मिथिळेमाजि आणूनि कन्या ८
उल्कापात त्यजि रवि रुचि क्ष्मा चके मार्ग वात्या
रोधी क्रोधी त्रिनयन-धनुः खंडनें भार्गवा त्या
जिंकी राम प्रभु दशरथा हर्षवी पुत्रलोभी
क्षत्रघातें निरखुनि धरी देह-भाना न जो भी ९
हर्षे पीतां प्रभु-विजय हा सार साकेत कानें
प्राचीनें या न विसरविजे सारसा केतकानें
हंसें जैसा मह[1] तदितरें काय होतो खगानें
कीं जो सामें कविमतिस तो काय हो तीरव गानें १०
नेला प्रेमें भरत सदना मातुलें भूरिभागें
भूपें द्यावें प्रभुसि युवराजत्व हें कार्य मागें
गुर्वाद्यासप्रियहि करितां मंथरानाम दासी
कैकेयीनें कुमति शिकवी जाचवी कामदासी ११
मागे राम त्यजुनि नगरा या अरण्यास जावा
चौदा वर्षे भरतचि धरापाळ नाला सजावा
स्त्रीच्या सत्यव्रत कुळज तो आग्रहीं कोंडला जे
तैसे त्यांचें वचन वदतां अन्यथा तोंड लाजे १२
कैकेयीचें प्रिय न करवे हाय तो आर्य साधी[2]
तत्सत्याचें समवन करी मुख्य तें कार्य साधी
विश्रांला दे धन विनविनां राम घे जानकीला
त्या भ्रात्याहीं विरह[3]-शिखिची सोसवे ज्या[4] न कीला १३

१ उत्सव. २ आधियुक्त. ३ विरहाग्नीची. ४ ज्वाला.

साहों बाहों धृतिस नशके तो वदे राय हा तें
पाहे जेव्हां दयित-तनया वल्क दे माय हा तें
भोगूं जातां अनघहि तसा तो वनाला विपत्ती
स्वस्त्रैणत्वें बहु खरखरा तन्मना लावि पत्ती¹ १४
सांगे सूता नृप निज-रथीं त्या तिघांतें वहाया
कौसल्येच्या विकळ-मति तो जाय गेहीं रहाया
झाले पौर क्षम न पळही तद्वियोगा सहाया
त्यांतें सोडी प्रभुहि नशके तत्सुखानें पहाया १५
श्रीगंगेच्या श्रित-हित तटीं शृंगिबेरीं गुहातें
भेटे मुक्ति-प्रद-पद जसा मेघ पृथ्वी-रुहातें
तेथें माथां हरि करि जटा दाखवी शर्व-रीती
प्रक्षालिह्या+ परिहरि गमे सूर्य तो शर्वरी ती १६
जाया भक्ता जनक-सचिवा त्या सुमंत्रासि मागें
सांगे राहो नृपति-भजनीं सर्वदा चित्त जागें
गंगा पारीं उतरि गुह ये रामभद्र प्रयागा
तो जिङ्कें तें हित कथि भरद्वाज साद्विप्र यो गा १७
त्या आर्यानें पुसुनि करि तो चित्रकूटीं निवास
ध्येय प्राप्या परम-कृपणा वित्तसा जो शिवास
मंत्री ऐके गुह चरमुखें तें कथी त्या प्रभूनें
देह त्यागी म्हणत वदनें राम शोकें प्रभूनें १८
ज्यीं शोकीं नृपति मरतां ती अयोध्या बुडाली
सर्वांचीही मति गति तसी प्राण होतां उडाली
स्थापी ज्ञाता गुह शव धराजानिचें तैल-पूर्ण
द्रोणीमध्यें पिटुनि चरे ते आणवी पुत्र तूर्ण १९

---

१ पादचारी. २ शव. ३ रामा. ४ पुष्कळें. ५ दूत. + कम्म अशि
धा.

येतां वृत्त श्रवण करितां फार मातेसि निंदी
खर्जूरीसी गमलिस कसी तूं सुधीराहि मिंदी
वा शत्रुघ्ना नच निरखिजे तोंड या पापिणीचें
जीच्या नेत्रीं खर गर वसे त्या बरें सापिणीचें २०
कौसल्येच्या रडुनि पडला तो गळां साधुरीती
त्या मातेची निववि भरता या सुधा-माधुरी ती
आचार्योक्त श्रुतिमत करी सांग तात-क्रियेतें
राज्यश्रीतें त्यजुनि विनवूं जाय साधुप्रियेतें २१
नौका दे तो गुह रुचि असे जाणतां सत्य यातें
आज्ञा येतां मुनिवर भरद्वाजहि प्रत्ययातें
भेटे आर्या पितृ-मृति कथी राम दे पिंड वन्यें
धन्यें भूपें वरवि वरिली तृप्ति तैसी न अन्यें २२
घाली प्रेमें भरत परतायासि तो देव राडा
प्रेमार्द्राचा तिळहि रुसवा श्री न नी दे वराडा
स्वादु श्रीमद्वच अमृत जें तेंहि न स्वादु कांहीं
सांत्वोक्तीहीं बहु निववि ला भक्त तो पादुकांहीं २३
नंदिग्रामीं परतुनि वसे की मनीं ताप सांचे
सेवी धर्म स्थिरमति सदा जे वनीं तापसांचे
त्या स्थानासि त्यजि विभु तया स्वाश्रमामाजि अत्री
पाहे हर्षे बहुतचि जसा मानसा हंसपत्री २४
तद्भार्या श्रीतनुसि निववी अद्भुतें अंगरागें
जेणें धावा श्रम नच घडो जेविं सत्संग रागें
सांगे श्लोकें धरुनि न भया या विराधा हिमारी
स्पर्धी जैसा सहज पतगा त्या विराधाहि मारी २५

१ गंगेतें. २ मानससरोवरा. ३ हंसपक्षि. ४ यत्नों. ५ अग्नि.
+ संसारसंबंधी निर्वाह्य जीं अनेक कामें त्यांचा जो पसारा तो

ब्रह्मानंदीं मुनि बुडविले दंडकारण्य-वासी
मुक्ति प्रेक्षा विनवुनि असें त्यापुढें तोहि वासी
वंदी सीता दयित-घटजा गृध्रपा बापभंगा[2]
राहे तीरीं सुखवि बहु या मायसी वृद्ध गंगा २६
तेथें आली कुमति विधवा रावणाची स्वसा या
श्रीरामाच्या रुचितम मही[+] जो चितांकीं[**] वसाया
नासा-कर्ण-द्वय-विरहिता लक्ष्मणें ती अशीला[3]
केली ज्ञाने म्हणति उचिता दुर्दशा हे अचीला[4] २७
धाता भ्राता खर सपलभुक्सैन्य अत्युग्र चंडी
प्रेषी द्वेषी करि समर तो तच्छिर श्रीश खंडी
सांगे कांगे रडसि म्हणतां रावणा वृत्त सोडी
शंका लंकापति स तुरवी जें असें वैर जोडी २८
श्रीतें वर्णी बहुबहु म्हणे रत्न भोक्त्या हरावी
ती स्त्री रत्न स्व-वर-महिषी त्वां समर्थे करावी
स्वःपुष्प-स्रक् तसिच हृदयीं सर्वदा ही धरावी
बा सर्वस्व त्यजुनि चतुरें मुक्ति तैसी वरावी २९
त्या मारीच स्तवुनि कळवी स्वाऽनुभूत-प्रतापा
श्रीरामाच्या विशिख-पवनीं तेज निःसीम बापा
तेणें गावें शत उडविलों मी जसें पर्ण वातें
मेलों होतों जरि नमिळतों रावणा अर्णवातें ३०
त्यातें दापी दशमुख म्हणे हो मृग स्वर्णवर्ण
स्त्री ती मोहीं मग उसळ तूं शीघ्र जैसा सुपर्ण
व्हावी प्राप्त द्रुत मज वनीं एकली हो सहाय
बोलेना हा म्हणसि अवशा[5] पाडितां ओस हाय ३१

---

१ पक्षी. २ शरभंगा. ३ दुःशीला. ४ याप्रकारचीला. ५ परस्वाधीना.
+ आनंदी. ** चितारूपमांडीवर.

चित्तीं चिंती ऋतु-वर-शरें मृत्युही लाभ मोठा
दिक्कंठाच्या जरि वध करें स्पष्ट अत्यंत खोटा
झाला मान्य प्रबल कपटी तो भरी ऐणतेवें
छाया थिर्थां यश करिति ते कर्म जें नेणते तें ३२
धावा स्वामी कनक-मृग हा प्रार्थिती हें सुदार
प्रेमें बोले वच बहुबरें यापरी तो उदार
गेला श्रीच्या अनुज अवना ठेवुनि त्यंकु-मार्गें
जाणों रामाप्रति मन म्हणे त्या उरीं शंकु मार्गे ३३
हा सीते हा अनुज असि तो ताडितां वक्ष बाणें
फोडी हाक क्षितिजनि म्हणे लक्ष्मणा क्षिप्र जाणें
मिथ्या रक्षश्छल कथि असें ती न तें सत्य मानी
बोले मातें वरिन म्हणसी वांछिसी आर्य-हानी ३४
तो सीतेला त्यजुनि उटजीं पावला ताप गेला
जैसा हंस-द्विज खवळल्या श्रावणीं आपगेला
ते आर्येतें टपतचि दशग्रीव होता दडाला
वाटे केलें हितकर भलें कर्म तें त्या जडाला ३५
रोधी क्रोधी दशरथ-सखा तो जटायु प्रतापी
भंगी युद्धीं रथ महिसुता सोडवी त्यासि दापी
जेव्हां पावे जय झटुनिही धर्म-युद्धीं न पापी
तीक्ष्णें खड्गें क्षत-शत-चित क्रूर तत्पक्ष कापी ३६
शोकें बोले श्वशुर पडतां साश्रु होऊनि हाय
क्ष्मापुत्रीतें उचलुनि नभोमार्ग लंघूनि जाय
पाहे पांच प्लवग नगतीं खोत्तरीय स्वहातें

१ हरिणपणातें २ हरिणाच्या मार्गे ३ भय ४ सीता ५ तां त्याद्रीं कडयानें व्याप्त, आच्छादित.

सोडी त्यांत श्रवण करिती जें तदास्योत्थ हा तें ३७
लंकेमध्यें दशमुख वनीं ती अशोकाभिधानीं
ठेवी देवी प्रभु मनिं जिच्या यक्ष जैसा निधानीं
तो सौमित्रि प्रभुसि गहनीं वृत्त भेदोनि सांगे
बोले दुःखें प्रभु नव असें त्वन्मुखीं कूक कां गे ३८
हा हा ऐसें म्हणत उटजीं ये प्रियेतें नपाहे
वाहे खेद प्रभु हृदु मनीं तद्वियोगा नसाहे
लाहे कोठेंहि न पद तिचें नाम घेऊनि बाहे
हा हे वाणीं निमिषभरिही श्रीमुखींची नराहे ३९
देखे गृध्रा वन हुडकितां मूर्छिता छिन्नपक्षा
सांगे कष्टें हळु वदविना शोक-निर्भिन्न-वक्षा
नेली वत्सा खळ-दशमुखें त्या वधीं दुष्ट-रक्षा
प्रक्षाळाया मदपयश वा शत्रु-संहार-दक्षा ४०
तात-प्रेमें करुनि उजवी दे तया शीश मांडी
श्रीमद्वक्त्राप्रति निरखितां तीवरि प्राण सांडी
आंगें मोक्षप्रदहि सुतसा तत्क्रिया सांग मांडी
जो या सोडी इतर करि तो स्पष्ट कोंडाचि कांडी ४१
श्रीश श्रीतें हुडकित फिरे स्त्रैणसा बंधु-युक्त
ग्रासाया जो धरि हरि करी त्या कबंधासि मुक्त
त्याच्या बोधें करुनि शबरी जी तिला भेट थोरें
तत्प्रेमें दे सुगतिहि दया-सिंधु भक्षूनि बोरें ४२
पंपा-तीरीं प्रकटि परमानंद तो जे विलाप
स्पष्ट त्यां ऱ्हा प्रथम न तिहीं ते धवां ठेविला पै
भ्रातृ-स्नेहें अनुज सुविधी धैर्य या दे वदाशी

१ कु-उक-दुर्भाषण. २ वायू. ॥ः मद्-अपयश-माझी अप कीर्ति.

रीति प्रेमें बहु कवि-शतें ती जिनें देव गाती ४३
आधीं भेटे पवन-तनुज ब्रम्हवेषें रमेना
तो अन्यत्रें त्यजुनि पळु तत्पारपद्मीं रमेना
हा सुग्रीवा दिनमणि-सुता भेटवी साधि तोया
जैसा यत्नें तृषित कपिहि श्रीशाही साधिता या ४४
दोघे तुल्य-व्यसन करिती सख्य सुग्रीव दावी
ते सीतेचे नग मग जगन्नाथ वक्षासि लावी
होय श्रीशा स्मरुनि व्यथिता साश्रु सांखी कपीन
स्व-क्लेशातें कथि विभु म्हणे शोक माझा न दीन ४५
स्वामी सांगे व्यसन हरितों हें तुझें सर्व आधीं
हो किष्किंधा-पति मग सख्या तूंहि मत्कार्य साधीं
कां तो चेंडु अचळ करिता क्रीडा कां पाळिता शीं
सूर्या देतां सुख असुख मी वासवा वालि-नाशीं ४६
पादांगुष्ठें उडवुनि दहा-योजनें दैत्य-देहा
भेदी सप्त द्रुम गिरि-शरें त्या सख्या शैत्यदे हा
मित्रा सांगे विभय समरा त्या महाबाहु बाहे
पाहे दोघे सम विभु उगा दूर वृक्षांत राहे ४७
भंगे युद्धीं पळुनि कपि तो ऋष्यमूकासि गेला
वल्ली कंठीं खुण करुनियां सिद्ध युद्धासि केला
एकें बाणें रघु-कुळ-वरें मारिला वीर वाळी
किष्किंधेतें सुगळ भगवद्दत्त सामर्थ्य पाळी ४८
वर्षाकाळीं प्रभु नग-गुहेमाजि राहे उगाची
श्रीविश्लेषीं त्रुटिहि विपुळ आलि झाली युगाची

---

१ रमा-इन-लक्ष्मीपति जो राम त्याला. २ कपि-इन-वानर श्रेष्ठ सुग्रीवाला. ३ पुढे. ४ सीतेच्या वियोगीं. ५. अल्पकाळहि.
६ सविं. + पर्वत.

वाट चिंता धर्मी विसरला तो कृतघ्न अनाथ
द्रावायाला विभु कपिकडे पाठवि क्षिप्र भ्राता ४९
सौमित्रीला सुगळ बहु भी साम योजूनि तारा
ने भासाही विनवुनि म्हणे हा सखा साधु तारा
प्रार्थायाला स्वगुरुसि तया कोशपाळासि तो घे
आले स्वामीजवळि शिबिकेमाजि बैसोनि दोघे
आल्या देती रविसहि दिसों ज्या न कीशादि सेना
भूमिप्रातें पदवधि तया जानकीशा दिसेना
राजा मासावधि करुनियां तो कराया स शोध
प्रेषी आले परतुनि दिशा तीन धुंडूनि योध ५१
शोधीं केला अवधि टळला दक्षिणावीन[२] वीर
प्राण-त्यागा धरुनि बसले ते महेंद्राब्धि-तीर
तों संपाती क्षुधित सहसा पातला गृध्र-वीर
शीघ्रें होते वदत हरण व्यग्र ते कीश-धीर ५२
खाऊं आला अनुज-सुकृता ऐकतां हृष्ट झाला
सांगे शोध प्लवग-बळ जें तोय सेवी न पाला
दे ऋक्षेश-स्तव नव महोत्साह वातात्मजाला
एकाकीच खबळ कळतां वायुसा तो निघाला ५३
मैनाकादि त्रिदश-वदनें क्षिप्र बाहेर आला
मानी विघ्न श्वसनज उरें पाडिता होय त्याला
देवाज्ञेनें अडधि सुरसा नागमाताहि यासी
ग्रासायाला द्विगुण-शतही योजनें तोंड वासी ५४
ती ब्रह्म्याचा वर मज असे यापरि स्पष्ट बोले
तद्वक्त्रीं तो लघु-तनु शिरे जाय देवेंद्र डोले

---

१ नामविशेषवालीची स्त्री. २ दक्षिणदिशेंत.

जी आकर्षी कुल-निधि-मना शिंहिका सांद्रलीला
तीतें पोटीं शिरुनि भिवदी कीर्ति दे मानलीला ५५
लंघी लीलें करुनि वाल तो योजनें सिंधु-पारा
पावे येमें चकित हृदयीं होय पाहोनि पारा
लंका-देवी-परिभव करी देवदारोग्र-कारा
शोधी पाहे उपवन-गता शेवटीं स्वामि-दारा ५६
नो मे रात्रि स्मर-विकळ तो केवळ क्रूरकर्मा
मार्थी माझी सुमुखि महिषी हो सदा मान्य शर्मा
काळीं मध्यें करुनि वदली ती विलंघूनि धर्मा
होसी वध्य प्रभु-धनुसि कां त्यागुनि न्याय-धर्मा ५७
पापी बोले उडविस वकें त्यांचि अद्यापि कां गे
ऐकेय झाले बहु मजपुढें देवता-यक्ष नागे
इच्छी पावे न च विधुसि जो आंगणीं बाळ सांगे
पाहे व्यर्थ व्यय वय तुझें हें बरें कां न सांगे ५८
क्रोधें आज्ञा करि खळ असी राक्षसीतें अगे या
स्त्रीतें सांगा हित पथ हठा हे न पोषू अगेया
बोध्या शोध्या अवधि दिधला दोन जाणून मास
ग्रासायाला मग मज इचें द्यावि आणूनि मास ५९
गेला ऐसें वदुनि करिती राक्षसी गंजना ज्या
देतें झालें बहुतचि तया ताप तें अंजनाजा
काढी वेण्युद्ग्रथन मग ती स्त्री कृतोद्बंधनाशा
जी चिंतावी विनळ-मतिनीं मुक्तिदा बंध-नाशा ६०
कूर्सीं वर्णी हळुचि कवि तो सद्गुणांच्या समुद्रा
रामा त्याची करुनि नमन सोन दे तीस मुद्रा

---

१ गाण्यास अयोग्य अशा ( हृदा शब्दाचें विशेषण ) २ महिने ३ स्त्रीकृत-उद्बंधन-आशा- स्त्रीकारिली गळफासाची इच्छा जीणें असी. + मारी.

सीता हर्षे कुशळ पतिचें देवराजें विचारी
रुग्णा जैसें अमृत हित तें वृत्त तो तेविं चारी ६१
बैस स्कंधीं घडिहि नभरे सद्गुणांच्या खने तों
पक्षींद्राचे करुनि चकित स्वांत ते पाव नेतों
देवी बोले सकुळ अमतां पाप हा सासु नेसी
कैसा वत्सा यश न करितां दिग्रथाच्या सुनेसी ६२
या श्रीवाक्यें कपि कवि निवे शास्त्र तेसें गणी तें
घे संदेश स्तवुनि महिजा दे स्व-चूडामणीतें
मोडी शौरी निशिचर-बळें तो महाबाहु झोडी
फोडी मस्तें बहुत परिघें दक्ष अक्षायु खोडी ६३
ब्रम्हास्त्रानें घनरव रणीं तद्विनाशार्थ योजी
होय छद्में वश कवि मनीं तो तयातें न मोजी
त्या मूढानें कपिवर महारज्जुनीं बद्ध केला
नेला राजाजवळ मदनारातिचा योग्य चेला ६४
तूं कोणाचा उपवन वर ध्वंसिलें कां अरे तें
कां रे केलीं निशिचर-बळें मर्कटा त्वां परेतें
ऐसें कोपें दशमुख पुसे कीं रणीं अक्ष मेला
त्याच्या शोकेंकरुनि वशधी होय तो अक्षमेला ६५
त्या वाताचा सुत कथि असें दूत मी राम-भार्या
आर्या येथें दिसलि सुकृतें पातलों याचि कार्या
आलों द्वारें तुजजवळि या वा करायासि बोधा
क्रोधा कामा त्यज वश नया नित्य धर्माहि हो धा ६६
सत्ता दत्तावरि करि असा कोण योगींद्र आहे

१ रोग्यास. २ भरबी. ३ दाहकरणारे. ४ वृक्ष. ५ मस्तकें. ६ असहमनेला.

मत्ता सत्तामद अहिवरा कोण कल्याण लाहे
लोभा शोभा-सुमति हरित्या सुज्ञ चित्तीं न वाहे
हो भी क्षोभास्तव नच उणी भाग्य पापें न राहे ६७
इत्यादि स्व-प्रभु-भुज-बळें मारुती जों दटावी
तों घे हस्तीं खळ असिलता जी सुरौघीं नटावी
सोडी मारूं कुमति इतरा जेविं तद्दूसळाशें
वारी भ्राता स्तवुनि नरुचे कर्म सद्दूसळा तें ६८
भिश्च-प्राण-प्रिय-तनय जो त्यासि मानूनि तुच्छ
स्नेहीं वस्त्रें भिजवुनि तिहीं वेष्टवी दीर्घ पुच्छ
क्रोधें बोधें रहित करवी दीप्त तें होय भीता
प्रार्थी अग्निप्रति तदवना ती दयासिंधु सीता ६९
सांगे यातें धरुनि फिरवा सर्व-लंकेंत सोडा
व्हावा दंड प्रणत-सरळा-कांत-मानार्थ थोडा
नेतां बद्ध स्व-भुज-युग तो वायुचा प्राण झाडी
पाडी द्वेषी कपि[2] देव गमे स्पष्ट लंकाहि झोडी ७०
होळी लंका गमलि धडके वाळली जेविं मोळी
घोळी रक्षोगण बहु दशग्रीव तो हात चोळी[4]
पोळी ज्योनीं दहन नटिके देवतांचीहि टोळी
चोळी साडीहि न धड शिव्या स्त्रीं दशास्यासि तोळी ७१
लंकेशाचा अनुज दुसरा साधु तद्गेह पाळी
आळी लक्षाधिक सुसदनें ज्यांत त्या सर्व जाळी[5]
जाळी मुक्ता-मणि-गण-मिषें पेटतां अश्रु गाळी
चाळी नेत्रें न रिपु-घुबड स्पष्ट हा अंशुमाळी[6] ७२.

---

१ कांति. २ वणवा. ३ वारीक मोठ्या झाडानीं निबिड अरण्यतीं. ४ घांसी. ५ दग्धकरी. ६ सूर्य.

पाराकारीं विझवि मग तें पुच्छ देवीस वंदी
नंदी भासे करि तरुनियां सिंधुतें कींचा बंदी
त्याला लावी मधुवन लुटायास वो भाटसाच
क्रोधें सांगे दधिमुख गमे साधु तो भाट साच ७३
श्रीचा चूडामणि पति-पदीं अर्पुनि स्वंग देहा
श्रीभर्ताही पवन-जनिच्या त्या परिष्वंग देहा
पर्णीना त्या बहु बहु कृतज्ञेश्वा कां जीवदाना
स्वामिप्रेमा अमृत अमृता कांजि कां जी वदाना ७४
श्रीसंदेशा सदरि-कुमता ऐकतां राम-वीरा
भ्रात्या त्याही पुसुनि सुगळा जाय पाथोधि-तीरा
मत्त-त्यक्ता द्विषदवरजा सत्सभा-मूर्ध-हीरा
लंकाराज्य स्वपद नमितां दे दयासिंधु धीरा ७५
सिंधु प्रार्थी नळ कपि रची सेतु लंकेंत पापी
श्रीला दावी प्रभु-शिर म्हणे लङ्कलाधीश कापी
माया ऐसें हळुचि सरमा सांगुनि श्रीस रक्षी
तीस प्रेमें जनक-तनया मायं तैसेंच लक्षी ७६
धाडी श्रीमान् करुण धरिले साधुनें हेरणारे
बोले शत्रो मम भुज पहा पातले हे रणा रे
वारा जैसा त्वरित वळवान् पावला तेथि पारा
स्वप्राकारीं चढुनि निरखी सैन्य तो तें धिपीरा ७७
दुर्गं प्रेक्षी चढुनि शिखरीं तो सुवेळाचळाच्या
शोभे चित्तीं सुगळ बळवान् दर्शनें त्या खळाच्या
स्वामीतेंही नपुसुनि उडे तार्क्ष्यसा त्यासि ताडी
पाडी खालीं मुकुट मदही बाहुयुद्धांत झाडी ७८

---

१ सु-अंग-चांगलें शरीर ज्याचें असा मारुती तो. २ आलिंगन.
३ द्विषत्-शत्रु-त्याचा कनिष्ठ बंधु बिभीषण त्यांस. ४ विरूप.

भिमा मार्थी प्रभु नभजती साहसा सुज्ञ नेषा
चूथाधीशांप्रति निजमुखें सांग लंकेशि वेषा.
तो कीशोघ प्रबळ दुसरा कोट दुर्गासि झाला
तेणें रक्षःप्रसर जळदें दाव नैसा विझाला ७९
धाडी आधीं प्रभु रिपुकडे वाळिपुत्रासि सामा
कामासक्ता कपि दशमुखा भेटला गर्वधामा
आमा बोध प्रिय न मरत्या बाळका जेविं औसा
या मारा हें कथि धरिति तें मूढ नेणोनि धामा ८०
कीशेंद्राचा सुत गरुडसा आक्रमी पुष्करातें
तत्कर्मातें स्तथि कविशत प्रीतिनें दुष्करातें
प्रासादातें सजव उडतां तो महासत्व फाडी
पाडी नाडी करुनि शिथिला शत्रु जों बाहु झाडी ८१
मोटे खोटे अहित चवघे मारिले अंगदानें
तेजें केले चकित अवघे दुष्टधी भंगदानें
युद्धारंभ प्रभु करि तदा तो न शंके शवांचे
राशी पाहे तरि बहु बुडायासि लंकेश वांचे ८२
सेना-नाथ प्रथमचि मरे पावुनीं भंग रामीं
नृत्व प्रेक्षी वधिनचि म्हणे सोडिना संगरा मी
मेघध्वान प्रखर फणभृत्पाश घालूनि बांधी
दोघे बंधु त्रुटित जय जो कौतुकें त्यासि सांधी ८३
देवी मोहे तिस बहु भली राक्षसी सत्य सांगे
तेजस्वी हे ध्वंसु नव्हणसी साध्वि तूं हाय कां गे
तों ये तार्क्ष्य त्यजिति अजिता सानुजा नाग धाकें

१ वणवा. २ अपक्का. ३ स्तन. ४ तेजा. ५ आकाशातें. ६ मनुष्यत्व. ७ इंद्रजित. ८ तुटलेला. ९ वि-अगतप्राण. १० गरुड. ∴ राजवाड्यातें. + सवेग.

केला स्तोत्रास्पद हरि करीशावनीं[1] जेविं नोकें ८४
बंध-स्कंध प्रभुवर वधी संगरीं यातु[3] कोटी
चिंता लागे निज-परिभवें राक्षसेंद्रासि मोठी
मोठ्या कष्टें उठवि अनुजा न त्यजी बुद्धि खोटी
त्या दाटूनि प्रलय-दहनीं कुंभकर्णासि लोटी ८५
त्याच्या होता भर पसरला विग्रहीं[4] आळसाचा
सुग्रीवाच्या तरिहि कटका भासला काळ साचा
पाडी मोहीं धरुनि परते वाळिचा भाउ जीव
स्वामी तेव्हां निजमनिं म्हणे त्यासि बा भाउजीव ८६
लंकेमध्यें अहित शिरतां मोह सोडी हरीना[5]
नासा तोडी सुटुनि मग तत्कर्ण कां तो हरीना
कोपे मागें फिरुनि कटका लागला घोळसाया
झाला दीवा[6] कपि-निकर तो टोळसा मोळसा या[7] ८७
कुंभश्रोत्र प्लवग सगळे तो गिळी जेविं पेटे
हा दावाग्नि प्रबळ भंवते स्पष्ट कीशौघ भेटे
त्याचे बाहू चरण मग तन्मस्तक श्रीश तोडी
जोडी शोकीं मन न कर ती दुष्ट खोडी न सोडी ८८
पुत्र भ्राते सचिव खपले पीडिते विष्टपा[8] हे
हानि स्पष्टा निरखि फिरलें आपलें दिष्ट[9] पाहे
झालें शाप-स्मरण तरिही दुष्टधी तो लवेना
कोणासींही हठमठ शठश्रेष्ठ हा तोलवेना ८९
दिक्कूटातें घनरव म्हणे निर्मितो संगरा[10] ज्या
कल्प[11] ज्ञाते म्हणतिल करीं इच्छिला संग राजा

१ करि-ईश-अवन-गजेंद्राच्यारक्षणीं. २ स्वर्गे. ३ राक्षस. ४ देहीं. ५ हरि-इन-वानरेंद्रा. ६ तृणवत्. ७ कुंभकर्णी ८ भुवनाला. ९ दैव. १० युद्धा. ११ प्रलय. ‡ रावण्या. ला. + कुंभकर्ण.

बा चिंतेतें करुनि म्हणसी तेज नाशो कसा हो
स्वस्थ आज्ञा तव मन सुखी व्हावया शोक साहो १०
बाण- आतें कपि- बळ रिघळी तो नभीं गुप्त राहे
त्याचें व्हाया यश वशनसा सानुज श्रीश साहे
ते शल्यार्त प्रभुसह जसे सर्व मोहीं बुडाले
वाटे प्राण क्षणभरि भयें जिष्णुचेही उडाले ११
रात्रीं उल्काधर ससरमाजानि तो वातभूतें
पाहे जोडी बळ- समयनाकारणें हात भूतें
ऋक्षाधीश स्तवि कथि तया ओषधी आण जा गा
बा नाहीं भी लव असासि तूं आमुचा प्राण जागा १२
तो कैलासाजवळ निमिषें जाय दे हर्ष बौला
भ्याल्या देती झडकरि न त्या ओषधी भेटि याला
ज्ञाता ओषध्यग- शिखरचि क्षिप्र घेऊनि आला
झाला स्वस्थ प्रभु सबळ या सधशें फार धाला १३
होतें तेथें पवन- तनु- भू नीट ठेवूनि शृंग
स्थापी ये तो परतुनि पुन्हा राम- पादाब्ज- भृंग
झाले स्वस्थ प्लवग सुभट शोभले सेश माया-
युद्धें सारे वधित सुटले राहिले ते शमाया १४
माया- सीता घनरव करी ने रणामाजि पापी
दावी आधीं मग शिर तिचें खड्ग हातींनि कापी
नाहीं स्त्रीचें अवन घडलें काय तूं स्वेड जापी
श्रीरामातें खळमणि असें आकुला तेवि दापी १५
तेव्हां बोले पवनसुत हा राम हा बंधु तो हा
राजाही हा शतमखहि हा पावले सर्व मोहा

* ईशासह. २ विष. ** बायाला बाय्काला.

सांगे साधु-प्रवर सरमाजानि कां खेद आया
हे कीं रामा अनुज समरीं त्या खळा दे दमाया ९६
अग्न्युत्पन्न प्रवर अमरत्व-प्रद प्राप्त होमीं.
मेघध्वाना रथ विधिवरें चिंतितों या न हो मीं
गेला दुष्ट भ्रमवुनि तुम्हां कार्य साधावयाला
सेना त्याला करु करि जरीं जेथिं बाधा वधाला ९७
आर्याज्ञेनें सकटक निघे वीर सौमित्रि पूर्ण
प्रत्यूहातें करि झटुनि दे होम होऊं न पूर्ण
मारी त्यातें अनेवरत तें युद्ध चोवीस-याम
प्रेमें बोले व्रण-चित वपु प्रेक्षितां हाय राम ९८
वार्ता येतां दशमुख मनीं भाजला पुत्र-शोकें
क्रोधें भारी तळमळ करी देखतां ओस ओकें
सीता-घाता धरुनि असितें काळसा जाय हो तो
भी ती बोले वध रघुपते हा असा काय होतो ९९
त्यातें प्रार्थी सचिव हरितो शर्म हेका यश स्त्री-
घातें जातें प्रभुजि करिती कर्म हें काय शस्त्री
सर्वस्वें कीं वरिलि वधितां ईस कां जीव धावा
जीणें आधीं वर नर इच्छा तो न कां जी वधावा १००
आयुःशेषेंचि परतविला हो न तो मंत्रि-बोधें
हेंचि स्पष्ट स्वमत विमळें स्थापिलें साधु-शोधें
माराया त्या सुगळ-सहिता सर्वथा रामराया
धाडी सैन्यें बहु कुमतिचा सर्व धारा मराया १०१
सद्वाणांचें विरवरुनि महासंगरीं जाळ तो रथा

---

१ विघ्नातें. २ अखंड, एकसारखें. ३ व्रणानीं व्याप्त. ४ घरें. ५ खड्गातें. ६ आग्रह. * दुदुल.

ऐसें सांगे प्रभु गुण-रवें नों धरी काळ तारवा
क्रव्यादांचे अगणित रणीं नाचले हो कबंध
क्रूरांचेहि प्रभुवर हरी तत्क्षणीं शोक-बंध १०२
तो कर्णाहीं सकळ पृतना- हानिची ती कथा पी
आंगें भांडे जरिहि असकृत भंग पावे तथापी
मोडी कीश-प्रखर-कटकें दारुणा शक्ति सोडी
फोडी वक्ष स्मृतिहि उरवी लक्ष्मणींही न थोडी १०३
तेव्हांही तें पवन-तनुजें आणिलें शृंग नस्यें
तेणें शोभा वरिलि अधिका यारिदें जेविं सस्यें
युद्धीं पत्ति प्रभु पर रथीं तें न शक्रा पहावे
धाडी जैत्रे स्वरथ न खळोत्कर्ष थोरा सहावे १०४
बैसे श्रीमान् सुर-पति-रथीं तापवी यातुपातें
पेटे वाटे दहन गिळि तत्सैन्य जें या तुपातें
नाकी जे त्या गमति म्हणते भक्त ते ओ घनाचे
कीं तो त्याचा शर विखरितां रावणीं ओघ नाचे १०५
शस्त्रें जीं जीं दशमुख रणीं क्रुद्ध होऊनि सोडी
तीं तीं राम प्रभुवर शर क्रूर योजूनि तोडी
अस्त्रांतेंही पवि-भृदरिच्या हा यशोराशि खंडी
दापी व्यापी अजित भुजगा जेविं घोरा शिखंडी १०६
खंडी राम प्रभु शत शिरें तो तरी हा न आटे
वाटे गेलें स्वबळ विभुच्या आधि चित्तांत दाटे
फाटे धाकें हृदय अरिचें तों अगस्त्यर्षि आला
झाला देता रवि-हृदय तो भक्तिनें भानु धाला १०७

१ नाकामध्यें घालावयाचें किंवा ओढावयाचें औषध त्याणें. २ मेघें. ३ धान्यें. ४ पादचारी. ५ शत्रु. ६ जयशील. ७ राक्षसेंद्र जो रावण त्यातें. ८ मोर. + सेनेच्या हानिची. ✱ पविभृत्-अरि-पवि धरणाऱ्या इंद्राचा शत्रु (इंद्रजित)

भास्वान्[1] बोले अबघड तुला काय कोमारिशील
श्रीदा तूं या शिरवुनि उरीं सायका मारिशील
लागो विश्व स्तवरचनिं घोराघ वारो पहा हो.
कीर्ति ध्यानांतुनि नच निघो राघवा शेष राहो १०८
साध्वी व्हाया मुदित ससुरा ही रसा[3] राम होरीं
भेदी ब्रम्ह-प्रवर-विशिखें हीरसारा महोरा
अंता संतापद म्हणुनियां पाठवी राजराजा
ध्याया श्री दे विधि-वर बळें पाठवीरा जरा ज्या १०९
सत्पुष्पांची प्रभुवरि तदा वृष्टि केली सुरांहीं
प्रेमाश्रूंची समनुभविली सन्मुनींच्या उरांहीं
झालीं वाद्यें परम सुस्वरें[4] दिव्य नृत्यें संगीतें[5]
आनंदाचें किमपि शकली पर्व वर्णूं न गी तें ११०
झाला [illegible] स्वसम रण जो तो अहोरात्र सप्त
स्वर्गेशादि त्रिदश मुनिही पाहती त्रास-तप्त
सर्वांचाही प्रभु-वर-जय-प्राप्तिनें ताप गेला
जैसा जातो सकळ भजतां याचिया आपगेला[6] १११
तद्भ्रात्यातें कथुनि करवी तत्क्रिया सांग तो या
श्रेष्ठ-प्रेमें विसरवि यशें पावनें गांग-तोया
स्थापी भक्ता स्थिर चिर-पदीं होय हा निष्कलंका-
वसीं स्वांकीं मिरवि मग ती स्वप्रिया निष्कलंका ११२
वा देणारा यश कवि-शता तूं महाबाहु त्याया
मन्नेत्रांच्या अतुळ-चरितें तोषल्या बाहुल्या या
वज्र क्रीडा त्यजुन मृति जें दे शरीरा वपातें

---

१ सूर्य. २ महादेवासारिखा स्वभाव ज्याचा असा. ३ पृथ्वी.
४ शब्दयुक्त असें. ५ वाणि. ६ नदीला, गंगेला. + मु
मुद्रांर्न

अंता नेता न पटु दुसरा तों शशी रावणातें. ११३
ऐसें शंभु दुहिण वदले शक अत्यंत हर्षे
युद्धीं मेले प्लवग उठवी आज्य-पीयूष वर्षे
भेटे राजा दशरथ तया बंधु-सीता-समेतें
श्रीशें केलें नमन अमृताहूनि भारी गमे तें ११४
लंका-कोशाधिप-सह बसे पुष्पकीं दे वरा ज्या
श्रीश आल्या सुखवि भरता त्या जसा देवराजा
राजा होय त्वरित पुरवी सर्वही आस राया
रंका प्रेमें निववि करितो तापला आसरा या ११५
पूजी अंगें कपि-निशिचर-क्ष्माप हो ते ससैन[1]
स्नेहें बोले प्रबळ हरिसे शत्रु होते ससे न
गात प्रेमेंकरुनि तुमचें सार साहित्य जावें
भृंगें स्वर्द्रु-स्तबक मिळतां सारसांहि त्यजावें ११६
प्रेमें पूजी पवन-तनया जाणता वत्स-मान
स्वामी दे त्या कथि अचळता जाण तावत् समान
यावत् साधो मम यश जळीं मीनसा मज्ज नामीं
बाधों देता अरि विटुनि सामीं न सा मज्जनानीं ११७
दीन त्राणोचित सतत ज्या धर्मसे विप्र ज्यातें
होती पाच श्रमुनि सकळा शर्म सेवि प्रजा तें
त्या श्रीरामा नमुनि यश हें लेश वाहे मयूर[2]
प्रेमाश्रूंहीं भिजवि शशभृद्वक्षसें जें मयूर ११८
भावरामायण प्रेमें मयूरें राम-नंदनें
अर्पिलें रामचरणीं असकृत् कृतवंदनें ११९

समाप्त.

1 सेनेसहित. 2 मयु-उर-घोड्याच्या मुखाचा जो मयु नामाकिंनर त्याचें वक्षस्थळ. + सरोवरा.

# ⁂ कविप्रिय रामायणप्रारंभ.

धाता स्तवी अभय-दाता स्वयें दशरथा तात माधव करी
माता तिची तनय[1]-त्राता महोवसति[2] हा ताप सर्वहि हरी
या तारका सुकवि गातात राम अघ[3]-व्याळाऽहि यापरि रसें
भ्राता जगीं भरत भाता[4] न लक्ष्मणाहि पाता[5] अरिघ्नहि असें
झाला द्विजत्व[6]-पद आला अशांत मुनि त्याला सहानुज दिला
व्याला[7] यश स्व-रिपु[8]-कालाऽहि-तार्क्ष्य गुरु धाला[9] निवे बहु इला[10]
हा लावि पाद-रज बाला शिलेसि करि भालाऽक्ष[11]-चापहि चुरी
त्याला समर्पि मति माला वरी अयोनिजा[12] लाभली रति पुरी २
धामा[13] हरूनि वध-कामा प्रशांत भृगुरामा करी रघुपती
धामासि[14] ये नृपति या मागुनी भरत मामा घरी स्व-वसती
सामात्य भूप अभिरामा स्वराज्यपद रामासि देइन वदे
वामा[15] म्हणे वनचि द्या माजियाचि पद सामा न मान लव दे ३
जो ठीक नेंचि परि जोडी नृपासि कर सोडी प्रियाऽनुज-सह
खोडी ललाट-लिपि गोडी यशींच बहु तोडी श्रिताऽनुग[16]-मह
फोडी न गुह्यतम झोडी दया करि न थोडी पदानत-जनीं
मोडी न रीति तरि होडी तसी सुगति घोडी सजी मुनि-वनीं ४
तोका[17] स्मरे नृपति जो कातरत्व धरि शोकार्त-मानस मरे
ओकास[18] ये भरत लोकाऽपवाद-हत तो कार्य साधुनि सरे

---

१ पुत्ररूप स्मरता. २ मोठें स्थान. ३ पातकरूप वाऱ्याला सर्प. ४ मावला. ५ रक्षणकर्ता. ६ ब्राम्हणत्वाला स्थान. ७ प्रसवला. ८ स्वशत्रुरूप काळसर्पाचा गरुड. ९ तृप्त झाला. १० पृथ्वी. ११ ललाटाच्या ठायीं नेत्र ज्याला अशा महादेवाचें धनुष्यहि. १२ सीता. १३ तेजा. १४ गृहासि. १५ वांकडी कैकेयी. १६ आश्रित सेवकांचा आनंद किंवा उत्साह. १७ बालका. १८ गृहास.

⁂ याचा अंत्य घाटी छंद आहे.

ओकारि आइ सम धीका करी बहु अहो काव्य भैं पद तया
हो कामद श्रित विलोका म्हणे प्रभुसि झोंका न हा म्हणु त्या
व्योपास दे सदय त्यो पादुका हरूनि तापास पाठवि पुरा
बापास तेविं नमि मापाल अग्निस उमापा श्रमा करि चुरा
सापा तसाच वश शापा विराध गतिला पाववी बहु-मुनि-
व्यापार-भी-घ्न सुख पापारि दावि घटजा पाद-पद्म नमुनि
पाहे जटायु खग बाहे म्हणे तनय आहेस जाय वसती
बा हे तुझीच वसला हे प्रमोद विभु राहे निवे बहु सती
बाहे कुबुद्धि वधु या हेय तें प्रभु न साहे विरूप करवी
स्वाहेशसाचि शुचि बाहेर घालि तिस माहेर ती न उरवी ७
जो राक्षसेंद्र खळ चोरा तया परम-घोरा सतीहि गवसे
होरा गणी कुमति तो रावण क्षुधित मोरा मंदें अहि डसे
भो रांझि भेटच नको राग दावुं चिर धोरा जनीं नच बसे
स्वोरा म्हणे न दृढ हो राम केवळ चकोरास चंद्र न दिसे ८
अक्षीणहार्द विभु आक्षे श्रितीं वमवि पक्षी पित्यासम करी
स्व-क्षीर-शब्द-यश लक्षी कबंध-वधिं न क्षिप्र सोडि शबरी
भक्षी फळें स्व-निधि यक्षीस दे सुगति रक्षी पदानत हरी
प्रक्षिस बाण कपि-वक्षीं शिरे दहन केक्षीं तसा असु हरी ९
रुद्रावतार न समुद्रास भी द्विषदसुद्रावक हनुगती

---

१ आश्रित. २ पहा. ३ वि-आप-उदक रहित जो भरत त्याला. ४ नगर
५ लक्ष्मीपति रामतो. ६ अनेक ऋषींच्या यज्ञयागादि व्यापारांला (उद्योगांला) जें भय त्याचा नाश कर्ता. ७ अगस्त्यमुनीला. ८ बोलावी. ९ रहाण्याचें स्थान, घर. १० त्याज्य. ११ अग्निसाच. १२ शब्द. १३ शूर्पणखेस. १४ मुहूर्त. १५ हे राजस्त्रिये. १६ स्व-उर-आपल्या वक्षस्थळाला. १७ क्षीण न झालें प्रेम ज्याचें असा. १८ नेत्र. १९ आश्रि[illegible]. २० टाकलेला, सोडलेला. २१ अग्नि. २२ तृणीं. २३ प्राण. २४ हरण करी
२५ द्विषत्-असु-द्रावक-शत्रूंचे प्राण वाहविणारा.
ः चोका असा पाठ आहे.

मुद्राऽर्पणें [1]ऊनि उद्रोक्षसाधि करि मुद्रेशिरी तो बुध सती
सुद्राक्षयाक श्रुति न दृढ्द्रा जिरे सति न रुद्राक्ष-राजि उचिता
क्षुद्रा वदे कपि मरुद्राज पाहुनि सुमुद्रा तसीच रुचिता १०
अंकातिवीर्य-पर-कंका मराल पवि-टंकाऽति-तीक्ष्ण-नरवर
डंका करी शमन-संकाश जाळि वर-लंकाख्य-शत्रु-नगर
रंका तसें नगणि पंकाधिला त्यजुनि शंका शिवे परिभवा
अंका न दास्यविदलंकार तो हरि कलंका यशें अरिभवा ११
श्रीराम भेटुनि समीरलजा जलधि-तीरास जाय सबळ
सीराख्यिसें यश करी रावणाऽनुजनिची राहवी तळमळ
वीराद्य सेतु रचवी राक्षसांसकट भी रावणास धरवी
धीरार्य-मौलि-मणि-नीराजितांघ्रि विभु ही राजरीति करवी
दूना न मानि पुरुहूताऽरि मंद-मति पूता मता नच वळे
चूता त्यजूनि वरि तूता स्व-मंत्र-हत-भूतापरीच खवळे
खेताभवा न गज सूता धरे प्रभु चमू तापवूनि खपवी
धूता मला नमनि भू तारिता द्रुहिण-सूता यशांत लपवी
सेना रणांत बहु सेनो सदा खपति येना कधीं जय करा
श्येनापुढें चटकसे नाशले सुभट वेनाधिकोद्धत खरा
जे नाश-हेतु गुरु ते नाग-पाश-मुख फेना अपाय हसले
मेनासुताप्तनुति देना स्वहानि सुइजेनो तयास न सले १४

---

१ उत्-राक्षस-आधि-मोठीराक्षसरूपमनोव्यथा. २ सुत-रात्रि-आनंदाचा रात्रि. ३ चांगलीद्राक्षारूपवाणि. ४ रुद्राक्षांचीपंगत. ५ हंस. ६ वज्र, टांकी यांपेक्षां अतितीक्ष्णनखरें ज्याचीं असा. ७ यमसदृश. ८ दोषाला, किंवाशेवाळाला. ९ दास्यवित्-अलंकार-दास्यजाणत्यांमध्यें अलंकारअसा. १० मारुति. ११ हरणकरी. १२ इंद्रशत्रु (इंद्रजित.) १३ पवित्र. १४ आम्राला. १५ तूतवृक्षाच्याफळाला. १६ कोळ्यापासूनझालेल्या. १७ सूर्याला. १८ महादेवाला. १९ स-इना-धन्यासहितअशी (सेनाआश्रयाचें विशेषण) २० चिमण्यांसे. २१ मेना-सुत-आप्त-नुति मेनाकपर्वतापासूनमिळालीस्तुतीज्याणें असामारुति. २२ मेंढा. बकरेंइत्यादिकांचें लोंकरीसखवळ्लाबूनलाडून जेंवस्त्रकरितात त्याला.

ह्राणी[1] पयोदरव पायी असें म्हणवि न्हाणी बळ[2] क्षतें[3]भवें
वाणीं स्विळी अगद[4] आणी प्रमोह-नग खाणी मरुत्सुत लवें
द्रोणीं[5]द्र-धी निवचि वाणी: समेत शिवे[6]राणीहि साधु वदली
गायीं शची[7]हि रचि वाणी-शिवार्थ कपि जाणीव शक्ति वदली.
[8]स्वांतरी-सबंधु-सुत मारी प्रभु स्व-हत तारी दया बहु करी
वारी जनु[9]र्मरण सारी अघें परम भारीहि दुर्मति हरी
[10]नारी वरी सुखवि स्वारी सुधा गमवि चारी यश त्रिभुवना
हा रीति चाप-शर-धारी असी प्रकटि सौरी[11] वरी कविमना
[12]प्राज्यानुकंप करि राज्याधिकार बहु वाज्या[13]दि दे द्विजजना
आज्यासि होमि मुनि याज्यांनि मुख्य मग ह्या ज्यां[14] न ओढि दमना[15]
त्याज्या न त्या भजति या ज्या प्रजा गमि विभाज्या[16] तयां करि महा
आज्यादि दीक्षित धराज्यानिजित् त्रिदश-राज्यार्ति-नाशक महा १७
व्हावें कृतार्थ जनुं जावें लयासि अघ यावें महागति-मना
ध्यावें विशुद्ध यश गावें जगीं न तरि भावें दशास्य-दमना
ध्यावें स्वतत्व उमगावें असेंच रुचि गावें असें गुरु-मुखें
पावें प्रभो म्हणुनि नावें सदा जपत गावें चरित्रचि सुखें १८
धाया मयूर-मतिला या यशीं शिरवि माया-नियामक बळें
गाया तरीच गुण हा यामिनी-दिवस नायास नाकुळ खळें

---

१ मेघनाद, इंद्रजित. २ सैन्य. ३ रक्त. ४ औषध. ५ माणि इंद्र-धी-मनुष्येंद्र जो राम त्याची बुद्धि. ६ पार्वतीहि. ७ इंद्राणीहि. ८ आपला शत्रु रावण तो. ९ जनुः मरण-जन्ममरण. १० पार्वती. ११ श्रेष्ठा (रीति शब्दाचें विशेषण.) १२ प्राज्य-अनुकंप-पुष्कळ दयाळु असा राम. १३ वाजि-आदि-घोडे इत्यादि. १४ धनुष्याची दोरी. १५ दमविण्याला. १६ विभाग करण्यास योग्य. १७ जन्म.

कायादि सर्ग रघुराया समर्पुनि निवाया सुबुद्धि सजले
माया करी प्रभुचि दायादसे भजक पायां म्हणोनि भजले १९

समाप्त.

∴

## विचित्र रामायण प्रारंभ.

[1]नयाऽब्धि सुकवी कवि-प्रिय करी  करीशतम[2]हो म[3]होदय हरी
सुकीर्ति परमा र[4]माप मिरवी  र[5]वीडितमहा म[6]हास्पद नवी  १
[7]अजात्मजनु तो [8]नुतो[9]दय [10]भवें  [11]भवें करि [12]मही [13]महीष्ट [14]विभवें
[15]शिवें दे [16]मुनि-सयास वारुनि अरी  अरिति धरिते [17]रिते प्रभु करी
करी मुनि-सतीस तीर्थचि हरी [18]हरी अघ-नगा न गाति दुसरी
उमादिक [19]सुरी सुरीति नवरी वरी धनुस तो [20]सतोषहि चुरी ३
[21]जिंणी भृगुवरा [22]वराभयद[23]यो  दया त्यजवि [24]भूविभूति [25]सदया
वरी [26]सदवना वनासि नसुनी  मुनी रमविता [27]विता सुर[28]धुनी ४

---

१ करि-ईश-तम-गजेंद्राचें अज्ञान. २ राम. ३ मोठा दयाळु. ४ लक्ष्मीपति. ५ रवि-ईडित-महा रवीसारिखें स्तुति करण्यास योग्य किंवा रवीनें स्तुति करण्यास योग्य तेज ज्याचें असा. ६ मह-आस्पद-आनंदाचें किंवा उत्सवाचें स्थान असा (रमापया शब्दाचें विशेषण) ७ अज-आत्मजनु- अजराजाचा पुत्र. ८ दशरथ. ९ नुत-उदय-स्तविली वृद्धी ज्याची असा. १० महादेवें. ११ कल्याणरूपें (विभवें या शब्दाचें विशेषण) १२ आनंदी असा (अजात्मजनु या शब्दाचें विशेषण) १३ महि-इष्ट-पृथिवीचें इष्ट. १४ ऐश्वर्यानें. १५ कल्याण. १६ विश्वामित्राच्या यज्ञास. १७ रिकामें. १८ हरणकरी. १९ देवस्त्रिया. २० आनंदयुक्तहि. २१ जिंकी. २२ वर आणि अभय देणारा राम तो. २३ रामाला. २४ पृथ्वीचें ऐश्वर्य असी (दया या शब्दाचें विशेषण). २५ दयायुक्त अशा (या या शब्दाचें विशेषण). २६ सत्-अवन- साधूंच्या रक्षणास. २७ प्रसवता. २८ भागीरथी.

∴ याचा जलोद्धतगती छंद आहे.

त्यजी असु पिता पिता गुण सुतां सु तापवि कुधी कु धीर-विनुता
न मोहि भरता रता स्व-भजनीं जनीं रघुप या पथीं पथ मनी
तपस्विजनता न तापप्रद या दयालु-नमनें मनें धरि अया
म्हणे स्वसुख गा खगा न खचरी चरित्र वरि ती रिती प्रभु करी
वधी प्रभु खरा खरा कनककसा कसा मिरविता विता भ्रम-रसा
रसा-जनि-मना मनाक् मृगपणें पणें हरितया तया बळकणें
स्वपत्यऽवरजा रजापरिस ती सती लघु करी करीश्वर-गती
नशांत जपला पळाशन तिला तिलोदप-रुचि नेचि नेष्ट-गतिला
जटायु शरणा रणा करि परा पराभवि नया न यातुप वरा
उपध्यनवधी वधी पळवि ती विती जग पराऽपराधि गिळिती
कपींत जगती-गति त्यजि नगा नगावरि वरा वरा रचि लगा
पुरींत वसती सतीस करितें रितें गृह अही अहीन हरितें१०
अवाच्य कविला विलाप नरसा रसाजनिप हा पहात सहसा
वनीं पितृ-सखास खाजिरनटा नटाकि महिमा हि गाय सुभटा

---

१ प्राण. २ बापदशरथ. ३ आह्वानकर्ता. ४ पुत्रजोभरत त्याचे प्राण. ५ दुर्बुद्धिकैकेयी. ६ पृथ्वि. ७ तपस्विजनसमूह. ८ भ्रमदेवाला. ९ खरराक्षसाला. १० सुवर्णसा. ११ कसोटीला. १२ भ्रमवता. १३ भ्रांतिरसा. १४ सीतेच्यामना. १५ किंचित्. १६ मृगरूपपणानें. १७ हरणकरणाऱ्या. १८ मारीचा. १९ किंचितबळानें २० लक्ष्मणास २१ सीतेला. २२ तिलोदकाचीरुची. २३ उपधि- अनवधि- अमर्याद कपट. २४ सीता. २५ अलंकाराला. २६ पर्वतावरि. २७ नबोलण्यासारिखा. २८ पृथ्वीपासून झाली जी सीता तिचा रक्षकरामतो. २९ दशरथाचा सखा जो जटायु त्याला. ३० आकाशरूप अंगण्यासंबंधीनट असा खाजिरनटा याशब्दाचें विशेषण). + आसक्ता (भरता याशब्दाचें विशेषण.) ## जटायूला. ॥ राक्षसी (शूर्पणखा) + खरेश्वर. # कोणत्याही कार्याकरितां केला जो प्रतिज्ञापूर्वक नियम त्यानें.

